श्रीः

कविवर्य

# मोरोपंतांचे समग्र ग्रंथ.




६

# कृष्णविजय.

संपादक व प्रकाशक

रामकृष्ण दत्तात्रेय पराडकर.

मुद्रक

अच्युत चिंतामण भट.

'यशवंत'

छापखाना पुणें.

सन १९१४

# प्रस्तावना.




जगच्चालक परमेश्वराच्या कृपेनें व महाराष्ट्रीय जनांच्या सदिच्छापूर्ण उत्तेजनानें मोरोपंतांच्या समग्र काव्यग्रंथांचा हा दुसरा हप्ता **हरिवंश, मंत्रभागवत** व **कृष्णविजय** ह्या तीन ग्रंथांच्या रूपानें प्रसिद्ध होत आहे ह्याबद्दल आम्हास अत्यंत संतोष वाटतो. वास्तविक म्हटलें तर संतोष व उद्वेग हे दोन्ही विकार च असून ते मनुष्याच्या अहंभावनेमुळें उत्पन्न होतात, असें वेदान्तमत आहे. ज्या परमेश्वराला आम्ही 'जगच्चालक' म्हणजे अखिल ब्रह्मांडाचीं सूत्रें चालविणारा असें म्हटलें, त्यानें च सिद्धीस नेलेल्या कार्याबद्दल आम्हाला संतोष वाटण्याचें व तो आम्ही व्यक्त करण्याचें वेदान्तमतें पाहतां खरोखर कांहीं कारण नाहीं. तथापि, ' सर्व कर्ता जगदीश ' हा सिद्धांत मान्य असून हि ' मी कर्ता ' असें म्हणण्याचा मोह मनुष्याला आवरत नाहीं. इतकें च नव्हे तर, ' मी कर्ता ' असें म्हटल्याशिवाय आपला व्यवहार चालावयाचा नाहीं, आपलें जीवन च शक्य नाहीं, असें देखील त्याला वाटतें. कोणा एका उद्दिष्ट कार्यांत लोकानुकूल्य मिळालें तर तें ईश्वरी प्रेरणेनें मिळालें असें तो एका तोंडानें म्हणेल; पण त्याची वृत्ति–त्याचा मूळ स्वभाव–त्याचेकडून असें वदवील कीं, हा सर्व तुझ्या दीर्घप्रयत्नाचा व चतुराईचा प्रभाव आहे. अशा प्रकारें आंदोलन पावण्याचा मनाचा स्वभाव असतां हि आम्ही प्रांजलपणें असें म्हणतों कीं, आतांपर्यंत सिद्धीस गेलेला कार्यभाग हा श्रीसमर्थांनीं म्हटल्याप्रमाणें ' जनीं ' तत्त्वरूपानें असलेला ' जनार्दन बोलल्यामुळें च ' सिद्धीस गेलेला आहे व अवशिष्ट कार्यभाग हि त्या च जनार्दनाच्या कृपेनें सिद्धीस जाईल ह्याविषयीं संशय नाहीं.

तथापि, स्वामी विवेकानंद म्हणतात कीं, " मला एका गोष्टीबद्द
मात्र कांहीं कानमंत्र सांगावासा वाटतो. हिंदुस्थानांतील दहापांच मनु
एकत्र होऊन कांहीं उद्योग करूं लागली म्हणजे जी एक चूक बहु
नेहेमीं करतात, ती चूक त्याना शेवटीं गोत्यांत घालून कार्याचा हि फड
पाडते. आमच्यांत अद्यापि खऱ्या व्यापारी तत्त्वांचा प्रवेश च झालेला ना
धंदा म्हटला कीं तो धंदा च. तो च त्या वेळीं परमेश्वर. त्यांत स्नेहसं
आड येतां उपयोगीं नाहीं. हें लक्षण आम्हा हिंदूंत अद्यापि आढ
नाहीं. 'हा माझा अमका; याची भीड कशी मोडावी ?' 'हे के
**बायकोचे साले, तुपावेगळा घांस न गिळे !'** अशा प्रकार
भिडेचें दडपण एकाद्या उद्योगावर पडलें कीं, त्याखालीं त्याचा
चुराडा होण्याला वेळ किती ? असली भिकारी लाज प्रथम सोडून द्या. हि
नेहेमीं चोख राखीत जा. आपल्या ताब्यांत जें कांहीं द्रव्य असेल त्
हिशेब पैपर्यंत बरोबर ठेविला पाहिजे. ज्या कार्यासाठीं जें द्रव्य जमा
त्याचा उपयोग त्या च कार्याला झाला पाहिजे. उपाशीं मरण्याची
आली तरी प्राणरक्षणार्थ सुद्धां त्यांतल्या दमडीला हि बोट लावूं नये
एका कार्याखेरीज दुसऱ्या कशाकडे हि त्यांतील एक कवडी सुद्धां
उपयोगीं नाहीं. याला म्हणतात धंद्यांतला चोखपणा. हा आमच्या
केव्हां येणार ? भीड तोडावयाला आम्ही केव्हां शिकणार ? दुसरी
त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे चिकाटी. जी गोष्ट हातीं धरली तिला
सारखें चिकटून रहावयाचें. ध्यानीं, मनीं, स्वप्नीं ती एक च गोष्ट.
गोष्टीची अव्यभिचारी भक्ति करावयाची; ती गोष्ट सोडून मन दुस
भरकटलें कीं, व्यभिचाराचें पातक घडलें च. हें मासिक हा च
तुमचा परमेश्वर; अशी भक्ति असली तर यश तुमचें च आहे
निराळें सांगावयास पाहिजे ? "

अवतरणांकित मजकूर हा स्वामीजींच्या एका खाजगी पत्रांतील आहे. तथापि आमच्यासारख्या होतकरू पिढीला तो चांगला मार्गदर्शक असल्या-मुळें च त्याचा खाजगीपणा जाऊन तो जाहीर झालेला आहे, व आम्हीं हि त्या च दृष्टीनें येथें त्याचा समावेश केला आहे; असो.

पहिल्या हप्त्याच्या रूपानें निघालेल्या आर्याभारताच्या प्रस्तावनेंत ह्या कार्याला कोणाची कसकशी मदत झाली व होत आहे ह्याचें सविस्तर कथन केलें आहे. येथें हि त्याची च पुनरुक्ति करण्याचें कांहीं कारण नाहीं. तथापि, जे नवीन सहायकर्ते लाभले त्यांचा नामनिर्देश करणें उचित आहे. रा. रा. गोविंद सखाराम सरदेसाई (कोल्हापूर) ह्यांचा काम-धंद्याचा व्याप मोठा असून हि त्यानीं सवड करून हरिवंशाच्या टीपा व उपोद्घात लिहून आपली मयूरभक्ति प्रत्ययास आणून दिली. तसें च रा. रा. शंकर बळवंत सहस्रबुद्धे बी. ए. व त्यांचे स्नेही कै. रामचंद्र विष्णु चक्रदेव एम्. ए. ह्यानीं मंत्रभागवतावरील टीपांचें काम केलें. रा. चक्रदेव ह्यांच्यावर काळानें आपला पाश टाकण्याची इतकी घाई केली नसती तर त्यांचे हातून बरी च वाङ्मयसेवा झाली असती, अशा प्रकारचे ते गृहस्थ होते. कृष्णविजयासारख्या गहन ग्रंथावरील टीपांचें व उपोद्घाताचें काम आमचे विद्वान् मित्र व अगदीं आरंभापासूनचे सहायकर्ते वे. शा. सं. काव्यालंकार-भूषण बाळशास्त्री खुपेरकर ह्यानीं केलें आहे. कृष्णविजयाची विषयानुक्रमणिका रा. रा. गजानन सदाशिव जोशी बी. इ. ( बर्कूले गोल्ड मेडॅलिस्ट ) ह्या आधुनिक कवींच्या हस्तें तयार झाली. हरिवंश व मंत्रभागवत ह्यांची विषयानुक्रमणिका आणि मंत्रभागवताचा उपोद्घात आमचे इतिहास-संशोधक मित्र रा. दत्तो वामन पोतदार बी. ए. ह्यानीं लिहिला. रा. पोतदारांची सूक्ष्मदृष्टि व मार्मिकपणा, त्यानीं च तयार केलेल्या आर्याभारताच्या विषयानुक्रमणिकेवरून हि दिसून आला च आहे. रा. रा. विनायक महादेव भुस्कुटे ह्यांचा हरिवंशाचे वेळीं विचारविनि-

मयाला चांगला उपयोग झाला. तसें च रा. रा. बाळकृष्ण भाऊ जोशी 'यशवंत' छापखान्याचे व्यवस्थापक ह्यांचा हि त्यांच्या काव्य-प्रियतेमुळें कृष्णविजयाचे वेळीं कांहीं उपयोग झाला. ह्या सर्व मंडळींनीं स्नेहभावपूर्वक जी मदत केली, ती केली नसती तर कामाचा उरक पडला नसता, व निरानिराळ्या मित्रानीं आरंभीं टीपा वगैरे तयार केल्यामुळें त्यांच्या साधकबाधकतेविषयीं विचारपूस व चर्चा करण्याची जी कांहीं संधि मिळाली ती हि मिळाली नसती. अर्थात्, ह्या सर्वांचे त्यांच्या उपकृतीबद्दल आम्ही ऋणी आहों.

येथें हें हि नमूद करून ठेवणें अवश्य आहे कीं, मलवडी (जिल्हा सातारा) येथील रा. बळवंत बाबूराव कुलकर्णी, अक्कलकोटचे रा. विष्णु बाबा अक्कलकोटकर व वाईचे रा. शंकर नारायण जोशी ह्यानीं फिरते एजंट ह्या नात्यानें मनःपूर्वक काम केलें. ह्या मंडळींनीं केवळ धंद्याची दृष्टि न ठेविल्यामुळें च त्यांच्या परिभ्रमणानें ह्या विषयासंबंधानें लोकांत जागृति उत्पन्न होऊन सहानुभूति हि वाढली.

मोरोपंतांचा प्रचंड कवितासंग्रह योग्य रीतीनें छापून काढण्या-सारखें काम केवळ द्रव्यबळावर किंवा केवळ मनुष्यबळावर निभण्यासारखें नसून, या दोन्ही बळांचा योग्य मिलाफ होण्यावर अवलंबून आहे अशी आमची समजूत आहे. सुदैवानें ह्यांपैकीं एका बळावर म्हणजे मनुष्यबळा-वर ह्या योजनेची उभारणी झाली आहे, व तसें होणें हें च इष्ट आहे. कारण, द्रव्यबळापेक्षां मनुष्यबळ श्रेष्ठ आहे हें निर्विवाद आहे. तथापि, द्रव्यबळाचें हि महत्त्व कार्यसिद्धीच्या दृष्टीनें नाकबूल करून चालत नाहीं. अशा रीतीनें अंतःस्थिति उघड करून दाखवावयाची म्हटलें तर, प्रस्तुत कार्याच्या अभिमान्याना व हितचिंतकाना एवढें कळविणें जरूर आहे कीं, ह्या कामीं आतांपर्यंत मिळालेलें सांपत्तिक पाठबळ पुष्कळ च अपुरें आहे. ह्या च मुद्यावर एका 'मातृभाषाहितेच्छूनें' लोकशिक्षणमासिकाच्या

आषाढ शु० १० श० १८३६ च्या अंकांतील आपल्या लेखांत काढलेले पुढील उद्गार वाचण्यासारखे आहेत.

" हल्लीं कविवर्य मोरोपंत ह्यांचे वंशांतील एक गृहस्थ पंतांच्या काव्याची खुद्द हस्तलिखित प्रतीवरून तयार केलेली आवृत्ति प्रसिद्ध करीत आहेत. ह्या आवृत्तीच्या प्रती खपविण्यासाठीं त्यांचेमार्फत एक गृहस्थ गांवोगांव फिरत आहेत. त्यांचे तोंडून असें कळलें कीं, काव्यग्रंथांच्या फक्त ३००० प्रती काढल्या असून कायमचे ग्राहक सुमारें दीड हजाराचे आंतबाहेर आहेत. अशा प्रकारच्या आवृत्तीला सगळ्या महाराष्ट्रांत अवघे ३००० ग्राहक मिळूं नयेत ही खरोखर च मोठ्या शरमेची गोष्ट आहे! इंग्लंडमध्यें अशी गोष्ट झाली असती तर, असल्या पुस्तकाच्या लाखों प्रती खपल्या असत्या; परंतु इकडे प्रकाशकाला प्रती खपविण्यासाठीं गांवोगांव व दारोदार फिरावें लागत आहे!"

ह्यापेक्षां अधिक कांहीं लिहून आपली नाउमेद व्यक्त करण्याची आमची इच्छा नाहीं. कारण, आम्हांस असा भरंवसा आहे कीं, आमचे स्वभाषाभिमानी महाराष्ट्रीय बंधु, आमचें सरकार, आमचे संस्थानिक व राजेरजवाडे हे योग्य तें सहाय करून कार्य तडीस नेल्याशिवाय रहावयाचे नाहींत. ह्या बाबतींत मुंबईसरकारनें दाखविलेल्या सहानुभूतीबद्दल त्या सरकारचे आभार मानणें जरूर आहे. मुंबईसरकारनें पूर्वी प्रसिद्ध झालेले **आर्यभारत** बक्षिस देण्यासाठीं व सर्व प्रकारच्या शिक्षणसंस्थीय पुस्तकालयांत ठेवण्यासाठीं मंजूर केलें आहे.

हा प्रस्तावनालेख पुरा करण्यापूर्वी आम्हांस एक अत्यंत दुःखदायक कर्तव्य करणें भाग आहे. तें कर्तव्य म्हणजे आमच्या सहायकर्त्यांपैकीं एका विद्वान् संस्कृतपंडिताचा मृत्यु नमूद करून ठेवणें हे होय. अर्थात च हे विद्वान् संस्कृतपंडित म्हणजे विद्यावाचस्पति अप्पाशास्त्री राशिवडेकर!

हरिवंश छापला जाईपर्यंत शास्त्रीबोवांच्या मदतीचा लाभ होत होता; इतकें च नव्हे तर, हरिवंशाच्या अखेरच्या अध्यायांतील वेदान्तविषयक रूपक सुबोध करण्याकरितां त्यानीं लिहावयास घेतलेल्या परिशिष्टाच्या आड जर मृत्यु आला नसता, तर त्यांच्या मौल्यवान् मदतीचें महत्त्व वाचकाना उघडपणें कळलें असतें; पण दुर्दैवानें तसा योग आला नाहीं !

असो. ह्या अस्थिर जगांत कशाचा च भरंवसा नाहीं. आज अप्पाशास्त्रीबोवाबद्दल दुःखोद्गार काढण्याचा प्रसंग आला. उद्यां हे दुःखोद्गार काढणाऱ्याबद्दल हि काय उद्गार काढण्याचा प्रसंग येईल हें कोणी सांगावें ? काळाच्या अपार उदरांत दडी देऊन बसलेला भविष्यकाळ मनुष्याला अज्ञेय आहे. तथापि चालू कार्याविषयीं मात्र इतकें निर्भ्रांतपणें म्हणतां येईल कीं,

'बहुतांचें संकल्पित जें तें होतें चि निश्चयें कार्य'

ह्या पंतवचनाप्रमाणें 'बहुतांचें संकल्पित' झालेली योजना सिद्धीस जाणें हें व्यक्तिमात्रावर मुळीं च अवलंबून नाहीं.

संपादक.



श्रीशः शरणम् ।

# उपोद्घात.

[ लेखकः—काव्यालंकारभूषण बाळशास्त्री खुपेरकर ].

**जयन्ति ते सुकृतिनो रससिद्धाः कवीश्वराः**
**नास्ति येषां यशःकाये जरामरणजं भयं ॥ १ ॥**

या अखिल चराचर सृष्टीमध्यें अशी एक हि वस्तु नाहीं कीं, जी चिरकाल राहूं शकेल. प्रातःकालीं आपल्या अतुल परिमलानें सर्व जीवांस संतुष्ट करणारीं नयनमनोहर अशीं फुलें पुनः सायंकालीं पाहिलीं असतां अगदीं कोमेजून अंतःकरणांत अत्यंत उद्वेग उत्पन्न करितात. तसें च, सर्व जगतीतलास आपल्या प्रकाशमय किरणानें अंधकारमुक्त करणारा तेजोराशि भास्कर कालगतीच्या फेऱ्यांत सांपडून त्यास नामशेष होण्याची वेळ येते. ज्यानीं आपल्या प्रचंड पराक्रमानें सर्व पृथ्वीमंडळ पादाक्रान्त करून आपल्या यशाचा डंका दिगंतरीं गाजविला, ज्यानीं आपल्या उदारपणानें कर्णास हि लाजविलें, ज्यांचें ऐश्वर्य पाहून कुबेरास हि हेवा वाटूं लागला असे हजारों शूर, वीर, उदार, श्रीमान पुरुष आजवर होऊन गेले; पण आज मागें त्यांचा कांहीं मागमूस तरी राहिला आहे काय? तात्पर्य इतकें च कीं, या अस्थिर संसारामध्यें चक्रनेमिक्रमानें सर्वांना सुख-दुःखाची प्राप्ति होत असते. असा एक हि पदार्थ नाहीं कीं, जो कांहीं वर्षें, कांहीं महिने किंवा कांहीं दिवस, फार काय पण कांहीं परिमित काल तरी स्थिरपणें सुखाची जोड करून देईल. प्रत्येक वस्तूचे मागें बाल्य, तारुण्य व वार्धक्य हें अवस्थात्रय सारखें लागलेलें च आहे. श्रीमदाचार्यांनीं सर्व

अज्ञ जीवाना उपदेश करीत असतां आपल्या चर्पटपंजरीमध्यें "दिनयामिन्यौ सायं प्रातः शिशिरवसंतौ पुनरायातः" याप्रमाणें कालगतीचें फार समर्पक वर्णन केलें आहे. अशा या जगद्भक्षक कालापुढें कांहींनीं आपलें दुर्बलत्व कबूल करून नम्रभावानें हात जोडले, तर कांहींनीं याजवर हि आपली सत्ता गाजविण्याचा प्रयत्न केला. कालाचा मारा आपल्यावर होऊं नये म्हणून त्या महात्म्यानीं पांचभौतिक देहाखेरीज दुसऱ्या च एका देहाचा स्वीकार केला. असे कालाच्या हातावर तुरी देणारे देहद्वयधारी दिव्यपुरुष या मृत्युलोकीं च राहणारे असून, शिरोभागीं उल्लेखिलेल्या श्लोकांत वर्णिलेले ते रससिद्ध कवीश्वर च होत.

"ते वंद्यास्ते महात्मानस्तेषां लोके स्थिरं यशः ।
यैर्निबद्धानि काव्यानि ये वा काव्येषु कीर्तितः ॥"

असें कविजनांविषयीं कोणीं उद्गार काढले आहेत ते अगदीं बरोबर आहेत.

२. एकंदर वाङ्मयाकडे स्थूलमानानें दृष्टी फेंकली असतां त्याचे तीन प्रकारानें विभाग करितां येतात. कांहीं वाङ्मय शब्दप्रधान असतें, कांहीं वाङ्मय अर्थप्रधान असतें व कांहीं शब्द आणि अर्थ या दोहींस हि प्राधान्य न देतां तिसऱ्या च अर्थास प्राधान्य देणारें असें असतें. यांतील पहिल्या दोन प्रकारांचा प्रस्तुत प्रकरणीं कांहीं उपयोग नसल्यानें त्याविषयीं अधिक कांहीं लिहिण्याचें प्रयोजन नाहीं. तिसरा प्रकार हा च 'काव्य' या शब्दानें प्रसिद्ध असा आहे. ज्या वाक्यांतील वरवर दिसणाऱ्या अर्थापेक्षां त्यांतील गूढार्थानें च अधिक आल्हाद होतो त्यास उत्तम काव्य म्हणतां येईल. काव्याचा रस आत्मा आहे. तो रस व्यंग्यार्थानें च प्रतीत होईल तर त्यापासून आनंद उत्पन्न होईल. कुलवती स्त्री जशी आपल्या पतीला स्वमनोगत उघड शब्दानीं न सांगतां प्रथम मधुर व विनयशील अशा भाषणानें त्याचें चित्त वश करून घेऊन नंतर पर्यायानें सुचविते, तसें च

काव्य हें हि कर्णमनोहर अशा शब्दध्वनीनें व अलंकारपूर्ण अशा अर्थानें सुकुमारमति तरुण जनांचें चित्त आकर्षित करून त्याना नीतिशास्त्राचा उपदेश करीत असतें. मनुष्याची स्वाभाविक प्रवृत्ति सुखानुसंचारी असल्यानें शरीरकष्ट सोसण्याचा त्यास फार कंटाळा येतो. म्हणून त्यास उपदेश करणें तो मनोरंजक रीतीनें च करणें अवश्य असतें. नीरस अशा केवल नीतिशास्त्राच्या अनेकग्रंथवाचनानें जें काम होणार नाहीं, तें काम उदारचरित अशा धीरादोत्तनायकगुणवर्णनात्मक सरस काव्यवाचनानें सहज होणार आहे. रोगनिवारणार्थ कोणी चतुर वैद्यानें प्रत्यक्ष कडु औषध देण्यापेक्षां तें च जर शर्करावगुंठित करून दिलें तर कोणता रोगी त्याचें सेवन करणार नाहीं ? तात्पर्य, काव्यपरिशीलनानें दिव्य आनंदाची प्राप्ति होऊन शिवाय व्यवहारचातुर्याची हि जोड होते. आतांपर्यंत वर्णन केलेल्या काव्यापासून अर्थ, काम वगैरेची प्राप्ति होऊन कलादिकांमध्यें कौशल्य संपादितां येईल. परंतु मानवजन्माचें इतिकर्तव्य केवळ शारीर सुख संपादण्यांत च पुरें होत नाहीं. मनुष्यानें कांहीं तरी आपलें पारमार्थिक कल्याण हि साध्य करून घेतलें पाहिजे. जसे नीतिशास्त्राचे अनेक ग्रंथ आहेत, तसे च केवळ परमार्थाचा हि उपदेश करणारे आपल्या महाराष्ट्रभाषेंत अनेक ग्रंथ तयार झाले आहेत. विद्वान् व व्यासंगी लोकाना त्या तत्त्वग्रंथांचा उपयोग होत च असेल; परंतु सामान्य जनाना त्यांचा कांहीं फारसा उपयोग होत नाहीं. म्हणून अशा लोकाना भक्तिरसभरित काव्यग्रंथांच्या द्वारें परमेश्वराच्या गुणांचें ज्ञान करून देऊन पुरुषार्थचतुष्टयांतील प्रथमपुरुषार्थ जो धर्म त्याची अनायासें प्राप्ति करून देणारे जे कांहीं थोडे कवि आपल्या महाराष्ट्रभाषेमध्यें झाले आहेत त्यांमध्यें च श्रीमन्मयूर ऊर्फ पंत हे प्रमुख होत.

३. पंतांचा कवितासमुद्र अफाट पसरला आहे. त्याचें समग्र आलोडन करण्याचा आजचा प्रसंग नाहीं व आम्हामध्यें तितकें सामर्थ्य हि

नाहीं. सांप्रत, पुण्यास पंतवंशांतील च एक रसिक व दीर्घोद्योगी गृहस्थ श्री. रामकृष्ण दत्तात्रेय पराडकर पंत यानीं प्रकाशित करण्यास सुरुवात केलेल्या मयूरकवीच्या समग्रकाव्यग्रंथमालेंतील सहावा खंड **श्रीकृष्ण–विजय** याविषयीं च आम्हांस थोडा विचार करावयाचा आहे.

४. महाभारत आणि रामायण या आपल्या वैदिक धर्मीयांच्या ग्रंथांप्रमाणें च पंतानीं श्रीमद्भागवताचें हि काव्यरूपानें ग्रथन केलें आहे. द्वादशस्कंधात्मक समग्र भागवतावर 'मंत्रभागवत' या नांवाचा 'नमो भगवते वासुदेवाय' या मंत्रानें अंकित असा एक स्वतंत्र ग्रंथ पंतानीं निर्माण केला आहे. केवल दशमस्कंधावर कृष्णचरित्रवर्णनपर असा हा दुसरा एक ग्रंथ संस्कृत दशमस्कंधाच्या अध्यायवारीनें तयार केला आहे. भागवतांतील स्फुट आख्यानांवर पंतांची निराळी च काव्यरचना प्रसिद्ध आहे. सदर कृष्णविजयाचे मूलग्रंथाप्रमाणें च पूर्वार्ध आणि उत्तरार्ध असे दोन विभाग कल्पिले आहेत. तसें च अध्यायसंख्या हि पूर्वार्ध ४९ व उत्तरार्ध ४१ मिळून दोन्ही अर्धांत ९० आहे. एकंदर पद्यसंख्या पूर्वार्धाच्या अखेरचें निंदकपंचक सोडून ३६७० आहे. पूर्वार्धांतील सर्व ४९ अध्याय आर्यागीतिवृत्तांत रचिले असून शेवटचा श्लोकपंचकात्मक उपसंहार गणवृत्तानें केला आहे. तसें च पूर्वार्धाचा उपसंहार पुरा करून राहिलेल्या मूळ प्रतीच्या दुसऱ्या पृष्ठावर पांच श्लोकांत व्याजस्तुतीनें निंदकाचें वर्णन केलें आहे.

पुढें उत्तरार्धाचा आरंभ एकदम पूर्वकथाप्रस्तावानुरोधानें च केला आहे. पहिले पांच अध्याय पूर्ववत् आर्यागीतिवृत्तांत च ग्रथित केले असून ५५ अध्यायापासून श्लोकात्मक गणवृत्तास सुरुवात झाली आहे, व ती ८० अध्यायापर्यंत सारखी अप्रतिहत चालू राहिली आहे. ८० अध्यायापासून पुढें पंताना अत्यंत प्रिय व सर्व आर्यांना रुचणारें असें आर्यावृत्त अवलंबून सत्वशील अशा सुदाममुनिचरित्रास आरंभ केला आहे व तें आर्यावृत्त ८९

अध्यायापर्यंत तसें च चालू ठेविलें आहे. ८९ व्या अध्यायाचा शेवटचा श्लोक शार्दूलविक्रीडितवृत्तांतील असून पुढें पुन्हां ९० व्या अध्यायास स्रग्धरेनें सुरुवात केली आहे. या अध्यायांतील २।३ श्लोक अश्वधाटीवृत्तांतले आहेत. पुढें पुन्हां आर्यावृत्तास सुरुवात झाली असून अध्यायसमाप्तीपर्यंत तें तसें च चालू राहिलें आहे. शेवटीं उपसंहार मात्र भिन्न वृत्तांत करून ग्रंथ समाप्त केला आहे.

५. कृष्णविजयाच्या रचनाकालाविषयीं निश्चित विधान करितां येत नाहीं. तथापि त्याविषयीं एक अनुमान शक्य आहे व त्या अनुमानाला हि कांहीं प्रमाण नाहीं असें नाहीं. पंतानीं विष्णुपुराणांतील कथाभागावरून 'प्रल्हादविजय' नामक एक खंडकाव्य केलें असून त्याचें हि वृत्त आर्यागीति हें च आहे. ह्या प्रल्हादविजयावर कवीनें लेखनशक दिला आहे. तो शक १६८० पौष शुद्ध ८ शुक्रवार हा आहे. आमच्या मतें कवीनें प्रल्हादविजयापासून आर्यागीतिवृत्ताचा जो एकदा अवलंब केला तो च कृष्णविजयांत हि कायम ठेवला; म्हणजे प्रल्हादविजयानंतर लगे च कृष्णविजयास सुरुवात केली. मागें सांगितलें च आहे कीं, कृष्णविजय हा ग्रंथ पंतानीं श्रीमद्भागवतांतील दशमस्कंधाचें अध्यायवार सार वर्णन करण्याकरितां च रचिला आहे. याला च कोणी 'बृहद्दशम' असें म्हणतात. पंतानीं स्वतः मात्र याचा 'बृहद्दशम' या नांवानें कोठें उल्लेख केल्याचें दिसून येत नाहीं. सदर ग्रंथाचे शेवटीं उपसंहारांत पंतानीं "पद्माकांतपदीं च कृष्णविजयग्रंथांबुजन्मांजळी भावें वंदुनि अर्पिला" आहे, त्यावरून त्याना 'कृष्णविजय' हें च नांव इष्ट असावें असें दिसतें. दशमस्कंधावर पंताना स्वतंत्र च काव्यग्रंथ निर्माण करावयाचा असल्यानें सदर स्कंधांत प्रमुखत्वानें वर्णिलेले भगवान श्रीकृष्ण अर्थात् त्यांच्या च विजयानें ग्रंथनाम प्रकाशित करणें यामध्यें पंतांचें बरें च नामकरणचातुर्य दिसून येत आहे. आतां 'बृहद्दशम' हें नांव नक्की केव्हां उत्पन्न झालें, त्याचा जनक कोण याचा कांहा च मागमूस

लागत नाहीं. पंतांच्या दप्तरांतील एका जुन्या यादींत मात्र 'मोठा दशम पूर्वार्ध,' 'मोठा दशम उत्तरार्ध' असा कृष्णविजयाचा नामनिर्देश आढळतो. आज पुष्कळांच्या तोंडीं 'बृहद्दशम' हें नांव रूढ झालेलें दिसून येतें; करितां तर्कानें तरी त्याची कांहीं उपपत्ति लागते कीं नाहीं हें पाहणें अवश्य आहे. पंतानीं भागवत दशम स्कंधावर जसा 'कृष्णविजय' हा ग्रंथ लिहिला तसा च दुसरा हि एक मंत्रमणिखचित असा स्वतंत्र ग्रंथ लिहिला आहे. या च ग्रंथास पुढें पंतानीं पूर्वपर स्कंधांची जोड देऊन मालात्रयात्मक असें '**मंत्रभागवत**' तयार केलें. पहिले नऊ स्कंध व शेवटचे ११।१२ स्कंध यांची जोड देण्यापूर्वीं केवळ दशमस्कंधावर च पंतानीं स्वतंत्र काव्यरचना केली आहे, हें त्याच्या उपक्रम, उपसंहार वगैरेवरून सिद्ध होत आहे. मंत्रभागवतांतील दशम स्कंध च प्रथम स्वतंत्रपणें रचिला गेला, यासंबंधीं सर्व पुरावा रा. पंत पराडकर ह्यानीं भा. इ. सं. मंडळापुढें वाचून ता. २६ माहे मे १९१४ च्या केसरींत प्रसिद्ध केलेल्या आपल्या निबंधांत केला आहे. ( मंत्रभागवताचा उपोद्घात पहा ). कृष्णविजय हा ग्रंथ तयार होऊन लोकांच्या वाचनांत आल्यानंतर मंत्रभागवतांतील दशम स्कंध लोकांच्या हातीं आला. अर्थात् दोन ग्रंथ हातीं आल्यानंतर तुलनात्मक दृष्टीनें कृष्णविजय ग्रंथ वृत्त, अध्याय, पद्यसंख्या व रचनाकाठिण्य वगैरेनीं मंत्रभागवतांतील दशमस्कंधापेक्षां बरा च किंवा फार च मोठा असल्यामुळें साहजिक च त्यास 'बृहद्दशम' अशी संज्ञा मिळाली. आतां 'बृहत्' ही संज्ञा सापेक्ष असल्यानें कथासादृश्यानें पुढें येणारा मंत्रभागवतांतील दशमस्कंध 'लघु-दशम' या संज्ञेस पात्र झाला. पंतानीं स्वतः कोणत्या हि ठिकाणीं ग्रंथांत किंवा पत्रव्यहारांत वरील नांवें उपयोगांत आणलीं नसल्यानें तीं प्रचा-रांत येण्यास वरील तर्काशिवाय आम्हास दुसरा कोणता हि तर्क करवत नाहीं. प्रस्तुत ग्रंथाबद्दल दोन आख्यायिका मयूरभक्त श्री. पांगारकर

यानीं ' मोरोपंतांचें चरित्र ' या ग्रंथांत पुढीलप्रमाणें दिल्या आहेत. एक अशी आहे कीं, पंतांच्या सोप्या व सरळ भाषेंतलीं लहान लहान काव्यें वाचून त्यांचा एक स्नेही त्यास म्हणाला कीं, " ही कविता कसली ? एकादा पोर सुद्धां ही लावील." हें ऐकून पंतानीं बृहद्दशमाच्या आर्यागीति केल्या ! (विविध-ज्ञानविस्तार वर्ष ४ अंक ६ ). दुसरी आख्यायिका अशी आहे कीं, बाबा पाध्ये यांच्या सांगण्यावरून पंतानीं हा ग्रंथ रचिला. त्यांच्यासारख्या पंडितानीं सुद्धां हा ग्रंथ कठिण झाला असें सांगितल्यावरून पंतानीं मंत्रभागवत रचिलें. हा ग्रंथ यमकानुप्रासविरहित अतएव सरळ सोपा झाला आहे. वरील दोन्ही आख्यायिकांत सत्यानृताचें बेमालूम मिश्रण झालें आहे. यामुळें यांतील ऐतिहासिक सत्य निवडून काढणें फार कठिण झालें आहे. प्रस्तुत ग्रंथाचें काठिण्य या एका च मूलभूत आधारावर वरील आख्यायिकांची उभारणी झाली असावी असें वाटतें. बृहद्दशमाच्या पूर्वींचे पंतांचे काव्यग्रंथ खरोखरी च एकाद्या पोरानें सुद्धां सहज लावण्यासारखे आहेत कीं काय एवढा एक च विचार त्या आख्यायिकेचे सत्यत्वनिर्णयास पुरेसा होईल असें आम्हास वाटतें. दुसऱ्या आख्यायिकेस हि किती महत्त्व द्यावें याची सुद्धां आम्हाला शंका वाटते. कारण, बृहद्दशम हा बरा च कठिण झाला आहे; पण बाबा पाध्यांसारखे आजन्म संस्कृतभाषापांडित्यांत च आपला कालक्षेप करणारे, संस्कृतांत स्वतंत्र ग्रंथरचना करण्याचें ज्यांचे अंगीं सामर्थ्य, त्याना कृष्णविजय क्लिष्ट झाला आहे असें वाटणें अशक्य वाटतें. पंत व बाबा पाध्ये यांचा सर्वप्रसिद्ध आप्तसंबंध; दोघानीं हि दशमावर प्राकृतसंस्कृत टीका लिहिल्या. झालें ! इतका पुरावा मिळाल्यावर आख्यायिकाना काय उशीर ? परंतु अशा आख्यायिका लेखी अन्य पुरावा मिळाल्याशिवाय ऐतिहासिक चर्चेला किती प्रमाणभूत समजाव्या हें विचार करण्यासारखें आहे कवीच्या चरित्रग्रंथांत तत्संबंधीं असलेल्या आख्यायिकांचा संग्रह करणें हें ग्रंथपूर्तीच्या दृष्टीनें आवश्यक आहे,

याविषयीं मात्र कोणाचें हि दुमत होणें शक्य नाहीं. कृष्णविजय ग्रंथ मंत्र-भागवतापेक्षां कठिण कां झाला ह्याचें पुढें लवकर च आम्ही सविस्तर उपपादन करणार आहों.

६. श्रीमद्भागवत हें एक महाकाव्य आहे, हें सर्व आर्यांना विदित च आहे. अष्टादशपुराणकर्ते व्यासमहर्षि ह्यानीं पुराणें, महाभारत वगैरे ग्रंथरचना केली; तथापि मनास शांति मिळेना, म्हणून नारदमुनींकडे उपायप्राप्ती-करितां गेले. तेव्हां "भगवद्गुणवर्णनाखेरीज चित्तास शांति मिळणार नाहीं; ईशगुणानुवाद च सर्व सुखास कारण आहेत" असें सांगितल्यावरून श्रीमद्व्यासानीं सदर ग्रंथाची रचना केली. तें च हें भागवत ब्रह्मवादी व नैष्ठिक ब्रह्मचारी श्रीशुकमुनीनें राजा परीक्षितीस निवेदन केलें. भक्तिरसप्रधान ग्रंथांत याची प्रमुखस्थानीं योजना करण्यास कांहीं हरकत नाहीं. आज हजारों वर्षें याचा पठनपाठनप्रचार चालू राहिला. रामायणमहाभारता-पेक्षां हि याची योग्यता लोक अधिक समजतात. रामायणमहाभारतांचीं पारायणें झालेलीं कोठें सहसा पाहण्यांत येत नाहींत; परंतु भागवताचें पारायणें किंवा सप्ताह होत असतात, हें निदान आम्हां आर्य लोकाना तरी सांगण्याची आवश्यकता नाहीं. आसेतुहिमाचल याचा प्रसार झाला. हा ग्रंथ अतिशय प्रसादयुक्त असून काव्यगुणानीं ओतप्रोत भरलेला आहे.

**किं श्रुतैः बहुभिः शास्त्रैः पुराणैश्च भ्रमावहैः।**
**एकं भागवतं शास्त्रं मुक्तिदानेन गर्जति ॥ १ ॥**

अशी याची ख्याति आहे. शुकमुखांतून गळलेलें हें अमृत-रसमय निगमकल्पतरूचें फळ आहे. याच्या आस्वादनानें अनंत रसिकांस स्वानंदसुखाचें साम्राज्य प्राप्त झालें आहे. या ग्रंथामध्यें धर्माचें शुद्धसत्वसंपन्न स्वरूप प्रगट झालें आहे. या ग्रंथपठनानें आजवर हजारों जीवाना मुक्तिसुखाच्या मिळणींत मिळवून दिलें आहे. अनेक संसारविरक्त

ातिश्रेष्ठानीं या ग्रंथाचीं परमआवडीनें पारायणें चालविलीं आहेत. पापबहुल कलियुगांत या ग्रंथासारखें मोक्षप्राप्तीचें स्वल्प साधन अल्पज्ञ जीवाना अन्य कोणतें हि नाहीं, अशी वेदवेदान्तपारग शुकाचार्यांनीं ज्याची महती गायली, याचें वर्णन अधिक करूं पहाणें साहसाचें आहे. असें हें श्रीमद्भागवत सर्व- जनसाधारण होण्याकरितां लोककल्याणेच्छु कविश्रेष्ठानीं जे अनेक प्रयत्न केले आहेत, त्यांतील च कृष्णविजय हा एक प्रस्तुत कवीचा प्रयत्न आहे.

७. पंतानीं अध्यायवार जरी सारखा हा ग्रंथ लिहिला असला तरी मूळांतील सर्व अर्थ त्यानीं आपल्या ग्रंथांत उतरिलेला नाहीं. मूळ ग्रंथां- तून अनेक ठिकाणीं येणारीं वेदान्तविषयक प्रकरणें ( वेदस्तुति वगैरे ) पंतानीं अजीबात सोडून दिलीं आहेत. कथासूत्र मात्र अगदीं मूळाबर- हुकूम उतरविलें आहे. मूळांतील प्रसाद किंवा अव्याजमनोहर रचना कृष्णाविजयग्रंथांत पूर्वार्धामध्यें फार च थोडे ठिकाणीं उतरली आहे. सदर ग्रंथरचनेचा काळ हा कवीच्या काव्यनिर्माणशक्तीच्या प्राथमिक स्थितीचा असावा असें दिसतें, हें पूर्वीं सांगितलें च आहे. नव्य कवि काव्यरचनेचा अभ्यास करूं लागला म्हणजे त्या वेळीं त्याची रचना स्वतंत्र नसून त्यामध्यें कल्पनाप्राधान्य फार थोडें असतें. कथाप्रधान कविता करण्याकडे च त्याचा या वेळीं कल असून, तो प्राचीन कवींचें अनुकरण करण्याकडे आधिक प्रवृत्त होतो. यमकानुप्रासादि शब्दचमत्काराकडे त्याचा ओढा अतिशय असतो. आपलें भाषाप्रभुत्व दाखविण्याची त्याला फार हौस असते. प्रसंगीं तो अर्थहानि झालेली कबूल करील; परंतु यमकहानि त्यास अत्यंत दुःसह होतें. त्याला आपल्या काव्यशक्तीचें प्रदर्शन करण्याची हांव उत्पन्न झालेली असते. अनेकविध वृत्तांत हि आपणास काव्यरचना करितां येते, असा त्यास एक अभिमान असतो. अशा च अभिमानाला पेटून प्रसंगीं कवि अत्यंत क्लिष्ट रचनेला हि बळी पडतो. कीर्तीचा मोह पडल्या- मुळें त्याची दृष्टी अगदीं अंध होऊन आपण कवितादेवीला अगदीं आड व कठिण अशा मार्गानें कशी धांवत पळत खेचून नेत आहों याचें भान हि

त्याला नसतें. तिची खुषी नसतां बळें च तिला ओढीत नेल्यानें ती अप्रसन्न राहते व कवीस लोकांच्या अनादरास मात्र पात्र करिते, असा साधारण सर्व प्राथमिक स्थितींतील कवींसंबंधानें तर्क करण्यास हरकत नाहीं. या च तर्कांच्या कसोटीला पंतांच्या कृष्णविजयाचा पूर्वार्ध लावल्यास आमचें म्हणणें वाचकांस बरें च पटेल अशी आम्हास खात्री वाटते. आर्यागीति-वृत्तासारखें चतुर्यमकात्मक व चालीला अत्यंत कठिण असें वृत्त निवडून घेण्यांत पंतांचा स्वकाव्यशक्तिप्रदर्शनाखेरीज अन्य कोणता हि हेतु नसावा असें आम्हास निःसंशय वाटतें. कवितासौंदर्यवर्धक असे जे अनेक गुण काव्यशास्त्रांत वर्णिले आहेत त्यांमध्यें कर्णमनोहरत्व हा प्रमुख गुण आहे असें सर्वांस कबूल करावें लागेल. कविता रचीत असतां कवि बहुशः चालीच्या मंजुळ व अस्पष्ट ध्वनीमध्यें प्रथमतः स्वतःशीं च गुणगु-णत असतो. त्या नादब्रह्माशीं त्याची तन्मयता झाली म्हणजे त्या च आनंदमय स्थितींत त्याच्या तोंडून जे स्वयंस्फूर्तीचे रसमय उद्गार निघ-तात ती च कविता होय. आर्यागीतिवृत्तांत असा कोणता गुण आहे, किंवा असा कोणता ताल आहे कीं, कवि त्यामध्यें गुंगून सर्व बाह्य व्यवहार विसरून जाईल ? आमच्या दृष्टीनें तरी त्यामध्यें तसा कोणता च गुण नसून, कवीनें केवळ आपलें कठिण वृत्तांतील रचनाकौशल दाखविण्याकरितां च तें वृत्त स्वीकारिलें असावें, असें आम्हाला निर्भीडपणें सांगावेंसें वाटतें. आर्यागी-तिवृत्तामध्यें ४ यमकें साधावयाचीं असल्यानें पूर्वार्धांतील कविता बरी च क्लिष्ट झाली आहे. यमकाधीनतेमुळें शब्दांची झालेली ओढाताण पुष्कळ ठिकाणीं दिसून येते. अप्रसिद्ध व अप्रयुक्त शब्द हि मधून मधून योजि-लेले आढळतात. पण ते फार थोडे आहेत. अशी एकंदरींत या कठिण वृत्ताच्या रचनेंत कवि पडल्यानें त्याची स्थिति झाली आहे. पण कवीला स्वतःला त्याची कांहीं च पर्वा वाटत असलेली त्याच्या सदर काव्यावरून दिसून येत नाहीं. उलट आपण एकसारखे ४९ अध्याय अत्यंत कठिण

वृत्तांत यमकप्राचुर्याची अडचण असताना हि मोठ्या करामतीनें पार पाडले, असा स्वकाव्यरचनेचा त्यास अभिमान च झाला. त्यामुळें "क्लेशः फलेन हि पुनर्नवतां विधत्ते" या न्यायानें शेवटीं उपसंहारांत पंतानीं आपला 'शुचिप्रतिभाझरा' अप्रतिहत वाहत असल्याबद्दल समाधानाचे उद्गार काढले आहेत. तसें च या समाधानानें च प्रेरित होऊन कवीनें मोठ्या कौतुकानें आपलें काव्य लोकाना दाखविलें असावें. परंतु, लोकानीं त्याचा योग्य सत्कार न करितां, रचना क्लिष्ट झाली म्हणून कवीची निंदा च केली असावी. आपण श्रमानें केलेल्या काव्याचें योग्य चीज न करितां लोक निंदा च करितात, यामुळें कवीला अत्यंत संताप येऊन त्याचें च उपसंहारानंतर व्याजस्तुतिद्वारा वर्णिलेल्या निंदकपंचकांत पर्यवसान झालें असावें, असा आमचा तर्क आहे. या अपार संसारामध्यें कवि हा च सृष्टिकर्ता आहे. त्याच्या इच्छेस येईल त्याप्रमाणें तो सृष्टीचें परिवर्तन करण्यास समर्थ आहे. कवि जर शृंगारी असेल तर तत्काळ सर्व जग रसमय होऊन जातें. कवीच्या मनोवृत्तीचें प्रतिबिंब म्हणजे च हें जग. कवीचा स्वभाव जसा बदलेल तशी सर्व जगामध्यें क्रांति घडून येत असलेली दिसून येते. कवि हे स्वतंत्र वृत्तीचे व अभिमानी असे असतात. त्याना लोकछंदानुवर्तित्व माहीत नसते. लोकांच्या आर्जवानें ते कधीं रहात नाहींत. जगाला च त्यांच्या अनुरोधानें रहावें लागतें. कवि झाले म्हणून च जगाला अस्तित्व आलें. कविकोप जगाच्या नाशास कारण होतो. राजेलोक हि कविमनास सतत रंजवीत असतात. तात्पर्य कवि निस्पृह असतात; लोकांच्या स्तुतिनिंदेकडे ते पहात नाहींत. पंतांचा स्वभाव हि अत्यंत अभिमानी असे, हें त्यांच्या चरित्रग्रंथावरून प्रसिद्ध च आहे.

अभिमानी स्वभाव असल्यामुळें च निंदकांच्या निंदेची फिकीर न करितां पुन्हां उत्तरार्धांत आर्यागीतिवृत्तास पंतानीं सुरुवात केली. पहिले

पांच अध्याय त्यानीं या च वृत्तांत रचिले. येथें एक मात्र विशेष लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे कीं, पूर्वार्धांतील ४९ अध्यायांची रचना करितांना आर्यागीतिवृत्ताचा पंताना खूप अभ्यास झाला आणि त्यामुळें उत्तरार्धां-तील त्यांची सदर वृत्तांतील रचना बरी च वरच्या दर्जाची, प्रसादमय, सरळ व सोपी अशी झालेली आहे. आर्यागीतिवृत्तांत च उत्तम रचना करावी अशा हट्टाला च पंत पडले होते कीं काय न कळे. कारण त्याना उत्तरार्धांत ज्या वेळीं ती रचना सहज साध्य झाली असें वाटलें त्या वेळीं तत्काळ त्यानीं ती ४।५ अध्याय लिहून सोडून दिली आणि पुढें विविध-वृत्तांत ग्रंथरचनेला आरंभ केला; असो.

आर्यागीतिवृत्त व त्यामुळें ग्रंथास पूर्वार्धांत आलेलें काठिण्य यां-विषयीं आम्हास जे कांहीं चार विचार सुचले ते केवळ तर्कांच्या च जोरावर सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. सदर प्रसंगीं केलेले तर्क सिद्धांतवत् म्हणून पुढें मांडिलेले नाहींत. केवळ एक नवीन विचाराची दिशा अशा स्वरूपांत च ते पुढें ठेविले आहेत. यामुळें विद्वज्जनांत कांहीं चर्चा सुरू होऊन निश्चित मत समाजापुढें येईल तर, या पूर्वपक्षाचा कांहीं स्वल्पसा उपयोग झाला असें आम्ही समजूं.

८. उत्तरार्धांतील ५५ अध्यायापासून वृत्तांत जशी सुधारणा झाली तशी च रचनेंत हि अधिकाधिक सुधारणा झालेली दिसून येते. पूर्वार्धापेक्षां उत्तरार्धांत च पंतप्रतिभेचा शुद्ध झरा जोरानें वाहत असलेला दिसून येतो. पुढें तर ज्या वेळीं आपल्या अगदीं आवडत्या आर्यावृत्तावर पंत आले, तेव्हां त्यांचा वाक्प्रवाह अगदीं गंगाप्रवाहासारखा अस्खलित वाहूं लागला असून स्वच्छ अतएव चित्ताकर्षक असा भासत आहे. उत्तरा-र्धांत जी वृत्तभिन्नता आली आहे ती पुष्कळ ठिकाणीं रसानुकूल असल्यानें वर्णन बरें च मोहक झालें आहे. मधूनमधून येणारे ईशस्तुतीचे प्रसंग पृथ्वी-वृत्तांतून फार च सरस रीतीनें वर्णिले गेले आहेत. पूर्वार्धाइतकी यमकाची-

नता या अर्धांत न ठेवल्यामुळें कवितांमधून सर्वत्र प्रसाद ओतप्रोत भरलेला दिसतो. कित्येक ठिकाणीं वर्ण्यविषयाशीं कवीचें अगदीं तादात्म्य झाल्यानें सदर प्रसंगीं प्रकट झालेल्या काव्योद्गारांशीं रसिक वाचकांची तन्मयता होते. पूर्वार्धांतील रचना जशी संस्कृत मूळग्रंथास फारशी सोडून नाहीं तसें मात्र येथें झालेलें नाहीं. पूर्वार्धांतील वृत्ताच्या क्लिष्टरचना-बंधनांतून मुक्त झाल्यामुळें कवीच्या कल्पनावृत्तीची भरारी वरी च उंच गेलेली उत्तरार्धांत प्रत्ययाला येते. कांहीं कांहीं ठिकाणीं तर व्यासकृतीला हि लाजवितील अशा कल्पना चमकतात. उतारे देऊन या सर्व गोष्टी सिद्ध करून दाखविणें इष्ट होतें; परंतु तितका अवकाश नसल्यामुळें केवळ स्थळ-निर्देश करून च पुढें जाणें भाग आहे.

## पूर्वार्ध.

| अध्याय | पद्य |
|---|---|
| १ | १–२–६–२२; ३४ ते ३७. |
| २ | २१. |
| ३ | १–२ ते ६. |
| ५ | १८. |
| ७ | ३९. |
| ९ | सर्व अध्याय. |
| १० | २ ते ४, ५ ते ८, १२, १३, १७. |
| ११ | ९. |
| १३ | ३ ते १२, २४ ते ३२. |
| १४ | १ ते ३. |
| १५ | ४ ते ९, ७ ते ११, २१. |
| २३ | १७, १८ ते २१. |
| २७ | ४. |

| अध्याय | पद्य |
|---|---|
| २९ | १ ते १५, ३० ते ३४, ३५ ते ५६. |
| ३० | सर्व अध्याय. |
| ३१ | सर्व अध्याय. भाषान्तराचा उत्तम नमुना. |
| ३२ | सर्व अध्याय. |
| ३३ | सर्व अध्याय. |
| ३४ | १७, १८, १९. |
| ३७ | ३०. |
| ३८ | २८ ते ३१. |
| ३९ | १५ ते ५२. |
| ४४ | १४. |
| ४५ | ११ ते १३, ७५, ७६. |
| ४६ | १०, १३ ते १४, १८ ते २५, ३०, ३७ ते ३८. |
| ४७ | ८, १०, भ्रमरगीत, १०५, १०६ ते १२६. |
| ४८ | ९ ते २०, २६ ते २९, ३४, ३६. |
| ४९ | २५ ते ३७. ( शिवाय उपसंहार व निंदकपंचक ). |

## उत्तरार्ध.

| अध्याय | पद्य |
|---|---|
| ५१ | १७. |
| ५२ | ३४ ते ४१ रुक्मिणीपत्रिका. |
| ५३ | १६ ते ३२, ५८ ते ६२, ६६. |
| ५५ | १५, २९. |
| ५६ | ३३, ३८. |
| ५७ | ५१. |
| ५८ | ५. |
| ६० | सर्व अध्याय. |

| अध्याय | पद्य |
|---|---|
| ६३ | १२, १३, २३, २४. |
| ६५ | ६, १३, १५, २४, २७, २८, २९, ३७, ३९, ४०, ४३. |
| ६६ | १५, १६, ३१, ३३, ३४. |
| ६७ | ५. |
| ६८ | २४, २६. |
| ६९ | ३ ते ७, ११. |
| ७१ | १२, १३, १६, १९. |
| ७२ | २, ३, १८, ४९. |
| ७३ | २, ११, २०, २६. |
| ७७ | २, २९. |
| ७९ | यांतील तीर्थयात्रावर्णन शब्दालंकारविभूषित आहे. |
| ८० | सर्व अध्याय. |
| ८१ | सर्व अध्याय. |
| ८३ | ९ ते १०० |
| ८५ | ५. |
| ८८ | ३४, ४७ ते ४९. |

वर दाखविलेले सर्व उतारे अगदीं सर्वोत्तम म्हणून निवडून काढिले आहेत असें नाहीं. सहज हाताला आले ते दिले आहेत. त्यांमध्यें कित्येकांत रूपक, उत्प्रेक्षा, अर्थान्तरन्यास वगैरे अलंकार आहेत. कित्येक चंद्रोदय, वसंतादि ऋतु, प्रमदासंभ्रम, नगरसौंदर्य वगैरे वर्णनात्मक असे आहेत. कांहीं गोपस्त्रियांची विरहव्याकुलस्थिति व्यक्त करीत आहेत, तर कांहीं रासक्रीडेसारख्या शृंगारमय वर्णनानें आनंदवीत आहेत. यांतील गोपीगीत हा तर निव्वळ भाषान्तराचा च उत्तम नमुना आहे. मूळांतील अर्थ मुळीं च न जाऊं देतां आर्यागीतीसारख्या कठिण वृत्तांत यमकांचें

बंधन पायीं वागवून पंतानीं भाषान्तर चांगलें वठवून दाखविलें यावरून त्यांची भाषेवरील कसरत चांगली च प्रतीतीला येते. कृष्णविजयाच्या पूर्वार्धासंबंधानें जर विचार केला तर त्यांतील बरा च भाग संस्कृत मूळाला धरून च आहे. सर्व च भाषान्तर आहे असें जरी स्पष्ट म्हणतां येत नाहीं तरी पण तें भाषान्तर नाहीं असें हि सिद्ध करितां येत नाहीं. भाषान्तर किंवा रूपान्तर करणें म्हणजे एका कुपींतून दुसऱ्या कुपीमध्यें अत्तर ओतण्यासारखें च कठिण आहे. अत्तराचा सुवास थोडा तरी बाहेर हा उडून जावयाचा च. असा च प्रकार या ठिकाणीं हि झाला आहे. मूळ भागवतांतील वर्णनांचा सरसपणा पंतकृतींत अगदीं तंतोतंत उतरला नाहीं. शिवाय व्यासकृत भागवत हें संस्कृतसारख्या अभियुक्त भाषेमध्यें रचलें गेलें असल्यामुळें स्वभावतः च त्यास भाषामाधुर्यानें प्रासादिकपणा आला आहे. संस्कृत भाषेच्या दृष्टीनें बऱ्या च रीतीनें कमजोर वाटणाऱ्या मराठी भाषेंत पंतानीं आपला ' कृष्णविजय ' ग्रथित केला असल्यानें भाषावैगुण्यानें च त्यामध्यें कांहीं कमीपणा राहिला असेल तर असेल. पण हा सर्व प्रकार पूर्वार्धांत च आहे. उत्तरार्धांत पंतांची प्रतिभा अगदीं स्वैरपणें चालू झाली आहे. अनेक ठिकाणीं त्यानीं व्यासांच्या कल्पनेवर हि ताण केली आहे. अशा सरस कल्पनांचीं स्थळें निर्णयसागरी कृष्णविजयाच्या प्रतींत श्री. वामनराव ओक यानीं अनेक ठिकाणीं दाखवून दिलीं आहेत. एके ठिकाणीं तर त्यानीं असें म्हटलें आहे कीं " पंत स्वप्रतिभाबळानें नूतन अलंकार घडवून ते मूलग्रंथकाराच्या सरस्वतीवर घालून तिला कशी साजरी करितात हें पहावयाचें असल्यास त्यास हें काव्य उत्तम स्थळ आहे. "

प्रस्तुत काव्यांतील प्रधान रस शृंगार हा असून तो जागोजाग पंतानीं कुलीनतेनें ग्रथित केला असल्यानें त्यामध्यें भारदस्तपणा बरा च आला आहे. रासक्रीडेसारखीं उत्तान शृंगारस्थळें हि पंतानीं अमर्यादपणें न वर्णितां गूढ भावानें त्यांतील माधुरी राहील असें च केलें आहे. भक्तिरस

: या काव्यामध्यें शृंगाराच्या बरोबरीनें दिसून येतो. सुदामाचें आख्यान यांतील एक भक्तिरसानें ओथंबलेलें असें प्रकरण आहे. त्यांतील प्रत्येक ार्या अत्यंत सरस आहे. अमूक च उत्तम अशी आम्हास निवड च रितां येत नाहीं. वाचकानीं तें सर्व च प्रकरण अवश्य वाचावें किंवा ठस्थ करावें अशी आम्ही शिफारस करितों. याशिवाय रुक्मिणीचें ात्मविवाहवृत्तकथन, कृष्णाचा गृहस्थाश्रम, कृष्णानीं रुक्मिणीशीं ेलेला विनोद, पुत्रदर्शनानें रुक्मिणीस झालेला अत्यानंद, कुंतीची भेट, गवत्कीर्तीचें पान करणारा व भ्रमरी यांची केलेली तुलना, द्वारकावर्णन, सुभद्राहरण वगैरे अनेक विविधरसात्मक स्थळें अत्यंत वाचनीय आहेत. थळाभावामुळें अधिक स्पष्ट करितां येत नाहींत याबद्दल खेद होतो.

९. सरते शेवटीं पंतांच्या लेखनपद्धतींतील व्याकरणविशेषावर चार ब्द लिहून हा बरा च लांबलेला उपोद्घात आम्ही पुरा करणार आहों.

ज्ञानेश्वरापासून तों तहत मराठी भाषेंतील शेवटचे कवि रामजोशी ोलापुरकर या सर्वांच्या कवितेचें जर भाषाशुद्धीच्या दृष्टीनें निरीक्षण केलें तर मोरोपंताइतकी भाषाशुद्धीकरितां कोणीं काळजी घेतली आहे असें दिसून येत नाहीं. कदाचित् यांतील ज्ञानेश्वर तेव्हडे सोडून देतां तील; पण इतर सर्व एकनाथ, मुक्तेश्वर, वामन, रामदास, तुकाराम आदि-करून कवीनीं आपल्या काव्यग्रंथांतून शुद्ध भाषा लिहिण्याकडे मुळीं च लक्ष्य दिलेलें नाहीं. यावरून त्यानीं सर्व च अशुद्ध लिहिलेलें आहे असा ात्र ह्या म्हणण्याचा कोणीं अर्थ करूं नये. कदाचित् त्या त्या ग्रंथ-काराच्या समकालांत ती भाषा शुद्ध अशी च गणली जात असेल. पण ंतानीं जसा आपल्या समकालीन भाषेत हि सुधारणा करण्याच्या बुद्धीनें या काळीं रूढ झालेले—होत चाललेले—अशुद्ध प्रयोग काढून टाकून भाषे-मध्यें आपलें स्वातंत्र्य दाखविलें आहे, असें कोणीं पंतांचे पूर्वकालीन, सम-कालीन किंवा उत्तरकालीन कवीनीं हि दाखविल्याचें दिसून येत नाहीं.

प्राचीन कालापासून वाहत आलेल्या भाषाप्रवाहास वामनादि कवींनीं मुळीं च प्रतिरोध केला नाहीं. उलट आपण हि त्या च प्रवाहांतून वाहत गेल्याचें दिसून येतें. भाषेचा प्रवाह इतका जोराचा असतो कीं त्याच्या उलट दिशेनें जाणें अत्यंत कठिण च असतें. तसा प्रयत्न आजपर्यंत कोणीं केलेला नाहीं, व केला असता तरी तो कितपत यशस्वी झाला असता याची हि शंका च आहे. म्हणून या भाषाप्रवाहास प्रतिबंध न करितां त्याची गति तशी च चालूं द्यावयाची; परंतु त्या प्रवाहांतून येणाऱ्या गढूळपणास मात्र दूर करणें अत्यंत आवश्यक असतें. आजपर्यंत जे भाषाशास्त्रज्ञ होऊन गेले त्यानीं हें च काम केलें आहे. या प्रवाहांतून येणारा केर-कचरा, माती वगैरे दूर करून हा प्रवाह शुद्ध रीतीनें वाहात जाईल इत-का च प्रयत्न करणें शास्त्रज्ञांचें व ग्रंथकारांचें काम असतें. मराठी भाषा ही संस्कृत भाषेपासून परंपरेनें निर्माण झालेली आहे. करितां मराठींत आलेले शब्दांचे प्रयोग संस्कृत भाषेच्या दृष्टीनें कितपत शुद्ध आहेत, अपभ्रंश झाला आहे तो व्याकरणशास्त्राच्या दृष्टीनें किती व्यवस्थित झाला आहे किंवा शास्त्राला झुगारून रूढी च आपली सत्ता प्रयोगावर गाजवीत आहे, अनुस्वार, विसर्ग, ऱ्हस्व, दीर्घ, जोडाक्षरें, विभक्तिप्रत्यय, अव्ययें, समास, नामें, विशेषणें वगैरेमध्यें कसकसा बदल होत आला आहे, झालेला बदल शास्त्रशुद्ध आहे कीं नाहीं, हें सर्व नीट रीतीनें पाहून अवश्य तर त्यांमध्यें सुधारणा करणें, हें तत्तत्कालीन ग्रंथकारांकडे किंवा कविजनांकडे असतें. साधारणतः समाजाचे धुरीणत्व त्या समाजांतील ग्रंथकारांकडे च अस-ल्यानें ग्रंथकारानीं उपयोगांत आणलेले प्रयोग सर्व साधारण जनता उप-योगांत आणते. भाषेच्या साम्राज्यांत कविजनाना च बादशाही तक्तावर अभिषिक्त केलेले असते. त्यांच्या च हुकुमानें भाषेंत काय फेरबदल व्हावयाचे ते होतात. येथें राजसत्तेचा कांहीं उपयोग होत नाहीं. मोरो-पंतानीं जसा या साम्राज्याचा कारभार मोठ्या मुत्सद्दीपणानें चालवून

ाषेला एक प्रकारचें व्यवस्थित रूप दिलें असें वामनादि कवींपैकीं कोणीं
लें नाहीं. पंतांचा इतर कवींपेक्षां विशेष तो हा च आहे. संस्कृताचें मिश्रण
री त्यांच्या काव्यांतून दिसून येतें तरी त्यामुळें त्यांच्या भाषेस कोणता हि
मीपणा आलेला नाहीं; उलट संस्कृत भाषा ही मराठी भाषेच्या मातृस्था-
ीं किंवा मातामहस्थानीं असल्यानें पुढील संततीनें आपल्या वाडवडिलांचे
द्गुण उचलणें व त्यांचें अनुकरण करण्यास प्रवृत्त होणें हें दूषण नसून
ूषण च आहे; असो.

मराठींतील तृतीयेखेरीज बाकीचे सर्व विभक्तिप्रत्यय जर पाहिले तर
एकवचन आणि बहुवचन यांचे प्रत्यय एक च आहेत असें दिसून येईल.
द्वितीया व चतुर्थी ह्या विभक्त्यांचा अनेकवचनी ‘ ना ’ असा एक अधिक
प्रत्यय आहे. पण पंतानीं त्याचा कोठें हि उपयोग केल्याचें दिसून येत नाहीं.
तृतीयेचे मात्र एकवचनाचे ‘नें, एं, शीं,’ हे प्रत्यय असून बहुवचनाचे ‘नीं, हीं,
ईं, शीं,’ असे निराळे प्रत्यय आहेत. बाकीच्या विभक्त्यांचे उभयवचनांचे प्रत्यय
एक च असल्यामुळें दोन हि वचनांतील विभक्त्यन्त नामांचा फरक दाखविण्या-
करितां बहुवचनाच्या प्रत्ययापूर्वीं सामान्य रूपावर अनुस्वार देण्याचा प्रचार
पडून गेला आहे. उदाहरणार्थ, एकवचन ‘मुलाचा’ तर अनेकवचन ‘मुलांचा.’
या च प्रमाणें सर्व विभक्तींचीं एकवचन अनेकवचनाचीं रूपें केलीं जातात.
पण अशीं सरसकट सर्व विभक्तींचीं रूपें करण्यांत एक चूक होत आहे ती
अद्याप कोणाचे लक्ष्यांत आलेली नाहीं. मराठी भाषेचे व्याकरणकार
दादोबा पांडुरंगांपासून कै. मो. के. दामल्यांपर्यंत आजवर दहा पांच होऊन
गेले. बालबोध, मुग्धबोध, प्रौढबोध, शास्त्रीय सोपपात्तिक अशीं अनेक
व्याकरणें आजपर्यंत रचिलीं गेलीं; पण कोणीं हि अद्याप ही चूक दाखवून
दिलेली नाहीं. पण पंतानीं आपल्या काव्यग्रंथामध्यें यासंबंधीं योग्य
सुधारणा केलेली दिसून येते. ज्या विभक्तीचे एकवचनाचे व अनेकव-
चनाचे प्रत्यय एक च आहेत तेथें सामान्यरूपावर अनुस्वार देवून एक-

वचनअनेकवचनाचा फरक दाखविणें इष्ट आहे; परंतु तृतीया विभक्तीचे प्रत्यय तसे नाहींत. ते मूळचें च आपलें भिन्नत्व दाखवितात. अर्थात् केवळ प्रत्ययानें च अनेकवचन जर सिद्ध होत आहे तर सामान्यरूपावर पुन्हां अनुस्वार देण्याचें काय प्रयोजन ? अशा स्थलीं अनुस्वार देणें म्हणजे विंध्याद्रिपर्वत म्हणण्यासारखी च द्विरुक्ति होत नाहीं काय ? पण आज सररहा या तृतीयाविभक्त्यन्त शब्दाच्या अनेकवचनी सामान्यरूपावर अनुस्वार देण्याची वहिवाट पडून गेली आहे. ही चुकीची वहिवाट केव्हां सुधारेल तेव्हां सुधारो.

तृतीयेच्या बहुवचनाच्या " हीं " प्रत्ययासंबंधानें मात्र सामान्य-रूपावरील अनुस्वाराचा विकल्प दिसून येतो. केवळ तृतीयेच्या " हीं " या च एका प्रत्ययासंबंधानें असा अनुस्वाराचा विकल्प पंतानीं कां केला याचा भाषाशास्त्रज्ञानीं जरूर विचार करावा.

पंत " मी " हें सर्वनाम प्रथमा विभक्तींत सानुस्वार " मीं " असें लिहितात व तृतीयान्त " म्यां " असें लिहितात. पंतांचें हें लिहिणें व्याकरणाचे दृष्टीनें बरोबर आहेसें दिसतें. संस्कृतांतील तृतीया विभक्तीच्या " मया " या रूपाचें अपभ्रष्ट " म्यां " हें रूप आहे; व " अहं " चें " मीं " असें सानुस्वार झालें आहे. " तूं " वरील अनुस्वार ठेवावयाचा व " मीं " वरील च कां काढावयाचा हें समजत नाहीं. 'मी' हा अनुनासिक असल्यानें त्यावरील अनुस्वार उडाला आहे असें म्हणावें तर ' नें ' वगैरे तृतीया विभक्तीच्या अनुनासिक वर्णावर अनुस्वार कायम असलेले दिसून येतात.

पंत शब्दयोगी अव्ययें केव्हां केव्हां तोडून लिहितात. हा पंतांचा प्रचार बरा च सयुक्तिक असावा असें वाटतें. शब्दयोगी अव्ययाच्या व्याख्येसंबंधानें व नांवासंबंधानें बरा च घोटाळा झाला आहे. दामल्यांच्या व्याकरणाखेरीज इतर कोणत्या हि व्याकरणामध्यें यासंबंधीं सोपपत्तिक

चार केलेला दिसून येत नाहीं. शब्दयोगी अव्ययाचें लक्षण प्रथम
ऊन नंतर उदाहरणादाखल दिलेलीं कित्येक अव्ययें त्या लक्षणाबर-
ूम आढळून येत नाहींत. विभक्तीचा अर्थ दाखवून शब्दाशीं जोडून
गारीं व त्याचें सामान्यरूप करणारीं तीं शब्दयोगी अव्ययें, अशी बहुशः
ी व्याकरणांमध्यें व्याख्या दिसून येते. परंतु ही व्याख्या च प्रथम सदोष
ल्यानें व्याकरणकारांच्या चुकीचे परिणाम तें व्याकरण शिकणाऱ्या सर्व
हाराष्ट्रसमाजावर होऊन लेखनप्रचारांत हि सर्वत्र शब्दयोगी अव्यया-
बंधानें अत्यंत घोटाळा माजून राहिला आहे.

शब्दयोगी अव्ययांमध्यें जरी कांहीं अव्ययें विभक्तीचा अर्थ दाख-
णारीं असलीं तरी सर्व च मात्र तशी नाहींत. थोडीं असतीं तर अपवाद
हणून काढतां आलीं असतीं. पण सामान्य नियमापेक्षां अपवाद च अधिक
यापक, अशी स्थिति या बाबतींत होणारी आहे. जीं अव्ययें विभक्तीचा
र्थ दाखवीत नाहींत तीं शब्दाला जोडून काय म्हणून लिहावयाचीं ?
ागील शब्दाचें सामान्यरूप करितात म्हणून म्हणावें तर विभक्त्यन्त शब्द
हे पुढें आले असतां षष्ठ्यन्त शब्दाचें सामान्यरूप करितात; मग ते हि
ष्ठिविभक्त्यन्त शब्दाशीं जोडून लिहिण्याचा प्रसंग येईल. करितां या शब्द-
योगी अव्ययासंबंधानें साधारण असा च नियम पाहिजे कीं जीं स्पष्टपणें
विभक्तीचा अर्थ दाखवीत असतील तीं मागील शब्दाशीं जोडून लिहिलीं
तरी चालतील. पण ज्यांच्यापासून विभक्तीचा कांहीं हि अर्थ निष्पन्न
होत नाहीं तीं हि जोडून च लिहिलीं पाहिजेत असा निर्बंध कां ? तीं
निराळीं च लिहिणें अवश्य आहे. या वरील सर्व विवेचनावरून पंतांनीं
आपल्या लेखनपद्धतींत सदर अव्ययासंबंधानें जो विकल्प स्वीकारला आहे
तो किती सशास्त्र आहे हें वाचकांचे ध्यानांत आलें च असेल. तसें च मराठी
व्याकरणकारानीं शुद्ध शब्दयोगी म्हणून एक शब्दयोगी अव्ययामध्यें उप-
भेद काढिला आहे, व त्याचीं उदाहरणें 'च, ही, ना, मात्र, पण, देखील'

अशीं देतात. पण या अव्ययाना शब्दयोगी म्हणण्यासारखा त्यांमध्यें कोणता शब्दयोगी अव्ययाचा धर्म त्यानीं पाहिला समजत नाहीं ! बरें तें राहूं द्या. पण त्यांस शुद्ध हें विशेषण कां जोडलें ? असा यांच्यामध्यें कोणता निर्मलपणा आहे कीं ज्या योगानें याना शुद्ध म्हणावें ? तसें च इतर अव्ययानीं असें काय पाप केलें आहे कीं त्यांच्या पदरीं व्याकरणकारानीं अशुद्धतेचें माप टाकिलें ? हा सर्व च शुद्धाशुद्धतेचा प्रकार म्हणजे व्याकरण-कारांच्या मनाचा केवळ खेळ आहे. पंतानीं या हि अव्ययांसंबंधानें वरील प्रमाणें च तोडून लिहिण्याविषयीं अनुकूल पक्ष स्वीकारला आहे. ' च ' आणि ' हि ' हीं अव्ययें अगोदर शब्दयोगी च नसल्यानें तीं शब्दाशीं जोडून लिहिणें अगदीं गैरशिस्त आहे. पूर्वीं सरकारी मदतीनें इंदुप्रकाश छापखान्यांत छापलेल्या तुकारामाच्या गाथ्यांत ह्या प्रघाताचा अवलंब केल्याचें दिसून येतें. परंतु हा प्रघात पुढें अगदीं मोडला. तथापि अलीकडे " सत्कार्योत्तेजक सभा " वगैरे कांहीं ग्रंथप्रकाशक तो इष्ट प्रघात पुन्हां रूढ करूं पहात आहेत.

पदें तोडून लिहिण्याची पंतांची मूळची रीत नाहीं. फक्त यमक स्पष्ट करण्याकरितां पंत इच्छेस येईल त्या ठिकाणीं तेवढ्यापुरतें पदच्छेद करितात. पण कृष्णाविजयाचा अर्धाअधिक भाग आर्या-गीतीसारख्या क्लिष्ट व अगेय वृत्तांत रचून शिवाय पादान्तीं यमक साध-ण्याचें धोरण ठेविल्यामुळें, प्रत्येक पद भिन्न करून दाखविल्याशिवाय ग्रंथ उकलणें अशक्य आहे, हें जाणून च पंतानीं मागाहून काळ्या तांबड्या शाईनें सर्व ग्रंथभर पदच्छेद करून ठेविले आहेत. पदच्छेद पंतकृत च आहेत ह्याला प्रमाण, पदच्छेद करताना त्या च शाईनें पंतानीं कांहीं ठिकाणीं टीपा लिहिल्या आहेत. नकलकारानीं पदच्छेद न उतरल्यामुळें त्या नकलांवरून कृष्णाविजय छापणाऱ्या पूर्वींच्या प्रकाशकांचे हातून शब्दांच्या जोडतोडीच्या किती तरी चुका झाल्या व त्यामुळें मूळच्या च

क्लिष्टपणाच्या दुर्लौकिकांत अधिक भर मात्र पडली. "शंकर पांडुरंग पंडित ह्या संस्कृत पंडितानें प्रस्तुत कृष्णविजय ग्रंथावर विपुल टीपा देऊन तो प्रथम प्रसिद्ध केला. तेव्हां त्यांची सुद्धां ग्रंथ उकलताना कशी तारांबळ उडाली हें त्यांच्या टीपांवरून दिसून येतें." असें चरित्रग्रंथांत लिहिलें आहे.

१०. आतांपर्यंत दाखविलेल्या तीन ठळक विशेषांशिवाय आणखी किती तरी विशेष पंतलिखितामध्यें दिसून येतात. त्यांचा स्वतंत्रपणें च सांगोपांग विचार व्हावयास पाहिजे. येथें फक्त सांप्रतकालीन लेखनपद्धतीशीं उघड विरोध करणारे तेव्हडे च विशेष दाखविले आहेत. त्यांवरून साधारण असें अनुमान करण्यास मात्र हरकत नाहीं कीं, चालू भाषेंत जर कांहीं सुधारणा करणें इष्ट असेल तर पंतांच्या लेखनपद्धतीशीं शास्त्रज्ञानीं चांगला परिचय करून घेतला पाहिजे. पंतांची भाषा व लेखनपद्धति भाषाशुद्धीच्या दृष्टीनें एक उत्तम आदर्श आहे व तो आदर्श आपल्या सर्व महाराष्ट्रीयांच्या सुदैवानें स्वच्छ व मूळ स्थितींत च आपणास आज उपलब्ध झाला आहे. त्याचा योग्य उपयोग करून वाङ्मयाची सेवा करणारे लोक आपल्या मायभाषेला अभियुक्त व राजमान्य भाषेच्या तोडीला नेऊन बसवितील अशी आशा प्रकट करून, ही बरी च लांबलेली व्याकरणविषयक चर्चा पुरी करितों.

अखेर या मालेचे पुरस्कर्ते रा. पंत पराडकर यानीं आम्हास आज दोनतीन वर्षें पंतकाव्योदधींत मज्जन करण्याचा सुयोग आणून दिल्याबद्दल त्यांचे प्रेमपूर्वक आभार मानून, शेवटीं त्या जगच्चालक परमेश्वराचे चरणीं पुढील पंतवाणीनें च विनंति सादर करून निरोप घेतों.

**तुमच्या आशीर्वादें जन्मींजन्मीं घडो अशी सेवा,**<br>**हे वाङ्मनःशरीरें करितों विज्ञापना सदा देवा.**

---

# कृष्णविजय

## विषयानुक्रमणिका.

### पूर्वार्ध ( पद्यसंख्या १७१३ ).

**अध्याय ६ वा ( १८ ):**–कंसप्रेरित पूतनेचें व्रजाला आगमन ( १-३ ); सुरूप धारण करून कृष्णाला विषलिप्तस्तन प्यावयास देते ( ४-१० ); कृष्ण दुग्धमिषें जीवरस पिऊन तिला मारतो ( ११-१४ ); विघ्नोपशमार्थ गोपीकृत नाना उपाय ( १५-२५ ); पूतनावपुदहन ( २६ ); दहनप्रसंगीं चितेंतून निघणाऱ्या धूमास सुगंध सुटतो ( २७-३२ ).

**अध्याय ७ वा ( २१ ):**–शकटासुरवध ( १-१२ ); तृणावर्तासुर तृणावर्तमिषें ( १३-२१ ) कृष्णास उचलून आकाशीं नेतो–गोपींचा कृष्णशोध व दुःख ( २२-२४ ); तृणावर्तवध ( २५-३६ ); स्वजननीस कृष्णाचें जृंभामिषें स्वमुखीं चतुर्दशलोकदर्शन ( ३७-४१ ).

**अध्याय ८ वा ( २६ ):**—गर्गांकडून नामकरणविधि ( १-८ ); रामकृष्णांच्या बाललीला ( ९-२४ ); मृदशनाचा कृष्णावर आळ ( २५ ); यशोदेचा मिथ्या कोपाविर्भाव ( २६-३१ ); कृष्णाचें स्वमुखीं ब्रह्माण्डदर्शन ( ३२-३९ ).

**अध्याय ९ वा ( २९ ):**—उलूखलबंधन ( १-२८ ):–गृहकार्यांत हि कृष्णचरित्रीं दंग असलेली यशोदा ( १-५ ) स्तन पाजित असतां ती मधें च गेल्यामुळें कृष्ण रागावून दहींदुधाचीं मडकीं फोडतो. त्यास यशोदा उखळाशीं बांधते ( ६-२८ ).

**अध्याय १० वा ( ३२ ):**—तरुरूपधारी यमलार्जुनोद्धार ( १ ).

**अध्याय ११ वा ( ३२ ):**—शिशुकथित यमलार्जुनतरुपतनाचा सत्य वृत्तान्त ( १-५ ); वृन्दावनवसति ( ६-१६ ); वत्सहनन ( १७-२० ) बकहनन ( २१-३५ ).

**अध्याय १२ वा ( ३६ ):**—सगोपशिशु हरीचें वृंदावनगमन ( १-४ ); अजगररूप अघासुराच्या मुखांत सर्व शिशु शिरतात ( ५-१० ); कृष्ण अघासुराचा गळा धरतो ( ११-१५ ); त्याची तळमळ व मरण ( १६-२० ); सुरकृत कृष्णस्तुति ( २१-३१ ).

**अध्याय १३ वा ( ३९ ):**–कासारपुलिनीं कृष्णशिशुक्रीडा ( १-१२ ); कृष्णप्रभावपरीक्षणार्थ ब्रह्मदेव सगोप गोवत्स हरून नेतो ( १३-१८ ); कृष्ण स्वतः सर्वांचीं रूपें धारण करून एक वत्सर राहतो–माताशिशुप्रेम–गोगोवत्स–

( १९-३९ ); वर्षान्तीं विधीचें पुनरागमन–कृष्णलीलेनें विधि गलित-
: होतो ( ४०-५४ ).

अध्याय १४ वा ( ४५ ):—विधिकृत कृष्णस्तवन ( १-९ ); सशिशु
णाचें गृहागमन ( १०-१६ ).

अध्याय १५ वा ( ४७ ):–वृन्दावनीचें क्रीडावर्णन ( १-२१ ); ताल-
ांतील खरस्वरूपी धेनुकासुराचें वृत्तकथन ( २२-२६ ); बळरामकृत सप्तगण
नुकवध ( २७-३६ ); कृष्णकृत यमुनाविषजलप्राशन–मृतगोवत्स–वत्स-
जीवन ( ३७-५१ ).

अध्याय १६ वा ( ५१ ):—कालियव्यालगरळदूषितजलह्रदस्थिति
१-५ ); कृष्ण डोहांत उडी घेतो ( ६-११ ); कालिय सर्प कृष्णशरीरास
डतो ( १२-१५ ); कृष्णादर्शनानें व दर्शनानंतर कृष्णसंकटानें व्रजवासीयांची
याकुळता ( १६- २८ ); कृष्णाहीयुद्ध ( २७-३६ ); सुरकृत कृष्णस्तवन
३७-३८ ); सर्प क्षीणबळ व विमद होऊन माधवास शरण जातो ( ३९-४२ );
द्रूनिताकृत माधवप्रार्थना ( ४३-४७ ); कृष्णाचें कालियास वरदान व आज्ञा–
ालिय यमुना सोडून समुद्रास जातो ( ४८-५५ ).

अध्याय १७ वा ( ५७ ):–कालियपूर्ववृत्त ( १-७ ); डोहांतून सुख-
प वर आलेल्या कृष्णाचें स्वागत ( ८-१७ ); नदीतीरीं वणवा पेटला असतां
ो विझवून सर्व मंडळींचें कृष्ण रक्षण करितो ( १८-२२ ).

अध्याय १८ वा ( ५९ ):–क्रीडाकाळीं बळरामहस्तें भूतगोपशिशुवेष–
लंबासुरवध ( १-२१ ).

अध्याय १९ वा ( ६१ ):–वनलुप्त गोधनान्वेषणतत्पर गोपशिशूंचें
णव्यांतून रक्षण ( १-१५ ).

अध्याय २० वा ( ६२ ):–रामकृष्णांचें वर्षाकाळीं हि वनसेवन ( १-३ ).

अध्याय २१ वा ( ६३ ): —शरदागमन ( १-६ ); माधववेणु-
ादन ( ७-११ ).

अध्याय २२ वा ( ६४ ):–कात्यायन्यर्चनव्रततत्पर व्रजयुवतींचा हरीत-
ासनदानानिमित्तें परिहास ( १-२६ ).

**अध्याय २३ वा ( ६७ )**:—यजननिरत द्विजांस अन्नार्थ हरिसख्यांचें विफलयाचन ( १-७ ); ऋषिपत्नींची याचना–त्यांचें अन्न घेऊन हरीकडे आगमन–निजरूपमोहित संगकाम अशा त्या स्त्रियांना कृष्ण उपदेशून परत पाठवितो ( ८-३८ ); कर्मपथानुगामी ऋषिगणाचा हरिभक्तिविमुखतेबद्दल पश्चात्ताप ( ३९-४९ ).

**अध्याय २४ वा ( ७२ )**:—सुरेंद्रमख वारून कृष्ण गोपांकडून गोद्विजधरयाग करवितो ( १-१५ ).

**अध्याय २५ वा ( ७४ )**: —इन्द्रकोप ( १-३ ); पयोधरास आज्ञा ( ४-८ ); घनवृष्टीनें व्रजवासीयांची तारांबळ ( ९-१६ ); त्यांची कृष्णास विनवणी ( १७-१८ ); त्यांस आश्रयस्थानार्थ कृष्णाचें करांगुलीं गोवर्धनपर्वतधारण ( १९-३२ ); इन्द्राचें वृष्टिनिवारण–कृष्णाचें अभिनंदन ( ३३-४८ ).

**अध्याय २६ वा ( ७९ )**: —कृष्णचरित्रें गोपमनीं गर्गकथितसिद्धान्ताकलन ( १-२ ).

**अध्याय २७ वा ( ८० )**:—इन्द्राचें करुणायाचन ( १-२० ); कामधेनूचा कृष्णास सदेवेन्द्र अभिषेक ( २१-३४ ).

**अध्याय २८ वा ( ८४ )**:—वरुणकृत नंदहरण-वरुणाकडे कृष्णगमन-वरुणदीनभाषण-नंदासह व्रजागमन ( १-२१ ).

**अध्याय २९ वा ( ८६ )**:—शरद्रजनीं ( १-३ ) कृष्णाचें वेणुवादन ( ४ ); तें ऐकण्यास जाण्याकरितां गोपींची श्रद्धा ( ५-१६ ); गोपांचा निष्फळ प्रतिबंधप्रयत्न ( १७-१९ ); गोपींस कृष्णाचें निवारक भाषण ( २०-२९ ); गोपींचें स्वविरहदुःखनिवेदन ( ३०-५७ ); गोपीच्छासंतर्पण; गोपीमदें कृष्ण अन्तर्धान पावतो ( ५८-६६ ).

**अध्याय ३० वा ( ९३ )**:—हरिविरहें गोपींचा शोक व तदन्वेषण ( १-२४ ); कृष्णपदचिन्हाजवळ स्त्रीपदचिन्हास पाहून गोपींचा मत्सरभाव ( २५-४७ ); कृष्णसंगतिलाभवती गोपी हि अभिमानानें कृष्णास अंतरते-तिचा विलाप ( ४८-५८ ); तिची व गोपींची भेट; कृष्णमार्गण ( ५९-६४ ).

: ); अक्रूराचें भाषण-नाम-व मातृप्रेमतुलना (९-२०); कृष्णोत्तर-
ाशंसा कुंतीस्थितिदिग्दर्शन (२१-३८).

**अध्याय ४९ वा (१७७)**:-अक्रूराचें हस्तिनापुरीं गमन-सर्वांची (१-८); कुंतीचें आत्मवृत्तनिवेदन-दीराकडून होणारा जाच-कृष्णावर च ास (९-१९); अक्रूराचें व कृष्णाचें समाधानपर उद्गार (२०-२४); ाचें धृतराष्ट्रास उपदेशपर भाषण-भाग्यमदें न उतावें-सुतममता टाकून मार्ग सोडावा (२५-३८); धृतराष्ट्राचें उत्तर-भगवंताची माया दुर्नि- (२६-४८). सज्जनप्रार्थना (श्लो. १-६) निंदकपंचक (श्लो. १-५).

## कृष्णविजय उत्तरार्ध (पद्यसंख्या १९,५७).

**अध्याय ५० वा (१८५)**:-जामातवधाचा सूड उगविण्याकरितां ासंधाचा द्वारकेवर हल्ला-यदूंची तयारी (१-१२); युद्धास प्रारंभ-जरासंधाचें ाषण-कृष्णोत्तर-जरासंधपराभव (१३-२५); त्याचा तपार्थ वनगमनविचार २६-२८); त्यास इतर भूप युद्धास प्रोत्साहन देतात (२९-३१); त्याची तरा युद्धें (३२-३६); काळयवनाची द्वारकेवर स्वारी-यदुरक्षणार्थ समुद्रां र्गस्थापना (३७-४५).

**अध्याय ५१ वा (१८९)**:-काळयवनकृष्णयुद्ध-शिववररक्षणार्थ कृष्ण पराभव स्वीकारतो (१-७); गह्वरसुप्त मुचुकुंदास कृष्ण समजून यवन-ृत्ताप्रहार-यवनज्वलन-मुचुकुंदकृष्णभेट-(८-१७); परस्परांचें आत्मवृत्त-कथन (१८-३६).

**अध्याय ५२ वा (१९२)**:-मुचुकुंदाचें श्रीबदरीं गमन (१-४); शेषयवनांचा नाश (५-६); जरासंधाचें असंख्यसेनेसहित युद्धास आगमन-राम-कृष्णकृत प्रवर्षण-पर्वताश्रय-रिपुनाशार्थ जरासंध पर्वत जाळून स्वस्थानीं जातो-रामकृष्णद्वारकागमन (७-१८); रुक्मिणीस्वयंवर-कृष्णरुक्मिणीचा परस्पर भाव-रुक्मीचा विचार (१९-२५); रुक्मिणीचिंता-कृष्णाकडे द्विजास धाडते (२६-३२); रुक्मिणीपत्रिका (३३-४१).

**अध्याय ५३ वा (१९६)**:-रुक्मिणीस्वयंवर (१-७०).

**अध्याय ५४ वा** (२०२):–रिपुबळांचा बळरामकृत पराभव (१-१४); रुक्मिप्रतिज्ञा-रुक्मिकृष्णयुद्ध-रुक्मिबंधन-रुक्मिणीविवाह (१५-५९).

**अध्याय ५५ वा** (२०६):–रुक्मिणीचा प्रद्युम्न सुत मदन च आहे असें समजून शंबर त्याचें हरण करून त्यास समुद्रांत फेंकतो–त्यास एक मासा गिळतो (१-५); त्या च माशास धरून एक धीवर शंबरास विकतो–त्या माशाच्या उदरांतून प्रद्युम्न निघतो (६); रतीची पतिप्राप्त्यर्थ शंबरपाकगृहीं चाकरी–तिच्या हाता तो मुलगा येतो (७-१०); रति प्रद्युम्नास सुरतार्थ भेटली असतां (११-१४) प्रद्युम्न ती आपली आई असें समजून तिचा धिक्कार करतो (१५); रति खरा प्रकार सांगते (१६-१८); प्रद्युम्नहस्तें शंबरवध (१९-२२); सुर त्याचा जयजयकार करतात (२३-२४); त्यास मायावती (रति) द्वारकेस नेते; त्यास पाहून हा कोण म्हणून साऱ्यांस शंका पडते (२५-२८); रुक्मिणीचें ह्या मुलांत कृष्णाचें साम्य असून आपल्या मुलाचें व ह्याचें वय जुळत आहे इत्यादि भाषण (२९-३६); कृष्ण व इतर मंडळी तेथें येतात (३७); नारद येऊन सर्व वृत्त कथन करतात (३८-४६); त्यांस सर्वांचें सप्रेम भेटणें (४७-५१).

**अध्याय ५६ वा** (२१५):–सत्राजिताचें सूर्यापासून स्यमंतकमणि मिळविणें (१-५); तो कृष्ण मागत असतां न देणें (६-९); तो मणि घेऊन त्याचा सोदर प्रसेन मृगयेस जातो–तेथें सिंहा त्यास मारून मणि घेतो–त्यापासून जांबवंत घेऊन आपल्या घरीं ठेवतो (१०-११); मणिलोभानें आपल्या भावास मारलें असावें असा कृष्णावर सत्राजित आळ घेतो (१२-१३); तो आळ खोटा करण्याकरितां कृष्ण स्वतः मणिशोधार्थ सहपौर वनांत जातो व जांबवंताच्या विवरीं एकटा च शिरतो (१४-१९); त्याचीं जांबवंताशीं अठ्ठाविस दिवस युद्ध (२०-२४); जांबवंताचा पराभव व त्याची प्रभुस्तुति (२५-३५); कृष्णास स्वकन्यार्पण (३६); पौरांचा कृष्णाविषयीं शोक व सत्राजितास दोष देणें (३७-३९); चंद्रभागेची प्रार्थना–तिचा वरप्रसाद (४०-४३); तिच्या सामर्थ्यें ते सर्व पौर झोपेंतून जागे होतां च कृष्ण सश्लोक पाहतात

४-४६ ); सत्राजित स्वपापनिवारणार्थ स्वकन्या प्रभूस अर्पण करतो--कृष्ण
ा मणि परत देतो ( ४७-५४ ).

**अध्याय ५७ वा ( २२४ )**:—पांडव लाक्षागृहांत जळल्याची वार्ता
ऱ्यावरून कुंतीस समजावण्यास रामकृष्ण हस्तिनापुरीं गेले असतां ( १-२ )
त्रर्मा व अक्रूर ह्यांच्या सांगण्यावरून शतधनु सत्राजिताचा वध करून मणि
ा करतो ( ३-९ ); तेव्हां सत्यभामा तें वृत्त हस्तिनापुरीं जाऊन कृष्णास
ाते-कृष्ण शतधनूस मारण्यास निघतात ( १०-१३ ); शतधनु कृतवर्म्याचें
ाय मागतो-त्यास कृतवर्म्याचें प्रत्युत्तर ( १४-१५ ); अक्रूर हि कृष्णमहिमा
ऊन सहाय देण्याचें नाकारतो ( १६-१८ ); अक्रूराजवळ मणि टाकून
गरक्षणार्थ शतधनु पळत सुटतो-शेवटीं त्यास कृष्ण मारतो ( १९-२४ );
ाचे ठिकाणीं मण्याचा निष्फल शोध ( २५-२८ ); राम मिथिलेस जातो
२९-३१ ); कृष्ण द्वारकेस येऊन सत्यभामेस वृत्त सांगतो ( ३२-३३ );
ावर्मा पळून जातो--अक्रूर हि काशीस जाऊन मण्याच्या साहाय्यें दानधर्म
ूं लागला ( ३४-३९ ); तें वृत्त द्वारकेस कळतां च सत्यभामा व बळराम
ष्णावर रागावतात ( ४०-४४ ); द्वारकेंत अनेक अरिष्टें उत्पन्न होतात
४५-४६ ); तेव्हां वृद्ध लोक अक्रूर नसल्यामुळें अशी गोष्ट होत असल्याचें
ांगतात ( ५१ ); तेव्हां अक्रूरास आणणें ( ५३ ) व गौरवयुक्त करून त्यास च
णिदान करणें ( ६१ ).

**अध्याय ५८ वा ( २३५ )**:—कृष्णाचें हस्तिनापुरास जाणें--सर्वांची भेट
द्रौपदी--पृथा--युधिष्ठिरभाषण ( १--६ ); चार मास कृष्ण वनास जातात ( ७ );
ाषा शमविण्याकरितां यमुनातीरीं जातात--तेथें एक सुस्वरूप कन्या दिसते
८--९ ); तिचें आत्मवृत्तकथन--कृष्णप्राप्तीची इच्छा ( १० ); कृष्ण तिला
कालिंदीला ) स्वपुरीं नेतो; ( ११ ); मयाकडून हस्तिनापुरीं सभारचना-
ांडववनदहनकथा ( १२--१५ ); सर्वांचे निरोप घेऊन स्वपुरीं आगमन
१६ ); मित्रविंदेशीं लग्न ( १७--१९ ); सत्यास्वयंवरप्रसंगीं कृष्णास दोन
वृषभांचें दमन करण्याचा पण सांगतात ( २०--२६ ); कृष्णाकडून वृषभांचें
दमन व सत्येशीं विवाह ( २७--३२ ); पुरास निघताना शत्रु अडथळा करतात;

त्यांशीं अर्जुन युद्ध करतो--पुरास आगमन (३३--३७); भद्रापरिणय (३८); लक्ष्मणापरिणय (३९-.४१).

**अध्याय ५९ वा (२४१):**—नरकासुराचीं कृत्यें (१); रुक्मिणीस च पारिजातक पुष्प दिल्यामुळें सत्यभामेचा रुसवा (२); इंद्राचें नरकासुरोद्भव-दुःखकथन--कृष्णाचें नरकासुरपुरीं गमन--नरकासुरहनन (३--५); त्याच्या मुलास अभयदान; त्याच्या बंदींतील सोळासहस्र एकशें एक बायकांची सुटका-त्यांस विवाहार्थ स्वपुरीं आणणें (६--९); अदितीस कुंडलें देणें (१०); देवकृत कृष्णसंभावना (११--१२); कृष्ण पारिजातकवृक्ष हरण करतो, म्हणून इंद्र युद्धास येतो (१३); पारिजातकहरणाचा खरा हेतु (१४); इन्द्राचें मूढत्व (१५-१६); त्याचा पराजय व तरूची उद्यानीं स्थापना (१७--१८); सोडविलेल्या स्त्रियांशीं विवाह (१९).

**अध्याय ६० वा (२४५):**—कृष्णाची स्वतःवर च फक्त प्रीति आहे अशा रुक्मिणीच्या गर्वाचा परिहार--कटुभाषण (१--३); रुक्मिणी दुःखित होते--तिचें सांत्वन (४--१०).

**अध्याय ६१ वा (२४६):**—कृष्णास सागरोपमा (१); त्याचा संसार (२); त्याची संतति (३); प्रद्युम्न--त्याचा रुक्म्यात्मजेशीं विवाह (३--५); चारुमति व अनिरुद्ध यांचे विवाह (६--७) भोजकटास होतात (८); रुक्मीस इतर राजांची दुष्टपणाची मसलत (९--१०); द्यूताची तयारी- द्यूतांत पण कोणीं जिंकला त्याबद्दल भांडण- आकाशवाणी- बळरामास कटुशब्दताडण (११--१९); रामकृत रुक्मिहनन--कालिंगवध--इतर भूपांची धांदल (२०--२३); कृष्णाची रुक्मिवधानें अडचणीची स्थिति (२४--२७).

**अध्याय ६२ वा (२५१):**—शंकरानुग्रहें प्रौढप्रताप भुज मिळालेल्या बाणासुराची प्रतियोद्धा मिळण्याबद्दल शंकरास प्रार्थना (१--८); इच्छित वरदान (९-११); बाणाच्या उषाकन्येस स्वप्नांत अनिरुद्धाची गांठ--जागी झाल्यावर सखीच्या चित्रदर्शनानें अनिरुद्धास ओळखते (१२--२१); सखी अनिरुद्धास घेऊन येते (२२--२३); उषा अनिरुद्धास गुप्तपणें जवळ ठेवते (२४--२६); ती बातमी कांहीं दिवसानीं बापास कळल्यावर (२७) तो

अनिरुद्धाकडे येतो--अनिरुद्धवर्णन (२८--३२); अनिरुद्धबाणयुद्ध--अनिरुद्धबंधन (३३--३६).

**अध्याय ६३ वा (२५७)**:—अनिरुद्धामुळें शोकाकुळ द्वारका (१); नारदाकडून सत्य वृत्तांत कळतां च (२-३) यदु बाणाशीं युद्धास जातात-त्याशीं युद्ध--बाणाचे चार हात राखून बाकीचे कृष्ण तोडतो (४-२३); शंकराची बाणाबद्दल कृष्णास विनंति (२४-२७); कृष्णोत्तर--बाणास जीवदान-अनिरुद्धाची सुटका--परत द्वारकेस जाणें (२८-३५).

**अध्याय ६४ वा (२६३)** निर्जीवन कूपांत असलेल्या सरड्यास काढण्याचा प्रद्युम्नादिक बाळकांचा प्रयत्न--कृष्ण त्यास बाहेर काढतो--त्यांतून दिव्याकृति निघते (१-४); तिचा पूर्ववृत्तांत--नृगनृपाख्यान--त्याचें पुण्यचरित (५-९); नष्टगोधनब्राह्मण त्याजकडे गाय मागण्यास येतो--त्यास नृगानें एक गाय दिल्यावर, तिचा पहिला मालक ब्राह्मण, त्याचें व त्या द्विजाचें भांडण (१०); ते नृगाकडे येतात--दोघांची हि समजूत न होतां ते रागावून निघून जातात (११-१७); मेल्यावर आधीं पापसंग्रह भोगण्याचें ठरविल्यावरून यम सरडा करतो (१८-१९); नृगकृत प्रभुस्तुति (२०-२२); नृगाचें स्वर्गमन (२३).

**अध्याय ६५ वा (२६७)**:—बळरामाचें गोकुळास गमन (१); सर्वाप्तांच्या भेटी व कुशळ प्रश्न (२-५); गोपगोपींच्या भेटी--त्यांचें कृष्णाबद्दल विचारणें (६-१०); गोपींचे बळरामास कृष्णागमनाबद्दल प्रश्न (११-१३); स्वचेतोहर कृष्णानें (१४-१६) स्वतःस फसविल्याचें सांगतात (१७-२०); बळराम त्यांस कृष्णाचा निरोप सांगून त्यांची समजूत करतो (२१-२३); कालिंदीतटीं त्यांसह बळरामाचा विहार (२४); सुरापान (२५-२६); सुरेची निंदा व भक्तीची स्तुति (२७-२८); कालिंदीला तोयकेलीस्तव बळरामानें जवळ बोलाविलें असतां तिनें अवज्ञा केल्यावरून बळरामक्रोध-कालिंदीची क्षमायाचना (२९-३६); बळरामाचा गोपींस दोन महिने असा सहवास-लाभ (३७-४३).

**अध्याय ६६ वा ( २७५ )**:—पौंड्रकनृपतोतयाचें बंड ( २-३ ); त्याचा कृष्णास निरोप ( ४-६ ); कृष्णोत्तर ( ७-९ ); युद्ध-कृष्णकृत पौंड्रकाचा अधिक्षेप ( १०-१६ ); तद्वध-काशीशवध ( १७-२० ); काशीशसुत सुदक्षिण पितृवध करणाऱ्याचा स्वहस्तें वध व्हावा म्हणून शंकरोपासना करतो--शंकर त्यास अग्नीची उपासना करण्यास सांगतात ( २१-२५ ); अग्नि द्वारकेस जाळित सुटतो- चक्रद्वारें कृष्ण अग्नीस आवरतो- अग्नि सुदक्षिणास जाळतो ( २६-३७ ).

**अध्याय ६७ वा ( २८२ )**:—नरकासुरसखा द्विविदकपि बळराम गोपींसहित क्रीडा करित असतां त्यांची चेष्टा करितो ( १-६ ); बळराम रागावतो-- दोघांचें युद्ध- द्विविदवध ( ७-२२ ); सुरकृत रामाभिनंदन (२३-२४).

**अध्याय ६८ वा (२८७)**:---दुर्योधनसुता लक्ष्मणा सांब हरण करतो म्हणून ( १ ) दुर्योधनादि यदूंस दोष देऊन सांबास बद्ध करण्याचें ठरवितात ( २-५ ); कर्णादि सहा वीर त्याजवर धावून जातात-त्यांचें युद्ध ( ६-१३ ); सांबबंधन ( १४ ); नारदाकडून हा वृत्तान्त कळतां च बळराम हस्तिनापुरास येतो ( १५-१७ ); त्यास सुयोधनादि भेटतात ( १८-२० ); बळरामाचें सामोपचारिक भाषण ( २४ ); त्यांस दुर्योधनादिकांचें दुरुत्तर ( २१-३० ); बळरामाचें क्रोधयुक्त भाषण ( ३१-४० ); कौरवांचा युद्धांत पराभव (४१-४५).

**अध्याय ६९ वा (२९५)**:—नारद द्वारकेस येतो (१-२); द्वारकेंतील थाट ( ३-८ ); नारदकृष्णभेट ( ९-१० ); त्यांशीं कृष्णभाषण ( ११-१२ ); नारदोत्तर ( १३-१५ ); नारदास कृष्णाच्या सर्व बायकांच्या घरां व इतर हि अनेककार्यव्यग्र असा कृष्ण दिसतो ( १६-२८ ); त्यास नारदाची अगम्यलीलानायक म्हणून प्रार्थना ( २९-३१ ); कृष्णाचा नारदसत्कार (३२-३४).

**अध्याय ७० वा ( ३०१ )**:—श्रीकृष्णाचा वर्तनक्रम ( १-६ ); मागधभूपत्रस्त सुभद्रराजांचा दूत त्यांची विपन्नावस्था सांगून रक्षणार्थ त्यानीं विनंति केल्याचें सांगतो ( ७-११ ); त्या च वेळीं नारदागमन ( १२ ); मुकुंदकृत नारदसत्कार--पांडववृत्तप्रश्न ( १३-१५ ); देवर्षीचा कृष्णास राजसूययज्ञास येण्याबद्दल निरोप (१६-१९); दोन कार्यांतील प्रथम कोणते स्वीकारावें ह्याबद्दल उद्धवास प्रश्न ( २० ).

**अध्याय ७१ वा ( ३०४ )**:–आधीं युधिष्ठिरयज्ञास जाऊन तदनंतर जरासंधास मारावें म्हणून उद्धवाचा अभिप्राय ( १-६ ); त्यास इतरांची अनुमति ( ७ ); हस्तिनापुरीं आगमन--सर्वांच्या भेटी ( ८-२० ).

**अध्याय ७२ वा ( ३०८ )**:—कृष्णास धर्म क्रत्वारंभाबद्दल अनुज्ञा विचारतो ( १-४ ); कृष्णोत्तर, दिग्विजयार्थ देशोदेशीं भाऊ पाठवावेत म्हणून सांगणें ( ५-८ ); त्याप्रमाणें मागधाशिवाय सर्वांस जिंकणें ( ९-१३ ); ब्राह्मण--वेष घेऊन कृष्ण भीमार्जुनांसह मागधाकडे येतात ( १४-१५ ); त्यास इच्छित पुरविण्याची मागणी करतात--तेजस्वी क्षात्राचें कर्तव्य ( १६- २८ ); जरासंधाचा आत्मगत विचार ( २९-३२ ); इच्छादानाची तयारी ( ३३ ); युद्धाची मागणी ( ३४ ); जरासंधोत्तर--वृकोदराशीं युद्धास तयारी (३५-३८); जरासंधभीमयुद्ध ( ३९-४५ ); दोघे हि सारखे च योद्धे असल्यामुळें सत्तावीस दिवस युद्ध चालतें--कृष्ण भीमास जरासंधास सांध्याच्या ठिकाणीं फाडण्याची खूण करतो–जरासंधवध ( ४६-५० ); त्याच्यामागें त्याच्या मुलाची गादीवर स्थापना ( ५१-५३ ).

**अध्याय ७३ वा ( ३१७ )**:—जरासंधाच्या बंदींतील राजे कृष्णाची स्तुति करतात (१-६); कृष्णाचें अभयोत्तर( ७-९ ); कृष्णादिकांचें हस्तिनापुरास आगमन ( १०-११ ).

**अध्याय ७४ वा ( ३१९ )**:–कृष्णाज्ञेनें क्रतूस आरंभ ( १-५ ); अग्रपूजेबद्दल विचार (६); सहदेवानें कृष्णाचें नांव घेतल्यावर सर्वांस तें पसंत पडतें-कृष्ण-पूजा (७-१२); चैद्याची कृष्णाच्या अग्रपूजेस हरकत ( १३-१६ ); चैद्याची कृष्णनिंदा ( १७-२० ); कृष्ण चैद्यास मारतो ( २१-२४ ); चैद्यतनूंतून ज्योत निघून कृष्णदेहीं शिरते ( २५-२७ ); यज्ञसमाप्ति ( २८-३१ ).

**अध्याय ७५ वा ( ३२४ )**:—शुकास परिक्षिताची दुर्योधनमत्सर-हेतुपृच्छा ( १ ); राजसूययज्ञप्रसंगीं पांडव व दुर्योधनादिक आपणांकडे निरनिराळीं कामें वाटून घेतात- त्यांत दुर्योधनास वित्ताधिकारी करितात ( ६-७ ); यज्ञसमाप्तीच्या वेळीं गंगास्नान ( ८-१२ ); दुर्योधनास युधिष्ठिराची यज्ञप्रसंगींची अलोट संपत्ति पाहून विषाद वाटतो ( १३-१५ ) व त्यांत च मयसभेंत जलस्थलाज्ञानानें पतन होऊन झालेला अपमान ( १६-२३ ).

**अध्याय ७६ वा ( ३२८ )**:—चैद्याचा मित्र शाल्व स्वहस्तें यदुक्षय व्हावा म्हणून शंकराराधना करीत असतां ( १-२ ) ते प्रकट होऊन इच्छिलेलें कामग ' सौभ ' विमान देतात ( ३-५ ); तत्साहाय्यें द्वारकेवर स्वारी (६-७); प्रद्युम्न द्वारकेचें रक्षण शौर्यानें करीत असतां (८-१२ ) रिपुगदाघातें मूर्च्छित होतो ( १३ ); म्हणून त्याचा रथ सूत बाजूस नेतो ( १४ ); त्याबद्दल सावध झाल्यावर खरी स्थिति माहित नसणारा प्रद्युम्न त्याची निर्भर्त्सना करितो ( १५-१७ ); सारथी त्यास खरें कारण सांगतो ( १८-१९ ).

**अध्याय ७७ वा ( ३३१ )**:—प्रद्युम्न पुनरपि युद्धास ठाकतो—सत्ता-वीस दिवस युद्ध चालल्यावर ( १-४ ) हस्तिनापुरीहून आलेला कृष्ण त्याच्या मदतीस जातो- कृष्णशाल्वयुद्ध ( ५-८ ); परस्पर निंदापर भाषणें ( ९-११ ); कृष्णप्रहारें सयान शाल्व नाहींसा होतो-दूतमुखीं पित्यास शाल्वानें हरण केल्याची कृष्णास वार्ता ( १२-१४ ); कृष्णशोक ( १५-१७ ); मायावी शौरीचा शाल्वकृत वध ( १८-२० ); त्यानें कृष्ण मूर्च्छित असतां त्यास मार-ण्याचा शाल्व प्रयत्न करतो ( २१-२३ ); कृष्ण ' सौभ ' विमान समुद्रांत पाडतो ( २४ ); नंतर शाल्व गदायुद्धास प्रवृत्त झाला असतां कृष्ण त्याचा वध करितो ( २५-२९ ).

**अध्याय ७८ वा ( ३३६ )**:—शाल्वादिकांचा मित्र कारूषक कृष्णावर चालून आला असतां कृष्ण तद्वध करितो ( १-८ ); तद्बंधु विदूरथवध ( ९ ); कृष्णाचें द्वारकेस येणें ( ९-१० ); भारती युद्धाचे वेळा बळराम यात्रेस निघतो ( ११ ); प्रभासादि क्षेत्रांहून नैमिषारण्यीं जातो- तेथें सूत आसनावरून न उठ-ण्यानें बलरामाचा अपमान करितो ( १२-१६ ); म्हणून बळरामाचें क्रोधयुक्त भाषण व सूतवध ( १७-२० ); तेव्हां इतर मुनींचा हाहाःकार व बलरामास प्रायश्चितोपदेश ( २१-२४ ); सूताच्या पुनरुज्जीवनार्थ प्रायश्चितविधिकथन—बल्वल—हवन व भारतवर्षप्रदक्षिणा करणें. ( २५-३३ ).

**अध्याय ७९ वा ( ३४२ )**:—बल्वलवध ( १-८ ); बळरामाची यात्रा. ( ९-२८ ); प्रभासक्षेत्रीं भारतीयुद्धाची हकीगत कळल्यावर धृतराष्ट्राच्या सांत्व-नार्थ बळराम कुरुक्षेत्रीं येतो ( २९-३१ ); तेथें गदायुद्धास तयार असलेल्या भीमदुर्योधनांस निरर्थक उपदेश ( ३२-४२ ).

**अध्याय ८० वा (३४७)**:—कृष्णसख्या सुदाम्याची दरिद्रावस्था (१–१०); त्यास त्याची भार्या कृष्णाकडे जाण्यास सांगते (११–१९); मूठभर पोह्यांचें उपायन घेऊन सुदामा कृष्णाकडे येण्यास निघतो (२०–२६) वाटेंत कृष्ण ओळखील कीं नाहीं म्हणून चिंता (२७–३०); द्वारकेंत आल्या-वर कृष्णभेट--कृष्ण सुदाम्यास उत्तम आसनावर बसवून पूजा करितो (३१–३९); त्याच्या बायकांचे दीनब्राह्मणपूजनास पाहून विस्मितोद्गार [४०--४६); कृष्णाचें सुदाम्यास भाषण — लग्न वगैरे झालें आहेना? अनासक्त असा च संसारीं वागतोस ना? (४४–५१); गुरुगृहांतील आयुष्याची आठवण—— गुरूंची महति (५२–५६); इन्धनार्थ वनांत जाऊन वाट चुकणें–गुरूंचें शोधास येणें–त्यांचें भाषण–गुरूपदेश देऊन गृहास पाठविणें–विप्रोत्तर (५७–७५).

**अध्याय ८१ वा [३५४]**:—कृष्णाची उपायनपृच्छा [१–५], लज्जित सुदाम्यापासून बळें च पोह्यांची गांठोडी घेऊन ते प्रेमानें खाणें [६--२३]; सुदाम्यास भोजनादि देऊन दुसरे दिवशीं प्रातःकाळीं तो निघाला असतां त्यास पोहोंचविण्यास जाणें [२४--३४]; विप्र परत चालला असतां मनांत म्हणतो—मज दीनाविषयीं प्रभूनें इतकी उत्कंठा व आस्था दाखवावी! [३९--४६]; पण धन मात्र मुळीं च देऊं नये!! [४७--५५]; आतां म्यां स्त्रीस काय सांगावें? [५६--५९]; इत्यादि चिंतनांत घराजवळ येतो [६०]; प्रभु-प्रसादानें सुदाम्याकरितां एक सुंदर पुरी निर्माण होते [६१--६८]; ती पाहतां सुदाम्याचे विचार [६९--७४]; त्यास पौरजन सामोरे येऊन मोठ्या सन्मानानें पुरींत नेतात [७५--८०]; स्त्रीभेट [८१--८९]; सुदाम्याचा नव प्रासाद [९०–१०२]; सुदाम्याचें कृष्णस्तुतिपर भाषण [१०३–११९].

**अध्याय ८२ वा [३६६]**:—कुरुक्षेत्रीं पर्वस्नानार्थ यादव, कौरव-पांडव वगैरेंचें येणें-परस्परांच्या भेटी [१-१३]; वसुदेवजीचें यशोदेस भाषण-पुत्रपालनार्थ तिचे उपकार मानणें [१४-२०]; गोपींस कृष्णाचें दर्शन व भाषण-उशिरां भेट दिल्याबद्दल क्षमायाचन [२१-३७]; गोपींचें प्रत्युत्तर [३८-४०].

**अध्याय ८३ वा [ ३५० ]**:—कृष्णाच्या बायकांस स्वमुखें स्वविवाहवृत्तकथनाविषयीं द्रौपदीची विज्ञप्ति [ १-८ ]; त्याप्रमाणें रुक्मिणी आपलें विवाहवृत्त सांगते [ ९-१०० ]; सत्यभामेचें स्वविवाहवृत्तकथन [ १०१--११६ ]; जांबवतीचें स्वविवाहवृत्तकथन [ ११७-१२५ ]; कालिंदीचें स्वविवाहवृत्तकथन [१२६-१३३]; मित्रविंदेचें स्वाविवाहवृत्तकथन [१३४--१४६]; सत्यचें स्वविवाहवृत्तकथन [ १४७-१६३ ]; भद्रेचे स्वविवाहवृत्तकथन [ १६४-१७१ ]; लक्ष्मणेचें आत्मस्वयंवरवृत्तकथन [ १७२-२०० ]; षोडशसहस्र महिषींतील एकीचें स्वविवाहवृत्तकथन [ २०१-२१२ ].

**अध्याय ८४ वा [ ३८९ ]**:—त्या ठिकाणीं नारदादि सन्मुनिवृंद येतो [ १-९ ]; त्याची कृष्णकृत स्तुति-तीर्थस्थानाहून हि आपण श्रेष्ठ आहांत [ ७-१६ ]; मुनींचे उद्गार-आमचं जनसंग्रहास्तव स्तवन होय [ १७—२२ ]; वसुदेवानें स्वोद्धरणार्थ मुनींना प्रार्थना केल्यावर नारद, कृष्णास सोडून हा आपल्यास प्रार्थना करतो, तें सामान्यजनप्रवृत्त्यनुरूप आहे असें म्हणतात [ २३-२६ ]; मुनि त्यास यज्ञ करावा म्हणून सांगतात-त्यांच्या साहाय्यें वसुदेव यज्ञ करतो [ २७-२९ ]; नंदाशिवाय इतरांचें जाणें [ ३० ]; नंदाचें स्वपुत्रास सांभाळल्याबद्दल उपकार वसुदेवाचें मानणें [ ३१-४३ ]; सर्वांचें क्षेत्राहून परत जाणें [ ४४-४९ ].

**अध्याय ८५ वा [ ३९३ ]**:—वसुदेव कृष्णाचा महिमा वर्णन करून स्वमोह नाहींसा करण्याची विनंति करतो [ १-१८ ]; देवकीची तनयांस विनंति-गुरुपुत्राप्रमाणें माझे हि कंसानें मारलेले मुलगे मला आणून द्या [ १९-२५ ]; रामकृष्ण पाताळीं जातात [ २६-३१ ]; बळीस पूर्ववृत्त सांगून आपले भाऊ त्यापासून घेऊन देवकीपुढें उभे करतात [ ३२-४० ]; मातेचें व रामकृष्णांचें दर्शन झाल्यावर ते विमानीं बसून जातात [ ४१-४३ ]; यशोदेचें कृष्णस्तुतिपर भाषण [ ४४-४९ ].

**अध्याय ८६ वा [ ३९७ ]**:—तीर्थें हिंडत अर्जुन प्रभासास गेला असतां तेथें सुभद्रा दुर्योधनास देण्याच ठरलेलें कळतें [ १-३ ]; तो त्रिदंडियतिवेष घेण्याचें ठरवून द्वारकेस जातो [ ४-६ ]; यतीची प्रसिद्धि [ ७-९ ];

# चमत्कारिक रीतीनें लागलेला एक शोध.

कृष्णविजयाचा उपोद्घात वगैरे सर्व छापून झाल्यानंतर ग्रंथाचें शुद्धिपत्र तयार करण्यासाठीं कारणपरत्वें मूळ पोथीचीं पत्रें चाळीत असतांना, पूर्वीं अनेक वेळां ध्यानांत आलेल्या च पोथींतील एका असाधारण जाड पत्राकडे चित्त विशेष वेधलें. पंतांचें दप्तर स्वदेशी व परदेशी (पोर्तुगीज) अशा दोन्ही प्रकारच्या कागदांवर आहे. त्यांत परदेशी कागदाचा भाग विशेष आहे. कृष्णविजय हा ग्रंथ स्वदेशी व परदेशी अशा दोन्ही प्रकारच्या कागदांवर लिहिलेला आहे. सर्व पूर्वार्ध व उत्तरार्धांतील पहिलीं २२ पत्रें, म्हणजे अ० ५७ तील ३१ व्या श्लोकाचा "प्रभूच्या शिष्यत्वें" येथपर्यंतचा भाग स्वदेशी कागदावर लिहिलेला आहे, व पुढें हि कागदाची सळभेसळ झालेली थोडीफार दिसून येते. उपरिनिर्दिष्ट जाड पत्र हें च क्रमानें स्वदेशी कागदावर लिहिलेल्यांपैकीं अखेरचें पत्र होय. पोथींत मध्यें च हें असें जाड पत्र कां म्हणून विचार करीत असतां, हें पत्र स्वदेशी कागदाचें आहे कीं परदेशी कागदाचें आहे हें अनुमानण्यासाठीं त्याचे आंत कांहीं गर्भचिन्हें (Watar Marks) आहेत कीं नाहींत हें पाहण्याचा प्रयत्न करूं लागलों, तों असें लक्ष्यांत आलें कीं, पंतानीं दोन गावठी कागदाचे पाठकोरे बेमालुम रीतीनें एकत्र डकवून सदरील पत्र तयार केलें आहे! पत्र उभें धरलें म्हणजे एका बाजूच्या कागदाच्या आंतील अंगावर पुढीलप्रमाणें मजकूर आढळतोः—

"श्रीगणेशोगुरुः (१ ली ओळ) पुस्तकें श्रीमद्रामनंदनमयूरेश्वरालि—(२ री ओळ) खित पत्रें (३ री ओळ व पुढें प्रत्येक ग्रंथनामासाठीं स्वतंत्र ओळ) २५ रसतरंगिणीटीका, १८ विद्वन्मोदतरंगिणी, ८ मत्स्यनीतिः, ३७ कुवलयानंद, ८ **कैवल्योपनिषट्टीका, २९ सांख्यतत्वकौमुदी**, २१ विवेकसिंधु, ५८ विश्वकोश, १९ मुहूर्तमार्तंड, २६ मयूरशतकं (सूर्यशतकं), **१२ भामिनीविलास**, ७ षट्पदीटीका, १४ **अद्वैतमीमांसा, २० शृंगारतिलक**, ४४ राघवपांडवीय, **४४ आचारार्कः, ४५ अमरकोश, १९ आदित्यहृदय.**"

सदर यादींतील ठळक ठशांतील ग्रंथांचीं नांवें मो. च. ग्रंथांतील पंतलिखित ग्रंथांच्या यादींत नाहींत.

दुसऱ्या बाजूच्या कागदावर कृष्णविजयाच्या सहाव्या अध्यायांतील २ व ३ हीं दोन पद्यें "श्रीगुरुपूतनावध" ह्या मथळ्याखालीं १ व २ असे क्रमांक टाकून लिहिलीं आहेत.

आतां, ह्या मजकुरावरून काय काय अनुमानें निघतात तीं पाहूं. पंतानीं स्वतः लिहिलेल्या ग्रंथांची जी यादी वरील कागदांत दिली आहे ती कांहीं विशिष्ट कालांत लिहिलेल्या ग्रंथांची आहे; पूर्ण यादी नव्हे. ह्या यादींतील उपलब्ध ग्रंथांपैकीं कांहीं ग्रंथांवर लेखकानें लेखनकाल दिलेले आहेत, व त्या कालाच्या पूर्वी लिहिलेल्या व त्या कालाच्या नंतर लिहिलेल्या हि पोथ्या उपलब्ध आहेत. ह्या यादींतील नांवें हि लेखन-कालानुक्रमानें लिहिलेलीं नाहींत. ह्यावरून ही यादी म्हणजे पंतानीं केव्हां तरी स्मरणार्थ लिहून ठेवलेलें टिपण दिसतें. ह्या यादींतील रस-तरंगिणीटीका, भामिनीविलास व राघवपांडवीय हे ग्रंथ शक १६८२ त आणि कुवलयानंद व षट्पदीटीका हे १६८३ त लिहिले असल्याचा उल्लेख त्या त्या ग्रंथांच्या अखेरीस आहे. अर्थात् हा कागद १६८३ तील किंवा त्यानंतरचा ठरतो. दुसऱ्या बाजूच्या कागदावरील मजकुरावरून त्याचा नक्की काल कळून येत नाहीं. तथापि कृष्णविजयांतील पूतनावधरचनाप्रसंगीं तो कवीच्या हातांत होता व त्यानंतर ५१ अध्याय म्हणजे सुमारें २ हजार कविता रचून व लिहून झाल्यानंतर त्या कागदाचा मागें लिहिल्याप्रमाणें कवीनें उपयोग केला आहे हें विचारांत घेतलें म्हणजे, उपोद्घातांत कृष्ण-विजयाच्या रचनाकालाविषयीं जें लिहिण्यांत आलें आहे त्यावर ह्या पत्रानें पडत च असेल तर कांहीं अनुकूल च प्रकाश पडत आहे असें आमच्या बुद्धीस वाटतें.

—संपादक.

---

राम त्यास घरीं भोजनास नेतो [ १०-१५ ]; पर्ववेळीं तीर्थस्नानाची संधि साधून अर्जुन सुभद्रेस पळवितो [ १६-२८ ]; तें वृत्त ऐकून बळरामाचा क्रोध [ २९-३४ ]; कृष्णानें समजाविल्यावर क्रोधशांति [ ३५-४१ ].

**अध्याय ८७ वा [ ४०१ ]**:-मिथिलापुरीचा निर्धन असा सज्जन-मार्गी वासुदेवभक्त श्रुतदेव ब्राह्मण [१-२ ] व तेथील राजा हरिभक्त बहुलाश्व ह्यांची मैत्री [ ३-४ ]; त्या दोघांस भेटण्यास कृष्ण समुनि येतो-मिथिलाभाग्य [ ५-१७ ]; त्याची श्रुतदेवबहुलाश्वभेट [ १८-१९ ]; कृष्ण दोन रूपें धरून दोघांकडे रहावयास जातो [ २०-२८ ]; बहुलाश्वाची प्रभुसेवा [ २९-३२ ]; स्वोद्धारार्थ कृष्णास भाषण [ ३३-४१ ]; श्रुतदेवाची प्रभुसेवा [ ४२-५७ ]; स्वभाग्योदयाबद्दल श्रुतदेवाचे मनांत तर्क [ ५८-६० ]; कृष्णास त्याचें कारण विचारणें [ ६१-६४ ]; कृष्णोत्तरः-ब्राह्मणमुनींचा प्रसाद-मला ब्राह्मणभक्ति मद्भक्तीहून प्रिय [ ६५-७६ ].

**अध्याय ८८ वा [ ४०८ ]**:-वृकनामा असुर नारदास हरिहरांत सत्वर प्रसन्न होणारा कोण म्हणून विचारतो [ १--३ ]; नारदानीं तसा हर आहे म्हणून सांगितल्यावर [ ४--७ ] वृकाची हर प्रसन्न करून घेण्यासाठीं तपश्चर्या; स्वमांसें होम [ ८--११ ]; सप्तमदिनान्तीं महादेव प्रसन्न होऊन 'वर माग' म्हणतात [ १२--१७ ]; 'ज्याच्या माथां कर ठेविन तो मरो' असा त्यानें मागितलेला वर शिव देतात [ १८-२४ ]; वृक स्ववरपरीक्षार्थ शिवशिरीं कर स्थापूं पाहे-शिव पळतात--त्यांच्या पाठीं वृक लागतो-सारखा मागें लागण्यानें वृक मद्भक्त च वाटला [ २५-४५ ]; हररक्षणार्थ हरि पुढें येतो [ ४६--५० ]; हरि शिशुवेष घेऊन [ ५१--५५ ] वृकास स्तुति करून वृत्तान्त विचारतो [ ५६ --६२ ]; मधुरवचनमूढचित्त वृकानें वृत्तान्त सांगितल्यावर [ ६३--६६ ] हराची निंदा करून, वर खोटा होणार; प्रत्यक्ष स्वशिरावर हात ठेवून प्रत्यय घे व वर खोटा ठरल्यावर हरास मार म्हणून सल्ला [ ६७--७५ ]; वृक त्याप्रमाणें करून आत्मघात करतो [७६--७८]; हरीचें हरास लीनतापर भाषण [ ७९--८५ ].

**अध्याय ८९ वा [ ४१५ ]**:-विधि, हरि, हर ह्या त्रिवर्गांत भक्तांची सोय जाणणारा कोण हें ठरविण्याकरितां सर्व मुनि भृगूस पाठवितात [ १--३ ];

भृगूचें ब्रह्माकडे जाणें [ ४--६ ]; शिवाकडे जाणें [ ७--८ ]; हरीकडे जाणें; हरि स्वतःकडे लक्ष देत नाहीं म्हणून लत्ताप्रहार [ ९--१३ ]; त्यावर विष्णूचें क्षमा-याचनपर भाषण [ १४--२० ]; भृगु मुनींस सर्व हकीगत सांगतात [ २१-२५ ]; स्वतोक जन्मतःच मरत असलेला एक विप्र त्यांचीं शवें राजद्वारीं टाकून कृष्णास निंदून शोक करतो [ २६--३१ ]; अशा रीतीनें आठ मुलगे मेले असतां ती गोष्ट अर्जुनास कळल्यावर तो अपत्य आपण रक्षूं म्हणून प्रतिज्ञा करितो [ ३२--३७ ]; त्यास विप्रोत्तर कीं, रामकृष्णादि हि रक्षणार्थ समर्थ नव्हते [ ३८--४० ]; अर्जुनाचें स्वप्रशंसायुक्त पुनः आश्वासन [ ४१--४५ ]; पुढच्या प्रसूतिकाळीं अर्जुनकृत गृहाचें रक्षण; तथापि अपत्याचें सदेह नाहींसें होणें [ ४६--५३ ]; विप्रस्त्री व विप्रशोक [ ५४--५५ ]; त्याचें अर्जुनास धिक्कारयुक्त भाषण [ ५६--६४ ]; पार्थाचें अपत्यशोधार्थ पाताळादि स्थानीं गमन [ ६५-- ६६ ]; शोध लागेना तेव्हां द्वारकेस परत येऊन प्रतिज्ञेप्रमाणें देह होमाया सिद्ध झाला [ ६७--७१ ]; तेव्हां कृष्ण अर्जुनासह पुनश्च शोधास निघतात [ ७२-७५ ] व लोकालोकगिरिपलीकडील स्थानीं पोहोंचतात [ ७६--८५ ]; तेथें शेषशायी विष्णुस्वरूपास पाहतात [ ८६--९३ ]। मदंशभूत अशा तुम्हां नरनारायणांचें दर्शन व्हावें म्हणून मीं पुत्रहरण केलें असें परमेश्वरभाषण [ ९४-९७ ]; द्विजास पुत्रप्रदान [ ९८-१०१ ].

**अध्याय ९० वा [ ४२४ ]**:—कृष्णाचें सर्व स्त्रियांस क्रीडासुख देऊन पावन करणें [ १--५ ]; क्षणैकविरहतप्ता षोडशसहस्र स्त्रियांचें भाषण [ ६--२५ ]; तत्रागत हंसास स्वपतिदूत मानून पुनरपि भाषण [ २६--४१ ]; कृष्णविजयाचें प्रभुपदीं अर्पण [ ४२--४६ ].

श्रीः

मोरोपंतकृत

# कृष्ण विजय.

## पूर्वार्ध[1].

( आर्यागीतिवृत्त. )

### अध्याय पहिला.

‘[3]हरिपद [2]भवसंतमसीं भास्कर,’ हें गुह्य बोलिले संत मसीं,<br>
गंगेच्या उगमातें [3]त्यातें वंदन असो प्रणतिसुगमातें. १

कारि जी प्रतियुग लीला, त्या नमन [4]शरण्यविष्णुपदयुगलीला.<br>
[5]मुनिमानसशिबिकेला, जीणें निजकीर्तिलेशजित शिबि[6] केला. २

म्हणती संत, ‘[7]तैंगाव्या चित्तीं हरिच्या कथा चि; संतत गाव्या.’<br>
या उपदेशासम न प्रिय इतर; वारि प्रमोद[8]देशास मन. ३

[9]शुकमुखशुचिसमजनता देवू हरिगुणसुधैकरुचिस मज नता.<br>
करुत कृपा बहु सुकवी. [10]भाव प्रणतीं स्वपाद पूज्य न [10]चुंकवी. ४

---

१. पंतानीं या कृष्णविजयग्रंथांत श्रीमद्भागवतांतील दशमस्कंधाचें सार अध्यायवार वर्णिलें आहे. म्हणून मूलग्रंथाप्रमाणें याचे हि पूर्वार्ध आणि उत्तरार्ध असे दोन भाग आहेत. पूर्वार्धांतील सर्व अध्याय आर्यागीतिवृत्तांत आहेत. या ग्रंथास ‘**बृहद्दशम**’ असें हि म्हणतात. २. संसाररूप गाढ अंधारामध्यें. ३. हरिपदातें. ४. त्राता विष्णूच्या दोन्ही पदांस. ५. मुनिजनांच्या मनांस शिबिका (पालखीप्रमाणें आधारभूत) अशी जी तीतें. ६. दानशूर राजविशेष. ७. रहाव्या. ८. आनंदाचें स्थळ च अशा (उपदेशास). ९. शुकादि पवित्र व निःपक्षपाती जनांचा समूह. १०. अन्वयः—पूज्य स्वपाद प्रणतीं भाव (सद्भाव) न चुकवी.

वृत्तीं आर्यीं आर्या श्राव्या, सेव्या चि फार, साधी, आर्या,
युक्ता सद्यमकानीं; घ्यावी रसिकीं करूनि उद्यम कानीं. ५
म्हणति भलीला आर्या, तैसी च सरोजनाभलीला आर्या;
संगत हें दोघींतें, जैसें रविहरिपदोत्थसरिद्दोघीं तें. ६
कृष्णकथा शुक राया अभिमन्युसुतास, मुक्त आशु कराया,
वदला स्पष्टा दशमीं; त्या गायिन एकवीसअष्टादश मीं. ७
निजसुखराशि शुकाचा बोल वदे; किति मयूर हा शिशु काचा?
तांडव उचित चि हे यां; वाणी कौतुक रसज्ञ म्हणति न हेयां. ८
सादर हो मन नामीं; हरिचरितांच्या करीन हो! मनना मीं.
म्हणती संत, 'तमातें हें चिंतन रवि घडेल संतत,' मातें. ९
आपुलिया संतानीं पूर्ण करावी दया सदा संतानीं.
श्रोत्र निवे, कीरमती बोधिति, बोलविति, सद्विवेकी रमती. १०
धरि गिरि, वन, पुर; साहे न दुरितकरअसुरभर परंतु, रसा हे.
स्वत्रास कळवि धात्या, गोरूपातें धरूनि, सकळविधात्या. ११
'आल्यें बा! धामातें सांगों, जाली असह्य बाधा मातें.
सांपडलों गा! यवनीं, दैत्यजनीं फार पीडिलों गाय वनीं.' १२
संतत नव्य सनतिचें पारिसे प्रभु अश्रुवर्धनव्यसन तिचें.

---

१. श्रेष्ठ. २. चांगल्या यमकानीं. ३. श्रम. ४. पद्मनाभ विष्णूची क्रीडा. ५. सूर्य आणि विष्णु यांच्या पायांपासून उत्पन्न झालेल्या नद्यांच्या म्ह० गंगेच्या आणि यमुनेच्या प्रवाहीं. ६. परीक्षितीस. ७. लवकर. ८. भागवताच्या दहाव्या स्कंधामध्यें. ९. प्रथमतः 'एकतीस' असा असलेला पाठ हरताळून 'एकवीस' केला आहे. १०. आत्मसुखाचा राशि. ११. शुकाचार्यांचा (पक्षीं) पोपटाचा. १२. मोरोपंत कवि (पक्षीं) मोर. १३. या मयूराला. १४. त्याज्य. [मला मोराप्रमाणें नृत्य च योग्य; तशांत मीं गायन केलें तर रसिक त्याचें कौतुक च मानतील; ते माझें गायन टाकावूं समजणार नाहींत हा भाव]. १५. पापरूप अंधकारातें. १६. शुकाचार्यांची बुद्धि. १७. पापी राक्षसांचा भार. १८. पृथ्वी. १९. सर्व सृष्टि उत्पन्न करणाऱ्या. २०. गृहास. २१. नमन करणारीचें.

'हें हारिल विभू; मीं तें करिन विदित सकळ,' विधि म्हणे *भूमीं तें. १३
[1]द्रुहिण [2]भवास, [3]वसुमतीश्रेयोर्थें घे, [4]सदेववासव, सुमती.
जाय, कृपा दावि नवी जो त्या [5]दुग्धाब्धिशायिपादा विनवी. १४
त्या सगुणब्रह्माची घे अभयोक्ती [6]समाहित ब्रह्मा चि.
हें विदित [7]वृषाकपिला प्रथम चि; कां न हारि हो! शिशुतृर्षा कपिलां[8] [9]? १५
तापातें हरि, चव दे अमृताहुनि, अभय जें मुखें हरि च वदे.
तें [10]स्वभवां पारिसविता जाला विधि, तन्मुखांबुजां पारि सविता. १६
'शीघ्र यदुकुळीं अमर स्वांशें जन्मोत हरिपदाब्जभ्रमर.
[11]भगवत्पदबंधुरता सेवा, जा, आर्जवा[12] [12]भंजकबंधु, [13]रता. १७
भूश्रम हा जननी ती हरिल, जिची वर्णिती महाजन नीती.
वसुदेवाची सुतता स्वीकारुनि, करिल कीर्ति लोकीं [14]सुतता. १८
म्हणउनि, सत्वर महिलीं[15] जाव्या, भगवत्प्रियार्थ, निर्जर[16]महिला;
प्रकटेल प्रथम [17]हिमामलशेष हि दाखवील [18]अवितथमहिमा. १९
प्रभुची माया देवी, ते ही जन्मेल, जे भ्रमा या दे, वी
विश्वाला, सहजगती भुवनें [19]यदनुग्रहें चि मत्सह जगती.' २०
एवं विधि आज्ञापी; सुरसेना ही सुधा तसी आज्ञा पी.
केलें गमन हि, महितें समजावुनियां, निजालया [20]मुनिमहितें. २१
पूर्वीं यदुपति होता [21]शरदहनीं रणमखीं [22]पराहुति होतो[22];
नृपनीतिप्रिय [23]शरणीं [24]प्रकृतींच्या पटु, जयासि ये चि यश रणीं. २२

---

१. ब्रह्मदेव. २. शंकरास. ३. पृथ्वीच्या कल्याणार्थ. ४. इंद्रादि देवांसह. ५. क्षीरसमुद्रवासी श्रीविष्णूच्या चरणांस. ६. आनंदित. ७. विष्णूला. ८. वत्सक-पंत. वासराची तहान. ९. गाय. १०. स्वपुत्र जे देव त्याना. ११. ईशचरणीं लीनता. १२. भक्तांचा हितकर अशा प्रभूला आळवा. १३. [त्याचे ठिकाणीं] रममाण व्हा. १४. विस्तृत. १५. महीवर. १६. देवस्त्रिया. १७. बर्फाप्रमाणें शुभ्र असा शेष. १८. सत्यमहिमा. १९. ज्या मायेच्या प्रसादानें. २०. मुनिपूजित अशानें. २१. बाणरूपी अग्नींत. २२. शत्रुरूप आहुतीचें हवन करणारा. २३. रक्षणीं. २४. प्रजाजनांच्या. * भूमीतें (?).

प्रेमें साधुजनपदां, तो माथुर[1]शूरसेननामजनपदां[2]
वीर्यें सेवि, प्रकृतिप्रियगुरु[3] तो, शूरसेन मतविप्रकृती[4]. २३
मूर्तानंदथु[5] राहे प्रभु जींत सदा, पुरीश्वरी मथुरा हे,
त्यापासुनि नृपधानी वर्णिलि यदुभूपहरिगुहा[6] चि बुधानीं. २४
तेथें देवक[7] रीती[8] प्रकटी; आश्चर्य फार देव करीती.
जैसा शिवगौरीचा, केला उद्वाह[9] देवकीशौरीचा[10]. २५
भगिनीस्नेहें भुलता जाला खळ कंस, उग्रसेन हि चुलता;
आंदण दिधलें; कीं तें उचित चि, बुध देति नैकविध लेंकीतें. २६
घेउनि आंदण, गेहा शौरि निघे; कंस करि महा दणगें[11] हा.
कनकरथीं बैसविता जाला शोभे सदारवर[12] तैं सविता. २७
त्या कंसविभू मिरवी राजपथीं; शौरि ही गमे भूमिरवी.
सारथि तो भाउ दयाप्रेमोत्सव करि; अपार शोभा उदया[13]. २८
या स्नेहरसमयांत स्वजनांच्या दृष्टिचित्तहरसमयांत
कंसश्रवणीं अशनी[14] गगनोक्ति[15] पडे, जसें हळाहळ अशनीं[16]. २९
'रे कंसा वेडसरा! लालन करितां हि नाग चावे डसरा;
होउनि सूत, वहासीं तूं, कन्यानिर्विशेष[17] जीस पहासी, ३०
अष्टमगर्भ, कराया त्वद्वध, होणार ईस अर्भक[18] राया!
न चुके भावि; लयातें जासिल जन्हि चित्त अनृत भाविल यातें.' ३१
हें ऐकुनि, पापरती कंस करी, मानसांतुनि कृपा परती.
तो घाली कर[19] वाली[20] भगिनीच्या वाम[21], दक्ष ही करवालीं[22]. ३२

---

१. माथुर [ व ] २. शूरसेन नामक देशांस. ३. प्रजेला प्रिय असा शास्ता (राजा). ४. मान्य आहेत विप्रांच्या कृति ज्यास असा. ५. मूर्तिमान् आनंद. ( आनंदथु=आनंद ). ६. यदुपति हा च सिंह त्याची गुहा. ७. राजविशेष. ८. परिपाठ. ९. विवाह. १०. वसुदेवाचा. ११. कडकडाट. १२. वधूसह तो वर. १३. [ वसुदेवरूप सूर्याच्या ] उदयास. १४. विजेसारखी. १५. आकाशवाणी. १६. अन्नांत. १७. कन्येपेक्षां हि अधिक. १८. मुलगा. १९. डावा हात. २०. केशीं. २१. उजवा [ हात ]. २२. तरवारीस.

भगिनीचा वध मतिला सुचला; उठला वधावया अधम तिला.
तों तो बालिश हाणी, शौरीची नीति आड जालि शहाणी. ३३
बोध सकळ स[1] मास ब्रह्मा करु, नायिकेल खळ सामासें[2].
जरि साश्रु दरिद्र वदे, तें कुधनिकमानसास[3] न परि द्रव दे. ३४
स्त्री आतंकाकुळ[4] ती देखुनि, करि फार शौरि तो काकुळती;
परि तो उग्र न वळला. उदकें न शमे चि तैलवह्नि खवळला. ३५
केलें यद्यपि कानीं बधिराच्या गान नित्य हृद्यें[5] पिकानीं[6],
फळ नुभवि[7]; तथा, यास ज्ञान कथुनि, शौरि होय वितथायास[8]. ३६
न धरि द्रवलेश शिला; विधुमणि[9] पाहुनि, रस प्रसवले, शशिला.
खळ बहु मळके वळते उपदेशा, तरि भले कुशळ केवळ ते! ३७
भाव विमळें[10] कळवीला, पुत्रार्पणनिश्चयें चि खळ वळवीला.
कथि सानंद, 'नसे जें त्वदधिक मज, घे समस्त नंदन सेजें[11].' ३८
या वचनें तो शमला कंस, म्हणे, 'जाहला परम तोष मला'.
भगिनीच्या क्षणनीं[12] च प्रोद्यत होता, न लाविता क्षण, नीच. ३९
सोडी कचनिचय[13] महाखळ. विश्वासे तदीय वचनिं च यम हा.
श्येनें[14]गुरु विधी; टपणें त्याचें अवितर्क्य; न समजे धीटपणें. ४०
स्थिर करुनि मन, स्वीयागारा गेला, निवारुनि, मनस्वी[15], या.
रिपुशि यशोवसु[16], देवस्तुल्य, प्रथमज[17] समर्पि तो वसुदेव. ४१
सत्याला जतनेला ठेऊनि, प्रथम सुत न लाजत नेला.
स्ववचन चि सदा कुळजें रक्षावें, न तनुजादि विपदाकुळ[18] जें. ४२
कंस तदर्पणसमयामाजि गणी शुद्ध रत्नदर्पणसम[19] या;

१. सद्दा. २. समेटास. ३. दुष्ट धनिकाच्या मनास. ४. दुःखव्याप्त. ५. मनोहर. ६. कोकिलानीं. ७. न+उभवी=उत्पन्न न करी. ८. विफलश्रम. ९. चंद्रकांत. १०. स्पष्ट. ११. क्रमानें. १२. मारणीं. १३. केशसमूह. १४. नशीब हें श्येनपक्ष्याहून श्रेष्ठ; कारण श्येनाचें टपणें धीटपणें समजे; परंतु नशिबाचें समजत नाहीं, तर तें अवितर्क्य असतें. अतएव विधि श्रेष्ठ होय, असा भाव. १५. मानी. १६. यशोधन वसुदेव. १७. पहिला मुलगा. १८. विपत्तीचें स्थान. १९. रत्नाच्या आरशासारखा.

बोले, 'रिपु अष्टम; हा न्या, भावोजी! नको करूं कष्ट महा.' ४३
शौरि गृहा जाय; जिणें पुत्राचें परि गमे मना जायं[1]जिणें.
कीं खळनृपविश्वास व्यर्थ. निघों दे पडोनि न पवि[2] श्वास. ४४
शौरिवरी फार दया कंस करी, तों, रहस्य कथि नारद या;
कीं, 'नरतनु[3] खोळ[4], खरे त्वदेहित[5] सुर नंदयदुकुळीं ओळख रे!. ४५
हे सहसा माराया दितिदनुजां जपति; न करिं सामा राया!
अहित नृपा! ते. जावें आप्तपणावरि न; पळ न पातें[6]जावें.' ४६
सोष्ण सदर्प श्वासा सोडि; वृकव्याघ्रकृष्णसर्पश्वासा[7]
धांवे; यद्यपि सांळे[8] वाक्पतिच्या[9] पढुनि ही अवद्य[10] पिसाळे. ४७
पातकराशि शुनकसा धांवे खळ कंस; ये करा शिशु न कसा?
शौरिनग[11] न हा लवला शोकभरें, न भयमारुतें हालवला. ४८
मारी वृक पोतांतें[12] हरिणीच्या, श्येन ज्यापरि कपोतातें,
तैसा वधिला भाचा; कंसें तो मानिला दिवस लाभाचा. ४९
जो सत्कारावा सस्त्रीक, तया शौरिला हि कारा[13]वास
बद्ध करुनि दिधला हो! कीं निजरिपुजनक दुःख बहुविध लाहो. ५०
नेले विलया सहसा कंसें ऐसे चि शौरिसुत यासह सा;
श्रम दे निरवधि, कारावास पित्यास हि, हरूनियां अधिकारा. ५१

---

# अध्याय दुसरा.

क्षय खवळि व्याधींतें, कीं श्वगणा मृगयु[14], [15]जें गदीं[16], व्याधीं[17], तें
कंस ससचिव क्रौर्य प्रकट करी, यादवप्रमथनीं शौर्य. १

---

१. अशाश्वत. २. वज्र. ३. मनुष्याचें शरीर. ४. आच्छादन. ५. तुझे शत्रु. ६. विश्वास ठेवावा. ७. लांडगा, वाघ, काळसर्प व कुत्रा यांसारखा. ८. शाळेंत. ९. बृहस्पतीच्या. १०. मलिन-पंत. ११. वसुदेवरूपी पर्वत. १२. मुलाला. १३. तुरुंगवास. १४. पारधी. १५. जें क्रौर्य. १६. रोगाचे ठायीं. १७. पारध्याचे ठायीं.

ातिदुष्ट समस्त बक[1]प्रलंबमुख गरळ[2]वल्लिकुसुमस्तबक,
वेत्तांत शिरोंनि हितें[3]च्छव्यें, जे होति तापद शिरोंनिहितें[4]. २
ारि विलया दवसा[5]; [6]हे तृण त्यांतें; दुःख कोण यादव साहे?
ा लउनियां मग पळ, ती मथुरा[8]रावनिका त्यजूनि, यदुमृग पळती. ३
यजिले ठाव कितेकीं; ज्यांला धृति नीति रीति ठावा[9]कि, ते कीं
भजती त्यास चि; वांचे स्थिति त्यांची जे विधेयें[10] त्या सचिवांचे. ४
ऐसा शोकद, नातें न गणुनि, करि कुमति कंस तो कदनातें.
देती ताप सहायें[11] क्रूराचे, म्हणति साधु तापस, 'हाय!' ५
यमसम देखे[12] पतिला मथुरेच्या; सातवी न दे खेपे[13] तिला
सुख; जीचे बाळक सा वधि जो, तो नाठवेल खळ काळ कसा? ६
'ससम गर्भ कसा' हे 'वांचेल' म्हणे; न कंस अर्भक साहे.
कुनृपतिचें निधिला भें, दुःख असें मनिं अनंतसुखनिधिलाभें[14]. ७
कंसकृतोपद्रव ते यदु जाले, त्यजुनि अशन, झोंप, द्रवते[15];
हें [16]कळतां अगदीं न प्रभु साहे; कीं, स्वशासनीं जग दीनें[16]. ८
'सर्व हि यादं[17], वनाश[18], व्यसु[19], निरुदक, मीन, तेंवि यादव नाश

---

१. बकप्रलंबादि राक्षस. २. विषवल्लीच्या फुलांचे गुच्छ. ३. हित करण्याचे भेषानें. ४. मस्तकावर ठेविले [असतां]. ५. वणव्यासारखा. ६. यादव. ७. ंसातें. ८. मथुरा हें च अरण्य. ९. ठिकाण, वसति. १०. आज्ञापरिपालक. ११. मित्र. १२. 'देवकी' हा कर्ता. १३. गर्भाची पाळी. १४. पुष्कळ सुखनिधींच्या ाभानें [हि]. (लोकांजवळ असलेल्या संपत्तीला जसें दुष्ट राजाचें भय असतें, द्रव्य जवळ असून हि सुख होत नाहीं, त्याप्रमाणें पुष्कळ सुखाचा लाभ असा मुलगा गर्भरूपानें उदरांत असताना हि कंसाच्या भीतीनें देवकीला सुख झालें नाहीं. येथील 'अनंत' शब्द श्लिष्ट आहे. अनंत=पुष्कळ (पक्षीं) अनंत=शेष. हा देवकीचा सातवा गर्भ शेषाचा होता. हा अर्थ मनांत योजून च कवीनें "अनंत" या द्व्यर्थी शब्दाची योजना मुद्दाम केली आहे). १५. पळते जाले. १६. आपण शासन करीत असतां जग दीन [असावें] हें प्रभूला अगदीं सहन झालें नाहीं. १७. जलचर प्राणी. १८. उदकेच्छु. (वन=पाणी). १९. गतप्राण.

मजाविण पावतिल; पती मीं रक्षिन; किति भयार्त धांवति, लपती?' ९
ऐसें चिंतुनि, माया करि हरि, निजदासदुःख किंतु[1] निमाया.
आज्ञापी परं[2] मायादेवीतें, जे अनुव्रता[3] परमा[4] या. १०
'रक्षूं लोका माये! देवि! सदिष्टार्थ[5] सिद्ध हो, कामा ये;
जा गे! गोपावासा[6]; समय चि हा लाभ त्यास ओपावासा[7]. ११
व्रजपति नंद नयातें जाणे; करि शौरि साधु वंदन यातें;
कीं, करउनि दे विवरें[8] कंसभयार्तस्वयोषितां[9], देवि! वरें. १२
रोहिण्याह्वा[10] यांची[11] स्त्री आहे शेषजन्मदा[12] न्हायाची;
तज्जठरीं तेजातें[13] ने, धरिते देवकी सती ते जातें. १३
मग मीं देवकजा[14] या तेजा जननी करीन, सेवकजाया[14].
दुग्धाब्धि यदुदरातें स्तवि, त्या जाउनि, विनाशिन यदुदरातें[15]. १४
नंद सुकृतमय[16]; दुहिता हो त्याची तूं, करूं निकाम[17], यदुहिता[18];
योग्या चि यशोदा त्या त्वन्मातृत्वा, समुज्ज्वलयशोदात्या[19]. १५
वरितिल वर मानव, सप्रेम भजुनि, तूज; तूं हि परमा नवस
सद्भाव पुरविशील, स्वजनाघतमीं[20] धरूनि वपु रविशील.' १६
माया, श्रीशास नती करुनि, करी शीघ्र सर्व ही शासन[21] ती;
हें किति? जड[22] जगवीते[23], अघटितघटनापटीयसी[24] जग वीते[25]. १७
निंदिति पातक सारे; 'जाला' जन म्हणति, 'गर्भपात कसा रे!'
विधिचें लिहिलें कां तें न घडे? कर्मे चि पावलि हि लेंकांतें. १८

---

१. शंका. २. श्रेष्ठ-परमेश्वर. ३. अनुकूल. ४. या परमेश्वरास. ५. साधूंचें इष्ट करण्यासाठीं. ६. गोकुळा. ७. अर्पण करण्यासारखा. ८. श्रेष्ठ अशा गुहा. ९. कंसाच्या भयानें आर्त झालेल्या आपल्या ( वसुदेवाच्या ) बायकांस. १०. रोहिणी नांवाची. ११. वसुदेवाची. १२. शेषाला जन्म देणारी. १३. [ माझ्या अंशरूप ] तेजातें. १४. देवकी–भक्तस्त्री. १५. यादवांच्या भीतीतें. १६. पुण्यवान्. १७. अतिशय. १८. यादवांच्या हितासाठीं. १९. उत्तम यश देणाऱ्या. २०. भक्त-जनांच्या पातकरूप अंधारीं. २१. आज्ञा. २२. अचेतन, निर्जीव. २३. सजीव करिते. २४. अघटित घटना करण्याविषयीं कुशल. २५. प्रसवते.

समधिष्ठी[1] अवदाता[2] देवक्युदरा मुकुंद उत्सवदाता;
देवांच्या जसि तरुची वसति पयोधींत[3], हरिदिशेंत[4] सितरुची[5]. १९
पळ न चुके वळसा[6], जे आनकदुंदुभिवधू[7] न केवळ साजे,
पावुनि हि अमरमणि[8] कीं कारासदनांत[9], शिखिशिखीं[10] जसि मणिकीं[11]. २०
कीं म्हणती कवि राजे ज्ञानखळीं[12] जसि सरस्वती न विराजे,
कीं जन्हि सुंदर, साजे कविता न तदाननीं[13], भजति न रसा जे. २१
शिशुवधकाम[14] सतीतें जेव्हां अवलोकि कंस[14] तामस[14] तीतें,
अत्यद्भुत शोभा जे, तीणें नयनीं मनीं हि खळ तो भाजे[15]. २२
स्पष्ट नवी हे रीती जाणे, जें अद्भुत च्छवी[16] हेरी[17] ती.
जन्हि तो खळ कर्कश, तें तेज न साहे; गमे हरि च तर्कशतें. २३
न घडे घात; नवा हे[18] दावी तेजःप्रकार; ह्मात न वाहे.
पाहे प्रसवावधि[19] तो. न असमयीं तक्षकादि डसवा[20] वधितो. २४
न चले अशनीं शय[21]; न स्थिरमति सिंहासनीं हि भवनीं; शयन
न घडे धड; कीनाशें[22] बद्ध तसा भी; मनांत धडकी नाशें[22]. २५
कीं हरिमय[23] जग ज्याला होय भयद उग्रसेनतनुजगजाला[24].
न दिसे, नीज नसे, जे चिंतेंत रुचे न, कामिनीजन सेजे[25]. २६
सदनीं वसुदेवाच्या विधि-भव-मुनि[26]-शक्र-सिद्ध[27]-वसु[28] देवाच्या

---

१. अधिष्ठान ठेवी. २. शुद्ध. ३. क्षीरसागरांत. ४. इंद्रदिशेंत—पूर्वदिशेस. ५. सर्य. ६. दुःख—पंत. ७. वसुदेवपत्नी देवकी. ८. अमरश्रेष्ठ विष्णु. ९. कारागृहांत. १०. अग्निज्वाला. ११. मडक्यांत. १२. ज्ञानाविषयीं दुष्ट अशांचे ठायीं. १३. त्यांच्या (अरासिकांच्या) तोंडीं. १४. मुलांचा वध करण्याची इच्छा करणारा तामसी कंस. १५. संतापे. १६. कांति. १७. पाही. १८. ही देवकी. १९. प्रसवसमय. २०. चावरा. २१. हस्त. २२. यमानें पकडल्यासारखा भय धरी व [भावी] नाशानें [त्याच्या] मनांत धडकी (धडधड) [भरे]. २३. कृष्णमय (पक्षीं) सिंहमय. २४. उग्रसेनपुत्र (कंस) रूप हत्तीला. २५. शय्येवर जे कामिनीजन [ते] चिंतेंत (चिंतेमुळें) न रुचे. २६. नारदादि मुनि. २७. देवविशेष. २८. अष्टवसु.

करिति [1]दयास्तवना, कीं केलों [2]वरसत्य [2]जय जयास्तव नाकीं. २७
'माते देवकि ! तव हा आला पोटासि देवदेव [3]कितवहा.
कंसांतक यदुप [4]कृती होइल, गातील सुरतरु हि यदुपकृती. २८
नाशिल रिपुसह [5]कारावासातप, [6]अस्मदादिपिकसहकारा
[6]सुरतरुदेवा तनया [6]तुझिया विघ्नाख्य कंप दे वात न या '. २९
प्रभुचरण स्तवुनि, सुर स्वपदा गेले मनांत होउनि [7]निसुर;
कीं, विश्वनि[8]काय जना उद्धारिल मुकुंद रक्षक निका [9]यंजना. ३०

---

# अध्याय तिसरा.

[10]जगदिष्टोत्तमसमयामाजि [11]निशीथीं हरी सुधाकरसम या,
दे[12]वकसुप्रियदुहिताप्राचींतुनि उदय करि चको[13]रयदुहिता. १
पाहे माय तनय, न [14]प्रतिनिधि ज्या, पं[15]कजच्छदायतनयन.
भुज च्यारि नि[16]जदरारी शोभति, जेथें [17]गदासरोजदरारी. २
श्री[18]वत्सें उर विलसे; [19]दृक्काम न कंठ कौस्तुभ हि [20]उरविलसे.
विद्युत्पीतांबर [21]वा घननीळ विलोचनांसि पीतां बरवा. ३
कर्णीं लो[22]लसमानें, मकराकृति, रत्नकुंडलें [23]लसमानें;

---

१. दयेच्या स्तुतीला. २. जय (जयविजयांपैकीं एक) वरसत्य (ज्याला दिलेला वर सत्य आहे असा) केला. ३. दुष्टांचा संहार करणारा. ४. कृतकृत्य. ५. तुरुंगवासाचा संताप. ६. अस्मदादिक जे पिक (कोकिल) त्याना आम्रवृक्ष च असा कल्पवृक्षाना हि देवासारखा जो तुझा (वसुदेवाचा) पुत्र त्याला. ७. निष्काळजी. ८. विश्वाचें स्थान. ९. यशास. १०. जगानें इच्छिलेल्या अशा उत्तम समयीं. ११. मध्यरात्रीं. १२. देवकराजाची अतिशय आवडती जी देवकी तद्रूप अशा पूर्वदिशेहून. १३. चकोर जे यादव त्यांच्या कल्याणाकरितां. १४. उपमान. १५. कमलपत्रवत् विस्तृत नयन ज्याचे. १६. स्वभक्तांची भीति नाहींशी करणारे. १७. गदा, कमल, शंख, चक्र. १८. श्रीवत्सनामक भूषणानें. १९. दृष्टीचा अभिलाष. २०. उरवील असे. २१. आणि. २२. चंचळ आणि सारखीं. २३. शोभणारीं.

जन्हि दिसति हि मकराचीं रूपें, बिंबें चि भास्करहिमकरांचीं. ४
ज्यांत मणींद्र[1] तपनसे, मुकुट शिरीं तो स्तवावयासि तप[2] नसे.
कुंतळ ते मधुपाळी, पाजूनि जिला मुखाब्ज निजमधु पाळी. ५
मणिखचिता दाब[3] रविद्युति, घंटापंक्ति[4], रम्यनादा, बरवी.
कंकण अंगद[5] याला धरणें, भक्तार्थ जेंवि अंग दयाला. ६
द्युतिभाजन[6] कारा हे जाली; भीति न मुकुंदजनका राहे.
पाहुनि अद्भुततनया, होय मनें अयुत[7]धेनुदान ततनया[8]. ७
जाणे पुरुष[9] पर[9] महा[10]वरुनी, वसुदेव हृष्ट होय परम हा;
स्मरला वास्तव नातें; करि जोडुनि हस्त, तेधवां स्तवनातें. ८
'धरणीला अव[11], तारीं दीनजना या सुखप्रदा अवतारीं;
जाला सुदिवस मजला; भक्तीं तूझा प्रसाद पूर्ण समजला. ९
मद्गेहिं जनन भावी ऐकुनि तूजें स्वभद्र[12] कुजन[13] न[14] भावी[14].
वधिले भवदग्रजनी[15]; या खळ कंसा असा नसे उग्र जनीं. १०
आझुनि न निवे दावा; कैसा वृत्तांत तूज न निवेदावा?
प्रसव वदावे; दारा उपासिती दूत, कथिति दावेदारा. ११
कळतां, घातक साप त्वरित चि धांवेल; करिल घात कंसाप[16].
केले सहसा वध हो! यास्तव म्हणतों विभो! तुला, सावध हो'. १२
स्तवुनि, धरुनि जननीती, कंसभयव्याकुळा वदे जननी ती,
'हे आकृति कमनीया[17] आच्छादीं शीघ्र; फार धाक मनीं या'. १३
'जालों सुत वरदानें[18],' पूर्वकथा सर्व कथियली वरदानें[19].
सांगे तो; कन्या या नंदाची घेउनि, स्वतोक न्याया. १४

---

१. श्रेष्ठ मणि. २. तपश्चर्या—पुण्य. ३. कमरपट्टा. ४. घागऱ्यांचा समूह. ५. बाहुभूषणें. ६. कांतीचें पात्र. ७. हजारों गोदानें. ८. प्रसिद्ध आहे नीति ज्याची. ९. परमात्मा. १०. तेजावरुनि. ११. रक्षण कर. १२. आपलें कल्याण. १३. दुष्ट कंस. १४. न समजे. १५. तुझे वडील बंधु. १६. कसाई. १७. सुंदर अशी. १८. वर दिल्यामुळें. १९. वरद कृष्णानें.

प्राकृतशिशुसम, जावी शंका म्हणवूनि, होय; हित समजावी.
[1]उक्ति [1]अवश्या मनिं घे; उंचलुनी शौरि तो घनश्याम, निघे. १५
पूर्वीं च [2]अजनमाया जे प्रोक्ता नंदमंदिरीं जनमाया,
त्या समयीं [3]जनिं लाहे शुद्धयशोदोदरांतुनीं जनि[4]ला हे. १६
ज्यासाटीं 'जनमो हे' देव म्हणे, तो तिणें सकळ जन मोहे.
[5]जनतेला नि[5]जलीला मायापतिची कसी कळे निजलीला? १७
[6]कांडकटाहा [7]नखरा भेदी लावूनि धाकटा हा न [8]खरा.
बद्धद्वाराजवळी येतां उघडति कसीं महाराज बळी? १८
गळिजेलें कुलपानीं; द्वारप निजले जसे मदाकुल पानीं;
बहु तम; [8]घन तीव्र जनीं; केवळ [9]हीनां गमे वसुमती [10]अंजनीं. १९
छत्र अनंतर [11]मेनां वरि होय; त्यजुनियां [12]अनंत रमेना,
सद्भक्ताला भजनीं आवडि मोटी; नसे दुजा लाभ जनीं. २०
मिति नाहीं [13]आवर्ता; बहु मोटा पूर, जो नये [14]आवर्ता;
[15]परमकराला टाकी तीराबाहेरि समकरा लाटा कीं. २१
परि ते यमुना सरिता मार्ग करुनि दे व्रजाभिगमनास रिता;
सागर सेतू [16]सरणी जैसा [17]दे [18]दशमुखांतहेतूस रणीं. २२
शौरि [19]महानंदाच्या कंदा ने, मग सुखें गृहा नंदाच्या.
करुनी तीव्र जवासी गेला, पाहे न जागती व्रजवासी. २३
नंदाची महिला हे मायामुग्धा श्रम प्रकाम हि लाहे;
प्रसवे; हो! तीस, 'मज प्राप्त सुता पुत्र,' असि न होती समज. २४
तच्छयनीं निजली[20]लानरतनुसुत ठेवि, न कळतां निजलीला;

---

१. मूळ पाठ–**आज्ञावश्या**. २. जन्मरहित माया. ३. लाकामध्यें. ४. जन्माला. ५. निजलेल्या जनसमूहाला. ६. ब्रह्मांडरूप कटाहाला. क+अंड= ब्रह्मांड. ७. तीक्ष्ण नख. ८. मेघ. ९. शून्य. १०. जातवेळीं. ११. मा+इन= लक्ष्मीपति. १२. शेष. १३. भोंवऱ्यांस. १४. वारावयास. १५. अत्यंत भयंकर. १६. मार्ग. १७. याचा कर्ता समुद्र. १८. रामास. १९. महा आनंदाच्या. २०. आपल्या लीलेनें मनुष्यरूप धारण केलेल्या पुत्रास.

तो दृढचित्त यदुहिता; तीची ने निजगृहास निर्भय दुहिता. २५
पूर्वस्थिति न विघडली; जाणों होती च ते, न हे नवि घडली;
चलन नसे कुलपाला, चरणयुगीं शृंखळा हि यदुकुलपाला. २६

---

# अध्याय चवथा.

ते नेल्याउपरि, सैती बाळध्वनि करि, तयास पौळ परिसती.
ते कथिति निजवरा, ज्या गर्भजनिध्यास, त्या, करुनि जव, राज्या. १
गर्भ दुराशय नाशी, तैसा हा ही गणी; त्यजी शयनाशी.
धांवे मृगराज वनद्विपकलभावरि, जसा चि वारा जवन. २
तो येतां माराया, बोले कंसासि शौरिरामा, 'राया!'
बहुदीनापरि, 'सून प्रभुजी! तुह्मि कीं द्रवेल हें परिसून. ३
करुणा आचर; माजे बहु सुत वधिले; दिजे सुता चरमा जे.
स्त्रीचा वध न बरा हो!, वांचो; त्वत्पुत्र तो इचा नवरा हो.' ४
तन्मन अशुभ द्रवलें न तदुक्तें; तत्सुतेसि गतभद्र बळें
चरणीं धरुनीं, चपळ क्रोधें ओढी; न राहुं दे नीच पळ. ५
ते पसरुनि 'आ' रडली भगिनी, जन्हि धाय मोकलुनि आरडली,
न धरी पाड; सखा तो व्याघ्रवृकांचा चि काय पाँडस खातो! ६
येइल कां पां याला करुणा? ते धरुनि कन्यका पायांला,
उंचलुनीं पात शिलापृष्ठीं करि कंस दिव्यरूपा ताशिला. ७
तों जाय नभा, उसळे, तेव्हां स्वमनांत देवकीभाउ सळे.
करुनि सभाजन मांये गाय, नमी, गगनिं सुरसमाज न माये. ८
'स्वपदाला शिवला हो! तारि, दर्शनपात्र खळ हि हा शिवें लाहो,'
हें माया भावी; जे दावी, ते दुःसहा निजा भा वीजे. ९

---

१. माया. २. द्वारपाल. ३. आपल्या राजास. ४. दुष्ट. ५. वनांतील हत्तीच्या छाव्यावर. ६. हतभाग्य. ७. पिलें. ८. कां बरें? ९. दुःखित होई. १०. मायेला. ११. वर्णी. १२. कल्याण.

दिव्यशरीरा, हेतिप्रवराष्टभुजा,[1] नभोंतरीं राहे ती.
सद्रत्नकलाप[2] तिचे भासति घडिले दिवाकरकलापतिचे.[3] १०

बोले ते असुरा या, 'कृपणांचे[4] हरिसि कां वृथा असु राया!?
जेणें तुज नाश, मला ठावा तो, वाढतो; न कुजना! शमला.' ११

बोलुनि सहसामहिता,[5] देवी तेथूनि जाय सहसा महिता.[6]
राहे नैकनिकेतीं;[7] धरि नामें बहुत, देति लोक निके तीं. १२

विस्मित कंस हि परते, समजावी स्वस्वसा सुदेवनपर[8] ते.
'गमली सत्य नभोगी;[9] चुकलों; मन्मन हि काय ताप न भोगी? १३

नर चि न बोलति लँटिके* हें कळलें, तरि मनीं न बोल तिलँ[10] टिके;
सत्य म्हणति संत तिला, यास्तव संहारिलें तुज्या संततिला. १४

हा[11] शिशुसा भावो जी! मना; तुम्हीं पितर; न स्वसा भावोजी!
संततिघातकरासी रक्षा; मीं सर्वथैव पातकराशी.' १५

करि सांत्वन; बुधरीती, जें कवि शोकाग्निशामकांबु,[12] धरीती.
त्यां दोघांला विनवी, बंध निवारूनि; आवडी लावि नवी. १६

नमुनि शिरीं पद, 'राशी अपराधांचा' म्हणे, पसारि पदरासी;
द्वेष मनांतिल सरला; वृत्ति तयाची विलोकिली बहु सरला. १७

आनकदुंदुभि याला समजावी, कीं, स्वकर्मविंदु[13] भियाला
हा; 'विधिनेम उगे हा' म्हणतां तो जाय होउनी मउ गेहा. १८

मग कंस, सखे मंत्री जे सुररिपु मूढ खळ, तयां आमंत्री.
त्यांला सांगे व्यथितस्वांतें[14] तें सर्व योगनिद्राकथित. १९

ऐकुनि, सर्व कुकवि ते जाले त्या कुमतिला कुमंत्र शिकविते.
पूर्णा चि अमा[15] त्यांहीं करिजेत्ये अंधभूपति अमात्यांहीं. २०

---

१. श्रेष्ठ शस्त्रीं युक्त आहेत अष्ट भुज जिचे. २. चांगल्या रत्नांचे समूह. ३. सूर्यचंद्रांचे. ४. दीनांचे. ५. सामासह हिताला. ६. पूजिता. ७. अनेक स्थळीं. ८. शोकव्याकुळ. ९. आकाशवाणी. १०. तिलमात्र हि. ११. हा मी (कंस). १२. शोकरूप अग्नि शांत करणारें पाणी. १३. आपलें कर्म जाणणारा. १४. दुःखित अंतःकरणानें. १५. अमावास्या. * लटिकें (?).

'बाहिर आंत दशाहा[1], ते शिशु मारूं; प्रभो! जितत्रिदेशा[2]! हा
प्रथमोपाय सुनय; न व्यभिचार फळीं, पहा तुम्हीं[3] हि सुनयन[3]. २१
हरि, हर, शक्र, शतधृती[4] यद्यपि तुझिया भयें सदा विगतधृती,
करिती रिपुंगद[5] हानी समुपेक्षित[6],' निवडिलें असें च दहानीं. २२
'देवांचें मूल हरी तेथें धर्म हि; न भिन्न सिंधू लहरी;
त्या धर्मांचें प्रसवस्थान[7] तपःश्रुतिसमूहगोविप्रसव[8]. २३
राहें स्वस्थ नयज्ञा! जे करिती सविधि धर्मजीवनयज्ञा,
गोवेदतपोनिलय[9] ब्राह्मण, त्यांचा बळें चि साधूनि लय, २४
तप, दम, गो, विप्र, शम, श्रद्धा, क्रतु, सत्य, सुर, दया, रुट्प्रशर्म[10],
हरिच्या तनु अकरा या; आज्ञा दे यांचिया क्षयासि कराया. २५
हरि सर्वगुहाशयन[11]; ग्रहणीं त्याच्या बळी तुजा हा शय[12] न.
करणें तन्नाश मनीं; आज्ञा आम्हांसि दे ऋषींच्या शमनीं.' २६
ऐकुनि दानवनिकरा, कंस म्हणे, 'जा, गतद्विजा अवनि करा.'
मग तो गोविप्राशी, विस्तारुनि कपटपाश, गोवि[13], प्राशी. २७
ते दानव अहितमती, जनपीडक, भीतिदाकृती, अहि तमती[14],
वधुनि सद्ध्वजनास[15], प्रेक्षिति साधावया खगध्वजनाश[16]. २८
धरुनीं सदसद्वेष च्छळिती दाटूनि साधुसद सद्वेष
जोडिति अघ पृथु[17]; कां तें कल्याण करील मारितां पृथुकांतें[18]? २९

---

# अध्याय पांचवा.

साधूत्तम हा नंद स्वात्मजजन्मीं धरूनि सुमहानंद,
मग बोलाउन मुनितें, करवि सविधि जातकर्म त्यांसि नमुनि तें. १

---

१. दहा दिवसाचे. २. ज्यानें देवांस जिंकले असा. ३. दूरदृष्टीचे तुम्ही. ४. ब्रह्मदेव. ५. शत्रु आणि रोग. ६. उपेक्षिलेले. ७. जन्मस्थल. ८. तपश्चर्या, वेदसमूह, गाई, ब्राह्मण व यज्ञ. ९. स्थान. १०. क्रोधशांति. ११. सर्वांच्या अंतःकरणांत राहणारा. १२. हात. १३. गुंतवी. १४. तळपती. १५. सन्मार्गी लोकांस. १६. गरुडध्वज हरीचा नाश. १७. मोठें. १८. मुलांस.

विप्रांतें मोदानें दे सालंकार [1]लक्षयुग गोदानें.
गाती गायक ताने, जनमनधन जे[2] हरूनि, आयकतां, ने. २
दुंदुभिच्या ध्वानांहीं गाणिला [3]पृथुकुक्षि तो [4]सुराध्वा नांहीं.
[5]वाल्मीक्यादिकविनयें स्तविती ते सूतबंदिमागध विनयें. ३
विप्रमुखीं स्वस्ति; [6]मितप्रदसुरतरु धरुनि राहिले [7]स्वः [8]स्तिमिति.
न लजति कां मितदाते [9]ब्राह्मणवृंदा समस्तकामितदा ते ? ४
त्या उत्सव बहळ दिनीं; कीं माखिति निजपशू हि तेलहळदिनीं
व्रजजन; नंद नवनवा कारि हर्ष; तसा न नाक, नंदनवन वा. ५
व्रज पशुपालांस मुदावह वैकुंठापरीस जाला [10]समुदा;
[11]गोकुळशोभारतिचें वर्णन मन लाजवील हो ! [12]भारतिचें. ६
येतां चि रमानवरा, व्रज पावे त्रिभुवनांत [13]चिरमान बरा.
[14]अजनजननवासर हा [15]सकळर्धीतें म्हणे, 'करा वास, रहा.' ७
नोहे सोपा यजना योगा, [16]घोषांत दावि तो पाय जना;
संसृतिच्या जो पारा नेता, गवळ्यांस जाहला सोपारा. ८
[17]व्रजपालाजिर, वाणें आणुनि, जें भरिति युवति, लाजिरवाणें
तें सुख कारि [18]नाकवर; त्रिजगांत हि गोपजातिचें नाक वर ! ९
मानुनियां परमहिता, गोपी आल्या प्रहर्षतत्पर [19]महितीं.
दृष्टि हरिति विश्वाची; लाजति [20]रंभा [20]तिळोत्तमा [20]विश्वाची. १०
देति हरिस [21]परमाशी, दृष्टि जडे तेथ जसि [22]सितापर माशी.
त्या [23]कोकिलगलसकला गाती नंदात्मजासि मंगल [24]सकला. ११

---

१. दोन लक्ष. ( युग=युगल, द्वंद्व, जोडी ). २. गायक. ३. मोठ्या पोटाचें. ४. आकाश. ५. वाल्मीकि आदिकरून कवींच्या पद्धतीनें. ६. स्वल्प देणारे. ७. स्वर्गीं. ८. निश्चलपणा. ९. सर्व इच्छित पुरविणाऱ्या ब्राह्मणसमूहास. १०. समदा=सगळा. ११. गोकुळांतील शोभारूप रतीचें. १२. सरस्वतीचें. १३. पुष्कळ दिवस. १४. कृष्णजन्मदिवस. १५. सर्व समृद्धींतें. १६. गोकुळांत. १७. नंदाचें अंगण. १८. इंद्र. १९. पूज्या. २०. अप्सराविशेष. २१. मोठमोठे आशीर्वाद. २२. साखरेवर. २३. कोकिलेसारखा मधुर कंठ ज्यांचा अशा सर्व. २४. कलायुक्त.

बहुत चि कुतूहळ दिनें त्या, गोपी स्नेहसद्रसार्द्रहळदिनें[1]
सिंचिति गोपसमुदया[2], पावलिया अतुळहर्षभाग्यसमुदया[3]. १२
सिंचिति गोप समुदित प्रेमें अन्योन्य भूरिगोरस[4] मुदित.
दधिदुग्धघृतोदानीं[5] व्रज कीं आलिंगिला महामोदानीं. १३
अभिमतदा[6] न वितरणीं[7] अदेय कांहीं, यशें तदा नविं[8] तरणीं[8]
वर्णे गौर वियाला नंद; सकळसाधुलोक गौरवि याला. १४
वार्षिककरवसु[9] देवीं[10] कंसीं[10] दे नंद, भेट ही वसुदेवा.
क्षणमात्र सखे दमन क्लेशाचें कारिति, बोधुनि सखेदमन. १५
शौरि वदे, 'स्थविरतमीं[11] तुझिया ठायीं प्रजा! सुखी[12] अविरत[13] मीं.
सुत सुखहेतु, जतन या कारिं; भाग्यें करुनि गांठि हे तुज तनया.' १६
नंद म्हणे, 'अहितानीं तूं तप्त सख्या!; नृपाळ हा अहि तानीं
बाळें वधि; मग तनया आठवि; यीं[14] न भय, न त्रपा, विगतनया[14].' १७
सुखदुःखें विधिजनितें जाणे जो, कीं विवेकनीराधि[15] जनि[15] तें
दैव न तन्मन मोही, न दुज्या करु, त्यासि सप्तजन्म नमो ही. १८
मग सहसा 'गेहातें जा,' ऐसें यासि शौरि सांगे हातें[16];
समजुनि नंद निघाला कीं, भावी सुचविला स्वनंदानें घाला. १९

---

१. तेल, स्वच्छ पाणी आणि भिजलेली हळद यानीं. २. गोपसमूहास. ३. अनुपम हर्ष आहे ज्यांत अशा भाग्याच्या उत्कर्षा. ४. पुष्कळ दूध. ५. दहीं, दूध, तूप आणि पाणी यानीं (उद=उदक). ६. इष्ट वस्तु देणाऱ्या [ नंदाला ]. ७. दान करण्यामध्यें. ८. हीं यशाचीं विशेषणें. ९. वर्षास भरल्या जाणाऱ्या खंडणीचें द्रव्य. १०. राजा कंसास. ११. अत्यंत वृद्ध अशा तुझे ठिकाणीं संतति [ झाली ]. १२. अतोहम्-पंत. १३. निरंतर. १४. न्यायभ्रष्ट कंसाला. १५. [ जो सुख-दुःखें दैवाधीन असें समजतो त्याचें च ] जन्म विवेकसागर. १६. हातानें खूण करून.

# अध्याय सहावा.

हरिसि[1] म्हणे कातर तो, ‘ देवा त्वच्छरण दुःखशोका तरतो.
भंजकसुगमसंताना[2] ! विघ्न न बाधो व्रजांत मम संताना.’ १
साधाया क्षिप्र हिता, कंसानें बाळघातिनी जी प्रहिता[3],
ते पूतनिका स्वधिती[4] राष्ट्रांत फिरे, छळें मुलांला वधिती. २
ते मृत्यूची आली शिशुमारी एकदा व्रजाला आली.
शोणितरुचिरें[5]त नुसती, धरि मायेनें वरी च रुचिरतनुस ती. ३
उल्लसमानवपु[6] सती देखुनि चकित स्त्रिया, न मानव पुसती.
मानिति कीं, अमर[7]मणी हरि, शोधी त्यासि हे तदुत्तमरमणी[8]. ४
लावण्याचे सरिते[9], माय यशोदा हि रोहिणी दूसरि ते,
वारूं न सकति कोणीं. चकितमनें त्या उग्या चि बैसति कोणीं[10]. ५
निजगुण खरतर[11] वारी[12], सौंदर्यें कोश[13]गत जसी तरवारी.
पावे श्रीहरि, पाशीं[14] बांधुनि नेली मृगी जसी हरिपाशीं. ६
भस्मच्छन्न[15]अनळसा शिशुतनु पाहे निजात्मघातिं अनळसा[16].
घे अंकीं कितवमती, स्तन जीचे गरळ कुंकुमांकित वमती. ७
द्याया हा रस, मतिनें गणिला शिशु काळसर्प हारसम तिनें.
जेणें क्षण हि न तगती प्राण, विषस्तन्य[17] तें हि घे विनत[18]गती. ८
दे विष यद्यपि याला, हरि तें मानूनि अमृत हृद्य[19] पियाला.
घे गरळाच्या रुचितें; जननीवेषें सुमंगळा[20] चारु[21] चि तें. ९

---

१. पांचवा म्हणून लिहून झाल्यावर कवीनें ह्या आर्येपासून सहावा अध्याय केला आहे. २. भक्तजनांस सुलभ अशा हे कल्पतरो ! ३. पाठविलेली. ४. [ प्रत्यक्ष ] कुऱ्हाड च. ५. रक्ताच्या गोडींत मग्न. ६. शोभत आहे शरीर जिचें. ७. देवश्रेष्ठ. ८. लक्ष्मी. ९. नदीला (पूतनेला). १०. कोपऱ्यामध्यें. ११. अत्यंत तीक्ष्ण. १२. खपवी. १३. म्यानांत असलेली. १४. पाशांत, जाळ्यांत. १५. भस्मानें आच्छादिलेल्या अग्नीसारखी. १६. आळस नाहीं अशी. १७. विषयुक्त दूध. १८. नम्र झालेल्यांचा रक्षणकर्ता. १९. मधुर. २०. कृष्णास. २१. सुंदर.

दे जरि उग्रविष, महासदयमुकुंद स्वयें न होय विषम हा.
वदनीं मारकथानें धरिलीं श्रुतिगीत[1]पूतसारकथानें. १०
मुखिं धरुनि कुचघट, [2]घटात्मजसा तज्जीवनासि सेवि घटघटा;
वरुनीं भूमितळ [3]मळप्रकृति कारि 'पुरे! पुरे!' म्हणोनि तळमळ. ११
करि बहु परिदेवन, 'हा!' म्हणत रडे, [4]स्तन्यतृप्त परि देव न हा.
[5]वर्णे अभ्र, मुरडतां प्रकृतिकडे, भासली हि [6]अभ्रमु [5]रडतां. १२
झाली ते असुरहिता, बाळग्रह, कुमति, पूतना असुरहिता.
पसरे वपु सा क्रोश, व्रज होय भयें करूनि बहु साक्रोश. १३
पडतां तीव्रजवासी वारुनि, रक्षी जगत्पती [7]व्रजवासी.
लोक सकळ कांपविला; तनुगिरिला लाजवी प्रभु, न कां [8]पविला? १४
प्रथम व्रज हा केला मृतबधिरसमान, मारुनीं हाकेला.
वर्णुनि [9]काय [9]कराल क्रूरेचा, त्यजुनि देव, काय कराल? १५
होउनि सावध, [10]ज्यांया गोपांच्या [10]कृष्णलालसा, वध ज्या या,
दुष्टेचा सुकर, तिच्या उरिं देखति त्या [11]निधीसि [11]कौतुकरतिच्या. १६
[12]स्वमनापरि [13]सत्वरती गोपी; [14]सुखमूर्ति काढिती सत्वर ती;
देती [15]तज्जननिकरीं; जाला आनंद बहु सुसज्जननिकरीं. १७
जे [16]विघ्नमशकचवरी, फिरविति गोपुच्छ [17]भगवदाकृति च वैरी.

---

१. वेदानीं गायिल्या आहेत पवित्र व सारभूत कथा ज्याच्या अशा ( कृष्णानें ). २. अगस्त्यासारखा. ३. पापी पूतना. ४. दुधानें तृप्त. ५. [ कृष्णानें शरीरांतील सर्व रस शोषून घेतल्यामुळें ] वर्णे ( कांतीनें, रंगानें ) अभ्र ( अभ्रासारखी पांढरी-फटक अशी ) [ ती पूतना ] प्रकृतिकडे ( आपल्या मूळ राक्षसी वृत्तीकडे ) मुरडतां ( वळली असतां ) [ शुभ्र वर्णानें व प्रचंडतेनें ] अभ्रमु ( ऐरावतपत्नी च अशी ) रडतां भासली. ६. ऐरावतपत्नी–**पंत**. ७. गोकुळांतील लोक. ८. वज्र–**पंत**. ९. विक्राळ शरीर. १०. कृष्णाविषयीं उत्कंठित अशा गोपस्त्रिया. ११. कौतुक आणि प्रेम यांच्या निधीस. १२. आपल्या अंतःकरणाप्रमाणें. १३. सत्वगुणाचे ठायीं प्रेम ज्याना अशा ( गोपी ). १४. सुखकर मूर्ति ज्याची [ अशा कृष्णास ]. १५. यशोदेचे हातीं. १६. विघ्नरूप मशकांस चवरीप्रमाणें. १७. भगवान् कृष्णाचे शरीरावर.

सिंपुनि गोमूत्रा, त्या न्हाणिति भयभंजना, सुरचमूत्राल्या. १८
जो भगवान् [1]कृत्स्नपिता, तत्तनु ते [2]गोरजःसमूहस्नपिता,
गोमयगोधूलीला धरि; [3]तीची या मनासि शोधू लीला. १९
स्त्री म्हणति, ‘सुरक्षण हो,’ विसरति ज्या स्वकवचास न सुर क्षण हो!
ज्यांहीं बहु भव तरले, [4]चरणप्लव ते न जाणती अवतरले. २०
[5]अजदेवीजन्यास स्वस्ति घडाया, [6]अजादिबीजन्यास
अंगीं सविधि करीती; चित्तहरी गोपयुवतिकौतुकरीती. २१
त्या [7]कौतुकजनकवचाः स्त्री गोपांच्या, स्वयें [8]महाजनकवचा,
तन्नामें [9]अंगरा या लेववित्ती, हांसविति मनीं जगराया. २२
ते [10]गोपीकृतकवचा, स्तन पाजुनि, [11]नंदगेहिनी [12]भृतकवचा
निजवी सप्रेम; निजे, ब्रह्मादिक सत्वमूर्ति चिंतिति मनिं जे. २३
नंद हि येतां पाहे, तों मार्गीं तन्मनासि दे तापा [13]हें.
विस्मय होय समस्ता; म्हणती, ‘कसि पावली असी हि [14]समस्ता?’ २४
‘शौरि तपस्वी, ज्ञानी, पूर्वीं आम्हीं न जाणिला अज्ञानीं;
तत्कथितोत्पात खरा जाला; वसुदेवबुद्धि मोटी प्रखरा.’ २५
[15]भिन्नाकार, पर [16]शुनी कर्में [16]रक्ताशिनी; [17]सुधारपरशुनीं
छेदुनि अवयव रचिती बळशाली गोप जाळिती [18]प्रवरचिती. २६

---

१. सर्वांचा बाप. २. गोरजसमूहें न्हाणलेली. ३. भगवत्तनूची. ४. चरणरूप नौका. ५. यशोदेच्या मुलास. ६. विष्णु आदिकरून देवांच्या बीजांचा ( अं वगैरे ) न्यास. ७. कौतुकोत्पादक भाषणें करणाऱ्या. ८. महाजनांचें कवच ( रक्षक ) अशा कृष्णास. ९. कवच (?). १०. गोपींनीं केलें आहे कवच ज्याला. ११. नंदपत्नी यशोदा. १२. सद्यः प्रज्ञाकरी वचा यथा तद्वदियं भगवन्मूर्तिरपि भजतामिति साधूक्तं भृतकवचेति—**पंत**. ज्याप्रमाणें वेखंड ( वचा ) तत्काळ बुद्धिवर्धक असतें त्याप्रमाणें भक्तांना परमेश्वराची मूर्ति हि असते. १३. ही पूतना. १४. मरणा. १५. शरीर [मात्र] भिन्न. १६. रक्त खाणारी कुत्री. १७. चांगल्या धारेच्या. १८. फार मोठी चिता.

धूमीं सौरभ[1] अगुरुस्मयहर[2]; आश्चर्य काय? जो तीर्थगुरु[3],
तो हृदयीं बाळकसा अंतीं होता; न होय अघकाळ[4] कसा? २७
अतिदुष्टा पूतनिका; हरिनें दिधला स्वलोक परि पूत[5] निका.
मानियली जननी ती; प्रभुची गाती म्हणोनि सज्जन नीती. २८
जे बाळकतिल घाणी[6], तीची जळतां हि कोण घेतिल घाणी?
जो तो सुरभिमधु[7] पसा घ्राण[8] पसारि, पी; गमे चि गोप मधुपसा. २९
म्हणति, 'नसे परिमल यासम, यद्यपि चंदनप्रभव परि मलया;
विस्मित, घेउनि वासा, नंदादिकगोप येति आत्मनिवासा. ३०
येतां वसतिस, मस्तीं[9] नमुनि, पतिस कळविलें स्ववृत्त समस्तीं.
सुतकुशळसमोदमना[10], विस्मित ही परिसतां तिच्या तो दमना. ३१
पाहुनि तोक, मनीं या प्रोष्यागत[11] मानि नंद तो कमनीया[12].
माथां हुंगुनि, बाला आलिंगुनि, पुण्यसिंधु फार निवाला. ३२

---

## अध्याय सातवा.

वधुनीं बकी[13] कुशिला[13], प्रथम चि वळला जयीं मुकुंद कुशीला,
जन्मर्क्षयोग[14] हि तदा[14], ते तिथि जाली व्रजास केवळ हितदा. १
उत्सवपरमानस[15] ती माता बाहे गृहा सबहुमान सती.
न्हाणी स्वांगज[16]; रानें गाजति वाद्यांचिया महागजरानें. २
ज्यांची बरवी प्रकृती, मंगळ करिती मुलासि वरविप्रकृती[17].
तो नेत्रांत[18] निजे हा दावी, जो पूरवी सुरद्रु[19] निजेहीं[20]. ३

---

१. सुगंध. २. चंदनाचा गर्व हरण करणारा. ३. परात्पर गुरु ( सर्वश्रेष्ठ ). ४. पापनाशक. ५. पवित्र. ६. लहान मुलें हे कोणी तीळ त्याना चिरडून टाकणाऱ्या घाणीसारखी. ७. सुगंध हा च कोणी मध. ८. नाक हा च कोणी पसा. ९. मस्तकीं—**पंत.** १०. पुत्राच्या खुशालीनें सानंद चित्त ज्याचें. ११. प्रवासाहून आलेला ( नंद ). १२. सुंदर. १३. दुष्ट पूतनेला. १४. [ कुशीला वळला ] त्या वेळीं जन्मकाळचें [ रोहिणी ] नक्षत्र आणि योग. १५. उत्सवासक्त मन जिचें. १६. निजपुत्रास. १७. श्रेष्ठ. १८. झोंपेला. १९. कल्पवृक्ष. २०. भक्तमनोरथ.

शकटा[1]खालें काला बकीचिया, मूर्तनिजसुखा, लेंकाला
प्रें[2]खीं मृदुलास्तरणीं[3] निजउनि, माता निघे जनेष्ट[4]वितरणीं. ४
स्वकरें सांगोपचिती[5] कारि, सुखवी विप्रबल्लवीगोप[6] चि ती.
सकळां गौरवि; सरली न सुहृज्जनमंडली; न पुत्र विसरली? ५
तों उठला विभु, केला त्याग निजेचा; प्रसूं[7] बलावि भुकेला[8].
करि बहु रोदन; पर ते ऐकेना गडबडींत माय; न परते. ६
रडतां पदयुगलीला झाडी, तों, ती हि दावि संयु[9]गलीला;
ध्वंसेना शकट कसें? तत्पविचक्रीं[10] रणीं पलाशकटकसें[11]. ७
शकटध्वंसें नवल व्रज करि, कीं ठाउकें शिशूचें न बल.
बाळक तन्निकटग[12] ती कथिती नंदादिकांप्रति प्रकट गती. ८
'करचरणांला, रडतां, झाडित असतां, कुमार बहु आरडतां,
शकटास उघड घडला पदनखरस्पर्श, तों चि हा घडघडला.' ९
वाणी विश्वा साची त्या बाळांची, जसी शुका व्यासाची;
वाणी[13] विश्वासाची घोषीं[14]; माया चि हे रमावासाची[15]. १०
जननी धरि तोकास स्वउरीं, ज्याची मुमुक्षु धरितो कास.
मुनि, 'सर्वस्व उरो जें,' म्हणति तयालागिं तोषवी स्वउरोजें[16]. ११
स्वस्त्ययनादि करीती ज्ञाते, सद्विप्र, शुद्ध, वैदिकरीती.
स्वकुशळसंजननमुनिं[17]प्रति दे व्रजपाळ वस्त्रगोधन नमुनीं. १२
निजसुखदा, या दासस्वर्तरुस[18], व्रजपदार[19], दायादास[20]
अंकावरि खेळविती[21] एकाकाळीं, यदंघ्रि बहु खेळ विती. १३

---

१. गाड्याखालीं. २. पाळण्यांत. ३. मऊ बिछान्यावर. ४. जनांचें इष्ट देण्यासाठीं. ५. यथासांग पूजा. ६. गवळणी. ७. माता यशोदेला. ८. भुकेलेला विभु. ९. युद्धकला. १०. त्याच्या वज्रानें व चक्रानें. ११. राक्षसांच्या सैन्या-सारिखे. १२. कृष्णाजवळ असलेले. १३. उणीव. १४. गोकुळीं. १५. कृष्णाची. १६. स्तनानें. १७. आपल्या कुशलाची उत्पत्ति ज्यांपासून अशा मुनींना. १८. भक्तांच्या कल्पतरूस. १९. नंदभार्या यशोदा. २०. मुलास. २१. खेळवीत होती.

तों सुगुरु[1] वपु त्रासप्रद होतां, उतरि भूमिवरि पुत्रास
नंदवधू, करि हरिचें चिंतन भीत्युपशमार्थ [2]भवकरिहारिचें. १४
इंदीवरदामनिभें[3] उपजविलें तनुभरें[4] यशोदामनिं भें;
कीं येतो सदरांती[5], पावेल, विलोकितां चि त्यास, दरा[6] ती. १५
सुचवी गृहकृत्य जिला, तीणें तेथें चि तो रमेश त्यजिला.
तों येत्ये वाहुटळे, नयन न झांकी, न हा महाबाहु टळे. १६
दैत्य महामायावी, हरिवधकीर्ति स्वकीयें[7]धामा यावी
म्हणवूनि, तृणावर्ती[8] दवसा[9] ये; जय गमे मनिं तृणावर्ता[10]. १७
बहु पीडा दे वात्यारूपें[11] खळ तो व्रजास; मग देवा त्या
हरुनीं गगनीं पळाला, जैसा घेवूनि जाय गृध्र पळाला[12]. १८
गोपवधू लीना, कीं भरली नेत्रीं, मुखीं हि, धूळी नाकीं.
त्यांत म्हणे '[13]वो!' वाळू या समयें[14] प्रळयकाळ ही वोवाळू.' १९
होय दिवस रजनि; पटप्रावृत[15] जाल्या दिशा, असें रजें[16] निपटें[17];
न स्मरवि स्ववपुस ती वेळा; कोणासि कोण बांधव पुसती ? २०
कल्पांत चि केवळसा, एक मुहूर्त व्रजांत ठाके वेळसा[18].
जनता स्वस्थिति लाहे, नंदाची परि सुतास न युवति लाहे. २१
निजसुतशोकाकुळ ती नंदवधू बहु रडे, करी काकुळती;
कीं स्थानीं च नग[19] वसे, कृपणा दे ताप; चोरि नीच, न गवसे. २२
न पडे जननीस कळ[20]; व्रजयुवती मिळति नंदसदनीं सकळ.
रडति जशा कुररी[21], ती वदवेना शोकविषनगांकुररीती[22]. २३

---

१. बहु जड असें. २. संसाररूप हत्तीस सिंह च अशा ( हरीचें ). ३. नील कमळाच्या माळेसारखा जो कृष्ण त्यानें. ४. शरीराच्या भारानें. ५. सद्वेष्टा. ६. भयास. ७. आपल्या घरीं. ८. गवताच्या समूहावर. ९. वणव्यासारखा. १०. तृणावर्तनामक राक्षसास. ११. वावटळीच्या रूपानें. १२. मांसास. १३. दुःखोद्गार. १४. समयावरून. १५. आच्छादित. १६. धूळी. १७. अत्यंत दाट. १८. वावटळेचें भ्रमण. १९. अलंकार. २०. दम—प. लि. टी. २१. पक्षिविशेष. २२. शोकरूप विषवृक्षाच्या अंकुराची तऱ्हा.

तो केवळ वळसा[1] ची; ते झष जीवनविहीन; वळवळ साची.
गोपी बहु तळमळती, लोळति धूळींत, रम्यकुंतळ[2] मळती. २४
क्रमितां गगनपथ, कला वेगाची क्षीण होय; निष्कृप[3] थकला.
कुचले धृतगरिमा[4]; या मूढाची काय वीर्यसागरिं[5] माया? २५
त्या कृतकपटा काया न वहावे, योजि जों अकृप टाकाया,
भुवनपरिवृढ[6] गळ्याला[7] धरि, तों सहनयन[8] देह सदळ गळाला. २६
कां करिल असत्य जुनी निजप्रतिज्ञा प्रभू तयास त्यजुनी?
आवळिलें खळनरडें; कीं, व्रज पावेल भीति पुष्कळ न रडे. २७
तो निश्चेष्टवपु रसा[9] वरि हरशरदीर्णदेवशात्रवपुरसा[10].
पातकरूपा डिखळापरि दैत्यांतक शिळातळीं पाडि खळा. २८
हृदयावरि हरि; खचला खळ नादें धरुनि गोपिका हरिखें[11], 'चला
पांहों' म्हणउनि जवनीं[12] धांवति, चिंतीत चित्तमीनें[13] निजवना. २९
तों दैत्यकळेवर तें पडलें, धरुनि स्वजीवनकळे[14] वरतें.
पांयांचा उर लाहो घे, म्हणवुनि तो हि कंठ ही उरला हो!. ३०
व्रजयुवति सकळ वळल्या, तदुरीं पाहोनियां हरीस, कळवळल्या.
उंचलुनि शवावरुनीं घेति, न योगादिकीं अनिशीं[15] वावरुनीं. ३१
देती त्या जननीला; ती घेउनि पोटिसीं धरी घननीला.
जगदीशा नंद नमी, म्हणे, 'पुनर्जात लाधलों नंदन मीं'. ३२
इष्टयजनतपदानें[16], भूतदयातोपितें[17] सुरनतपदानें

१. उदकाचा लोंढा—**प. लि. टी.** २. सुंदर केश. ३. निर्दय. ४. धारण केला आहे जडपणा ज्यानें असा (कृष्ण). ५. बळसागरीं. ६. लोकनायक कृष्ण. ७. गळ्याला. ८. नेत्रांसह. (त्या तृणावर्ताचा देह ज्या वेळीं खालीं पडला त्या वेळीं त्याचे डोळे ही बाहेर पडले होते). ९. पृथ्वी. १०. शंकराच्या बाणानीं विदीर्ण झालेल्या देवशत्रु त्रिपुरासुरासारखा. ११. हर्ष. १२. वेगवती. १३. चित्तरूप माशांस जलासारिखा कृष्ण त्यास. १४. आपल्या प्राणाचा काळ अशा कृष्णास. १५. नेहमीं. १६. निर्जल स्थळीं तळीं वगैरे बांधणें म० इष्ट. १७. भूतदयेनें संतुष्ट अशा व देवानीं ज्याचें पद नमिलें अशा जगदीशानें.

निज[1]जननिपरि च याला रक्षियलें, स्मरुनि पूर्विल परिचयाला. ३३
"दैत्यशिशू लपवीला; या संर[2]क्षेपुढें त्रिशूलपवीला
विष्णो! त्वजन न भिये; '[3]त्वत्पदता' सत्य वदति सज्जन 'नभिं ये.'"
जनहिंसापापरता हिंसक न दुजा तदीय पापापरता.
स्वसमत्वें हानि भला पावे न कधीं, तसा चि शिशु हा नि[4]र्भला. ३५
बहुत बृहद्वनवसतींमाजि असीं अद्भुतें जयीं जथिं दिसती,
मानी वसुदेवाचे, विस्मित होवूनि, नंद तो मनिं वाचे. ३६
पाजियलें कुरवाळी एकासमयीं स्वतोक लेंकुरवाळी,
पाहे [5]मुखराजीवा, ज्याचा दे सुख अनंत [6]मुखरा जीवा. ३७
[7]पी सादर मूल कुचँ; प्राशी मुखरुचिस गोपति[8]र्वधू; [9]लेंकुच
अमृतरस; न दे व[10]मनीं चित्त रसिक; [11]पद रुचे तिस [11]तदेव मनीं. ३८
'वि[12]धु! तुझि हे तुच्छ, विरे न [13]जड, नि[14]शाल्पद्रवैकहेतु [15]छवि रे!
जितुनि तिस हि पळवि रवी; हरि[16]मुखविधु अजित, कठिन[17]हृदुपळ विरवी.'
ये जृंभा, मुख विकसे, व्रजदेवीपुण्यदृष्टिला सुखवि; कसे
तों [18]उत्सवदालोकप्रतिकूल, प्रकट होति चवदा लोक? ४०
झांकि न मग कां पदरीं [19]पक्ष्मीं नयनें? तनु प्रकटि कांप [20]दरीं.
परि तत्काल विसरली; माया स्नेहीं स्मृतीस कालवि, सरली. ४१

---

२. याची (कृष्णाची) माता (यशोदा) रक्षण करिते त्याप्रमाणें. २. संरक्षणापुढें. ३. अन्वयः—सज्जन त्वत्पदता (विष्णुपदत्व—आकाशास विष्णुपद म्हणतात.) नभिं ये वदति [ तें ] सत्य. ४. वांचला. ५. मुखकमला. ६. चेहरा. ७. स्तनपान करी. ८. यशोदा. ९. [ त्या कृष्णाचे मुखकांतीपुढें ] अमृतरस [ हि ] निंबू [ वाटे ]. १०. मधुनीति तदर्थः—पंत (मध हा मधमाशांचें वमन म्हणून रसिक त्याचे ठिकाणीं आसक्त होत नाहीं). ११. तें च (कृष्णाचें च) स्थान. १२. चंद्रा! (हें बोलणें यशोदेचें आहे). १३. अचेतन दगड. १४. रात्रीच्या च वेळीं मात्र किंचित द्रव उत्पन्न करणारी. १५. कांति. १६. कृष्णमुखरूपी चंद्रमा. १७. कठिण असा अंतःकरणरूपी दगड. १८. आनंददायक अशा दर्शनाच्या विरुद्ध (भीतिदायक हें तात्पर्य). १९. पापण्यानीं. २०. भयानें.

# अध्याय आठवा.

वसुदेवोक्तें [1]भर्गप्रतिम, ज्ञानी, [2]विवेकजितषड्वर्ग,
प्रेमभरें [3]अपवर्गप्रदपद देखावया, व्रजा ये [4]गर्ग. १

विप्रोत्तम हा नंदें पूजियला सविधि, नमुनि सुमहानंदें;
नामकरण त्याकरवी पुत्रांचें [5]गुप्त उक्तरीत्या[6] करवी. २

भूतभविष्यत्कथन प्रकट करी; परि न तो [7]रहस्यविमथन;
जें प्रभुला संमत न, व्यक्त न बोलोनि, तत्व केलें जतन. ३

"'संकर्षण,' 'राम,' 'बळ,' ज्येष्ठाख्या; हा [8]द्विषर्ज्जनविरामबळ.
दुसऱ्यास सुखनिधानें 'कृष्ण,' तथा 'वासुदेव,' हीं अभिधानें. ४

[9]शुचिगुणकृत्यनुरूपें तव पुत्राचीं अनंत नामें रूपें
मज इतरांस हि [10]अकळें; हा सुत देइल तुम्हांसि कुशळें सकळें. ५

हा, साधुजनें त्रास त्यजिला, जोडुनि; तुझ्या हि निजनेत्रास
निवविल; तोका [11]मखरा श्रीच्या[11] जप; हो अभीष्ट तो काम खरा. ६

सुत नारायणसम हा, श्रीकीर्त्यनु[12]भावसद्गुणावास महा.
हे भाग्यखनि, जतन या नंदा! जीवापरीस करिं निजतनया." ७

[13]भावुकहेतु कवि खरी वाणी बोले असी सकौतुक; [14]विखरी
आशीर्वचनें सुमनें जातां [15]सापत्यगोपतीवरि [16]सुमनें. ८

---

१. शंकरासारिखा. २. विवेकानें जिंकिले आहेत कामक्रोधादि षड्रिपु ज्यानें असा. ३. मोक्षदायक चरण ज्याचे अशा कृष्णास. ४. गर्गमुनि. ५. नामकरण गुप्त करण्याचें कारण, गर्ग हा यादवांचा कुलगुरु; यानें जर या मुलाचें नामकरण केलें, तर कंसास हीं मुलें वसुदेवाचीं च अशी शंका येऊन हा यांचा घात करील, म्हणून गुप्त रीतीनें असें म्हटलें आहे. ६. शास्त्रोक्त पद्धतीनें. ७. गौप्यस्फोट. ८. शत्रूंचा नाश करणारें बळ ज्याचे असा. ९. शुद्ध गुण व कृति या अन्वयें. १०. कळत नाहींत. ११. लक्ष्मीच्या रमणस्थानास. १२. अनुभाव=प्रभाव. १३. सुखोत्पादक. १४. पसरी. १५. मुलांसहित नंदावर. १६. चांगल्या मनानें.

लागति रांगायाला, करिति चरित्रें कवीश्वरां गायाला,
ते दोघे भाउ; रती[1] व्रजनयना देति नान्यशोभा[2] उरती. ९
करिति उदार, कलीला नाशाया, प्रेक्षणीय दारकलीला[3].
हरिति मन श्रम हेलामात्रें[4]; सुख पावती अदभ्र[5] महेला[6]. १०
हळुहळु रांगति, लाजे श्री मनिं, दे, ते, मुनीश्वरां गतिला जे;
ते सदुदार करीती लीला गोष्ठांत गोपदारकरीती. ११
लघुमंजुळसिंजित[7] कीं लेवविलीं भूषणें; मधुरसीं जितकीं
ऐकुनि कुतुक मनीं या जननींच्या, देति करुनि गति कमनीया[8]. १२
गमन त्रिचतुरपदें[9], कीं भूषवितो भूमि नवारि सुचतुर पदकीं[10].
लघुगति करित मुरडणें[11], जननिकडे जनभयें सुचकित मुरडणें[12]. १३
तनु भरिती जंबाळें[13]; गळां बळें घालिती मिठी, जैं बाळें,
दाटे पान्हा थानीं, सेवावा आग्रहें जगन्नाथानीं. १४
घेउनियां उत्संगीं स्तनपानीं सांवरूनियां हृत्संगीं;
मुग्धस्मितमितरदनश्रीवदन[14] विलोकिती सुखाचें सदन. १५
हर्षविती जननि, करीं अवलंबुनि वत्सपुच्छ ते जननिकरीं[15],
चालति, बहु खेळ गडी गोपांचे दाविती; असे खेळगडी. १६
माता देखति च पळ व्यग्रत्वें[16] पळति केलिपरें[17] अतिचपळ.
निजगृहसुतरक्षण हीं न सकति दोन्हीं; न दोंत इतर क्षण ही. १७
मन बहुधा लेंकांहीं जननींचें सुखविलें; न धालें कांहीं.
बहु आवडि; रुचि राहे अमृतीं; लीला तयाहुनीं रुचिरा हे. १८
हरिलीला आबाळ[18] व्रज पाहे नित्यकृत्य ही आबाळ[19],

---

१. प्रीति. २. अन्य शोभा उरत नाहीं. ३. बालक्रीडा. ४. लीलेनें च. ५. फार. ६. स्त्रिया. ७. मंद मंजुळ ध्वनि ज्यांचे ठिकाणीं अशीं. ८. मनोहर. ९. तीनचार पावलें. १०. भूषणानीं. ११. नटणें—पंत. १२. वळणें. १३. चिखलानें. १४. मधुर हास्य व नियमित दंत यानीं युक्त असें शोभिवंत मुख. १५. जनसमूहांत. १६. [इतर कामांत] गुंतल्यामुळें. १७. क्रीडासक्त. १८. बाळापासून वृद्धापर्यंत. १९. उपेक्षित (नित्यकृत्याची हि उपेक्षा झाली).

संस्कारें करि कामें तनु; कृष्णीं मन सुखी विशोक रिकामें. १९
हरिलीलारसिक थवे गोपींचे; प्रेमरीति मज कसि कथवे ?
न पळ भजे मन, शय[1]; न प्रीतिपुरःसर अगार जेमन[2] शयन. २०
गीतें ये मृग वळणी, लीलेनें मोहिल्या तशा चि गवळणी.
प्रथम समान सत्यांचें न कळत हारिलें चि सरसमानस त्यांचें. २१
जो त्रिभुवनराजपति ब्रह्मेशानादि ज्या सुरवरा जपती,
गोपकिशोरसखा तो होउनि, चोरूनि कृष्ण गोरस खातो ! २२
चोरुनि गोरस खातो, परि दे गोपींस तोष थोर सखा तो.
गोपवधूजन निकडे[3] गाऱ्हाणें येति घेउनीं जननिकडे. २३
गाऱ्हाणीं हि परिसती, कोप करीना तऱ्ही सुताउपरि सती.
अविनय[4] तनय न वाटे; ये स्मितवदनीं दयामृत नयनवाटे. २४
विश्वोदर[5] तो, भाट श्रुति, केला गोपबाळकीं बोभाट;
हा मृदशन[6] करितो कीं; हें परिसुनि, कोप माय ते करि तोकीं. २५
मन शीतळ मउ गारेपरि; हरिवरि कर न कोप परम उगारे.
न सजो खोडि कराया पुनरपि, म्हणउनि दटावि खोडिकरा या. २६
फार यशोदा दापी, "पय नलगे, जरि म्हणें, 'शिशो ! दादा[7] ! पी;'
रुंते साय नखासी ? भरविलिया मानुनीं रसायन खासी." २७
सुखकरकर धरुनि करें हरिवरि वारिवरि बरी च कोपे निकरें.
ओढी रामकड, कडे दयाब्धिच्या उतरली अशी च कडकडे. २८
गोपीमुखशीतकर क्षणमात्रें भासला मना तापकर,
हरिनयनाब्जें कुमुदें विपरीत चि कोपभीतियोगें समुदें[8]. २९
चित्तीं बहुधा कमनें[9] श्रीच्या धरिला चि काय बहु धाक मनें ?
माय म्हणे, 'कांतरते[10] दाविसि, माती निषेविली[11] कां तर ते ? ३०
तूं अरवाळ[12] कसा रे ! ? राम भला, आणिखी हि बाळक सारे.

---

१. हात. २. जेवण. ३. घाईनें ४. उद्धट. ५. विश्व आहे उदरांत ज्याच्या असा तो. ६. मृत्तिकाभक्षण. ७. दादाबाबा. ८. सर्व. ९. कांतें. १०. भीतीला. ११. खालीस. १२. आनिवार.

मन धाके, बळपृथुकीं[1] कथिलें; होईल उदर केवळ पृथुं[2] कीं.' ३१
कृष्ण म्हणे, 'जननि! बळप्रमुखांचे बोल अनृतभाजन[3] निवळ.
सारे वाचाल टिकीं[4] लाविति या दोषसंभवाचा लटिका. ३२
त्यां केलें न मृददन[5]; स्वांतीं[6] गणिशील वचन सत्यास्पद न,
साच म्हणुनि तव लोकप्रोक्तीं[7] विश्वास, तरि वदन अवलोक.' ३३
माय वदे, 'बा! पाहूं;' लागे विधिच्या[8] म्हणावया बापा 'हूं!'
ब्रह्मांडें सुखवासी ज्यामाजि, प्रभु अनंत तो मुख वासी[9]. ३४
त्या सुकृतनदिस[10] लेंकीं विश्व, मुखीं, अर्पितां नयन, दिसलें कीं.
करि तो प्रभु 'आ' ज्याला श्रुति 'विश्व' म्हणे शिवाचिया आज्याला.
ब्रह्मांडाच्या रचने पाहे; तों ते[11] मनासि[12] साचार च[12] ने.
गेलीं च अनादि सलें[13]; व्रज आपण सुत हि दिव्यनयना दिसलें. ३६
विश्वात्मा अटकळला[14], चित्तंतु[15] चि पुत्र[15] तेथ जग पट कळला.
पाहुनि सुखसुख वळली, तों माया वैष्णवी क्षणांत खवळली. ३७
श्रुतिशास्त्रें पर[16] महिमा गाती यत्कीर्ति, ताप हारि, परमहिमा[17];
ज्यास्तव वनिं जतन यती योग करिति, मानि त्यास हि निजतनय ती.
[18]द्रोणाभिध वसु देवें[18] ब्रह्मवरें नंद पावला, वसुदेव
जनक न हरिलीला जे पावे, जिस मुक्ति[19] तीं हि वारिली लाजे. ३९

---

## अध्याय नववा.

नंदवधू लोकार्या, दासीजन सर्व गुंतला गृहकार्या,
त्यास्तव दधिमथन सती करि आपण एकदा विमळगुणवसती[20]. १

---

१. बळराम आणि मुलें यानीं. २. मोठें. ३. असत्यपात्र. ४. टिकला. ५. मृत्तिकाभक्षण. ६. अंतःकरणामध्यें. ७. लोकानीं सांगितलेल्यावर. ८. ब्रह्मदेवाच्या बापाला (कृष्णाला). ९. पसरी. १०. पुण्यनदीस (यशोदेस). ११. ती रचना. १२. खरोखर मनास ने. (मन आकर्षी, हा भाव). १३. दुःखें. १४. समजला. १५. चैतन्यरूप तंतु असा [आपला] पुत्र कृष्ण. १६. उत्कृष्ट. १७. फार मंद. १८. द्रोण नांवाचा देवविशेष. १९. ती (मुक्ति) (?). २०. निर्मळ गुणांचें स्थान.

सुवसन रुचिरमणी या सुभगेवरि[1]; सहज देहरुचि रमणीया;
तेजें अगदीं शाला[2] भरली; नादें हि गाय जगदीशाला. २
न गणी श्रम हो! दधिला मथितां, कीं गाय सद्गुणमहोदधिला.
सुतचरितीं बहुत रती ज्यांच्या लेशें भवासि जन बहु तरती. ३
आपण रविगुण[3] वोढी, हृदया संसारतिमिररविगुणवोढी[4].
गाय मुखें हरिलीला, तीणें न रुचति दुर्जी सुखें हरिलीलें[5]. ४
सूतमूर्ति हृदयसदनीं, नयनीं प्रेमाश्रु, घर्मकणगुण[6] वदनीं,
पान्हा थानीं, गानीं रुचि, दधिमथनीं गृहीं प्रकाश नैगानीं[7], ५
तों येवूनि रवीला धरि, सुज्ञीं सर्व अर्थ ज्या निरवीला.
तृप्त उदार कथानीं ज्याच्या जन, तो सतृष्ण दारक थानीं[8]. ६
घे उत्संगावरि ती, हरविधि यच्चरणधूलिसंगा वरिती.
पी स्नेहस्तन्यासी[9], नमिति जया जोडुनी स्वहस्त न्यासी[10]. ७
तृप्त न होतां पानें सुत टाकी; पय उते अहो! तापानें[11]
म्हणउनि जाय लवकरी; परमसुखामाजि विघ्न अर्थलव करी! ८
तुच्छार्थपरागमनीं[12] स्वत्यागें धरि रमेश बहु राग मनीं.
दधिपात्र शिलापुत्रें[13] फोडी. करिजेल काय तशिला पुत्रें? ९
कोप करी सुरमणि[14], कीं तृप्ति न होतां त्यजी धरेवरि; मणिकीं[15]
म्हणुनि उभा उपळाला[16] घालुनि सदनांत रामभाउ पळाला. १०
जाउनि भवनीं तातें विधिच्या भक्षूनियां हि नवनीतातें,
वांटियलें प्लवगातें[17]; चारित मना! भवपयोनिधिप्लव[18] गा तें. ११
माय न धरि आगं[19] मनीं, पाहे दधिपात्रभंग जन्हि आगमनीं;

---

१. सौभाग्यवतीवर. २. गृह. ३. रवीची दोरी. ४. संसाररूप अंधकारास सूर्यासारखा जो कृष्ण त्याचे गुणांची ओढी ( आकर्षण ). ५. हरिलीलेनें हरण केलेलीला. ६. घर्मबिंदूंची शोभा. ७. अलंकारानीं. ८. स्तनपानीं. ९. स्नेहयुक्त दुधास. १०. संन्यासी. ११. उष्णाधिक्यानें. १२. थोडक्याकरितां गेल्यावरून. १३. वरवंट्यानें. १४. देवश्रेष्ठ. १५. मडक्यावर. १६. दगडाला. १७. वानरांला. १८. संसारसागरांतील नौका. १९. अपराध.

परमसक्रुप डेरा हे देखुनि हांसे; सुखांत चि पडे, राहे. १२
देखे जरि खापरिया डेऱ्याच्या, पावली चि हरिखा; परि या
स्वसुता खोडिकराला पाहे, सद्वृंद ज्यासि जोडि कराला. १३
शोधी जों सुतपा[1] हे सदनांत, उलूखलांघ्रिवारि[2] सुत पाहे.
गेली देखायासी, तों गोरस मर्कटांसि दे खायासी. १४
'धरिन' म्हणे सहसा धी, ज्या न, बळें करुनि तप हि दुःसह, साधी;
देव हैठा[3] केंवि बळे प्रणतिविणें? श्रमसमूह[4] ठांके; विवेंळे[5].
१५
मागुनि मंदगति शयें[6] यष्टि धरुनि ये विलोकितां चि आतिशयें.
दृष्टि करुनि विभु तरला[7], उखळापासूनि चौर्यभीत उतरला. १६
कृष्ण पळे, तों पाठी माता धांवे धरूनि हातीं काठी.
मंथरगति[8] परि गांठी[9]; होतें तीच्या चि पुण्य पुष्कळ गांठीं. १७
प्रेमें मति विनटावी[10] ज्याच्या चरणीं, तयासि माय दटावी!
ज्यासि यमादिक भीती, मातेपासूनि तो धरि प्रभु भीती. १८
पावे सुततनु कंपा; वारी गोपीस तत्क्षणीं अनुकंपा.
पुत्र न हो बहु कष्टी, म्हणउनियां टाकिली करींची यष्टी. १९
जीवें[11] म्हणति, 'बा! धांवें,' त्यासि म्हणे ते, 'उलूखलीं बांधावें'.
बहुवश दासां; गावें हरिचरित, प्रेमळां सदा सांगावें. २०
मुनि नमिति सदा मानें, उखळीं बांधी जगत्पतिस दामानें[12].
परि तें न पुरे दावें अनंतरूपीं; विचित्र काय वदावें? २१
दुसरें गोवी दामीं; 'बांधेन' म्हणे 'बळें चि गोविंदा मीं'.
तें ही जालें ऊन द्व्यंगुल, मग तीसरें हि ये घेऊन. २२
तिसरें प्रथमाचिपरी स्पष्ट दिसे द्व्यंगुलोन[13]; नुमजे चि परी.

---

१. चांगलें तप जिचें अशी ती यशोदा. २. उखळाच्या मूळावर. ३. बलात्काराला. ४. सर्व यत्न थांबले. ५. व्याकुळ होई. (कर्ता 'यशोदा'). ६. हातानें. ७. भयचकित. ८. मंदगति. ९. गांठीं (?). १०. रंगून जावी. ११. [सर्व] प्राणी म्हणतात कीं अरे! धांव [या संसारसागरांतून सोडीव]. १२. दांव्यानें. १३. दोन बोटें उणें.

देखुनि हांसति गोपी, माया दिसतां हि तत्व तें संगोपी[1] २३
करितां आग्रह ठकवी, निष्फळ चि करी तिचा समग्र हठ, कवी,
कीं 'बळ[2] दावीं सारीं मज'; तों पहिल्यासमान दावीं सारीं. २४
निजसूनुस भागे या गृहदामीं बांधितां सुरसभागेया[3].
चारिता दाउनि दामीं गुंते; कीं, 'भक्त्यधीनमात्र सदा मीं'. २५
दामें त्या बांधावें यमपाशें ही न यन्नता[4] बाधावें.
प्रभु निजतंत्र[5], परि हरी भक्ताधीन; स्वगौरवासि[6] परिहरी[7]. २६
पुत्र[8]स्वात्मजाया चतुरास्य[9] महेश दुग्धसागरजा या
गोपीला लज्जित, कीं त्यांला गमलीं उणीं स्वभाग्यें जितकीं. २७
क्षीरधिचा जामाता बांधुनि गुंते स्वगेहकाजा[10] माता;
असतां बद्ध चि उखळीं यमळार्जुन[11] अंतरीं रिघोनीं उखळी. २८

---

# अध्याय दहावा.

नारदशापें नगते[12] शत वर्षें पावले धनदसुत[13]; मग ते
पाठविले अलकेला सदनुग्रह[14] दिव्यविग्रहासह[15] केला. १

---

# अध्याय अकरावा.

नगपतनरव[16] नितांत[17] व्याकुळ करि तो व्रजस्थनरवनितांत[18].
क्षितिस हि कांपवि पाता[19] गोपांचा मानि तेधवां पविपाता[20]. १

---

१. गुप्त ठेवी. २. बळें (?). ३. देवसभेनें गाण्यास योग्य. ४. त्याच्या भक्तांस. ५. स्वतंत्र. ६. आपल्या मोठेपणास. ७. आवरी. ८. मुलगा, आपलें च दुसरें रूप, पत्नी (?). ९. ब्रह्मदेव, शंकर व लक्ष्मी हीं तिघें या यशोदेला लज्जित झालीं. कारण, प्रभु तिला वश झाला आणि म्हणून च त्याना आपलीं भाग्यें उणीं वाटलीं. १०. आपल्या घरांतील कामास. ११. यमक व अर्जुन=दोन वृक्षविशेष. १२. वृक्षत्वास. १३. कुबेरपुत्र. १४. सत्कृपा. १५. दिव्यशरीरासह. १६. झाड पडल्याचा आवाज. १७. अत्यंत. १८. गोकुळांतील स्त्रीपुरुषांचें अंतःकरण. १९. गवळ्यांचा रक्षणकर्ता नंद. २०. वीज पडली असें.

यमळार्जुनतरु पडले, पाहुनि म्हणती, 'कसे नगेंद्र उपडले?'
गोप सनंद भ्रमती; जवळि पतनहेतु नेणती द[1]भ्रमती. २

तों शिशु वदति श[2]यांतें दा[3]उनि, पाहोनि भीति त[3]दतिशयांतें;
'न पहा कां पतनाचा हेतु, खरा कृष्ण, काय कांपत ना[4]चा?' ३

शिरला या दों[5]माजीं, उखळ अटकलें निबद्ध जें हो माजीं.
वोढी तों चि निखळले मूळांसह वृक्ष हे, क्षणांत उखळले. ४

दिव्यपुरुष तंव दोनी यांतूनि प्रकटले हि [6]मुदित, वदोनीं
'यासीं वंदुनि वडिलापरि गेले;' हा मु[7]लीं [8]उदंत निवडिला. ५

तार्किक जन तो, 'लटिके बाळ,' म्हणे; तन्मनीं कसा बोल टिके?
संदिग्ध कितिक यास त्यजिति, न घेती न करिति हि किति कया[9]स. ६

करुनि भजन कवि मुक्त प्राज्य जयाचें, तयास जनक विमुक्त
क्षिप्र करी; हरि[10]तींत प्रमाण कीं विश्वबंध[11] कर[11] हरितात? ७

नयना काना चा[12]वि ती बहु; गावविती हि गोपिका नाचविती.
बहुमत आज्ञा पितया विधिच्या जे स्त्री जसें चि आज्ञापि तया. ८

गोपींची प्रेम[13]लता फळली कैवल्य; धन्य ती प्रेमलता.
तें वस्तु महा गायींगोपींला सुलभ फुकट, न महागायी. ९

व्रज[14]वीथी सुरसरितें हांसति; सत्यादिलोक जन्हि सुरस, रितें;
श्रीश[15]भुललाम हि[16]त प्रभु जेथें प्रेमळांसि भुलला महि[17]त! १०

कृष्ण बृहद्वनवासीं, चरितासीं वाढतां सदैव नवासीं,

---

१. अल्पमतीचे (नंदादि गोप). २. हातवारे करून. ३. त्या विलक्षण प्रकाराला. ('पाहोनि' याचें कर्म). ४. नाचतां. ५. मध्यभागीं (कंबरेंत). ६. आनंदित. ७. मुलांनीं. ८. वृत्तांत. ९. शोध. १०. विष्णु–**पंत**. ११. ज्याचे–**पंत**. (ज्या विष्णूचे हात जगाचें बंधन हरण करितात तो विष्णु प्रमाण कीं त्या विष्णूस उलखल-बंधनापासून मुक्त करणारा नंद प्रमाण, असा येथें कवीचा प्रश्न आहे). १२. गोष्टी. १३. प्रेमरूप वल्ली. १४. गोकुळांतील रस्ते. १५. श्रीशंकरास [हि] भूषणभूत. १६. हितकर. १७. पूज्य, मान्य.

बल्लवलोकासि[1], कवी उपनंद स्थविर[2], बुद्धि ऐसी सिकवीः— ११
' येथें शिशुनाशक ते जाले उत्पात सर्वनिधना शंकते[3];
केलें दीनसमवन[4], श्रीशें भय भंगुनि स्वलोकसम[5] वन. १२
न दिसे जों नयनाशी उत्पात दुजा, न आमुचा नय[6] नाशी,
वृंदावन आटोपां[7]; दृष्टभयें[8] पावतें स्वमन आटोपां[9].' १३
या बोधीं आवडिला धरुनीं, नंदादि मानिती त्या वडिला.
श्रीवृंदावनवसती केली; होती करीत भूमि नवस ती! १४
तेथें चित्त मग वसे बळकृष्णांचें; प्रमोद उत्तम गवसे,
खेळति नानारीती; देखति लीळा समुन्मना[10] नारी ती. १५
चारी तोकांसहित प्रभु वत्सें, यत्पद त्रिलोकांस हित;
कारिती शुद्ध वसुमती[11], चुंबी चरणांबुजीं सुहृद्धव[12] सुमती. १६
देखुनि सर्वमुनिधना[13], वत्साकृति धरुनि, तेथ ये रिपु, निधना.
तें हरि बंधुस कळवी, माया यदनुग्रहें चि विश्व सकळ वी. १७
त्यासि[14] किती पाठ कला? सावध असतां हि गोपरूपा ठकला.
मग कारिल कसें? पडिला प्रभुहस्तीं; धरि पदांसहित सेंपडिला[15]. १८
फिरवि तया आनिधन[16]; स्वतनुवरुनि उतारि निजहिता ज्ञानिधन[17].
कंसहितकृदनुगारी[18] व्यसुस[19] कपित्थीं[20] फळार्थ अजित झुगारी. १९
असुर कपित्थांसहित व्यसु वसुधेवरि गळे पळें कंसहित;
दैत्यजिघांसु[21] मनातें हर्षवि, सुर वर्षती तदा सुमनांतें. २०

१. गवळी लोकांस. २. वृद्ध उपनंद नांवाचा एक गवळी. ३. समर्थ होणारे. ४. दीनांचें उत्तम रक्षण. ५. वैकुंठासमान. ६. नीति. ७. आवरा, स्वाधीन करून घ्या. ८. [आतांपर्यंत] पाहिलेल्या प्रकाराच्या भीतीनें. ९. क्षोभः—**पंत**. १०. अत्यंत उत्कंठित. ११. पृथ्वी. १२. प्रसन्न मनाचा पति. १३. सर्व मुनींचें धन अशा कृष्णास. १४. असुरास—**पंत**. १५. शेंपटाला. १६. मरेपर्यंत. १७. ज्ञानी लोकांचें धन [कृष्ण]. १८. कंसाचें हित करणाऱ्या सेवकांचा शत्रु कृष्ण. १९. गतप्राण अशा त्या राक्षसास. २०. कवठाच्या झाडावर. २१. दैत्यवधाची इच्छा ज्यास असा. [' हर्षवि ' याचा कर्ता].

विश्वप[1] वत्सप गवळी जाला हो! वासुरें रमारंग[2] वळी!
चारी गवता रानीं, तारी लोकांसि जो सदवतारानीं. २१
उदकप्रांता नेलीं बळकृष्णीं वासुरें उनीं तानेलीं,
इतरां ही गोपानीं; कीं वत्सांमाजि तृप्ति जागो पानीं. २२
पाजुनियां वत्स, पसे भरुनि पिती पय परप्रभू वत्सपसे[3];
तों नामें बक, साच त्रिदशारी[4], तेथ देखिला बकसा च. २३
न गमे बाळांशि खरा, मनिं मानिति वज्रकृत्तपर्वतशिखरा[5].
तों झडपि समग्रासी, कृष्णा, अहिला खगेश्वरसम, ग्रासी. २४
मूर्ति गळा ते जाची, जे खनि अनळादिकाखिळा तेजाची.
गिळितां बळभाउ जळे कंठीं, तो तत्क्षणीं प्रबळभा[6] उजळे. २५
शीघ्र बकीभाउ[7], गळीं जाळी म्हणवूनि पद्मनाभा उगळी.
ये हनना तुंडानें; शूराच्या[8] धरिलि चंचु नातुंडानें. २६
वत्सप अद्भुत करणी पाहति तीं सहज मारितां हतक[9] रणीं.
चिरि हरि जेंवि लव्हां[10] या; काम सफळ साधुजनमनांतिल व्हाया. २७
करिती देव स्तुतिला, वंदुनि जीला श्रुती वदे 'वस्तु' तिला.
मूर्ति मन नयन मोही; स्तव करि बळ मानसीं सविनय, 'नमो' ही.
स्फुरणें आलीं गाया गुण मित्रें कडकडोनि आलिंगाया
रामादि; कळेवर तें चाले कीं या चि जीवनकळेवरतें[11]. २९
जाति, नमुनि पद, काया वोवाळुनि वरुनि[12] साधुहृत्पदका[12] या,
गात चि सुर निजलोकां; चिंतांकीं[13] म्हणति, 'आजवरि निजलों कां!' ३०
निजजीवन दासां जे हरिलीला, कथिति ते जननदां[14] सांजे.

---

१. जगत्पालक कृष्ण. २. रमारमण. ३. गवळ्यांसारखे. ४. देवशत्रु राक्षस. ५. वज्रानें फोडलेल्या पर्वताचे शिखरास. ६. कांति. ७. बकी—पूतना तिचा भाऊ. ८. हें पाठांतर असून तें पक्की प्रत लिहितांना च क्रमानें लिहिलें आहे. मूळ पाठ—**धरिला चंचूसि शूरनातुंडानें.*** कृष्णानें. ९. दुष्ट. १०. लव्हाळा-तृणविशेष. ११. जीव चालविणारी कळा कृष्ण त्यावर. १२. साधूंच्या हृदयावरील पदकावरून. १३. चितेच्या मांडीवर. १४. जन्म देणाऱ्या नंदयशोदा ह्यांस.

'पावविला पर[1] मसणा' म्हणति, 'व्रज हीं महेश्वरें[2] परम सणा.' ३१
'न भुके जागा ताने, हरुनि भवा, हरियश व्रजा गातां ने.
करितां उच्चाराशी वाढति हर्षांचिया चि उच्चा राशी. ३२
याचे वात कितेकीं केले, मेले परंतु घातकि ते कीं.
जोडुनि पापा, मरते जाले त्यजुनि त्रपा कृपा पामर ते. ३३
प्रतिहतिस[3] द्विजवाचा[4] न पवे, जैसा न रोध सद्विजवाचा[5].
गर्ग[6] मनुष्यतनु भव स्पष्ट चि; आला तदुक्तिचा सदनुभव.' ३४
नंदादिक कृष्ण मुखें गाती, जाती स्वयें भयें कृष्णमुखें[7].
हरिलीलाभिनवसुधा पीती; त्याला न विष्णुलोक न[8] वसुधा. ३५

---

# अध्याय बारावा.

हरि शिशुशृंगारानीं भूषिततनु, वाजवूनि शृंगा, रानीं
जाया, चरित निज सुरीं गाया, मित्रें खुणावि सर्व निजसुरीं[9]. १
करिती अर्भकलीला, ज्या गातां हरिति पापगर्भकलीला[10].
शुक गातो रसिकानीं सेवाया योग्य सुरस तो रसिं[11] कानीं. २
करुनि तप रमा नंदासम न सुखी; हा चि पात्र परमानंदा.
नाथ सुरांचा करितो, चारुनि रानांत वासुरां, चाकरि तो! ३
नंद पिता चि; परि जनीं गोपांचें भाग्य हें न विष्णुपरिजनीं[12];
कीं करि जो रवि हरण प्रणततमाचें[13], तयासवें चि विहरण[14]. ४
तों आला अजगरसा रूपानें असुर, कीं करिल अजंग[15] रसा.
अघ[16] अघभाजन[17], 'घास ज्वलना मज,' हा म्हणे 'तसा जन घांस.' ५

---

१. शत्रु. २. कृष्णें. ३. प्रत्याघातास, विरुद्ध स्थितीस. ४. ब्राह्मणवचन. ५. गरुड–पंत. गरुडाचा वेग (सत्=चांगला, वि=पक्षी=गरुड). ६. मनुष्यदेहधारी [साक्षात्] शंकर गर्गमुनि. ७. काळतोंडीं. ८. वसुधा विष्णुलोक नव्हे असें नव्हे–**पंत.** ९. आपल्या सुरानीं, किंवा निद्रिस्त. १०. पापी कलीला. ११. पृथ्वीवर. १२. विष्णुभक्तीं. १३. भक्तांच्या अज्ञानरूप अंधाराचें. १४. क्रीडा. १५. निर्मनुष्य. १६. अघासुर. १७. पापी.

धरुनि क्षोभा, उसणें घ्याया, तर्पावया बकी भाउ सेणें[1],
पसरी अघ, सारा हे गिळितां व्यापुनि नभास हि, घसा, राहे. ६
त्या हरिदासां परवा काय ? न जाणोनि, जाणुनी साप, रवा[2]
करुनीं शिरति, पर गडी हरि न शिरे तों रेंदीं[3], न निष्कृप रगडी. ७
जाणें अज गरजावें जों कीं, ' न पुढें, विशाल अजगर ! जावें, '
तों शिरलें जगरा[4] या ल्याले जे विश्वरक्षका जगराया[5]. ८
स्मरतां अज गरल टिके काळव्याळीं[6] न; तेथ अजगर लटिके.
संकल्प अनिश[7] मायाबळें धरुनि ये पतंग दहनिं शर्माया[8]. ९
करुणेचा उदराशी[9] स्वमनिं म्हणे, ' अजगराचिया उदरासी
वश जाले दास गडी; जाळिल कीं या पतंगवृंदा सगडी[10]. १०
वत्सकिशोरतदशन[11] क्रूरें केलें चि, उग्रमुख शितदर्शन[12];
हे जासिं पर्वतशिखरें अग्रें दिसती विशाल सर्व तशिं, खरें. ११
माज्या हे मज नामीं गाती; या माय बाप हेमें[13] जना मीं.
' त्यजुं, निजजीवा, तूतें परि, ' म्हणति, ' न पळ भरि स्वजीवनतूतें[14] '. १२
माराया अहि तातें विधिच्या मनिं युक्ति धरिलि जे अहितातें;
हरि यम हा भुजग तिला नेणे, कीं न फिरवी महाभुज[15] गतिला. १३
जाय तशा दरदांत[16] द्विपदास्यांत[17] चि सरक्तशादरदांत[18].
असुरघनां रवि लपला देखुनि सुरगण उदश्रु[19]नीर विलपले[20]. १४
कोंडे वायु; गळाला धरि हरि; झप गुंतला गतायु गळालीं[21].
करि बहु तळमळ; काय प्रयत्न ! कांपवि धरित्रितळ[22] मळकाय[23]. १५

---

१. सण=सणावारीं परीट, न्हावी वगैरेंना दिलें जाणारें अन्न वगैरे. २. गोंगाट. ३. दांतानीं. ४. कवचाला. ५. जगन्नाथ विश्वरक्षक अशा कृष्णास. ६. काळसर्पी. ७. सतत. ८. मराया. ९. समुद्र. (उद=उदक). १०. शेगडी. ११. वासरें व गोपबालक यांचें भक्षण. १२. तीक्ष्ण दांत ज्याचे. १३. सुवर्ण ( सर्वस्व ). १४. आमचें जीवनसाधन अशा तूंतें. १५. कृष्ण. १६. भयंकर. १७. शत्रुमुखांत. १८. तांबडे व हिरवे दांत त्यानीं युक्त. १९. आसवें गाळणारा. २० रडला. २१. आमिषाला. २२. पृथ्वीतळ. २३. मलिनशरीर असा.

दाटे बहु वायु, गळा रोधी, तों पतन जाहलें दृग्युगळा[1].
भक्तांच्या अज गरजे गुंते, दे मुक्ति, लाधला अजगर जे. १६
मेले पशु गोप वनज्वलनीं मृगसे क्षणांत; मग तो पवन
राहेल कसा उगला? व्याळगळां[2] काळकाळबाळक[3] फुगला. १७
भ्याला कीं हरिस रणीं भेदुनियां ब्रह्मरंध्र तो करि सरणी;
जाला ही असुरहित त्रिदशमुनिजनेष्ट[4] पावला असुर हित. १८
मारुनि असुर, हितातें कारि, उठवी दृष्टिनें चि असुरहितातें[5];
त्या सकळांसह, साची करुनि कृपा, घे मुखांतुनीं सहसा[6] ची. १९
अहिच्या जें तेज निघे देहांतुनि शुद्धसत्वमय तें जानिं घे
मोक्षदपद[7] सुखसदन त्रिभुवनतापोपशांतिकरशशिवदन[8]. २०
स्तुति करिती सुर; सकळा अर्पिति ते गायनादिका सुरसकळा;
बहु मीनलिं नभ वाद्यें भरिति रवें[9], हे सनाथ नलिनभवाद्यें[10]. २१
तो बकसोदर तरला जीणें, ते हरिदया नसो दरतरला[11].
पशुपशुपावनचारु[12] स्वयश करू वत्स विश्वपावन[13] चारू. २२
तरले पतित रज्याचे रतिनें[14], पद पूत सदय अतितर ज्याचे,
धरुनि कृपा, वनचरसा हिंडे; केली समस्त पावन च रसा. २३
ब्रह्मभवेन[15] भगा जे गाती, तद्वाक्यसद्रवें[16] नभ गाजे.
माधवमधु[17] पिकलाहे; महिमामाकंद[18], मोद कविपिकें[19] लाहे. २४
दावूं महिमा नेला वाद्यरवांहीं; सुरोत्तम हि मानेला

१. दोन नेत्राना. २. सर्पाच्या गळ्यामध्यें. ३. काळाचा हि काळ असें बाळक. ४. देव आणि मुनिजन याना इष्ट ( कृष्ण ). ५. मृतातें. ६. एकदम. ७. मोक्ष देणारे आहेत पद ज्याचे तो. ८. त्रैलोक्याचा संताप दूर करणारें चंद्रासारखें मुख ज्याचें. ९. एकत्र झालेलीं वाद्यें [ आपल्या ] गजरानें आकाश भरून टाकितात. १०. ब्रह्मपिता कृष्णानें. ११. भयकंपित. १२. पशु व गोप यांच्या संरक्षणानें सुंदर. १३. जगाला पवित्र करणारा. १४. प्रीतीनें. १५. ब्रह्मदेव, शंकर, सूर्य. १६. त्यांच्या भाषणांच्या मंजुळ ध्वनीनें. १७. कृष्ण हा च कोणी वसंत. १८. महिमारूप आंबा. १९. कविरूपी कोकिल.

लववी, विस्मित जानें त्या चरितें होवूनि दूरुनीं निजजनित्या[1]. २५
भजदघ[2]परिहार पति श्रीचा करि; भयद उग्र परि हारपती.
सिंह कसा कलभांहीं[3] जिंकावा? प्रलयवह्नि वा शलभांहीं? २६
वृंदाविपिनीं[4] सुकलें जें अजगरचर्म, जीवनातें मुकलें,
क्रीडोचितगह्वर[5] [6]सें खेळति गोपाळ हरिपदग्रह्व[7] रसें. २७
अघ मारुनि वांचवि या पशुपशुपां कृष्ण वत्सरीं पांचविया;
कथिती हार्यंन[8] सावा, तैं व्रजिं कीं अहि जनांत हाय नसावा. २८
'निर्दयमानस; हाय! व्याळ न तो काळ तत्समान सहाय;
न तया[10] गिरि पृथु[11] कबळ[12];' प्रकट करिति नंदसूनुचें[13] पृथुक[14] बळ. २९
अर्थ न वत्सर हा या विदित जना, नित्य बाळवत्स रहाया
येती परि; बोभाट व्रजिं नाहीं ते अवारिचे[15] तों भाट. ३०
हा संशयपरिहार, प्रकटी प्रेमाश्रुबिंदुचे परि हार,
तें चि बरें वद, नामीं कीं हरिच्या रंग चिनवितों वदना! मीं. ३१

---

# अध्याय तेरावा.

केली भजदरिरक्षा[16]; कांसाराला[17], करूनियां बरि रक्षा[18],
ने वत्सप वत्स लता[19] देवांची, जे शरीरिणी वत्सलता. १
कृष्ण म्हणे, "जळ पाजा आपलिया वासुरांचिया कळपा, जा;
चरतिल कोमलयवसा[20], हें स्थान म्हणे, 'स्मरों नको मलय, वसा.' २
रमलें माजें मन, या पुलिनीं[21] बैसों सुखें करूं जेमन, या.
मृदुसिकतेवरि केली मांडूं," आज्ञा असी तयां बरि केली. ३

---

१. स्वपिता कृष्ण यास. २. भक्तपातकनाश. ३. लहान हत्तींनीं. ४. वृंदावनीं. ५. क्रीडा करण्यास योग्य अशी गुहा. ६. शेकडों [ गोपाळ ]. ७. कृष्णचरणनम्र. ८. प्रीतीनें. ९. वर्ष. १०. त्या सर्पास. ११. मोठा. १२. ग्रास. १३. कृष्णाचें. १४. मुलें. १५. कृष्णाचे. १६. भक्तांच्या शत्रूंची राख. १७. सरोवराला. १८. रक्षण. १९. कल्पलता. २०. कोंवळ्या गवतास. २१. वाळवंटांत.

पाहुनियां पुलिन गणीं बाळांच्या सुख; तृषा हि आपुलि न गणी;
पाजुनि जळ नवयवसीं सोडिति, जीं वासुरें प्रियें अवयवसीं[1]. ४

सोडुनियां दधिभक्तप्रभृति[2] सद्न्नें दयासुखोदधिभक्त[3]
जेविति त्या पुलिनीं च; त्रिदशां वाटे सुधा हि आपुलि नीच. ५

मध्यें अहिपतिशयनें[4] बसतां, तीं लेंकुरें सुविकसितनयनें[5]
हर्षप्रहसितवदनें[6] बसति जसी पद्मकर्णिकेचीं[7] छदनें[8]. ६

त्यांच्या सरसा लीला; किति करिती पात्र पत्रकरसालीला[9],
किति जेविति वरदगडी[10] कुसुमफळीं[11] शिक्यपल्लवांकुरदगडीं[12]. ७

कृष्णसखे रुचिरमती दाविति अन्योन्य भोज्यगतरुचि[13]; रमती.
सेविति अन्नरस हितप्रियें[14] हांसति हांसविति सुरेश्वर[15] सहित. ८

देखति ते सुर लीला, खोवी उदरांबरामधें[16] सुरलीला.
डाव्या तो काखेला धरि शृंग सवेत्र[17], दावि तोकां खेला. ९

वामीं विधिजनक[18] बळभ्राता वे करिं दधिप्लुतोदनकवळ[19].
ठांव[20] लवणशाकेला[21] अंगुलिसंधी[22] करांत चि तशा केला. १०

श्रुतिशास्त्रनयज्ञांचा गुरु, भोक्ता मुख्य साधुजनयज्ञांचा,
जेवि; शिशू हांसवितो, जो ब्रह्मांडाचिया समूहांस वितो ! ११

त्या बाळचरित्रास प्रेक्षुनि, सुर तोष धरिति, तदरि[23] त्रास;

१. अंगासारखीं. २. दहींभात आदिकरून. ३. दया आणि आनंद यांचा समुद्र जो कृष्ण त्याचे भक्त. ४. शेषशायीनें. ५. प्रफुल्लित नेत्र ज्यांचे. ६. हर्षानें हास्ययुक्त मुखें ज्यांचीं. ७. कमळांतील मधाचीं. ८. पानें. ९. पानें, हात आणि साल यांस. १०. कृष्णसखे. ११. फुलें व फळें यांवर. १२. शिंकें, पानें, अंकुर व दगड यांवर. १३. खाण्याचे पदार्थांची गोडी. १४. हितकर व रुचकर. १५. देवाधिदेव. १६. पोटावरील वस्त्रामध्यें. १७. वेताचे कांठीसहित. १८. ब्रह्मपिता व बळरामाचा भाऊ. १९. दह्यानें कालवलेला भाताचा घास. २०. जागा. २१. लोणच्याला. २२. दोन बोटांमधील जागा. २३. त्यांचे (देवांचे) शत्रु=असुर.

गाति; वने[1]चरविभवां लाभ, न हा [2]शक्रमुनिविरिंचरविभवां. १२
जेविति शिशु हरिसहित स्वा[3]दु शिळें अन्न ही सुधेपरिस हित.
धरुनीं तृणलोभ वनीं पशु शिरति, भयें हि [4]वत्सपमनोभवनीं. १३
गोप [5]ससाध्वस, खाया विसरति; जाणे भया असा[6]ध्वसखा या.
सांगे कीं, '[7]सह सारे बैसा, मीं वत्स आणितों [8]सहसा रे!' १४
त्या गोपकिशोरांसी अभय असें दे दयाबळयशोराशी.
ध्यावा जो धीरानीं, [9]सकवळकर तो स्ववत्स शोधी रानीं. १५
महि[10]मांतरदोहद या विधिला; कीं [11]वत्सगोपसंदोह, दया
करुनीं वांचविला जे [12]अघहरलीला, जिला सुधाचवि लाजे. १६
व्रजगोरसचोर [13]हरी जनक सुत विधी हि वत्स [14]सकिशोर हरी.
या पहिल्या चालीला चालवि. संसार हरि भल्यांचा लीला. १७
वत्स वनांत न दिसती, मागें मुरडे [15]दयासुधांबुनदि [15]सती.
शिशुवृंद हि विधि हरि; तें दिसलें ज्ञानाचिया महानिधि हरितें. १८
योजी [16]साक्षी प्रमद स्वसुता, जेणें शमेल हि क्षिप्र मद;
शोकें ही न करपती गोगोपी, करि असें [17]सुरप्रकरपती. १९
स्वपदीं चि विभु लवाया विधिला आश्चर्य दाखउनि भुलवाया,
भगवान् [18]स्वप्रभ विष्णु क्षणमात्रें सर्व जाहला [19]प्रभविष्णु. २०
आपण वत्स पहा, कीं, आपण होवूनि त्यांसि वत्सप हाकी.
वर्णिल कोण शहाणा? आपण काठी करीं पदीं हि वहाणा! २१
सारी पहिली चि [20]परी; ईश्वर न करील काय? हें मात्र परी

---

१. वनचरपुत्र गवळी यांस. २. इंद्र, मुनि (नारद), ब्रह्मदेव, सूर्य व शंकर. ३. मधुर. ४. गोपांच्या मनोरूपी घरीं. ५. सभय. ६. असाधूंचा असखा–**पंत**. ७. एकत्र. ८. लागली च. ९. घासयुक्त हात ज्याचा. १०. दुसरें सामर्थ्य [पाहण्याची] इच्छा. ११. वांसरें आणि गोप यांचा समुदाय. १२. पातकाचा नाश करणारी लीला. १३. कृष्ण. १४. मुलांसह. १५. सती दयासुधानदी. १६. [सर्व-] साक्षी कृष्ण. १७. देवसमूहपति (कृष्ण). १८. स्वयंप्रकाश. १९. समर्थ, सर्वशक्तिमान्. २०. तऱ्हा.

वारूं न शके तो, कीं जननींची स्नेहवृद्धि, मोह न तोकीं. २२
जाय रमावर सांजे; व्रज भावी भेट ते [1]शतां वरसां जे.
तोष न तो कां माता मनिं? जरि भेटति जुन्यां चि तोकां माता. २३
गळती थपथप थानें, प्रेमें धावोनि येति [2]अपथपथानें,
[3]स्तन्यसुधे नूतनयां [4]प्रसवलियाशा चि देति धेनू तनयां. २४
गोगोपीगोप [5]रमावरगुरु [6]समसिद्धि काय सांगों परमा?
आला वत्सर हाता, जाला होवूनि गोप वत्स रहाता! २५
हें जाल्यावरि, साच्या न्यून निशा असति पांच सा वरिसाच्या.
वत्स सबळबाळक हा चारी व्रजनिकट, [7]सर्वखळपाळकहा. २६
तेव्हां धेनू चरती, गोवर्धनपर्वतावरी संचरती;
तेथुनि दृष्टिस त्यांच्या वत्स दिसति, सुकृत बहु [8]अदृष्टिं सत्यांच्या. २७
चावूं विसरति [9]घांसा, चाविलिया ही गळां न उतारिति घांसा;
हंबरती, दयमाना पाहति वत्सांसि उंचलुनि वरि माना. २८
एकिपुढें एकि, कडे लंघिति, धांवति, करूनि भय एकिकडे;
पाहुनि [10]आटोपा या गोप न जाले समर्थ आटोपाया. २९
वत्सांचा मनिं ओढा, न दिसे दृष्टीस दगड, तरु वनिं ओढा;
गोवर्धनगिरिमधुनीं जाती सुखसिंधुलागिं त्या [11]प्रेमधुनी. ३०
आल्या कळपापासीं, क्षय ज्यांच्या पदरजें सकळ पापासी.
बहु वत्सांवर माया करिती, त्या [12]दुग्धसिंधुच्या [12]वरमाया. ३१
हुंबरती प्रेमानें, चाटिति वत्सांसि, पाजिती बहुमानें,
वत्सवती परि माया बहु; त्या प्रेमा नसे जनीं उपमा या. ३२
न [13]तिळें मृदू राग मनीं, गोप तिहीं श्रमविले [14]विदूरागमनीं.

---

१. शंभर वर्षांनीं. २. आडमार्गानें. ३. दुग्धरूपी अमृतास. ४. प्रसविल्याप्रमाणें. ५. कृष्ण. ६. सर्व प्रकारची सिद्धि. ७. सर्व दुर्जनाग्रणींचें हनन करणारा. ८. नशिबांत. ९. तृणाला. १०. आवेशास. ११. प्रेमनदी. १२. क्षीरसमुद्राच्या विहिणी. [ दुधासारख्या शुभ्र, हें तात्पर्य ]. १३. स्वल्प हि. १४. दूर येऊन.

लेश नुरे परि तो यां, प्रेमानें वर्षती सुतोपरि तोयां[1]. ३३
प्रेमभरें बाहूनीं[2], उंचलुनीं धरिति पोटिशीं बाहूनीं.
हुंगिति बाळकटाळू; म्हणति 'त्वदरिष्टें[3] विश्वपाळक टाळू'. ३४
करिती मायें[4] तात; प्रेक्षाया वदनचंद्रमा येतात;
जावुनि दूर, मुरडती; न सकति पुत्रांविण क्षण क्रमुं, रडती. ३५
हे आधीं रामा या कळली नाहीं च वर्ष धीरा माया.
प्रेमा लक्षि प्रबळ व्रजतोकीं निजमनांतिल क्षिप्र बळ[6]. ३६
'जो प्रेमा जातो कीं हरिविण कोठें न तो हि माजा तोकीं;
न दुजी रामा यावी माया, मायेश हा खरा मायावी.' ३७
चिंतुनि हें राम घडीभरि, हृदयीं ज्ञानदृष्टिला मग उघडी.
पाहे[7] पशु पशुप रमापति; पावे प्रीति तेधवां बळ परमा. ३८
पुसतां, हरि, हेतूतें कथि, 'लीला उमजली[8] चि बरि हे तूतें;'
हा अभिनव देवाचा प्रश्नोत्तरवाद एक न वदे वाचा. ३९
वर्षें स्वत्रुटिकाळें[9] आला विधि नेउनीं सवत्सें बाळें.
पहिल्यापरि विभुला या देखुनि, तत्काळ लागला चि भुलाया. ४०
द्रुहिणें[10] म्हणे मनिं, 'हारिला न कळत पशुतोकसंघ म्यां वनिं हरिला.
माया जनिं जे माजी, त्या तल्पीं[11] असति सर्व हि निजेमाजी. ४१
उरउनि अमृततनु[12], रवी एक हि भगणांतरीं[13] प्रकाशित नुरवी;
त्यापरि वर्जुनि हारिला म्यां शिशुपशुगण, विमोह सर्जुनि[14], हरिला. ४२
येथें हा तो[15] कांहीं अर्थ नसे; वेष्टिला चि हा[16] तोकांहीं.
करितो रानीं केली, पहिली जसि गोपवासुरानीं केली.' ४३
नेणोनि, असा ध्याया बैसे; परि गति कळे चि न असाध्या या.

---

१. अश्रुजलांस. २. हांक मारून. ३. तुझ्यावरील संकट. ४. प्रेमाला. ५. पितर. ६. बळराम. ७. गोप गाई [ सर्व च ] कृष्ण दिसूं लागलीं, हा भाव. ८. मूळ पाठ--**जाहली विदित.** ९. त्रुटिकाळ=ऱ्हस्व स्वर उच्चारण्यास जो वेळ लागतो त्याचा एक चतुर्थांश. १०. ब्रह्मदेव. ११. [मायारूप] शय्येवर. १२. चंद्र. १३. नक्षत्रीं. १४. उत्पन्न करून. १५. हा तर. १६. हा कृष्ण.

जाला शोध न; वेधा[1] लागे मन; पावला चि बोध न वेधा[2]. ४४
दिसती हीं सत्य जुनीं कीं नव? न कळे चि हें, भ्रमास त्यजुनीं.
कुतुकें अन्यायाला करुनि भुले; गति सुचे न अन्या याला. ४५
करि निगम[3] 'नमो;' हा यापरि मायेश्वर; तदीय मन मोहाया
माया दावि; भुले कीं स्वकृतें; निर्दय कदा न हा विभु लेकीं. ४६
श्रेष्ठीं जो कां मायें[4] योजी, तो दोष त्याचिया कामा ये.
रवितेज्या जन अर्ची; न पवे[5] खद्योत[6]गत सभाजन[7] अर्ची. ४७
सकळ विभु[8]ललामा तें कळलें कीं, 'ठकवितां चि भुलला मातें.'
निजरूपीं निजवि, भवा[9] वारुनि दासांसि दावि तो निजविभवा[10]. ४८
विधि पाहे सहसा जे पशु शिशु जो ज्या विभूषणासह साजे.
ते ते प्रभु हरिसारे सर्वगुणें भक्तमोह[11]करिहरि सारे. ४९
तो अद्भुतमहिमा या निश्चळ करि; देखवे न धाम हि; माया
हरि हरि; कीं नभिं याला मूर्छा आली च; शक्तिहीन भियाला. ५०
श्रुतिभाजन[12], कवि, मानी हा सावध होय विश्वजनक विमानीं.
नेत्र उघडि आठ; विना[13] स्वदुरित[13] मोहासि बीज तो आठविना. ५१
तों न सके कवळाया निजमाया ज्या कराब्ज[14]धृतकवळा या.
देखे भव्ययशोधी जो शिशु पशु त्या वनांत अव्यय शोधी. ५२
शीघ्र जसा रवि, माना सोडुनि, उतरे नभीं च सारविमानीं[15];
कांचनदंडासम हा पडला; समजे दया चि दंडास महा. ५३
वाहे स्वशिरःकमळें चरणीं, अभिषेकुनि स्वलोचनकमळें;
करि सत्यप[16] दीनमनें वारंवार स्वजन्मद[17]पदीं नमनें. ५४

---

१. वेधाला मन लागे (मनाला वेध लागला, मन गोंधळलें, हा भाव). २. ब्रह्मा. ३. वेद. ४. कपटास. ५. पावे. ६. काजव्याचें तेज. ७. पूजन. ८. प्रभुश्रेष्ठास (कृष्णास). ९. संसारा. १०. ऐश्वर्या. ११. भक्तांच्या मोहरूपी गजांविषयीं सिंह च. १२. वेदाधार. १३. आपल्या पातकावांचून. १४. करकमलामध्यें घेतला आहे [भाताचा] घास ज्यानें. १५. पाठान्तर-**वियाना.** वियान=विमान). १६. ब्रह्मदेव. १७. कृष्णचरणीं.

# अध्याय चवदावा.

माथां पादरज्यांतें वे, स्मरती साधुसंघ सादर ज्यांतें;
जोडुनियां हस्त, वनप्रभवोद्भव[1] करि दयांबुवाहस्तवन[2]. 1

'तनुरुचिजितजलदघटा[3]! गुंजाशिखिपिच्छभूषणा[4]! कनकपटा[5]!
स्तविन तुला वनमालाशृंगकवळवेणुवेत्रधर[6]! गोपाळा! २

नमन तुला भवशमनाखंडलमुखदेववंदिता[7]! भवशमना[8]!
स्वचरणनिरतमुनिधना[9]! लीलाकृतविश्वसंभवावननिधना[10]! ३

धन्य म्हणों वरदेशा! या श्रीवृंदावना किती वरदेशा[11],
हिंडति पद कमनीयाकृति जेथें यद्रजोंश[12] पदक मनीं या. ४

होय, सकृप योजें[13] जनीं यां[13] तव नाभ्यमृतसभ्रदपयोजजनि[14]
मीं जारि, तारि यवसाचें[15] या वनिंच्या भाग्य हें सदवयव[16] साचें. ५

श्रुतिशास्त्रनयज्ञांहीं रचितांहीं[17] तृप्ति बा! तुज न यज्ञांहीं.
गोगोपीस्तनपानें त्वां धरिली तृप्ति तत्सुतें जनपानें[18]. ६

करुणेचा उदधी न त्वत्सम; सर्वेश तूं स्वजनहृदधीन[19].
हा कांम[20] हि मागाया, दे मति, जन्मांतरीं हि महिमा गाया.' ७

---

१. कमलोद्भव (ब्रह्मा). २. दयामेघ कृष्णाची स्तुति. ३. शरीरकांतीनें जिंकलें आहे मेघसमूहास ज्यानें. ४. गुंजा आणि मयूरपुच्छें (पिसारा) हीं भूषणें ज्यास असा. ५. पीतांबरधारी. ६. वनमाला (पायापर्यंत लोंबणारी माळ), शिंग [वाजविण्याकरितां], [दहींभाताचा] घास, मुरली आणि वेताची कांठी यांस धारण करणारा. ७. शंकर, यम व इंद्रप्रमुखदेव ह्यानीं वंदित. ८. संसारनाशका. ९. तुझ्या चरणाचे ठिकाणीं रत झालेल्या मुनिजनांच्या सर्वस्वा! १०. सहज क्रीडेनें केली आहे जगाची उत्पत्ति, संरक्षण आणि लय ज्यानें असा. ११. श्रेष्ठ देशास-पंत. १२. ज्याच्या रजाचा अंश. १३. या [तुझ्या] जनीं (गोपमंडळमध्यें) [माझी] योजना कर. १४. नाभीरूप अमृताच्या चांगल्या डोहांतील कमलामध्यें जन्म असा. १५. गवताचें. १६. सांग असा अर्थ-पंत. १७. केलेल्या यज्ञानीं. १८. लोकप्रभु जो तूं त्यानें. १९. भक्तांच्या हृदयाधीन. २०. इच्छा.

विगतमदाज्ञानमनें[1] विनउनि, घेवूनि गुरुपदाज्ञा नमनें
करुनि पिता, मह[2] सत्य स्वांतें[3] देहें हि वरि[4] पितामह सत्य. ८
होय[5] पिता महनदिला[6]; तृप्तिकरीं[7] पारि मनें पितामह न दिला,
गेला सत्यपदास श्रीहरिच्या मनिं धरूनि सत्यप[8] दास. ९
तें कुतुक मज न कथवे; वत्सांचे तो स्वयें जगज्जनक थवे
पुलिनीं दारक[9] थारे तेथें ने; करि अशी उदारकथा रे!. १०
शिशु म्हणति सकळ, 'पाहा न विलंब करूनियां गतिस, कळपा हा
घेउनि आला, हरिला धाक. अहो! आमुची दया बहु हरिला. ११
ये हरि सहित पहात, ग्रास धरुनि, बैसलों; करिति तप हात.
चिंति तुजें मन वांटे[10]; तुजवांचुनि विषसमान जेमन[11] वाटे. १२
शीघ्रप्रत्यागमनें केला [12]त्वद्विरहसंज्वरत्याग मनें.
एककवळभक्षण ही घडलें न; विलंबला घनाभ[13] क्षण ही. १३
ये जेवूं, स्वस्थानीं बैस,' असा प्रार्थिला तिहीं स्वस्थानीं.
हांसे मनिं हरि, खाया लागे दधिभक्त[14], तन्मनें हरिखाया[15]. १४
करुनीं भोजनपानें, वत्सांसह बाळसंघ तो जनपानें,
अजगर दावुनि, सांजे नेला वसतीस, लब्ध बहुदिवसां जे. १५
'अजगर खाउं[16] ग्रासी आम्हां; मग त्या हरी सखा उग्रासी
आजि वधी,' तोकानीं कथिलें हें वृत्त; लोक घे तो कानीं. १६

---

१. गेला आहे मद आणि अज्ञान ज्यापासून अशा मनानें. २. उत्सव. ३. मूळ पाठ —**स्वांतीं धरि, मग वरी.** ४. सत्यलोक. ५. सेविता होय—**पंत.** ६. उत्सवनदीला—**पंत.** ७. तृप्तीच्या हातीं. ८. सत्यलोकपति—**पंत.** ९. बाळ [गोप]. १०. वाटेला. ११. भोजन—**पंत.** १२. तुझ्या विरहामुळें [उत्पन्न होणाऱ्या] संतापाचा त्याग. १३. मेघासारिखा. १४. दहींभात. १५. आनंदण्यास. १६. खाण्याकरितां.

# अध्याय पंधरावा.

या चरितोपरि साऱ्या वर्षींच्या कृष्णसत्कथा परिसाव्या.
येथें नित्य नवि रती; याविण विषयांत होय सत्य न विरती[1]. १
हरि बळ सहशिशु वृंदाविपिनीं चारिति महासुखें पशुवृंदा.
याची शोभा नमना योग्य, नुरवि मन्मथाचिया भान मना. २
रक्षिति हें वन माळी ऋतु सादर सर्व ही; धणी वनमाळी.
पाहुनि पैदवि[2], भुलावी कां न श्री, जीसें[3] नित्य पद विभु लावी? ३
जेथें वेणुपिकाचा[4] ध्वनि, दोहद कृष्णपादरेणु[5] पिकाचा,
त्या वृंदावनमहिला[6] वाखाणिति आदरें त्रिदशजनमहिला[7]. ४
त्या सुभगा अवनितळीं, गुंजन्मधुपांबुजें[8] उदंड वनिं[9] तळीं[10],
तेथिल गंध वहाया पदिं ये, हरि दे निदेश[11] गंधवहा[12] या. ५
वैकुंठांत रमे न, क्रीडा करि या वनीं नितांत[13] रमेन[14].
देव समग्र जपाया सादर ज्या तो स्तवी निजाग्रजपाया[15]. ६
'आर्या! सुरनुतपद[16], या क्षितिवरि आलासि करुनि बहु नतप दया.
अर्चिति पादप, दास, प्रणत, फळसुमीं[17] सुधाप्रपादपदास[18]. ७
होउनियां भ्रमर हितें[19] त्वद्यश शमलघ्न[20] गाति हे भ्रमरहित.
धृतनरतनु वरदास त्यजिति न पदपद्मनिरतमुनिवर, दास. ८
नाचति मयूर; सकळा अर्पिति तुझिया पदीं स्वनृत्यरसकळा.
त्वद्दर्शनमोदास स्वांत[21] दिलें; करिति तुज न 'नमो' दास? ९

---

१. विरक्तता. २. मार्ग. ३. ज्या पदवीस. ४. मुरलीरूप कोकिळाचा. ५. कृष्णचरणधूलि. ६. वृंदावनांतील भूमीला. ७. अमरांगना. ८. गुंजारव करणारे भ्रमर आहेत ज्यांत अशीं कमलें. ९. अरण्यांत. (स्थलकमलें). १०. सरोवरांत. (जलकमलें). ११. आज्ञा. १२. वाऱ्यास. १३. अत्यंत. १४. रमाकांत. १५. बळरामाच्या पायास. १६. देवांनीं नमिलेत चरण ज्याचे अशा. १७. फलपुष्पांनीं. १८. अमृताची पोई देणाऱ्या अशा [तुझ्या] चरणास. १९. हितकर. २०. पापनाशक. २१. अंतःकरण.

करिती न [1]व्याहारा, स्मरति न पति, न सुत, तनु हि, न[2]व्याहारा,
पाहति गोपीसम या सादर हरिणी तुला त्यजुनि [3]दरसमया. १०
त्वत्प्रिय दक्ष करीती सूक्तें पिक; हे चि धर्मरक्षकरीती
स्वगृहागतपूज्य, कृती हर्षविती [4]विद्यमान [4]अर्थे सुकृती. ११
हे पद मुनिराजगतिप्रद, जीव समस्त जीवनें या जगती.
खग, मृग, अग, नग, जगती, धन्य चि कीं सकळ दाविताति गजगती.'
वर्णित आला पाया ऐसा, वेदांसि उचित आलापाया;
यद्गुण बळ [5]भद्राचें, जो तो यश गाय देव बळभद्राचें. १३
श्रुति[6]विश्रमदा ल्याली पद्मप[7]रागांगराग [8]समदाल्याली,
सेउनि [9]सुममधु रानीं, गाय; हरि हि तीसवें स्वरीं मधुरानीं. १४
गति, कूजित[10] हंस हि तें नेणे, जें दाविलें स्वयें [11]हंसहितें.
वनिं ठकला पिक, [12]लाजे नृत्य करुनि दाखवी कलापि कला [12]जे. १५
जातां दूर चराया, घनगंभीरस्वरें चि [13]दूरचरा या
पशुकळपा पाचारी; तृणचर हि द्रवति, न खळ पापाचारी. १६
प्राकृतजन भागतसे, भागति खेळोनि बहु [14]महाभाग तसे.
श्रीपति बळपद रगडी; हरिचे सेविति [15]गतत्रितापदर गडी. १७
श्रुति[16]नुतपादप हा, या स्वच्छाये योग्य [17]वरदपाद पहाया
[18]श्रुतमूर्ति [19]सदाननिं जे ते मूळीं श्रीकुचांत हि सदा न निजे. १८

---

१. संभाषण. २. नवीन आहारास. ३. भयकाल. ४. असेल त्या द्रव्यानें. ५. कल्याणाचें. ६. कर्णमनोहर. ७. कमलांतील पराग (सुगंधी पीठ) एतद्रूप उटी. ('ल्याली' याचें कर्म). ८. आनंदित अशी भ्रमरपंक्ति. ९. फुलांतील मकरंद. १०. पक्ष्यांचा शब्द. ११. परमहंस संन्यासिजनाना हितकर (मोक्षप्रद) अशा कृष्णानें. १२. अन्वयः–[कृष्ण] नृत्य करुनि जे कला दाखवी [ते पाहुनि] कलापि (मोर) लाजे. १३. दूर जाणाऱ्या. १४. दैववान असे कृष्ण व बळराम. १५. तापत्रयाचे भयापासून मुक्त. १६. वेदानीं स्तविलेला वृक्ष. १७. कृष्णचरण. येथें 'वरदपादप हाया' असा पंतकृत पदच्छेद आहे; पण तो सदोष असावा. १८. लोकप्रसिद्ध मूर्ति ज्याची. १९. साधूंच्या मुखीं.

विश्वाच्या [1]नगरीं जे पल्लव शयनार्थ देति ते नगराजे,  
जे गोप शयन रचिते योगि[2]मनोरथ विशुद्ध मूर्त[2]नरें चि ते. १९  
गोप सुशीला मांडी, निजतां [3]सुकृतांबुधी, उशीला [4]मांडी;  
किति सेविति [5]भव्यजनीं [6]नवविटपांच्या सरोजनाभ [6]व्यजनीं. २०  
किति गाती चरितगति; प्रेमाश्रु न तद्विलोचनांतरिं तगती.  
[7]मुखसारसमधुपानीं देहस्मृति सोडिली चि शिशुमधुपानीं. २१  
त्या मोक्षश्रीदा मानाथा सबळास तत्सखा श्रीदामा  
विनवि [8]स्मितसुभंगमुख, प्रार्थिति हि [9]स्तोककृष्णसुबळप्रमुख. २२  
'येथुनि जातां लव न श्रम; कीं, आहे समीप बहु तालवन.  
तेथ फळें बहु; [10]सुरभी हा येतो गंधें; दे परंतु असुर भी. २३  
धेनुक अभिधान, [11]खरस्वरूप तज्ज्ञातिवर्ग हि समान खर.  
खगपशुगणमनुजगती तेथ नसे; जाति, ते कदापि न जगती. २४  
फळगंधें दरवळतें वन मन हें आमुचें हि सादर वळतें.  
जाले लोभित [12]दशन, घ्राण, रसज्ञा, करावयासि [13]तदशन. २५  
अमृतफळासि फळे हा सुरवृक्ष अनंत; नुरवि [14]तुच्छफळेहा.  
नेले कांतारा हे शिशु, जेथें असुर [15]धार्मिकांता राहे. २६  
जेंवि [16]करी, [17]तालागा बळ कांपवि; असुर [18]ये करीता लागा;  
वीर्यें गाढ; वधावे शिशु या कामें सकोप गाढव धावे. २७  
कोपें कांपत, नर वा सुर नेणत, ऐकतां चि [19]फळपतनरवा,

---

१. जगन्निवासाला. २. नरवेष धारण करणारे मूर्तिमंत योगिमनोरथ च. ३. पुण्यसागर (कृष्ण). ४. ठेवी. ५. शोभन जन्म ज्यांचें असे. ६. कोमळ डहाळ्यांच्या पंख्यानीं. ७. मुखकमलांतील मकरंदप्राशनानें. ८. हास्यानें सुशोभित मुख ज्याचें. ९. स्तोक, कृष्ण, सुबल आदिकरून. (हीं गवळ्यांचीं नांवें आहेत). १०. सुंदर वास. ११. गाढवाच्या आकृतीचा. १२. दांत. १३. त्यांचें (फळांचें) भक्षण. १४. क्षुद्र फळांची इच्छा. १५. धार्मिकांचा नाश करण्यासाठीं. १६. हत्ती. १७. ताल वृक्षास. १८. पाठलाग करीत ये. १९. फळ पडण्याच्या आवाजास.

येउनि[1], वीरास भया लातेच्या दुष्ट दाखवी रासभ या[1]. २८
कोप धरीला ताळें बळभुजपरिकंपितें[2]; करी लाताळें;
कीं[3] गर्दभ रानीचा[3]; काय अमृतपात्र पातकभरा नीचा? २९
जो हा गाढव, यातें दुर्मतिवारांगनानुगा[4] ढेंवयातें[5],
बळ सज्जनपदक बळी चरणीं, सुखवावयासि जनपद[6], कवळी. ३०
तो अतिउग्र गरगर[7] प्रभुनें खळ फिरविला धरूनि गरगर,
त्यजिला लौकर ताळीं; नभ गर्जे इष्टदेवकृतकरताळीं[8]. ३१
गर्दभतृण राज्यानें[9] विश्वांच्या क्षेपितां चि, तृणराज्यानें,
पडतां ताळ जवळिला कांपविला; त्या द्रुमें हि अन्य कवळिला. ३२
तो ही चुरला ताळद्रुम; ऐवं[10] त्या वनीं न उरला ताळ[11].
वृक्ष न जगती, पवनक्षोभें भंगी, तसें[12] चि जगतीप[13] वन. ३३
तों तज्ज्ञाति मिरासी[14] आले भांडावयासि; त्या तिमिरासी
बळहरिहिमभानुरविस्वजनकुमुदनलिनसुखदकरभा[15] नुरवी. ३४
करुनि खर परासु, मनीं सुखविति सुर; ते हि करिति मुदिरीं[16] सुमनीं.
वाद्यें बहु वाजविती, जयजयशब्देंकरूनि नभ गाजविती. ३५
करुनि परासु खरासी, देति जना भक्ति तत्परा सुखराशी.
व्रजिं नमितां पद, वडिला लोका जो निजवियोगताप, दवडिला. ३६
एके दिवसीं वृंदाविपनीं रामाविणें हरी गोवृंदा

---

१. पाठान्तर—**ये दावी रासभ या अतुळाखिळबळबळप्रवीरास भया.** हें पाठान्तर पोथींत क्रमानें च आहे. २. बळरामाच्या भुजानीं कंपित. ३. कारण तो रानटी गाढव च. ४. दुर्बुद्धिरूप वारांगनेच्या पाठीस लागलेल्या. ५. या ढव्यास. ६. देश. ७. विषास हि विषासारिखा. ८. संतोषित अशा देवानीं पिटलेल्या हाताच्या टाळ्यानीं. ९. कृष्णानें. १०. याप्रमाणें. ११. ताळतंत्र, किंवा तालवृक्ष. १२. [ पवनक्षोभानें भंगतें ] त्याप्रमाणें. १३. विश्वपालक. १४. वतनदार. १५. बलराम व कृष्ण हे च कोणी [ अनुक्रमें ] चंद्र व सूर्य यांची स्वजनरूप चंद्रसूर्यविकासी कमलाना विकसित करणारी कांति. १६. मुदिर=मेघ; येथें

चारि; निदाघातप[1] या सकळां करि तृषित; पीति यमुनेंत पया. ३७
विषजळ पशुपानीं या सेवियलें पीति त्या चि पशु पानीया.
प्राणी जो जो धाला, तो जाला प्रेत, पावतां रोधाला[2]. ३८
पाहुनि मृत सकळ, वळे करुणामृतघन जगन्निवास कळवळे.
दृष्टि सुधावृष्टि[3] हरी कारि, जे[4] पाळी करूनि यां सृष्टि, हरी. ३९
उठती जेंवि सकाळीं; हरि दासांचें हरी च साध्वस काळीं.
कोण विषास विचारी? पावे आपण चि नाश तें अविचारी. ४०
दुसरा वांचविता न प्रेतां; हरिनयन अमृतवर्षि[5] वितान
शिरिं, म्हणुनि असु परतले, हें जाणुनि विभुपदांत चि पशुप रतले. ४१

# अध्याय सोळावा.

मुनिसर्वस्वा[6] दुहिता[7] रविची वाटे करावि सुस्वादु[8] हिता;
कीं, कालियसापानें दूषित जळ, जन न मरो सहसा पानें. १
ह्रद विषसागर लाला[9] अहिच्या धरि, भी कृशानु[10] ज्या गरलाला.
जळ विष सरमिसळ, सळे[11] जन पाहुनि; जें कढे सदैव सळसळे. २
जरि गेला खग वरणें[12] मरणाची सरणि[13] तत्क्षणीं मग वरणें.
जन्हि जव थोर पळतिल द्विजें[14], तन्हि वाफेकरूनि होरपळातिल. ३
मारुत[15] डोहावरिला, स्थिरचर त्याला न सांपडो; हा! वरिला[16]
त्यांतिल सविषवनलवीं[17], प्राणांसि हरावया उशिर लव न लवी[18]. ४
भीति खचर[19] वाफांस, ब्रध्नसुताचा[20] गळां न बरवा फांस.

---

१. उन्हाळ्यांतील [प्रखर] ऊन्ह. २. तीराला. ३. जींतून अमृतवर्षाव होत अशी. [विधिविशेषण]. ४. जे (दृष्टि) सृष्टि करूनि यां (मृतसकळां) पाळी व हरी. ५. अमृताचा वर्षाव करणारें छत. ६. मुनिजनांचें सर्वस्व असा जो कृष्ण त्याला. ७. सूर्यपुत्री (यमुना). ८. गोड आणि हितकर. ९. लाळ, फेंस. १०. अग्नि. ११. भय पावे. १२. वरून. १३. मार्ग. १४. पक्षी. १५. वारा. १६. स्वीकारला. १७. विषमिश्रित पाण्याच्या थेंबानें. १८. ह्याचा कर्ता 'मारुत'. १९. विहंग, पक्षी. २०. सूर्यपुत्र यमाचा.

जाली इच्छा पीडाहरणीं श्रीमन्मयूरपिच्छापीडा. ५
ह्रदह्रदयांत निखारा यमुनेच्या त्या सुदुःसहा कुंविखारा.
काढाया कौस कैसी, दावि पहा सदयता स्वलोकांस कसी! ६
भवताप कविस दाही न, तसा जरि ही कदंब निकट सदा ही,
तन्हि विष भय दावीना या अमृतकरा शिरोनिलयदा वीनां. ७
लावी पद झाडा या हरि, त्या अहिचा समूळमद झाडाया.
चढला प्रभु तरुशिखरीं, घडलीं होतीं महातपें तरुशि खरीं. ८
जेथें सकुतुक रतलें श्रीमन, त्या विजयि विश्ववर्ण्य करतलें
ताडि भुज विभु जगाचा; टाकि उडी, मद हरावया भुजगाचा. ९
जळ धांवे शतधनु तें; त्या डोहीं टाकितां उडी विबुधनुतें.
प्रकटति बहुतर लहरी; करि करिवरसा ह्रदासि बहु तरल हरी. १०
'गोगोप पिपांसू न व्यसु केले स्यां, न दोप मजपासून,'
प्रभुभुजदंडाहत तें जळ ऐसें विनवि काय शब्दें वितंतें! ११
नाग अंदांत रवासी ऐकुनियां, धांवला ह्रदांतरवासी;
भवनाभिभवा मानी, प्रकट करी कोपगरळविभवा, मानी. १२
नीरदनिभ, सुकुमार, श्रीवत्सांकित, सुवर्णवसन, कुमार,
मृदुपद, सुस्मितवदन प्रेक्षाया योग्य, अतुळसद्गुणसदन. १३
मूर्तीला हि अशीला पाहे, तत्केलि या रुचे न अशीला.
मर्मीं चावे दांतीं, वेष्टी, महिमा कळे जिचा वेदांतीं. १४

१. मयूरपिच्छाचा तुरा आहे ज्यास. २. क्रूर विषारी सर्पास. ३. कंबर बांधी ४. ज्ञानी पुरुषास संसारताप जसा त्रास देत नाहीं, त्याप्रमाणें कदंबवृक्ष जरी नेहमीं [ त्या डोहाच्या ] जवळ असे तरी त्यास विष भय दाखवीत नसे. [ कारण, ] या वृक्षानें ज्याच्या हातीं अमृत अशा गरुडास [ पूर्वीं एकदां आपल्या ] मस्तकावर स्थान दिलें होतें; [ त्या अमृतस्पर्शानें आज त्यास विषबाधा कांहीं झाली नाहीं ]. ५. शंभर धनुष्यांइतकें लांब. ६. चंचल. ७. तृषित. ८. गतप्राण. ९. दीर्घ. १०. उन्मत्त. ११. [ आपल्या ] घराचा पराभव. १२. क्रोध आणि विष यांचें आधिक्य. १३. गर्विष्ठ. १४. पीतांबरधारी. १५. या दुष्ट सर्पाला. १६. ज्या मूर्तीचा.

न दिसे नयनीं चेष्टा हरिची; भासे दशा जसी नीचेष्टा[1].
नाहिं समान सहाय[2], प्रियसख म्हणती सशोकमानस 'हाय!' १५
वेष्टी कृष्णा गुरुला स्वशरीरें सर्प, जेंवि कृष्णागुरुला[3].
शोकहृदीं मोहाहीं[4] कवळी श्रीकांतमित्रसंदोहा[5] ही. १६
प्रिय आत्मा, वत्स, तरी न स्मरती धेनु; सर्व वृष वत्सतरी[6]
फोडिति हंबरडा; या हरिचा लागे सुहृत्कदंब[7] रडाया. १७
नीरजनाभ यदा ते स्थिति दावी तेधवां जना भयदाते[8],
त्रिविधोत्पात प्रकट क्षणमात्रें होति; नाश कळविति निकट. १८
नंदादिक बहु धाकीं पडले हरिनाश भाविती बहुधा कीं.
'रामावांचुनि दावा[9] गेला; करिती सुरारि यासह दावा. १९
यमलोक गमे व्रज हा;' तेथ म्हणे बाळगोपगोपीव्रज 'हा!'
न पहाती ओकासी[10], त्यजिति जसे लोक ओकिल्या ओकासी. २०
जाती शोधित रानीं; भय धरिलें बहु बळाहुनीं[11] इतरानीं.
वारीना वनगमनीं; जाणे अनुजप्रभाव[12], हांसे स्वमनीं. २१
धैर्यें सहसा ढळलीं; शोधित जातां, पथीं पदें आढळलीं.
जीं सेवि अनादिसती, चिह्नें पद्मांकुशादि नयना दिसतीं. २२
जें हरिचें पद वीतें अर्थचतुष्टय, तदंकिता[13] पदवीतें[13]
धरुनीं, यमुनातट ते पावुनियां, जाहले सकळ जन तटते[14]. २३
जाउनि देखति अहितें, जेणें हरि वेष्टिला ह्रदीं अतिअहितें.
गोप हि पडले शवसे; कोणाच्या मनिं न धीर धड लेश वसे. २४
बुडवी शोकनदीन[15] व्याळावृतदेहहरिविलोकनदीन[16]

१. नीच सर्पाला इष्ट [तशी]. २. बरोबरीचा मित्र. ३. चंदनाला. ४. मोहसर्प. ५. लक्ष्मीपति श्रीकृष्णाच्या मित्रसमूहाला. ६. पाड्या. ७. मित्रसमुदाय. ८. भयंकर. ९. वनाला. १०. घरासी. ११. बळरामाहून. १२. धाकटा भाऊ कृष्ण याचा पराक्रम. १३. त्या पदानें चिह्नित अशा मार्गाला. १४. थांबले. १५. शोकसागर. ( नदी+इन=नदीपति=समुद्र. ) १६. सर्पानें वेष्टित आहे शरीर ज्याचें अशा हरीच्या अवलोकनानें दीन.

व्याकुळजन थोर; पळे स्मृति; शोकाग्नीकरूनि बहु होरपळे. २५
करुनि विलापा रडती गाईपरि, धाय मोकलुनि, आरडती.
दुःख अनंत यशोदे; म्हणे, 'परिष्वंग[1] अमृतशीतें[2] शिशो! दे.' २६
गोपी स्मरती हसित, प्रेक्षण, सौहृद, विनोदवाक्य, विलसित.
देह परम रसरसित, प्रियशोकाग्नी करील जाणों भसित. २७
त्या डोहांत शिराया, जाले नंदादि सर्व सिद्ध मराया,
परि ते सकळ बळानें वारियले सांत्वनादियुक्तिबळानें. २८
कृष्णास सकळ कळलें कीं, 'गोकुळ मन्निमित्त बहु कळकळलें'.
तेथ घटीद्वय उगला होता, मग भुजगभोगबंधनिं[3] फुगला. २९
प्रभु वपु जों जों फुगवी, तों तों तो नाग भोगवेढे उगवी[4].
वाढे गोपकुलगडी; तनुभंगभयें भुजंग बंध उलगडी. ३०
सोडी म्हणुनि न उलला, परि नेणे हरिस; गरळमदें भुलला.
उंचलुनि स्वफण[5] फणी[6] कोपें, विषवह्निला वमोनि, फणफणी. ३१
उपमा तन्नयना, कीं मंडकभाजन[7]; गळे गरळ बहु नाकीं.
फूत्कार करि उदंड; व्याळ न तो, काय कोपला यमदंड! ३२
ओष्ठप्रांत जिभानीं चाटी, विषवह्निकीलखड्गनिभानीं[8].
हरि दाखवि धीटपणें, गरुडाचें जेंवि पन्नगवधीं, टपणें. ३३
अन्योन्य तधीं[9] टपती; श्रमणक्षतशक्तिनागशिरिं[10] धीट पती
चढला बहु लवलाहें; बसतां गुरुरूप मस्तकीं लवला[11] हें. ३४
मृदु रक्त सहज चरण; व्याळशिरोमणिखड्यावरी[12] संचरण;
धरिति अरुणता तळवे ज्यां श्रीकरपल्लवांसि बहु नीतळवे[13]. ३५
स्वामी भुवनाचा, या अहिशिरिं लागे कळाप्रभव[14] नाचाया.

---

१. आलिंगन. २. अमृताप्रमाणें शीत. ३. सर्पदेहाचे बंधनांत. ४. उकली. ५. आपला फणा. ६. सर्प. ७. मांडे भाजण्याचें पात्र. ८. विषाग्नीच्या ज्वाला आणि खड्ग यांसारख्यानीं. ९. त्या वेळीं. १०. श्रमणामुळें नष्टशक्ति अशा सर्पाच्या मस्तकावर. ११. हें गुरुरूप. १२. सर्पश्रेष्ठाच्या मस्तकावरील खड्यावर. १३. स्पर्श न करवे. १४. कलाकौशल्यांचें उत्पादक स्थान.

**सहज चि सुरसा** ही त्या नृत्याच्या करिति सर्वसुर साहित्या. ३६
घेउनि **आतोद्या**, या प्रभुपायीं देवगण गुणा तो द्याया,
कांतासह **आला**, पी स्मितकांत्यमृतासि, वाजवी, आलापी. ३७
म्हणती, '**कुजना**! चावें निजअधरा; हे समर्थ भुज, नाचावें.'
वर्षति **कुसुमें** अमर, श्रीपतिचरणांबुजीं स्वयें जे भ्रमर. ३८
**कृष्ण महानट** नाशी विषबळ, करि विश्वधाम हा नटनासी
हरि, **जैसा शफ** टांचा हाणोनि करी मदप्रणाश फटांचा. ३९
तो **यदुकुळजनु** ठेंची शिर तोंवरि, जों म्हणे, 'फिरोन नुठें चि';
पूर **वमे रुधिराचा**; पदवज्रा काय होय मेरु धिराचा? ४०
**नागशिरें शंभर** ही ठेंची; करि नम्र पंक्ति विश्वंभर ही.
**मूर्छेस्तव अचळ**, बळक्षीण; शरीरीं उरों दिली न चळबळ. ४१
**प्रभुवर नागवि**; सरला मदसंचय; सर्व गर्व नाग विसरला.
**होउनि विमद**, मनें हा जाय शरण माधवा अधर्मदमनेहा. ४२
**पाहुनि साप** दरातें पावुनियां, विकळमानसा, पदरातें
**तद्वनिता पसरीती**. शरणागतिमाजि शुद्धतापसरीती. ४३
**स्त्रीजन सापत्य** वनप्रभवाक्षा सदयमानसा पत्यवन
प्रार्थी, **वंदुनि** भावस्तवनें, जेणें घडे भयांत निभाव. ४४
'**खळदमना**! सकळेना! तूं प्रभु हें प्राकृता जनास कळेना.
**न धरा जी**! आगं मनीं; केलें दीनासि धन्य या आगमनीं. ४५
**केली शिक्षा**; माया दीनावरि बहु तुझी अशी; क्षामा या
**द्या जी! असुदान**; मन प्रसन्न हो, करु सदा तव पदा नमन.' ४६
**स्त्रीजन बहु विनवि**, लया कीं पति पावो न; कांति जावि न विलया

---

१. वाद्या. २. खोडलेला पाठ–**सुरगण स्वगुण**. ३. हास्यशोभेच्या अमृतास. ४. जगन्निवास श्रीकृष्ण. ५. नृत्यासि. ६. जसे खूर [ त्याप्रमाणें ]. ७. गर्वनाश. ८. फडांचा. ९. दुष्टांच्या नाशाविषयीं इच्छा ज्यास. १०. कमलनयन कृष्णाला. ११. पतीचें रक्षण. १२. जगदीशा! १३. अपराध. १४. कृश अशा या सर्पास. १५. सौभाग्यशोभा.

आपुलि, हा वर दासीं मागति, आली दया महावरदासी. ४७
त्यजुनि मृतनिभा[1], उतरे हारि; वासुकिचा[2] हि मोहजळ भोंउ तरे.
जाणोनि हैरादीना[3] स्तवि अहि, 'मज रक्ष मृतिजनिहरा[4]! दीना. ४८
अतिदुःसह जात्या[5] गा! अहि, या कोपा[6] अधीन सहजा; त्यागा
मीं तों न क्षम, जनका विश्वाच्या! सापराध मानु मज नका.' ४९
कृष्ण स्वस्था नागा सांगे, 'सकुटुंब जा निजस्थाना गा!
खगपतिभय आगामीं[7] तूज न; केली क्षमा तुझ्या आंगा[8] मीं. ५०
परमाप्त गणिल विनतानंदन मत्पादलांछिता तुज विनता.
वस निःशंक रमणकीं[9], मत्पादांभोजभृंग[10] पक्षिरमण[11] कीं. ५१
जा ह्रदओकामधुनीं; पुरवू गोमर्त्यखगमनःकाम[12] धुनी[13].
पळ न लावि प्रस्थाना; सोडीं या देवधेनुविप्रस्थाना. ५२
जें शासन तुज, गाया संध्यायुगळीं[14] स्मरेल जो, भुजगा, या
माज्या दासा दर हो न तुम्हांपासूनि; मत्पदा सादर हो.' ५३
आज्ञापि विभु जगाचा ऐसा, श्रममद हरूनियां भुजगाचा.
त्या शुभकाळिं यशोधि प्रभु पूजुनि, निजमनासि काळिय शोधी[15]. ५४
शुचिमानस मुद्राशि[16] प्रभुसि नमुनि, जाय सहजन समुद्रासी;
अमृतनिभा[17] सवित्याची[18] होय सुता, कीर्ति विश्वभासवित्याची[19]. ५५

---

१. मृतवत् झालेल्यास. २. कालिया. ३. शंकरआदिकरून [देवांचा] स्वामी (हर+आदि+इन). ४. जन्ममरण चुकविणाऱ्या! ५. स्वभावतः च. ६. जन्मतः उत्पन्न झालेल्या कोपाच्या. ७. पुढें. ८. शरीरास, शरीरावर. ९. रमणक नांवाच्या द्वीपांत. १०. माझ्या चरणकमलींचा भ्रमर. ११. खगपति—गरुड. १२. गायी, मनुष्यें व पक्षी यांचे मनोरथ. १३. नदी (यमुना). १४. संध्याकाळ व प्रातःकाळ या दोन्ही वेळीं. १५. शुद्ध करी. १६. आनंदाचा राशि. १७. अमृतासारखी. १८. सूर्यपुत्री यमुना. १९. जगाला प्रकाशित करणाऱ्याची.

# अध्याय सतरावा.

नागांतकगरुड बळी, त्याला निजरक्षणार्थ देति अहि बळी.
कालिय त्यासि न मानी, भक्षी बळि अन्यदत्त ही अभिमानी. १
जंगम[1] विषतरु डासी[1] युद्धीं हा कालिय प्रबळ गरुडासी.
नाग भगवद्दंशा या चुकला नाहीं च उग्रजव दंशाया. २
झडपोनि उडवि पक्षानिळवेगें[2] त्या, खगेंद्रगरुड, विपक्षा[3].
वातानें तृण सुकलें, तेंवि पडे येथ; मरण म्हणउनि चुकलें. ३
मृत्यु कदा न घडो, हा म्हणउनि ये शरण, करुनियां अघ, डोहा.
अहिस तशा, पतंगा[4] या जो मुनिचा कळवि दैव शाप तगाया. ४
पूर्वीं येथिल मीनां हरि[5], सौभरिमुनि निवारि, परि सोडीना;
पतिशोकाकुळदीनां[6] वारिचरां[6] अभय, शाप ही दे वीनां. ५
'मृत चि पडो हा, माजी वाचा हे सत्य, खगप डोहामाजी,
येउनि जरि दाविल यावरि ही अत्रत्य जळचराच्या विलया.' ६
अपराधी ही जगला गरुडापासूनि नाग यास्तव तगला;
हरिपदसारसमुद्रा[9] शिरीं होतां जाय सपरिवार समुद्रा. ७
जैसा चि किरणमाळी[10], डोहांतुनियां निघे तसा वनमाळी.
जनलोचननलिनांतें विकसित करि शोकघनतमोमलिनांतें. ८
उरवी शोक न कांहीं दिव्यस्रग्गंधवस्त्रमणिकनकांहीं[11].
मंडित रामानुजनी[12] तापतमोहर[13] शशी खरा मानुं जनीं. ९

---

१. चालणारा विषवृक्ष [च] असा चावरा कालिय सर्प. २. पंखांच्या वाऱ्याच्या वेगानें. ३. शत्रूला. ४. पक्ष्यास, गरुडास. ५. याचा कर्ता 'गरुड.' ६. [गरुडानें हरण करून नेलेला जो] मोठा मासा त्याच्या शोकानें व्याकुल व दीन अशा [इतर] जलचरांस. ७. पक्षिश्रेष्ठ गरुडास. ८. येथील. ९. कृष्णाच्या चरणकमलांची मुद्रा. १०. सूर्य. ११. तेजस्वी माला, गंध, वस्त्र, सुवर्ण यांहीं. १२. बळरामाचा कनिष्ठ बंधु कृष्ण. १३. संतापरूप अंधकार नाहींसा करणारा किंवा संताप आणि [अज्ञानरूप] अंधकार हरण करणारा.

कृष्णाचीं प्रिय मित्रें प्रथम गळां घालिती मिठी सुपवित्रें;
धरिती कडकडुनि भुजीं. यांच्या भाग्या असी त्रिलोकीं न दुजीं. १०
धरि हृदयींच यशोदा या सुखदा नंद, रोहिणी हि यशोदा.
गोपी सर्व[1] सैदिष्टा आलिंगिति या स्तनो[2]पपीड [3]सैदिष्टा. ११
भेटे भावा [4]सैबळ प्रेमानें जाणता प्रभावास बळ.
हांसे सानंदमनें, कीं केला धन्य बंधु कालिय दमनें. १२
व्रजलोका सकळांतें मूर्तप्राणा[5]मलाभ हा विकळांतें.
गोवृषवत्सद्रुम ही सुखनिर्भर; सर्व पावली मोद मही. १३
द्विज वदति, 'तुला नंदा! जाला सुतलाभ; पात्र अतुलानंदा.
तूं कांचनगोदानें तीर्थी पुत्रोदयार्थ दे मोदानें.' १४
सविधि तयां तो दानें दे गोस्वर्णादि पूजुनी मोदानें.
नमि किंकरसा नंद द्विजवृंदा जोडुनि स्वकर सानंद. १५
पुरुषोत्तम हा [6]भोगा आला जिस सुतपणें असि महाभागा,
आलिंगी सूनुस ती [7]करुणा [8]तन्मुखसुधापिपासू जुसती. १६
अंकीं बैसवि मोक्षप्रद हा, करि तच्छिरीं चि [9]अश्रुविमोक्ष;
[10]सुपयोवाहस्तन यावारि सोडिति, सुखद लागतां हस्त, [11]नया. १७
जाली होती रजनी; धरिलें तें वसतिला नदीतीर जनीं;
तों पेटे शुष्कवनीं वह्नि, जसा दोष तापकर दुष्कवनीं. १८
प्रळयाग्निसम ग्रासी वन, दे लोकासि त्या भय समग्रासी;
करि [12]दैव भस्म यदा, वी ज्वाळा [13]स्वाहासुवल्लभ, [14]स्मय दावी. १९
ज्याचें स्मरण हरीतें भवयय, गेले तया चि शरण हरीतें.

---

१. सर्वांना प्रियकर अशा कृष्णास. २. [ ज्या आलिंगनामध्यें ] स्तन मर्दिले जात आहेत अशा रीतीनें. ( हें क्रियाविशेषण ). ३. चांगली ( पवित्र ) वासना ज्यांची अशा गोपी. ४. गाढ, दृढ [ भेटे ]. ५. मूर्तिमंत प्राणलाभ. ६. वाटणीला. ७. करुणावती, सदय. ८. त्याचें मुख हें च अमृत त्याविषयीं तृषित. ९. अश्रु ढाळणें. १०. चांगलें दूध आहे ज्यांत असे स्तन. ११. नद्या. १२. दावाग्नि, वणवा. १३. स्वाहापति, अग्नि. १४. गर्व.

पाहुनि लोक विकळ ते, जनरक्षेची तयांत दाखवि कैळ ते. २०
जाळिल सर्वां सहित; प्रभु कृष्ण दयापयोद सर्वांस हित,
निजजन रक्षायास ज्वलना पी; दे करूं न रक्षा यास. २१
ऐसा तो जयशाळी वनमाळी सैद्धृदंबुरुहकोशाळी
ये सदनास सकाळीं, घालुनियां सर्व आप्तवर्ग सुकाळीं. २२

---

# अध्याय अठरावा.

गुण हरिबळदेवाचे वर्णाया, तद्या चि बळ दे वाचे.
करिती बाळक लीला वृंदावनिं, त्या चि होति काळ कलीला. १
वाजविती मुरलीला, गाती, नाचति; विलोकिती सुर लीला.
गडि होउनि निर्वाणप्रददेवांस प्रशंसिती गीर्वाण. २
त्या शुद्धसुकृतजळधिप्रभुमित्रांत प्रलंबनामक मळधी
ये गोपच्छद्मानें; खळ ओळखिला मनीं रमासद्मानें; ३
द्वेष मनीं पर वाहे, जगदीश्वर हा धरी च ना परवा हे.
मांडी खेळा; याला वंचाया लागला चि खेळायाला. ४
कृष्ण म्हणे, 'परिसा रे! दों ठायीं होउनीं अशेपरि सारे
खेळों; येथूनि वडापर्यंत पराजितें वहावें; निवडों'. ५
जाले शिशु दों भागीं, प्रभु केले रामकृष्ण सुमहाभागीं.
होउनि घोडा, बाला वाहे त्या, लावि यास जो डावाला. ६
ऐशी करिती क्रीडा, तें सुख पाहोनि मुक्ति हि धरि व्रीडा.
भवगदविपदगद गदाधर बळ हांसोनि हांसविति हि गदगदा. ७
श्रीदामा, वृषभ, असे संवगडि तिकडे, गणांत ज्या राम असे.
हे विजयासि लेहाती, तैं पृष्ठीं माधवादि त्यांसि वहाती. ८

---

१. आस्था. २. साधुहृदयरूप कमलाच्या कळींतील भ्रमर. ३. मोक्ष-देणाऱ्या देवांस. ४. शुद्ध सुकृताचे समुद्र च असे जे प्रभूचे मित्र त्यांत. ५. गोपवेषें. ६. रमानाथ कृष्णानें. ७. [ गड्यांची ] वाटणी करा. ८. संसाररूप रोगाच्या विपत्तीस दूर करणारें औषध च असे. ९. मिळविती, प्राप्त होती.

त्या बाळांपरि भूतप्रभव[1] हि खेळांत जाहला परिभूत.
लागे त्या श्रीदा मानाथा पृष्टीं च वाहणें श्रीदामा. ९
जो प्रिय सात्वतऋषभा[2] वाहे तो भद्रसेन पृष्टीं वृषभा.
असुर सबळ देवातें घे निजपृष्टीं प्रलंब बळदेवातें. १०
असुर पराजित वाहे रामा, नेणति हरीविणें कितवा हे.
आला बळ हातातें स्वांतांत म्हणे, 'करीन' खळ, 'घातातें'. ११
क्षुधित श्वा चिर सैरसक्रव्येच्छू[3] लोहगोळका चि रसरस
करित्या घे तो कैंबळ[4] स्वांत; तसा यास रोहिणीतोकंबळ[5]. १२
त्या सुरवर्या देहिध्येया[6] घेउनि, वटागमर्यादे[7] ही
लंघुनि, घोटकरीन[8] क्षिप्र पळे कीं, 'तदस्र घोट करीन'. १३
स्वमतें न कळत हारिला, चोरें निधिसा, बळ प्रलंबें हारिला.
जन्हि काढी पळ, वेची बळभर[10] बळभर[11]; खळा न बहु पळवे चि. १४
प्रकटि खेरा[12] रूपा, पी जें गगनाला, असें शैरारू[13] पापी.
लाजे काजळ काया; गिरि उपमा मूर्तपातका जळका या. १५
जेंवि तमोनग[14] नीच स्वर्णालंकारधर भरे गगनीं च,
सतडिन्मेघाउपरी[15] चंद्र जसा, राम शोभला त्याचिपरी. १६
ऐसें जगदभिरामा उडउनि जेव्हां प्रलंब ने नभिं रामा,
करुनि निरीक्षण कायक्रौर्यातें[16], बळ हि भय धरी क्षण काय! १७
बळ त्या शत्रुशिरासी निजमुष्टीनें, न लावितां उशिरासी,
फोडि, जसा शिखरीला वज्रें हरि; काय भूतळीं विखरीला. १८

---

१. प्राणिमात्रांची उत्पत्ति ज्यापासून तो. २. यादवाधिपास. ३. रसभरित मांसाची इच्छा ज्यास. ४. आपला नाश करणारा ग्रास. ५. रोहिणीचा मुलगा बळराम. ६. मानवानीं ध्यान करण्यास योग्य. ७. वटवृक्षमर्यादेस. ८. अश्व आणि हत्ती यांत श्रेष्ठ. (वेगाविषयीं व शक्तीविषयीं). ९. त्याचें रक्त. १०. बळरामाचें वजन. ११. [त्या राक्षसाची] अधिक शक्ति. १२. उग्र–**पंत.** १३. घातुकः–**पंत.** १४. अंधाराचा पर्वत. १५. सविद्युत् मेघावर. १६. शरीराच्या क्रूरतेस.

मारुनि खळ, देवांतें, गोपांतें, सुखवि; ते हि बळदेवातें.
गाजविति समस्त वनें जयजयनादें पयोधरसम स्तवनें. १९
देवनिवह[1] रामाला दिव्यसुमांच्या निजाहितहरा माला
अर्पिति, कीं हरसा च द्युतिकीर्तिबळें अमर्त्यारिपुहर[2] साच. २०
आलिंगुनि बळभद्र प्रियसख वदती, 'तुज्या भुजीं बळ भद्र
वर्धिष्णु महाबाहो! राहो; ऐसा चि विजय सुमहा बा! हो.' २१

---

# अध्याय एकोणिसावा.

गोपशिशूंचा विसर[3] क्रीडा करि, तों पडे पशूंचा विसर;
नवयवसीं ज्यांशि रती, मुंजारण्यांत[4] गोधनें त्या शिरती. १
भ्याले बाळक सारे म्हणती, 'आला स्वघातकाळ कसा रे!?'
हुडकिति, धांवति मागें, कष्टें निजगोधनासि पावति मागें[5]. २
तृषितशिशुमुखें सुकलीं, वळिलीं निजगोधनें वनीं जीं चुकलीं.
हरिशब्दें[6] हंबरती, गोधनसेना स्वरें भरी अंबर ती. ३
कठिन फिराया गहन; ग्रास कराया अशांत आला दहन,
त्या पवमान सहाय; त्रस्तपशुप म्हणति मृदुलमानस, 'हाय!' ४
म्हणती गोप, 'हरि! लया पावतसों; तुजविणें दुजा न हरिल या.
आला कीं अंत, रतिप्रदपद[7] रामा! तुझे अहा! अंतरती. ५
हीं[8] आज न रक्षा हो शरणागतदीनदासजन; रक्षा हो!
वांचेल कवण बा!? हा! कल्पांताग्नीस पाडि[9] ठकें[10] वणवा हीं[10].' ६
मुंजवनानलदर हीं[11] जाणोनि म्हणे, 'उगे' दयाजलद[11], 'रहा;
झांका रे! नयनां; हीं रक्षितसें गोधनें; तुम्हां भय नाहीं.' ७
झांकी जन नेत्रास; क्षणमात्रें तो लया अजन[12] ने त्रास.

---

१. देवसमूह. २. असुरनाशक. ३. समूह. ४. मुंजनामक गवताच्या अरण्यांत. ५. माग लावून. ६. कृष्णाच्या शब्दानें. ७. आनंददायक चरण. ८. हे आम्ही दासजन. ९. पराभूत करी. १०. हा ठक वणवा. ११. हा दयामेघ. १२. जन्मरहित असा.

पी भगवान् कृष्णपथा[1]; न विनाशति लागले[2] भले कृष्णपंथा[3]. ८
काळ भयानक दापी न हरिजना; विषय दे भया न कदापि,
घे घनवात[4] कवि तुळे[5], हरिच्या स्मरणीं भवादिघातक वितुळे. ९
उघडुनियां नयनातें भांडीरवटा[6]प्रती निजानयनातें[7]
जाणुनि, हांसति चित्रें[8] मित्रें; जाली तटस्थ; भासति चित्रें. १०
ताप हरि अमृतगुरुचि[9] क्षणभरि; तापघ्न तरि हरि अमृतगुरु[10] चि.
त्याचा, तापा, दास प्राप्त कसा होय, सेविता पादास? ११
रक्षुनियां हा निकर[11], स्वविरहताप व्रजाबळाहानिकर[12],
जाउनि सांजे हरिला जीवनदत्वें[13] घनत्व साजे हरिला. १२
सांगति ते शिशु भवनीं, ‘बळकृष्णीं आजि नाशिलें अशुभ वनीं;
न तसा यम, रावण वा, उग्र[14] असा असुर एक[15], दुसरा वणवा. १३
हा निरवधिबळ[16] देवप्रवर पळामाजि असुर वधि बळदेव,
कृष्णें जीवनदानें वांचविले दहनिं सर्व जीवनदानें[17].’ १४
ऐसा निजतोकानीं कथिला वृत्तांत; ऐकुनीं तो कानीं,
देवप्रवर वसुमतीवारि[18], हें समजति सदारबल्लव सुमती. १५

---

१. अग्नीला. २. लागलेले. ३. भगवद्भक्तीला. ४. प्रचंड वारा. ५. उपमेला. ६. वटविशेष. (हा पूर्वी खेळांत मर्यादा केला होता). ७. आपल्या आणण्याला. ८. चमत्कारिक. ९. अमृतकिरण चंद्राची रुचि (कांति). (गो=किरण). १०. मोक्षस्वामी, किंवा अमृतापेक्षां [हि] श्रेष्ठ. चंद्र किंवा अमृत हीं क्षणभर ताप हरण करितात आणि हा अखंड ताप दूर करितो. अर्थात् अमृतादींपेक्षां हा श्रेष्ठ. ११. समुदाय. १२. गोकुळांतील स्त्रियांस दुःख देणारा. १३. जीवन दिल्यानें. (‘जीवन’ शब्द श्लिष्ट आहे. जीवन=पाणी व जीव). १४. मूळ पाठ—**एक.** १५. मूळ पाठ—**आणि.** १६. अमर्याद बळ ज्याचें. १७. उदक देऊन. १८. पृथ्वीवर.

# अध्याय विसावा.

बळ कृष्ण उदारमती घनकाळीं[1] ही वनांत चि सदा रमती.
होतां वृष्टि उभविती वृक्षकोडीं[2]; गुहांत सुख अनुभविती. १
हरिनें धेनु वळाव्या शब्दें, त्या जवळुनीं न दूर ढळाव्या.
स्रवती त्या बृहदूधें[3] ऐकुनियां वेणुरव सुखावह दूधें. २
वदनीं[4] शशिरुचिरानीं प्रभु घेती कंदमूळफळरुचि रानीं,
सेविति दधिभात शिळा, गोपांसह ते करूनियां ताट शिळा. ३

---

# अध्याय एकविसावा.

होतां शरदागम, जे दावि वनश्री नटोनि वरदा गमजे[5],
ते कां पाहे नाकाधीशवनी[6]? वर्णितां न वाहे नाका[7]. १
तो बहु दे कुतुक; मळें रहित[8] जळीं विकासितें करी ऋतु कमळें;
तीं चषकें[9] चि मधुरसें भरि; सेउनि गाति मधुप फार मधुरसें[10]. २
शीतसुरभिसुख[11] रानीं मारुत, अळिनीं[12] विनादितीं[13] मुखरानीं[13].
फळदळकुसुमें ऋतु जीं सजि[14] विपिनें म्हणति, 'लघु वनें मेरु! तुजीं.' ३
अद्भुत परिमल याचा; विभव[15] उणा चंदनाढ्य[16] परि मलयाचा[17].
कीं तेथें अहि तरती[18] येथें नाहीं च सर्वथा अहितगती[19]. ४
कुसुमितवनमधुपानीं[20] मदमत्तानीं अनेकखगमधुपानीं[21]
अद्रिसरोवरसरिता, नादित. राखे न ठाव गीतरसें[22] रिता[23]. ५

---

१. पावसाळ्यामध्यें. २. झाडाच्या खालीं. ३. मोठ्या कासेनें. ४. चंद्राप्रमाणें सुंदर मुखानीं. ५. डौल, हावभाव. ६. स्वर्गाधिपति इंद्राचें नंदनवन. ७. नाका न वाहे (लाजेनें मान खालीं करून नाक वर न दाखवी, हा भाव). ८. निर्मळ जलामध्यें. ९. पेले, पात्रें. १०. गोड. ११. शीतल, सुगंधी [म्हणून] सुखकर. १२. गुंजारव करणाऱ्या भ्रमरानीं. १३. शब्दित अशा रानीं. १४. भूषवी. १५. ऐश्वर्य. १६. चंदनवृक्षानीं भरलेला. १७. मलयपर्वताचा. १८. टिकतात, राहतात. १९. दुष्टाना थारा. २०. प्रफुल्ल वनांतील मधुपान करून मदमत्त झालेले जे. २१. अनेक पक्षी व भ्रमर यांहींकरून. २२. गायनरस. २३. रिकामी.

सबळ कमलनाभ वनीं, त्या [1]रतलीलोत्कदेवललना भवनीं;
ने चाराया सु[2]रभी, जो भगवान् विश्व[3]पावनयशें [4]सुरभी. ६
वाजवि माधव मुरली, विश्वमनोवृत्ति ऐकतां रव मु[5]रली.
व्रजयुवति भुलति काया [6]स्तंभ पडे; कल्पवृक्ष विभु, लतिका या. ७
[7]नटपतिसम [8]जगदर्ह [9]श्रुतियुगुळीं कर्णिकारें[10], धरि शिरिं [11]बर्हें,
स्वर्णवसन, वनमाळा; वाजवि वेणू; सवें सख्यांचा पाळा. ८
[12]हृद्यविलोकन, [13]कपटप्राकृत, [14]कृतिमृग्य, विधिगुरू, कनकपट,
तो व्रजराज नटपती देखाया सर्व गोपिकाजन टपती. ९
वेणु मधुरतर वाजे वनिं; मोहे युवति, पी [15]तदमृतरवा जे.
[16]हृदयसरीं [17]मदनकरी [18]धृतिनलिलोद्धृतिस उशिर उन्मद न करी. १०
वृंदावनिं तारी ती वर्णिति हरि वेणुची च वनिता रीती.
गाउनि देवास, 'रहा विरहा!' म्हणती, 'उगा;' क्रमिति वासर हा. ११

---

# अध्याय बाविसावा.

हेमंतीं सुकुमारी [19]कात्यायन्यर्चनव्रतासि कुमारी
करिती, 'कृष्ण निजपती हो' या कामें; सतीस पूजुनि, [20]जपती. १
यमुनेच्या चि [21]शुभवनीं न्हाती, जों सुप्त गोपगोशिशु भवनीं.
मूर्ति रुचिर [22]सिकतेची अर्चिति; मनिं हरिचिया [23]रुचि रसिकतेची. २

---

१. सुरतक्रीडेविषयीं उत्कंठित अशा देवस्त्रिया. २. गाई. ३. जगपावन अशा यशानें. ४. सुंदर. ५. रंगून गेली. ६. ताठ. ७. प्रौढ नटासारिखा. ८. जगत्पूज्य. ९. कर्ण. १०. पुष्पविशेष. ११. [मोर-] पिसें. १२. मनोहर अवलोकन. १३. मायामनुजः—**पंत** १४. चतुरानीं शोधण्यास योग्य. १५. त्या [वेणूच्या] अमृततुल्य ध्वनीस. १६. हृदयरूप सरोवरामध्यें. १७. मदन हा च कोणी उन्मत्त हत्ती. १८. धैर्यरूप कमलिनीला वर उपटून काढण्यास. १९. पार्वतीच्या पूजारूप व्रताला. २०. जप करिती. २१. पवित्र जलांत. २२. वाळूची. २३. आवड.

त्या सुनियमपर मासव्रत करिती, चिंतुनीं सतत परमास[1].
म्हणती, 'अभिनव राहो प्रेम जननि ! हरि यशःसुरभि[2] नवरा हो.' ३
त्या युवतिजनिं, सकाळीं स्नानें करितां, क्रमूनि रजनिस, काळीं[3]
जाणुनि भक्ति, वरद ये ससख; तयांवरि करी विमुक्तिवर[4] दये. ४
खेळति जळिं; हरिसि च या गाति; अशांत चि तटींचिया हरि[5] सिचया[6].
समधिष्ठुनि नीपें[7], गडी हांसवि; हांसे स्वयें फिरउनीं पगडी. ५
हरि तद्धृदया; गेयां[8] लीला करि; त्यां म्हणे वरद, 'या गे ! या;
घ्या सुमुखि ! संपदि[9] वसन; प्रकटी जों रूप तामरसप[10] दिवस न. ६
यमुनेचा सहवास त्यागा, घ्या एकएक वा संह[11] वास[12].
नर्म[13] न हें, अनृत हि मीं न वदें, व्रतकर्शिता तुम्हीं प्रसृत[14] हिमीं[14].' ७
ऐकुनि यापरि हांसप्रेमव्रीडाकुळाबळा[15] परिहास,
निघति, न वसति; हिवाळा बहु; त्या उठती, जळीं न वसति हि बाळा. ८
प्रभुसि म्हणति धन्या या, 'न करीं, वसनें हरूनि, हरि ! अन्याया,
जाणों, तुज[16], सानंद व्रज मानी श्लाघ्य तूं बहु जसा नंद[16]. ९
तूं प्रिय, सदय हि मानें श्रेष्ठ हि; कांपे जळांत हृदय हिमानें.
अबळांस वसनदानें रक्षावें त्वां दयामृतरसनदानें. १०
हे श्यामा ! रमणीया ! त्वँदुदित[17] करूं, दासिका तुझ्या रमणी या.
धर्मज्ञा ! दे वास; स्पष्ट, न देतां कथूं धरादेवास[18].' ११
देव वदे प्रमदांसी, 'वचनातें करितसा जरी मम दासी !
सत्वर कूळांसि[19] च या; मागुनियां घ्या मनोनुकूळा[20] सिचया[6].' १२

---

१. श्रेष्ठ कृष्णास. २. कीर्तिमनोहर. ३. योग्य वेळीं. ४. मुक्तिपति भगवान कृष्ण. ५. हरण करी. ६. वस्त्रा. ७. वृक्षविशेष. ८. गाण्यासारख्या. ९. तत्काळ. १०. कमलपोषक सूर्य. ११. एकत्र. १२. वस्त्र. १३. थट्टा. १४. पसरलेल्या थंडींत. १५. हास्य, प्रेम व लज्जा यानीं व्याकुळ झालेल्या अशा स्त्रिया. १६. अन्वयार्थः— जसा नंद बहु श्लाघ्य तसा तूं [ असें ] व्रज तुज सानंद ( आनंदानें ) मानी. १७. त्वां सांगितलेलें. १८. भूपति नंदास. १९. तीराला. २० मनास आवडेल त्या.

वेधी हरि हि मन; दिला वचनाला मान, धैर्य [1]हरि हिमनादिला
सोडिति; कांपति; लाजे त्यजिति; [2]नको ते धरावि कां पतिला [2]जे? १३
नुरवि मनीं पापासी जो हरि, [3]तत्पादपूतनीपापासीं
येती सुदति, [4]शयानीं [5]स्मरगृह झांकुनि, तटासि मुदतिशयानीं. १४
निर्मळ भाव सतींचा देखे हरि [6]सुकृतसुगुणभावसतींचा;
प्रीत परात्पर [7]महितँ [8]स्कंधनिहितवस्त्र तो वदे परमहित. १५
वदतो [9]सस्मितलपनें, 'तीर्थीं[10] केलीं व्रतीं [11]विवसनस्नपनें;
करुनि अशा [12]परमागा देवांच्या, मागती कशा वर [13]मांगा? १६
हो व्याकुळ न मन; करा जोडुनि अंजळि शिरीं धरा; नमन करा.
येणें पाप सरेल, व्रतफळसंसिद्धिची कृपा पसरेल.' १७
'चुकलों वाटेला,' जे व्रतविच्युति ते खरी च वाटे लाजे
विसरुनि, नमिति हरिस; त्या जाणति कीं, हा चि सर्व दोष हरि सत्या.
[14]सर्वजगद्भावन तीं स्त्रींची सकरुण विलोकि [15]सद्भावनती,
[16]स्वाधिगमायासवती गौरवि; कीं श्रीस ही गमाया सवती. १९
[17]रक्तासितसितहरितें वस्त्रें, नेसुनि [18]सकामविलसित, हरितें
पाहति, [19]निरुपमनियती; चिंतिति [20]यच्चरण देवतरुप मानें यती. २०
जे मनिं, दे वर ते हा; 'सत्वर चि,' म्हणे 'पुरेल,' देव, 'रते[21]हा.
ये त्या रजनीमाजी संगति पावाल सादर जनीं माजी.' २१

---

१. हरण करी. २. पतीला ( कृष्णाला ) नको असलेली लाज स्त्रियानीं कां धरावी ? ३. त्याच्या पायानें पवित्र झालेल्या कदंबवृक्षाजवळ. ४. हातानीं. ५. जननेंद्रिय. ६. पुण्य, सद्गुण आणि कांति यांचीं राहण्याचीं स्थळें अशा सतींचा. ७. पूजित. ८. खांद्यावर ज्यानें वस्त्रें ठेविलीं आहेत. ९. सहास्य मुखानें. १०. तीर्थोदकीं. ११. नग्नस्नानें. १२. परम अपराधा. १३. मागतां [ मागा ]. १४. सर्वजगदुत्पादक. १५. सद्भावयुक्त नमस्कार. १६. आपल्या प्राप्तीकरितां आयास करणाऱ्या. १७. तांबडीं, काळीं, शुभ्र आणि हिरवीं. १८. मदनचेष्टायुक्त. १९. ज्यांच्या दैवास उपमा नाहीं अशा. २०. कल्पवृक्षापेक्षां श्रेष्ठ ज्याचे ( कृष्णाचे ) चरण. २१. सुरताची इच्छा.

करि कुतुका मदनारिप्रियगुण[1]; तोषवि समस्तकामद[2] नारी.
हरिविण गणिति व्रज न प्रियतमवचनें[3] परंतु करिति व्रजन[4]. २२
वारूनि महागायी स्त्रीकामांची[5], सदिष्टतम[6] हा गायी[7].
चारित गेला वृंदाविपिनाहुनि दूर सबळ हारि गोवृंदा. २३
तारी दीन गजा[8], ती सुखमूर्ति स्तवि पदोपदीं नगजाती.
न[9] करिति अन्यायांसी उपकृतिची जोडि; कीं न अन्या यांसि. २४
स्वसुखाची सवगायी[10] करित वनीं, गोपवृंदवासव[11] गायी
ने यमुने यदुप रमापति; कीं करणार यज्विमद[12] तदुपरमा. २५
करिति नमन दिसलीला[13], पीति सगोधन सुधोपम नदीसलिला.
सोडिति पशु तदुपवनीं, बसति तटीं; सुखद जें सुरभिमृदुपवनीं[14]. २६

---

# अध्याय तेविसावा.

गोपांचा भूक बळा[15] लागे. मग विनविले स्वयंभू[16] कबळा[17].
येति दयोदधिभक्त[18] प्रातःकाळीं, न आणितां दधिभक्त. १
निजजन अन्नपर[19] महा, जाणे, द्विजदारें[20] सुप्रसन्न परम, हा.
क्षुद्बाधा सकळ बळा मित्रांच्या; ये दयांबुधीस कळवळा. २
हारि जो दासत्रास, प्रभु धाडी गोप ते तदा सत्रास.

---

१. शंकरप्रिय गुण ज्याचे. २. सर्व इच्छा पूर्ण करणारा. ३. परमप्रिय श्रीकृष्णाच्या सांगण्यावरून. ४. गमन. ५. स्त्रियांच्या अभिलाषांची कमताई. ६. सज्जनांस अत्यंत प्रियतम. ७. गायन करी. ८. गजेंद्रास. ९. [ हे वृक्षसमूह ] अन्यायांसि न करिति, कीं ( आणि ) यांसी [ जी ] उपकृतीची जोडि [ ती ] अन्या न. १०. स्वस्तता. ११. गोपसमूहाचा इन्द्र ( कृष्ण ). १२. यज्ञ करणाऱ्यांचा गर्व. १३. दृष्टीस पडलेल्या ( यमुनेस ). १४. सुगंध मंद वाऱ्यानीं. १५. समूहास. १६. बळराम आणि कृष्ण. १७. [ अन्न- ] ग्रासासाठीं. १८. दयासागर कृष्णाचे भक्त. १९. अन्नाविषयीं आतुर. २०. ब्राह्मणस्त्रिया.

चिंतुनि नाकजय, जनीं जवळि सुरांच्या चि निरत सुद्विज येजनीं[2]! ३
सांगे तो, 'यजन मुनी करिति सुरांचें; तदंघ्रितोयज[3] नमुनीं,
आर्यांच्या[4] मागोनी; मन्नाम कथूनि, अन्न घ्या मागोनीं. ४
निजलोकास त्राते करिती, आंगिरसनामका सत्रा ते.
जवळि सदा सवशाला[5] जा' हें कथि त्या जना पदास वशाला. ५
गेले तोकमृग[6] जळा धावुनि विषयेच्छुविप्रलोकमृगजळा.
न हरी ताप सभा[8] जी, त्यांची बरवी दुरूनि तापसभा[9] जी! ६
ते मूक बधिर अंध; श्रीशा अमृतप्रदा[10] न अर्पिति अंध[11].
आले परतोनी च. श्रुतमहिमा द्विजसमूह; पर[12] तो नीच. ७
श्रमले परिजन; [13]रीती यात्रा जाली[13]; मुकुंद पारि जनरीती
सांगे, 'श्रुतिवादिसती[14] प्रार्थी, न तुला तदाशभावा[15] दिसती.' ८
"होउनि सन्नत याच्या साध्वीजन, वृत्ति सुप्रसन्न तयाच्या.
भेटीचा मनिं काम, स्वन्न समर्पिल सुबुद्धिधाम निकाम[16]. ९
'आलों रामासहित' श्रवणें वाटेल विप्ररामास[17] हित.
धृतिच्या आया, सरिता करुणेच्या, न करितील आयास रिता." १०
नाशक जो आशिवाचा, त्याची ऐकोनि गोप ते आशि वाचा,
त्यांच्या स्वपदीं[18] नमनें, पत्नीशाळेंत करिति मुदधीन[19] मनें. ११
म्हणती, 'देवि! भुकेले, आले श्रुत रामकृष्ण जे विभु केले.
अन्नें द्या अशनीं[20] या सानुचरा प्रभुस; शांतवा अशनाया[21]. १२
मतिस विभू दे वसती स्वपदिं नताच्या, तयास भूदेवसती,

---

१. स्वर्गप्राप्ति. २. पूजेमध्यें. ३. तत्पादकमल. ४. बळरामाच्या. ५. यज्ञशाला. ६. बाळ ( गोप ) रूपी मृग. ७. वैषयिक अशा ब्राह्मणांच्या समुदायरूप मृगजळाकडे. ८. समुदाय. ९. तपस्व्याची कांति. १०. मोक्ष देणाऱ्या. ११. अन्न. १२. परंतु. १३. यात्रा रीती ( रिती ) जाली=जाणें फुकट झालें. १४. वैदिक ब्राह्मणांच्या स्त्रियाना. १५. त्या ब्राह्मणस्त्रियांच्या हितकर [ अशा ] अभिप्रायास. १६. अत्यंत. १७. विप्रस्त्रियांस. १८. [ ब्राह्मणस्त्रियांच्या ] चरणीं. येथील "स्व" निरर्थक आहे. १९. आनंदित चित्तानें. २०. खाण्याकरितां. २१. भूक.

सुखनिर्भर[1], परिसोनीं होती, पावोनि अधनें[2] ज्यापरि सोनीं[3]. १३
त्यजिति तदा सवशाला, हरिला देखावया स्वदासवशाला
त्या प्रभुभक्तिरुचिरसें[4] निघती घेउनि चतुर्विधान्न[5] रुचिरसें. १४
न रुचे धामें[6]; निकाम प्राशावी श्रीशनखसुधा[7] मनिं काम
बहु बहु वासरें[8]; हा ती वेळा, मग भिवुनि कां भवास रहाती? १५
गुरु बांधव पति तानीं बाळें या जरि निवारिल्या पतितानीं,
सरिता पारावारा[9] जाति; सुदुर्धर चि जेंवि पारा, वारा. १६
लंघुनियां बंधु[10] कडे[10] गेल्या प्रेमापगा[11] स्वसुखसिंधुकडे;
कोण्हीं परि वाराया न शकति, सोडूनि जाति परिवारा[12] या. १७
यमुनोपवनीं महिलों[13] शोभवि, त्या पाहती मुनींच्या महिलों[14].
अद्भुतरूप मन हरी, सर्वामृतफलद सुरतरूपम न हरी. १८
श्याम भुवनवनमाळी[15] पल्लवशिखिपिच्छधातुनीं[16], वनमाळी,
कनकांबर नटला. जे शोभा याची, तिला मदननट लाजे. १९
मुख रुचिर सदलकांहीं[17]; नयन तुळे ये न तामरसदल[18] कांहीं.
श्रवणीं उत्पल[19] विलसे; ताप न ते जे स्मितामृत न पळविलसे[20]. २०
सुहृदंसीं[21] भुज, गाभा नीलद्युतिचा[22], तया महाभुजगाभा[23],
ठेउनि हरि शोकमळा त्या दक्षें[24] फिरवि देववर तो कमळा. २१
पाहुनि सुभग असा, यीं मधुपी[25] इच्छिति पदांबुजीं च असाया,
हृदयीं आणुनि कामप्रदमूर्तिस, भेटती सुबुद्धि निकाम. २२

---

१. सुखपूर्ण. २. दरिद्री. ३. सुवर्ण. ४. ईश्वरभक्तीची जी गोडी तद्रूप रसानें. ५. चार प्रकारचें अन्न—खाद्य, लेह्य, चोष्य आणि पेय. ६. घर. ७. कृष्णनखाचें अमृत. ८. दिवस. ९. समुद्रा. १०. बंधुरूप कडे. ११. प्रेमनद्या. १२. आप्तेष्टसमूहास. १३. पृथ्वीला. १४. स्त्रिया. १५. जगरूप वनांतील माळी. १६. वृक्षपल्लव, मयूरपिच्छ, आणि [गैरिकादि—काव वगैरे] धातूनीं. १७. चांगल्या केसानीं. १८. कमलपत्र. १९. कमल. २०. हास्यामृत पळवणार नाहीं असे ताप च नाहींत. २१. मित्रस्कंधीं. २२. कृष्णकांतीचा. २३. महासर्पासारखा. २४. उजव्या हातानें. २५. विप्रस्त्रियारूपी भ्रमरी.

चेतोहर[1]सुखकायब्रह्मप्रेक्षणज बोलवे सुख काय?
न धरी चलन वपु, तळ्यां[2] अमृताच्या पिउनि, दिसाति अभिनव पुतळ्या.
बोले हरि, 'या हो! या; आलां माझ्या हि मोद हृदया होया[3].
बरवें केलें येणें, मज देखायासि मन भुकेलें येणें. २४
मीं आत्मा प्रिय समजे ऐसें ज्यांला, सुशीळ, सत्क्रिय, सम[4] जे,
ते च्चि कुशळ साच; रती धरुनीं मद्भक्ति[5] मत्फळा आचरती. २५
देहप्राणमनमतीस्वजनस्त्रीसुतधनादि ही प्रिय गमती
संपर्कास्तव लोका ज्याच्या[6], प्रिय कोण त्याविणें, अवलोका. २६
जा, सेवा सवबाट[7] प्रेक्षिति[8] भागार्थि[9] देव वासव वाट.
संपवितिल सत्रास स्वर्गेच्छु पती तुम्हांसह; न[10] सत्रास.' २७
ऐकुनियां असि वाणी, लागे हृदया स्त्रियांचिया असिवाणी[11].
म्हणति, 'असें न वद, मना परुष[12] गमे दीनवत्सळा! भवदमना! २८
रक्षीं निजनिगमातें[13]; आम्हां करवे न येथुनी जनिं गमातें[14].
विरहज्वरदढकलिलस्वांतातें[15] सदय पाय काय ढकलिल? २९
दासी प्राप्ता सहसा टाकुनि, म्हणतोसि काय आम्हांस 'हसा'?
करिं वाचा सत्य जुनी; आलों स्वजनत्रपाभयास त्यजुनी. ३०
पतिपितृजन ही नाहीं आश्रय देणार सर्वजनहीनांहीं[16];
आम्हीं तारि हरि! काय स्वगति[17] किजे, जीव जरि न परिहारि[18] काय[19]? ३१
तुलसी[20] दाम तुडविलें, निर्माल्य पदें अनादरें हि उडविलें,

---

१. मनोहर मुख [ व इतर ] अवयव ज्याचें असें ब्रह्मस्वरूप कृष्णरूप पाहून उत्पन्न झालेलें. २. सरोवरास. ३. होण्यासाठीं. ४. पक्षरहित बुद्धीचे. ५. माझी प्राप्ति हेंच फल जिचें अशी माझी भक्ति. ६. ज्या कृष्णपरमात्म्याच्या. ७. यज्ञमंडप. ८. वाट पहात आहे. ९. [ आपापले ] भागाची इच्छा करणारे. १०. त्रासयुक्त नाहींत असे (पति). ११. खड्गासारखी. १२. कठोर. १३. आपल्या बेदवाणीतें. ("न मे भक्तः प्रणश्यति" इत्येवंरूपा स्वप्रतिज्ञा). १४. गमनातें. १५. विरहरूप ज्वरानें क्षुब्ध झालेल्या अंतःकरणातें. १६. सर्व जनांनीं परित्यक्त अशा आम्हीं. १७. आपला विचार करावा. १८. सोडी. १९. देह. २०. तुलसीमाला.

धरूं दासि शिरावारि तें; तापाकुळमन [1]तया [1]सुशिशिरा वारितें.' ३२
बोले दीनप हा, ती काकुळती परिसुनीं, '[2]पदीं न [2]पहाती,
[3]अघदृष्टि पति तनय न स्तवितिल जे [4]अन्यें लोक हि पतितनयनें. ३३
तुंम्हीं सुकृतनदि सती; अनुमोदिति हे पहा अमरजन, [5]दिसंती.
संतत बहुधा माजा ध्यास असों द्या मनासि बहु; धामा जा. ३४
स्वसुखा, स्नेहाला वा न समृद्धी [6]अंगसंग दे हा; लावा
मद्रूपीं मन; या हो! पावा लौकरि [7]सुखाब्धिधाम [8]नया हो!' ३५
अत्युत्सव वाटाया पत्यादि जनासि, जाति सववाटा या.
न मनुनि अपराध वदे 'प्रिय आलिंगन' गणूनि [9]अपरा धव 'दे.' ३६
रत निजमहिला भजनीं हरिच्या, येणें [10]गतश्रम हि [10]लाभ जनीं
मानुनि मुनि अतितर, ते जाले अनुतप्त [11]भवनदीपति तरते. ३७
पति जाउं न दे, हातें धरि एका स्त्रीसि; ते त्यजुनि देहातें,
पावे [12]परमा [13]पतिला [14]चैतन्यें; दे [15]स्वरूप पर [16]माप तिला. ३८
'जाउं न दीजे वांया [17]सिक्थ,' कथुनि हें दयानदी जेवाया
लागे [18]बल्लवविसरासह जे, न [19]तदीयपादपल्लव विसरा. ३९
कौतुक [20]गाढें करितो त्या अन्नें, उदारें धरि जगा ढेंकारि तो.
प्रेमें बहु धाला; हे तृप्ति असी अन्यथा न बहुधा लाहे. ४०
तापवि [21]वाडवमतितें [22]निजकर्ममदाख्य विष दुवाड, वमति तें.
वर्णिति गुरुसम जाया; कीं, या हेतु स्वलाभ गुरु समजा या. ४१

---

१. अत्यंत शीत अशा तुलसीमालेला. २. पायाखालीं काय आहे हें हि पहात नाहींत. ३. पापदृष्टि. ४. पापदृष्टांचे अन्य लोक हि. ५. दिसत आहेत. ६. देहासक्ति. ७. सुखसागराचें स्थान. ८. नद्या. ९. स्वकीय अशी. १०. श्रमविरहित लाभ. ११. संसारसागर. १२. श्रेष्ठा. १३. पालकाला (श्रीकृष्णाला). १४. ज्ञानयोगें. १५. आत्मरूप. १६. लक्ष्मीपति. १७. शीत. १८. गोपसमूहासकट. १९. [जे जेवाया लागे] तिचे चरणपल्लव. २०. मोठें २१. ब्राह्मणमतीतें. २२. आपल्या ब्रह्मकर्मांचा गर्व या नांवाचें.

'हरिची [1]रतिदा रजनीदिवस अधिक भक्ति [2]सद्विरति [3]दारजनीं.
आपण तद्रहित महासुख हि मुनि ' म्हणति, 'वंचलों स्वहित[4]महा.' ४२
'भगवान् हरि यदुप कृती स्वजनमुखें सूचवी असी [5]यदुपकृती;
[6]कर्ममदासवपानें नेणों न भजों दिल्या पदास [7]वपानें. ४३
आम्हीं अबुध न्यायाचार्य जऱ्ही; स्त्री हि सुमति बहु धन्या या.
निजदृष्टि [8]असीम धुरा पी [9]या हरिगुणसुधानदि असी मधुरा. ४४
शास्त्र पढोनि अशास्त्री आम्हीं; परि धन्य, कीं जयांसि अशा स्त्री.
नेणों धर्म; ठकविते माया; भुललों; अभक्त, कर्मठ कवि ते. ४५
कुळविद्याभ्यास कळा, व्रत, दीक्षा, कर्मकुशळता, या सकळा
लागो आग; मनाला भक्ति न; हरिच्या हि विमुख आगमनाला. ४६
हरिली मति मायेनें; कर्मपथीं दीन हे श्रमति [10]मायेनें;
तारावे [11]सदयाला [11]हरि ! शरणागत असों तुला सदयाला. ४७
घे न महाजन कानें, ऐसा अपराध परम हा जनकानें
क्षमिजे चि; असीमा या दीनीं तुझि साधु गातिल असी माया.' ४८
स्मरुनीं निजपापातें, प्रार्थिति हरिला, धरूनि अनुतापातें.
[12]मुनिमानसहंसाचें दर्शन घेती न, भय मनीं [12]कंसाचें. ४९

---

# अध्याय चोविसावा.

जो मुनिलोका [13]मंदहा तारी सद्वृंदसेव्यपद कामद हा,
नरतनु हरि; [14]या [14]गवळी [14]कळती, जे सिद्ध कारिति हरियाग बळी. १

---

१. प्रियकर. २. उत्तम वैराग्य. ३. स्त्रियांचे ठायीं. ४. उत्सव–**पंत.** स्वकल्याणोत्सव. ५. जो उपकार. ६. [ स्व ] कर्मांच्या गर्वरूप मद्यप्राशनानें. ७. मस्तीनें. ८. अमर्याद. ९. या स्त्रियाना. १०. [ कर्मांवर असलेल्या ] प्रेमानें. ११. साधूंचें कल्याण करणाऱ्या अशा हे हरि ! ( सत्+अय+ला=गृहण करणें ). १२. कृष्णाचें दर्शन घेत नाहींत; कारण मनामध्यें कंसाचें भय होतें. ( हा कृष्ण वसुदेवपुत्र च असें समजून कदाचित् कंस यास मारील अशी भीति ). १३. गर्वहारक. १४. याला गवळी समजती.

ाणे, परि सानंदा, वृद्धां गोपांत पीतवासा नंदा
ार्थुनि, दासभ्रमहा[1] पुसतो कीं, 'आज कोण हो! संभ्रम[2] हा? २
ीं तों बाळ[3]; परि सवा कां करितां? हें तुम्हीं दयाळ परिसवा.'
ोल्लामानवदेहा नंद क्रतुदेवताफळादि[4] वदे हा. ३
रपतियाग रहाया युक्ति वदे वेदशास्त्रसागर हा या;
ानेसा ही त्यांतें; गोद्विजमख[5] करवि, लावि साहित्यातें. ४
ाकुनियां जंभारी[6], तैंद्यज्ञार्थप्रकल्पितासंभारीं[7]
ोद्विजमख तैं करवी अखिलेश्वर शक्रगर्वतिमिरैकरवी[8]. ५
ान्नांबरहेमानें केले संतुष्ट विप्रवर हे मानें;
ोमाच्या अवसानीं पूजुनि गायींस तर्पिती यवसानीं. ६
जिति सांग नगा, ती रीति सुखाची च, गोप सांगन[9] गाती.
रिस बळास अहार्यप्रदक्षिणा[10] करिति सपशुवृंद सहार्य[11]. ७
हु विश्वास गमाया, लोकांला कृष्ण दाखवी मग माया.
पांतर विभु धरि तो. पावनलीला करूनि जग उद्धरितो. ८
रुनि बृहद्वपुशि खरा गिरिसा चि वसे, अधिष्ठुनी नगशिखरा.
ांसि म्हणे 'परिसा, रे! वाटतसा इष्ट अवयवापरि सारे. ९
थितों सवांशि खरी वाणी; गोवर्धन स्वयें मीं शिखरी[12].
चिभावें बाळक हो! दर्शन दिधलें तुम्हांसि गोपाळक हो!' १०
ाषउनि पशुप, हारें[13] श्रीचा[13] सेवी समस्त मग उपहार.
ोवास, हित कराया, जोडी आपण हि गोपसहित करा या. ११
ाधु अगाध रसाचा कुतुकाच्या हरि; नमी अगा! धर[12] साचा.
ारुनी भाव नमा, गा,' देव म्हणे, 'यास वर निजावन[14] मागा. १२

---

दासाचा भ्रम घालविणारा. २. गडबड. ३. लहान, अज्ञ मूल. ४. यज्ञ, ची ] देवता, फल वगैरे. ५. गायी आणि ब्राह्मण यांकरितां यज्ञ. ६. इंद्र. ७. यज्ञाकरितां केलेल्या तयारींत. ८. इंद्रगर्वरूप अंधारास शुद्ध सूर्य [च]. ज्ञीक. १०. पर्वतप्रदक्षिणा. ११. वडिल, वृद्ध यांसह. १२. पर्वत. १३. च्या गळ्यांतील हार [च असा कृष्ण]. १४. स्वरक्षण.

तोषवि नयन मन; करा जोडुनि याला, धरा विनय, नमन करा.
होय जना दूरकारी हिंसक, त्यां मूढ जे अनादरकारी. १३
वंदा हो! गोत्रातें; देइल कल्याण आमुच्या गोत्रातें.
हा प्रभु गोवर्धन हो! गोवृद्धि करू; यथार्थ गोवर्धन हो. १४
करवी याग असा; या जाय जनासह मग, स्थळास असाया.
त्याच्या चि पदीं नमना करितों, स्थिति देवु दीनसख दीनमना. १५

---

# अध्याय पंचविसावा.

मंदभाजन कोपाया इंद्र, करी हरि अमर्षजनकोपाया;
भंगी काम खरा, हे गोष्टि कळे देवनायका, मख राहे. १
मखभंगें शतकोटिप्रहरण गणि गोपमंतुच्या शत कोटि.
हृदयिं न सामावे ची क्रोध; अदंडा नया ससामा वेची; २
जडले अंगा रचिते ताप, न डोळे, रुंडाग्निअंगार चि ते;
श्वासोच्छ्वास हि भाते; त्याची च न सोसवे तयास हि भा ते. ३
कोपें चोळूनि करा, बाहे कल्पांतकरपयोधरनिकरा.
सांगे येउनि निकरा, नंदव्रज नामशेष जावूनि करा.' ४
सुज्ञ बरा, न टवाळा; त्या कृष्णा भजति गोप रानट बाळा.
कां साहेल? नयज्ञा ईशा मंजसहित करिति हेलन यज्ञा. ५
व्रज न जगो, पानीया वर्षा; केलें अनिष्ट गोपानीं या.
क्षण न तगो धन; दावा उगवा; दृष्टिस पुन्हां न गोधन दावा. ६

---

१. भिवविणारा. २. पर्वतातें. ३. कुळातें. ४. 'गायींस वाढविणारा' याप्रमाणें सार्थनाम. ५. गर्वपात्र. ६. क्रोधोत्पादक उपाय. ७. वज्रायुध (इंद्र). ८. गवळ्यांच्या अपराधांच्या. ९. दंडविरहित. १०. क्रोधाग्नीचे निखारे. ११. तेज. १२. कल्पांत करणारे असे मेघसमूह त्यांस. १३. लबाड. १४. न्याय जाणणारा [व] देवश्रेष्ठ असा मी त्या मजसह. १५. पाण्यास.

लाविति मज[1] पद वडिला, कीं नाहीं श्रीमदावलेप[2] दवडिला.
ऐसा दंडक[3] राजा साहेल कसा? निघा चि, दंड करा, जा. ७
मीं ऐरावतनागारूढ चि येतों हि; उद्धरा वतना गा!'
निश्चित बोले, 'खपती[4] गोप, करा तें,' असें चि तो लेखपती[5]. ८
सोडिति जल, दगड, दया; पाडिति गृह, वृक्ष, अशनि, जलद, गडद या.
गमति[6] जना[6] दगड गडी काळाचे उग्र; मेघवृंद गडगडी[7]. ९
वर्षति बहुतर वारी; घनकाळकरीं[8] विजा चि बहु तरवारी;
धन्वी शरधारी[9]; ती युद्धाची भासली च बहुधा रीती. १०
शब्द भयंकर; कानीं शूळ उठे, वर्षतां महाकरकानीं[10];
अचळा हाले; खांचा पडती; संक्षोभ होय हा लेखांचा. ११
मनिं इंद्र वदे, 'वांचा खळ हो! अपराध करुनि गुरुदेवांचा!
कृष्णनराश्रित[11] राना गिरिला हि पुजूनि, कां भयासि तराना? १२
भीति अपारासि तानीं बाळें पावति सुनिष्कृपा[12] रसितानीं[12];
दुःसह तो काल; पतिक्रोडीं[13] स्त्री, घेउनि स्वतोका, लपती. १३
करुं पाहति घात बळें, काळपयोदावहप्रवहवातबळें[14].
न घडे धारण[15]; धारा स्थूला, उपमेसि होय धारणें[16] धारा[17]! १४
कांपे अत्यासारानिलपातें[18] पशुपलोक नृत्यासारा[19].
स्थळ उन्नत खळगे हा पूर भरी; न उरवी जलद खळ गेहा. १५

---

१. इंद्र कृष्णाचा वडील बंधु म्हणून च कृष्णास उपेंद्र म्हणतात. २. संपत्तीपासून झालेला जो मद व गर्व तो. ३. स्वभाव—प्र. लि. टी. ४. मरती. ५. देवेंद्र. ६. मूळ पाठ—**भासति ते.** ७. गडगडाट करतात. ८. मेघरूप यमाचे हातीं. ९. [ पाण्याच्या धारा हे च ] बाण त्यांस धारण करणारे. १०. मोठ्या गारानीं. ११. 'कृष्ण' नांवाच्या मनुष्याचा आश्रय केलेले तुम्ही. १२. अत्युग्र मेघगर्जनानीं. १३. पतीच्या पोटाशीं. १४. प्रळयकाळच्या मेघांतील प्रवहनामक वाऱ्याच्या सामर्थ्यानें. १५. धरणें. ( सहन करणें ). १६. खांब. १७. लहान. १८. अत्यंत वृष्टि आणि वादळ यांच्या पडण्यानें. १९. नाचासारखा.

देहीं वत्स शिरा या गायी झांकूनि, कृष्णचरणिं शिराया,
येती; कांपति तानीं बाळें; करुणा करावि कां पतितानीं[1]? १६
आबाळस्थविर[2] हिता गति नेणति एक कृष्णनाथविरहिता;
वरिती सादर तरणी[3] हरिपदयुगळी च, भरंवसा दरतरणीं[4]. १७
प्रार्थिति दीन जगाया कीं, 'पाळक तूं दयानदीन जगा या;
सुमहाभागा! रानीं मरतों गा! वज्रसंनिभा गारानीं.' १८
क्रोधवश[5]तम न्यूनें[6] मानें[6] जो होय, त्या चि शतमन्यूनें[7]
केलें हें, सकळ कळे; रक्षाया दीनबंधु यांस कळकळे. १९
'श्रम जाले, खायाचा कीं न दिला भाग; काय लेखा[8] याचा?
श्रीमदतम[9] हानी च, त्रिदशपतित्वें[10] चि मत्ततम[11] हा[11] नीच. २०
स्मयघन[12] वारावा; हे मद तोंवरि, जों न दंडवारा[13] वाहे.
तारि कटाक्ष, मला जे नत; अळसें हा चि एकटा क्षम लाजे[14]?' २१
हें मानिं आणि, खरा हो व्रजजनाविश्वास[15], बिरुद[16] आणिख राहो.
गोवर्धन हरि हातें एकें धरि; भय समस्त ही हरि हा तें. २२
उकरुनि[17] मूळासहित, छत्राकीं[18] बाळ धरि तसा, श्रमरहित
लीळेनें चि धरातें उचली; काय प्रयास विश्वधरातें? २३
सांगे नंदास महापूरुष मात्रादिगोपवृंदा[19] सम[20] हा,
'या, धाका मनिं वारा[21], पर्वतगर्ती शिरा, निकाम निवारा[22]. २४
गिरिच्या कां, पतनाचा धाक धरुनि, वृष्टिमाजि कांपत नाचा?

---

१. पडलेल्यानीं (पातक्यानीं), मेघानीं. २. बाळापासून वृद्धापर्यंत. ३. कृष्णचरणद्वंद्व ही च नौका. ४. भयापासून तरण्याविषयीं. ५. क्रोधाच्या फार अधीन. ६. अपमानानें. ७. इंद्रानें. ८. पाड, किंमत. ९. संपत्तीपासून जो गर्व तो च कोणी एक अंधार. १०. इंद्रत्वानें. ११. फार माजलेला हा इंद्र. १२. गर्वरूप मेघ. १३. शासनरूप वारा. १४. लाजेला. १५. गोपांचा [आपल्यावर असलेला] विश्वास. १६. ब्रीद. १७. उखळून. १८. पावसाळ्यांत छत्रीच्या आकाराची एक लहानशी वनस्पती उगवते ती; अळंबा. १९. आई आदिकरून गोपसमूहास. २०. सारख्या तऱ्हेनें. २१. दूर करा. २२. निवाऱ्याची जागा.

गोपावनिपा[1] ! तनया सत्य गणीं, मत्करातुनि[2] निपात[3] न यां[4]. २५

वनपवनांसि हि न [5]भिजे, तुमचें हाले न लोम[6], येथें न भिजे;

गोधनसह या हो ! या, स्थळ केलें स्वास्थ्य शीघ्र हृदया होया. २६

धावुनि जन, खळगा जो, त्यांत शिरति, सर्व म्हणति, 'घन खळ गाजो;

ऐसा चि सबळ बा ! हो कृष्णा ! दीनावन[7]क्षमसबळबाहो !. २७

न प्रभु भागे; हातें गिरि धरि, धारणें जसा उभा गेहातें.

पाहति वदन टकटकां जन; मोहि सुरांचिया हि नरनट कटकां[8]. २८

नग धरि सप्ताह, [10]रितें दावी वांछित करूनि [11]देशा [11]हरितें;

मनिं जो कां मद हा तें तिमिर मिहिर[12]हारि हरी स्वकाम[12]द [13]हातें. २९

सादर न स्तनिं तानीं, केलें उद्विग्न मन हि न [14]स्तनितानीं.

घातकि पातकि ते कीं गणुनि, त्यजिले हि पक्ष्मपात[15] कितेकीं. ३०

पीतां श्रीमुख खाणीं पीणीं न स्मरति; उघडली सुखखाणी;

लक्ष्मीचा अनघ[16] टिका[16] सप्ताह उभा; गणी मनीं जन घटिका. ३१

केवळ त्या न नगाचा केला उद्धार, या जडा हि जगाचा.

केवळ गिरि च न उतरी, हरिमदभर ही मुकुंद भवसिंधुतरी. ३२

'वृष्टि कशास ? न वारि त्यजा,' असें मेघ पाकशासन वारी.

कीं याचा सर्व [17]हरी, दाउनि योगानुभाव, मदगर्व हरी. ३३

[18]उभले मेघ [19]सरे हो; गर्वनगीं हारि चढे, भ्रमे, वसरे हो !

उरविल गर्व तमिं रवी केंवि ? पविपुढें हि धैर्य पर्वत मिरवी ? ३४

---

१. गोकुळपते ! नंदा ! २. माझ्या हातांतून. ३. पतन. ४. पाठान्तर—**कर सोडिल नग, मोहें चित्ताला तुमचिया कदा न गमो हें.** हें पाठांतर क्रमानें च लिहिलें आहे. ५. भ्यावें. ६. केश. ७. दीनांचें रक्षण करण्यास समर्थ–शक्तियुक्त बाहु ज्याचा अशा कृष्णा ! ८. मागें १४ वी आर्या पहा. ९. क्रमानें लिहिलेलें पाठान्तर–**जन मोहि सुरांचिया कनकपट कटकां.** १०. निरर्थक. ११. गर्विष्ठ इंद्राला. १२. भक्तमनोरथ पूर्ण करणारा, सूर्यासारखा कृष्ण. १३. हातानें, किरणानें. १४. मेघगर्जनानीं. १५. डोळ्यांचीं पातीं झांकणें. १६. निर्मळ टिकला च असा कृष्ण. १७. कृष्ण. १८. थांबले. १९. वृष्टि [करण्याचे].

देव वदे, 'हो! सरला घन; तटिनीचा हि पूर ही ओसरला;
टाकूनि निघा त्रास, स्त्रीसुत घेवूनि गोधना, [1]पात्रांस.' ३५
परिसुनियां जन सारे म्हणती, 'क्षणमात्र येथ आज नसा रे!
सर्व हि बाहेर चला; कृष्णाच्या भार फार [2]बाहे [3]रचला. ३६
लोक निघे सर्व तसा, इंद्रमद हि गर्व, उतरि हरि पर्वतसा.
मुदित यशोदादिसती जाल्या; उपमा न त्या प्रमोदा दिसती. ३७
भेटति जन यास महा प्रेमें; मानी तदीय मन [4]यासमें हा.
आशीर्वाद हि तातें दिधले त्या, दे [5]यदीयपाद हितातें. ३८
सुर वाजविति नगारे; यश गाति, [6]दुज्यांसि म्हणाति मुनिजन, 'गा रे!'
हसति [7]अमृतघनगारे, हरिगुण तापत्रयघ्न सेविं [8]नगारे!' ३९
वांछिति न [9]सुधाचें[10]मना, मनें स्वर्गापरीस वसुधा च मना.
विश्वाचा हि धणि वरी नरता; पाजी जनासि अमृत [11]धणिवरी. ४०
पहिला घन तोयाचा; मग पुष्पांचा; प्रमोद घन तो [12]याचा.
गाति [13]अदीनभगा जे सुर, त्या गंभीर[14]सुनिनदीं नभ गाजे. ४१
पावे मन मोदास; स्तवन करुनि, म्हणति सर्व हि 'नमो' दास.
सुख तें [15]पर्व तदा वी; प्रभु बहु वात्सल्य, धरुनि पर्वत, दावी. ४२
येतां [16]भांवु [17]कलीला तत्सर्व[18]तमोग्रंथि, करुनि भा, वुकलीला;
कीं, हे [19]भांवुकलीला गाउनि, जन नामशेष [20]भांवु [21]कलीला. ४३
विमद करी [22]अगदमना जो प्रभु, तद्यश भवार्तिचें अगद मना.
स्वर्ग [23]निपट, अधर धरा यच्चरणें उच्च, भज तया चि [24]धरधरा. ४४

---

१. भांडीं वगैरे. २. बाहूला, बाहूवर. ३. रचला गेला आहे. ४. याच्या-सारखा हा च, निरुपम हें तात्पर्य. ५. ज्या कृष्णाचे पाय. ६. इतरांस. ७. अमृत-मेघाच्या गारेस. ८. हे इंद्रा! ९. अमृतपानास. १०. आवडे. ११. तृप्ति होईपर्यंत. १२. कृष्णाचा. १३. कृष्णभाग्यास. १४. सुस्वरानीं. १५. पर्वकाल. १६. इंद्र. १७. तंव्याला. १८. त्याच्या मनांतील अज्ञानांधकाराची गांठ. १९. कल्याणकारक क्रीडा. २०. समजो. २१. कलियुगाला. २२. इंद्रास. २३. हीन. २४. गोवर्धनधारी कृष्णास.

अंबुधरा[1] मारा[2] मापति[3] लाजवि, त्या मनोभिरामा[4] रामा[5]
भेटति; जलदवरा या टाकुनि, आल्या विजा, अमृतद[6] वराया! ४५
गोपँ न देवानंद प्रेमभरें जेंवि वासुदेवा नंद
भेटति सवपु रहाया पदिं आलिंगी न राम भव पुरहा यां. ४६
रक्षुनि जन, घन बळहा, यांचा हरि गर्व, उरवि अनघ न बळ हा;
प्रकटूनि यश, स्वीया गोष्ठा घेवूनि ये प्रभु यशस्वी या. ४७
वेष्टुनि जयशालीला, सेविति जन कामधेनुपयशा लीला;
सत्य मुकुंद सुरभि[10] ती; वत्स भजक गोप; इतर[11] असुर सुर भिती. ४८

# अध्याय सविसावा.

असिं सबळें[12] मुनिवित्तें[12] बक्यसुनाशाद्रिधारणांतें[13] [14]वित्तें
कर्में केलीं होतीं; आठविती सर्व गोप विस्मित हो! तीं. १
वदला जें काय कवी[15] गर्ग, व्रजनाथ तें तयां[16] आयकवी,
कीं, 'नारायणसम यां[17] सांगे,' हे[18] करिति तो चि हा या समया[19]. २

---

१. मेघास [श्यामवर्णानें]. २. मदनास [सौंदर्यानें]. ३. लक्ष्मीपति. ४. मनास आनंददायक. ५. स्त्रिया. ६. मोक्षदायक (कृष्ण). ७. अन्वयार्थ—ज्याप्रमाणें नंद [तेंवि] वासुदेवा प्रेमभरें गोप न; सवपु देवानंद भेटति, (ज्याप्रमाणें नंद भेटतो त्याप्रमाणें श्रीकृष्णास प्रेमातिशयानें-गोप नव्हेत तर—ते देहधारी देवांचे आनंद च भेटतात) [तसें च] या रहाया पदिं राम न [तर] पुरहा (त्रिपुरनाशक) भव (शंकर) आलिंगी. ८. इंद्र. ९. कामधेनूच्या दुधासारख्या. १०. कामधेनु. ११. भक्तांहून इतर. १२. मुनिजनांचें वित्त (च) अशा बलरामसहित कृष्णानें. १३. पूतनेचे प्राण घेणें यापासून आरंभ होऊन गोवर्धन धरणें एथपर्यंत. १४. ख्यातें—पंत. १५. नंद. १६. गोपाना. १७. कृष्णास. १८. गोप—पंत. १९. सिद्धांत—पंत.

# अध्याय सत्ताविसावा.

विक्रम पाहुनि सुर[1] भी, निजसंततिरक्षणें सुखावे सुरभी.
येती पदनमनातें; यावांचुनि अन्य सुखद पद न मनातें. १
अपराधी ये, कांतीं श्रीच्या जाणुनि दयास्थिती[2], एकांतीं.
रविनिभमुकुटशिर[3] कवी पदिं ठेवि, तयांत रज[4] भयघ्न शिरकवी. २
वंदी हरिवाह[5] तसे चरण, श्री ज्यां कुचां चि वारि वाहतसे.
शेषमळासि[6] उरकवी, लाउनि पदपूतभूतळासि[7] उर, कवी. ३
जरि नाशी तम, उरवी गुहेंत; करि ताप ही; न शीत मउ रवी;
रज लब्ध शतमखा जें, उत्तम, अमृतकर[8], न[9] परवश तम खाजें. ४
प्रणतीं सुमृदु, दर हरी जो, प्रभुवर्य क्षमी त्रिजगदुदर[10] हरी;
जरि हि अतिक्रम, निवळे[11], वंदी जेव्हां पदासि शक्र, मनि वळे[12]. ५
'दे भाग्यमद भ्रम हा; केला अपराध तों न मम दभ्र[13], महा.'
ऐसें हरि विनवि पदा प्रभुच्या, जो वंदितां चि उरवि न विपदा. ६
वंदुनियां, स्तवन करी शक्र असें, रोष विभु जयास्तव न करी.
दंड कसा? चव दावी करुणेची; ते चि एक साच वदावी. ७
'तव चरणसरोज्यांचा ध्यास न मच्चित्त लव हि विसरो; ज्यांचा
भ्रमतम[14] रजकण वेची, वाणि[15] न करि सत्प्रियतम रज[16] कणवेची[17]. ८
सेवी शंभु वन[18] धणीवरि[19] पायांचें तुज्या चि, तूं भुवनधणी.
विश्ववरा! कामातें वश जालों; श्रैष्ठ्यमद[20] वराका[21] मातें? ९
लघुता यश गौर विल्ये; त्वत्पादनता श्रुती अनिशीं[22] गौरविल्ये;

---

१. देव इंद्र भय पावे. २. दयेचें वास्तव्य. ३. सूर्यासारखा मुकुट ज्यावर असें मस्तक. ३. भयनिवारक धूलि. ४. इंद्र. ५. ६. राहिलेल्या मळास (पापास). ७. [कृष्ण–] पदानें पवित्र झालेल्या भूमीस. ८. चंद्र. ९. अर्थ? १०. त्रैलोक्य उदारमध्यें ज्याच्या असा. ११. क्रोधरहित होई. १२. दयार्द्र होई. १३. क्षुद्र. १४. भ्रमरूप अंधार. १५. उणीव. १६. साधूंस अत्यंत प्रिय अशी धूलि. १७. करुणेची. १८. पाणी. १९. अ. २५, गी. ४० पहा. २०. थोरवीविषयीं गर्व. २१. गरीब अशा मला. २२. नेहमीं

ते गणिली [1]अध मानें; केला हितघात म्यां महा अधमानें! १०

फार असावध साच प्रभु! मीं कीं आपुला असा [2]वधसा च,
सावध परि, वाराया, तूं गुरुवर, पाळिसी स्वपरिवारा या. ११

बा! यापरि च यशांतें जोडिसि, देऊनि पादपरिचय शांतें.
या [3]विभवा [3]सतरावा तूं दाविशि, लोक कीं भवास तरावा. १२

[4]स्वपर तरावे दास स्वयशें, हें विदित [5]परतरा वेदास.
तूं [6]शुचिसत्व [7]रसिकं ते देसि, तरि च बुद्धि भक्ति सत्वर सिकते. १३

त्रिभुवनकल्पद्रो! हें बहु पाप [8]त्वज्जनीं [9]अनल्पद्रोहें.
तूं चि [10]रसद यागातें अर्ह, श्रुतिशत असें चि सदया! गातें. १४

तूं प्रभु बहुल क्षमिता; मत्कृत अपराधकोटि [11]बहुलक्ष [11]मिता;
दीन पदास स्वामी! शरणागत होय तूज [12]दासस्वा! मीं. १५

[13]प्रभुपदराजीवाचा स्पर्शे, प्रियशिष्य [14]बुधवराजीवाचा,
परि [15]नखराजी वाचा स्तवुं न शके; गुण उणा खरा [16]जीवांचा.' १६

[17]निजपदपद्मपरागासक्तेंद्राळीचिया, [18]त्रिसद्मप रागा
टाकूनि, सकृप [19]रांगा [19]अनुपूर्वा धरि मनीं न शक्र[20]परागीं.' १७

'सुख मजपासाव [21]धरे होणार; स्वमनिं नाकपा! सावध रे!
लववि न [22]माने [23]स्तंभें; श्रीमदमत्त हि मला न माने [24]स्तंभें. १८

---

१. नीच. २. वध [केल्या-] प्रमाणें च. ३. [लहानपणापासून आतांपर्यंत गेलेलीं सोळा व] हें सतरावें ऐश्वर्य यास. ४. आपल्या ठिकाणीं आसक्त. ५. श्रेष्ठ अशा. ६. शुद्ध, पवित्र धैर्य ज्याचें असा. ७. गोडीला. ८. तुझ्या जनाचे ठायीं (माझ्या ठिकाणीं). ९. मोठ्या द्रोहानें. १०. आनंददायक. ११. बहु लक्षांनीं मोजलेलीं. १२. भक्तांचें द्रव्य असा जो तूं त्या तुज. १३. प्रभूच्या चरणकमलाच्या. १४. पंडितश्रेष्ठ बृहस्पतीचा. १५. नखपंक्ति. १६. प्राणिमात्राचा. १७. आपल्या चरणकमलाच्या परागांत आसक्त असा जो इंद्ररूपी भ्रमर त्याच्या. १८. त्रैलोक्याधिपति. १९. प्रेमा. २०. परमापराध—पंत. २१. पृथ्वीला. २२. मानेला. २३. ताठा. २४. ठोंब्या, जड, दांडगा, खांबासारखा ताठलेला.

कीं श्रीमदमत्त नुरे; त्यासि गिळी काळ संभ्रमद[1] मैत्तनु[2] रे!
हरितों श्री, मद हो! तों सरे, स्मरे मज; मग स्वकामद होतों. १९
स्तंभ कशास? न माजें, जा स्वपदा, भज विशंक, शासन माजें.'
सदय अनुग्र हरी ती आपुलि सांगे असी अनुग्रहरीती. २०
जो विमळयशःसुरभी,[2] ज्यापासुनि पावती असाधु असुर भी,
काळ महाभ्यासुर[3] भी, प्रार्थी त्याला नमूनि भावें सुरभीः— २१
'कृष्णा! तुज वरदासी मागतसें भुवनपाळका! वर दासी,
सर्व भितों हरिवाहा;[4] तूं गोविप्रामरेंद्र हो, हरि! वाहा.[5] २२
कोण महानलगेहाश्रय[6] करि? कुळधर्मकामहा नलगे;[7] हा
गोक्षितिदेवास[8] वधी; बहु निष्ठुर फार भीति दे वासवधी.[9] २३
अभिषेकाच्या विधिलीं[10] आलों, पुसुनि त्वदीय पुत्रा विधिलीं.[11]
क्षितिभर विग्रह[12] सारा हरिता तूं शुद्धसत्त्वविग्रह,[13] सारा![14]' २४
विनवि असा धेनु, तिला वश होय संभक्तिला[15] चि साधे नुतिलीं.[16]
स्वरसवरक्षीरानीं[16] अभिषेकी, जो स्ववंश रक्षी रानीं. २५
हरि[17] खनदीपानीया[18] वर्षे, निजमुकुटरत्नदीपानीं[19] यां[20]
नाथपदा नीरांजी,[21] घे माथां तीर्थसंत्पदा[22] नीरा[23] जी! २६
नमुनि पदें, वासव दे सद्रत्नाकल्प[24] वासुदेवास, वदे,

---

१. भ्रम उत्पन्न करणारा मच्छरीररूप. २. निर्मळ यशानें सुंदर. ३. अतिशय भयंकर. ४. इंद्राला. ५. रक्षण कर. ६. पुष्कळ अग्नि जेथें आहे अशा घराचा आश्रय. ७. कुलधर्माची वासना नाहींशी करणारा. ८. गायी आणि ब्राह्मण यांस. ९. इंद्रमति. १०. विधानाला, कृतीला. ११. ब्रह्मदेवाला. १२. तंटा, युद्ध. १३ शुद्ध सत्व च शरीर ज्याचें. १४. श्रेष्ठा! १५. भक्तियुक्त [ पण ] साध्या च [ इंद्रानें भगवंताच्या ] स्तुतीला. १६. आपल्या रसभारित श्रेष्ठ दुधानीं. १७. इंद्र. १८. आकाशगंगेच्या पाण्याला. १९. आपल्या मुकुटावरील रत्नरूप दीपानीं. २०. या कृष्णचरणास. २१. ओंवाळी. २२. तीर्थाचें चांगलें स्थान अशा पाण्यास. २३. हो! २४. उत्तम रत्नांचे अलंकार.

"'गोविंद' असें नामीं, अर्थ गवादींद्र[1], तूं प्रभु, असेंना मीं." २७
तुंबरु नारद, याचें गाती दोषघ्न यश उदारदयाचें[2],
गमति सुर समस्त वनीं प्रभुपादांभोजबंभरसम[3] स्तवनीं. २८
करिति मनोरम लास्या निर्जरललना कलावती[4] कमलास्या[5].
वृष्टि रसदसुमनांची, जाली सुखसंपदा चि सदसुमनांची[6]. २९
तें अतिशय दुध वाहे गायींचें; भू निवे, वश यदुधवा[7] हे[8];
स्रवती द्रुम मधुरानीं पूर्ण रसानीं सपत्रसुम[9] मधुरानीं[10]. ३०
त्या तत्तदुदधिमधुनीं[11] आल्या वाहत चि घृतपयोदधिमधुनीं[12]
नैकरसप्रसवधुनी[13]; कीं सेवावें चि सर्वरसधिस[14] वधुनीं[15]. ३१
हे वसुधा बुधरमणी[16] त्यजिति न; कीं धरिति धर[17] सुधांबुधर[18] मणी.
हे तरु गुरु सुरतरुचे; तच्चित्तातें[19] न नंदनीं सुरत रुचे. ३२
क्रूरें जात्या सत्त्वें[20]; जाला निर्वैरभाव ज्या त्या सत्त्वें[21]
सन्मतिलाभ व्यालीं[22] व्याघ्रा; जीवौघ पावला भव्यालीं[23]. ३३
अभिषेकुनि वरदास श्रीगोगोकुळपतीस सुरवर[24] दास,
गोविंदाज्ञासुमना धरुनि शिरीं, स्वर्ग करि सनाथ ससुमना[25]. ३४

---

१. गायी आदीकरून जीवांचा इंद्र. २. दयावंत कृष्णाचें. ३. कृष्णाच्या चरणरूप कमलांतील भ्रमरासारखे. ४. कलाकुशल. ५. कमलमुखी. ६. थोराचे प्राण आणि मन यांची. ७. यदुपति कृष्णास. ८. ही भू. ९. पत्रपुष्पांसह. १०. गोड अशा. ११. त्या त्या (आपआपल्या) समुद्रांतून. १२. दूध, दहीं व मध यानीं. १३. अनेक रस प्रसविणाऱ्या नद्या. १४. सर्व रसांच्या कोशास. १५. स्त्रियानीं. १६. देवांगना. १७. पर्वत. १८. अमृतमेघ. १९. देवांगनेच्या मनास. २०. प्राणी. (हा शब्द नपुंसकलिंगी योजिला आहे). २१. साधुत्वें. २२. सर्पा. २३. कल्याणाला. २४. इंद्र. २५. सानंदचित्तानें.

# अध्याय अठ्ठाविसावा.

एकादश्युपवासा करि, पूजी व्रजपति त्रिविष्टपवासा[1].
बहुरात्री अपगेला[2], साधाया द्वादशी, व्रजाधिप गेला. १
स्नान करी, अरुणाचा उदय न जों; असुर भृत्य तों वरुणाचा
निजवेळेंत हरि[3]; खलाहित[4]हरिजनक न कळे, मनांत हरिखला. २
नेला जेथें वरुण व्रजपति. हा उगवला प्रथम कीं अरुण[5];
शीघ्र तमोघ्न[6] सकरुण प्रकटेल हि लोकबंधु[7]हंस न तरुण[8]. ३
गिळिला नंद नदीनें, मग गोपजनें तदीयनंदन[9] दीनें
प्रार्थियला हरि तातप्रिय, ज्याचे पाय भवभया हरितात. ४
स्वाभयद यशोधर हा कृष्ण म्हणे सदय, 'मीं करिन शोध, रहा
स्वस्थ, धरा विश्वास,' स्वमुखें कथि हें, प्रमाण जो विश्वास. ५
जो सकरुण भव नाशी, गेला जगदीश तो वरुणभवनासी.
निजवैभव[10]कळशातें पाहुनि, पावे जलाधिप[11] सकळशातें[12]. ६
पसरुनि पदरा, जीवीं प्रार्थीवीं, त्या मुकुंदपदराजीवीं
दिधली भेटि; परम हा धन्य सुकृतसिंधु; पावला चि परमहा[13]. ७
वंदी प्रभुपदनलिनें, जीं न त्यजिलीं लवार्धमात्र सदलिनें[14];
होती निर्मळ. मलिनें स्मरतां ज्यातें, निजेंत भ्यावें कलिनें. ८
पूजी हरिपद, काशीपतिमुख[15] जपती जया महापदकासी.
तेजें नगर विराजे, ऐसे लेववि विभूसि नग[16] रविराजे. ९
वरुण वदे पद नमुनी, शिवति प्रत्यक्ष जें सुखास्पद न मुनी,
'ते कामद गा राया! आले, वर्णील कोण, मदगारा[17] या? १०

---

१. स्वर्ग हें च वसतिस्थान ज्यांचें अशा देवांस. २. नदीला. ३. हरण करी. ४. दुष्टनिकृंतन अशा कृष्णाचा पिता. ५. सूर्यसारथि. ६. [ अज्ञानरूप ] अंधकार निवारण करणारा. ७. लोककल्याणकारक सूर्य. ८. तरुण नव्हे [ तर ] बाल असा सूर्य. ९. नंदपुत्र. १०. आपल्या वैभवाच्या डेऱ्यांस (कृष्णास). ११. वरुण. १२. सर्व सुखांतें. १३. श्रेष्ठ उत्सवातें. १४. साधुरूप भ्रमरानें. १५. शंकरादि (देव). १६. सूर्याप्रमाणें [ शोभणारे ] अलंकार. १७. माझ्या गृहास.

जालों पावन मीं, न स्तवनीं पटु परि, [1]भवत्कृपावनमीन.
मुनिजनसर्वस्वा ! मीं सफळजनन पावलों चि सर्व स्वामीं ! ११
हा तात तुझा [2]कृष्णानीरांतुनि, न कळतां, [3]मदनुगें कृष्णा !
आणियला नंद; मना भय दे अपराध थोर हा, खळदमना !. १२
भय दे [4]आग मनातें, परि कारण हें तुझ्या हि आगमनातें;
चुकला तो मूढ; [5]कलिध्वांतार्का ! पदनता मज न तूं ढकलीं. १३
न्यावा हा निजतात; प्रभु ! तव पदसावुलींत जे निजतात,
त्यांतें नुठवि, न खवळी, जो [6]द्विपरार्धांतकाळ उरवि न [7]खं [6]बळी. १४
हे फुलली, पालवली, फळली, वैकुंठवल्लि सकृपा ! लवली;
देवुनि वैभव, नीच प्रभु ! केला धन्य, येवुनीं भवनीं च. १५
गंगाख्या धाम रसा [8]जें, या वंदन तुझ्या चि [9]पदतामरसा.
मायामानवदेहें क्षमिजे हो ! ' वरुण निरभिमान वदे हें. १६
मग तातासह, साची करुणा करुनि, व्रजासि ये सहसा चि.
आणी नंदन वासाप्रति; गोपांला गमे स्वनंद नवासा. १७
ऐश्वर्य [10]भुवनपतिचें निजपुत्राचें महत्व हि [11]भुवनपतिचें
गोपां सहसा नंद प्रकट [12]करीवि [13]समया हि [13]सह सानंद. १८
पहिलें ईश्वरसा च प्रभु भासे त्यांसि आजि ईश्वर साच.
म्हणती जन मनिं, ' [14]जगतीधर पावविल व्रजा हि सूक्ष्म निजगती. १९
जड सुरतरु पूरवितो स्वाश्रिततृष्णा, [15]हृदिष्टरसपूर वितो
चिंतामणि हि; [16]तदधिप प्रभु न कसा करिल भक्तजनहित [17]दधिप ? २०

---

१. तुझी कृपा हें च जल त्यांतील मत्स्य. २. यमुनेच्या जलांतून. ३. माझ्या सेवकानें. ४. संताप. ५. कलिरूप तमाला सूर्य [ च ] अशा. ६. बळवान असा कल्पांतींचा काळ. ७. आकाश [ हि ]. ८. गंगानामक उदक [—प्रवाहाला ] जें धाम ( स्थान ). ९. पदकमलाला. १०. वरुणाचें. ( भुवन+पति=जळाधिपति, वरुण). ११. कृष्णाचें. १२. करवितो. १३. उत्सवासह. १४. कृष्ण. १५. मनांत इच्छिलेलें तें च जणुं उदक त्याचे पूर. १६. कल्पवृक्ष व चिंतामणि यांचा मालक. १७. दधिभक्षक.

[१]ब्रह्मह्रदमज्जन ते करिती, कीं हरि म्हणे, 'घडो [२]मज्जनते;'
[३]श्रुतिसंस्तुत आपण हा वैकुंठीं शांतिचा उघडि [४]आपण [५]हों ! २१

---

# अध्याय एकुणतिसावा.

लेश हि [६]शरदमळ न, [७]भा [८]धवळी अमृतांशुची हि [९]शरदमळनभा;
[१०]अंबर [११]सितरुचि रजनी विलासिनी धरि, [१२]भमौक्तिकें रुचिर, जनीं. १
मंगळसुतिलक [१३]अलिकीं [१४]कुमुदाक्षीं भरि सुरम्य कज्जळ अलि कीं.
चंद्रमुखी ते हरिला रुचली; श्रीकांत योगिपति परि [१५]हारिलों. २
प्राचीमुख चंद्र [१६]करीं [१७]स्वोदयरागें करी [१८]अरुणं [१६]मोदकरीं.
ये प्रिय बहु दिवसां, जे दयिता, तद्वदन कुंकुमें भरि सांजे ! ३
[१९]कुंकुमपिंजरितरमामुखनिभशशिमंडळीं दिसे द्युति परमा;
पाहुनि वन हि धवळलें, हरिमन गायासि मधुर बहुविध वळलें. ४
ऐकति [२०]युवतिमृगी तें, तों तद्हृदयांत संचरे स्मर गीतें;
[२१]वनवसुधा वेगानें पावति, हरि जेथ घेति धांवे गानें. ५
हरिनें बहु शुभगानीं हरिलें मन; टाकिलें सदन [२२]सुभगानीं.
लज्जा भय न पल टिके; व्यवहार त्यागवी [२३]गुरुजनप लटिके. ६
काढित असतां धारा, टाकुनि, अनुसरति युवति जगदाधारा.
तापवितां दुध मणिकीं, त्यजिति; [२४]अमृत पाजितो बहु [२५]विबुधमणि कीं. ७
चुलीवरि च करपती अन्नें, गांठिति वधू [२६]प्रमोदकर [२६]पती,

---

१. ब्रह्मसुखाच्या डोहीं स्नान. २. माझ्या भक्तांस. ३. वेदस्तुत. ४. दुकान –पंत. ५. हर्ष–पंत. ६. जलद–पंत. मेघांधकार. (शर=पाणी). ७. कांति. ८. शुभ्र करी. ९. शरदृतूच्या स्वच्छ आकाशास. १०. आकाश. ११. शुभ्र कांतीचें. १२. नक्षत्ररूप मोत्यें. १३. भालीं. १४. कमलनयनीं. १५. भुलविला. १६. आनंदकर किरणानीं. १७. आपल्या उदयाच्या कांतीनें. १८. रक्त. १९. कुंकुमानें लाल झालेल्या लक्ष्मीच्या मुखासारखा जो चंद्र त्यावर. २०. स्त्रीरूप हरिणी. २१. वनांतील जागा. २२. सुंदर स्त्रियानीं. २३. श्रेष्ठजनांचे पालक. २४. अमृत किंवा मोक्ष. २५. देवश्रेष्ठ. २६. आनंददायक असा पति [कृष्ण].

पडतां ध्वनि तो कानीं, स्तन काढुनि, जाति, चोखितां तोकानीं. ८
करितां वाढप, रिचवी[1] कर पात्र; स्वगुरुभय हि बाढ, परि, चवी
घेतां गानसुधेची, त्यजिले व्यवहार. हे असार सुधे[3] चि. ९
न रुचे पतिसेवा यां. वाटति हे मानिले स्वपतिसे वायां.
भेटाया निजपतितें गेल्या; फळलें सदैव हि मनिं जपति तें. १०
हरिचा स्वांता[4] टंकळा[5]; भोजन करितां हि, ढकलिती ताट; कळा
गानाख्या[6] दूतिस त्या खोळंबिविति क्षणार्ध न वधू तिस त्यां. ११
स्त्री संपविति न उटिला उठती न्हातां, न देह धुतला उटिलाँ[7].
सांवारिली हि न कुटिलालकसंहति[8]; लाविलें न कुंकुम निटिला. १२
कोण्ही कुशला, केला अंजितदृक्प्रांत[9] लावुनि शैलाकेला[10],
तों त्यजिति; वेणु सुचवी कीं, 'याहुनि कृष्णरंग[11] देयिल सुचवी[12].' १३
भूषण उत्तम नाकीं, तें कानीं धरिति; हारि अनंत मना कीं.
कानांचें ये नाकां; वस्त्रांच्या धारणीं असें येना कां? १४
पांघुरल्या लुगड्याला ऐशा ही मानल्या दयालु गड्याला.
प्रेमें सरसा[13], जारि या व्यत्यस्तांबरविभूषणा[14], सोजरिया[15]. १५
त्यजिति अपत्या, दिसती अनिवार्या, मानिती न पत्यादि सती.
जाती च परम हेलों[16] करुनीं, जैशा विटांप्रति[17] परमहेला[18]. १६
गोप खरे श्रमहेलापात्र[19] चि; गेल्या त्यजूनि उचित महेला.
कीं हरिविषयीं न चले वारण, हे तर्क मतिस नाहीं सुचले. १७

---

१. रिक्त करी. २. फार. ३. खरोखर. ४. अंतःकरणाला. ५. गडबड, घाई. ६. गायननामक दूतीस त्या स्त्रिया न खोळंबिविति, म्हणजे गाण्याला सुरुवात करित्या झाल्या, हें तात्पर्य. ७. उटणें लाविलेला. ८. कुरळकेशसमूह. ९. अंजनयुक्त कटाक्ष. १०. शलाका=अंजन लावण्याची काडी. ११. काळा रंग [पक्षीं] कृष्णाचा रंग. १२. उत्तम गोडी. १३. रसानें भरलेल्या. १४. वस्त्रें आणि अलंकार यांचा ज्यांचे ठिकाणीं विपर्यास झाला आहे अशा. १५. शोभिवंत. १६. विलास. १७. जारपुरुषांप्रति. १८. परस्त्रिया. १९. श्रम आणि अवहेलना यांस पात्र.

गोप दुरासद[1] नीच स्त्री रोधिति ज्या सुदुर्धरा सदनीं च;
त्या, ध्यानद्वारासी उघडुनियां, पावल्या स्वमुद्द्वाराशी. १८
करिति गळांठा[3]; काया रोधिति; पडती पती गळां ठाकाया.
स्त्रीमत काय, 'चिरा हे, भाजा, खा;' कीं गृहांत काय चि राहे. १९
पावलिया सदया[4] या[5]; पाहूनि म्हणे असद्दुरासद[6], 'या, या;
रात्रि महाभागा[7]! या वनिं कां हो!? कोण काम[8] हा भागाया? २०
मीं प्रिय करिन सकळ; वा आहे कीं व्रज अहो! असाध्वस[9], कळवा.
निवसा घरिं; घोरानीं रात्रि फिरावें; शिवेच्छु न रिघो रानीं. २१
शोधित असतील पतीप्रभृति स्वजन; त्यजूनि असती लपती.
उचित तुम्हां कुळज्यांचें अकपट गुरुभजन, कीं विमळ कुळ ज्यांचें. २२
जे सुषमा[10] हे रानीं, चंद्रकरानीं सुधास्वमाहेरानीं[11],
देखिलि? जा; ताप वनीं शमला कीं सर्व सूर्यदुहितापवनीं[12]? २३
वत्सतनयदुहितांची[13] भूक न हरितां चि, पातलां दुहितां[14] चि.
समजावा[15]; निलयाला जा; जें हें कृत्य, धर्म वानिल याला. २४
मज चि पहाया [16]येणें स्नेहें हें जरि, सुखी असें मीं येणें.
जाणतसें प्रेमा, जें सुखदर्शन वांछितें सदा ही माजें. २५
पतितद्बांधवसेवा हा स्त्रींचा मुख्य धर्म, यातें सेवा.
बाळांतें पोसावें; हित[17] भेषज[17] लागतां कडू सोसावें. २६
अगुणसुगुणपति[18] तातें दिधला त्यजिजे न[19]; टाकिजे पतितातें[20].
कीं, जारीं सुख न सती वांछिति; दोनीं हि लोक तेणें नसती. २७

---

१. हट्टी. २. स्वानंदसागरास. ३. गाळण. ४. कृष्णाकडे. ५. स्त्रिया. ६. खलांस जो दुर्लभ. ७. भाग्यवंत स्त्रियानो! ८. इच्छा. ९. निर्भय. १०. शोभा. ११. अमृताची माहेरघरें च अशा. १२. यमुनेवरील वाऱ्यानीं. १३. वासरें, पुत्र व कन्या यांची. १४. दूध काढित असतां च. १५. समजूत करा. १६. आगमन. १७. हितकर औषध. १८. बरा वाईट नवरा. १९. पूर्वपर अशा दोन्ही वाक्यांकडे या "न" चा अन्वय करावा. २०. पातकी जो त्यास.

माजाठायीं भाव, श्रवणें कीं दर्शनें विगतपरिभाव[1],
जेंवि निरूढ[2] चि होतो ध्यानें संकीर्तनें, न संगें हो तो. २८
यास्तव चिंतित जावें; तेणें साधेल सर्व चिंतित; जावें[3].'
निष्ठुरता क्षण दावी हरि असि; अद्भुत खरांशुभा[4] क्षणदा[5] वी[6]. २९
स्त्रीजन विप्रियवाणी[7] परिसे बहु यापरी नवी प्रियवाणी[8].
आशेच्या परिभावें[9], खिन्नमनें, हरिपदें स्मरति, परि भावें. ३०
भ्याल्या मदनदवाला[10]; धांवति सेवावया प्रमदनद[11] वालों[12];
तों बहु दुस्तर वाटेमध्यें या धर्मनर्म[13] रोध[13] चि वाटे. ३१
पंकांत इभी[14] रुतती, ते व्याकुळ जाहली च तासि भीरुततती[15];
चरणांगुष्ठें महिला[16] खणिति[17] शिरायासि काय दुःखित महिला[18]! ३२
अबळांचा धीर गळे सांजननयनांतुनीं जसें नीर; गळे[19]
दाटति; ओष्ठ हि सुकले उष्ण श्वासें; स्तन स्वशोभे मुकले. ३३
केलें रामांवरि[20] जें क्षण औदासिन्य सदयरामावरजें[21],
तें दे बहु भी; रुसती स्वजीवनीं[22], न जगजीवनीं भीरु सती. ३४
अभिलषितसुरत[23] रुसवे न मना[23]; लावी नवी नतसुरतरु[24] सवे;
शब्द उदासीन; मनें भ्याल्या करिती हरीस दासी नमनें. ३५
प्रणयक्रोधवशमती[25] सुदती[25] वदती; विलोकुनीं धव[26], शमती[27].

---

१. परिभाव (लोकनिंदा)–विरहित. २. दृढ. ३. घरीं परत जावें. ४. फार तीक्ष्ण अशा किरणांची कांति. ५. रात्र. ६. प्रसवे. ७. कठोरशी. ८. कृष्णाची वाणी. ९. खंडनानें. १०. मदनाग्नीला. ११. आनंदरूप मोठी नदी. १२. बाला, गोपतरुणी. १३. पतिव्रताधर्मसंबंधीं कृष्णानें केलेली थट्टा हा च कोणी बांध. १४. हत्तीण. १५. भितऱ्या स्त्रियांची मंडळी. १६. पृथ्वीला. १७. जमीन पायाच्या अंगठ्यानें उकरीत रहाणें हें चिंतातुरतेचें लक्षण समजतात. १८. स्त्रिया. १९. कंठ. २०. स्त्रियांवर. २१. बळरामाच्या दयाळू धाकट्या बंधूनें. २२. आपल्या जिवावर. २३. इष्ट सुरत मनाला न रुसवे. २४. भक्तजनकल्पद्रुम. २५. प्रेम आणि क्रोध यांच्या अधीन झाल्या आहेत मति ज्यांच्या अशा सुंदर स्त्रिया. २६. पति (कृष्ण). २७. सुखी होती.

क्रूर, विभो! न वदावें; दग्धांतें काय जाळिसी नेवदावें? ३६
साहेना आग मन स्मरेषुंची; तव पदांबुजीं आगमन,
टाकुनि सर्व विषय, मापति! केलें; वदसि जें असह्य विषयमा. ३७
हारिं मानसखेदासी; लोटीं विरहाग्निमाजि न सखे! दासी.
जें वंश देवा चवि तें दे न, अधरिंचें चि अमृत दे वांचवितें. ३८
मुनि पंचतपा, दासी या ही पंचेषुतप्त, नत पादासी.
तूं पुरुषोत्तम हातें धरिं, निववीं जें प्रतप्तचित्त महा तें. ३९
न जऱ्ही आवडि, लेंचें त्वद्भजनाच्या, करूं भजन वडिलांचें.
याविण, गेहीं न सवे; लागे कैंची क्रिया? उगें ही नेसवे. ४०
'वचन करा, गे! जावें' म्हणसी हें न मानि मन; न रागेजावें.
कीं, बहुवस खेद वसे पतिपुत्रीं; होति तापद सखे! दवसे. ४१
सिंपिलिया तरुबुड, तें दळफळकुसुमांत जळ मिळे, कीं बुडतें.
कथिला तो धर्म; पण त्वच्चरणीं अर्पितां, खरें धर्मपण. ४२
आत्मा प्रिय, नित्य धणी तूं; पावति कुशळ तव पदीं च सुखधणी.
त्वदधररसपानाशा बहु दिवसांची, न योग्य, सकृपा! नाशा. ४३
कल्पतरू! पाहसि तें कलगीतें कामकांतरूपा! हसितें
होय समुद्भव धमन स्मराग्निचें यांत तर्कि दाह वध मन. ४४
कामदहनिं कापूर स्त्री होति; तयां सुखावह निकी पूर
अधरसुधांचा वाहो तुमच्या, अबळासमूह वांचावा हो!. ४५
मन हारिलें कलगीतें; दासी करितों तुझ्या पदीं सलगीतें;

---

१. कठोर ( भाषण ). २. अपूर्व वणव्यानें. ३. संताप. ४. कामाच्या बाणाची. ५. विष आणि यम याना हि असह्य म्हणजे अतिशय कठोर असें बोलतोस. ६. प्रिया! ७. अधीन (सुलभ). ८. मुनि पंचाग्नीनें तप्त असे [ असतात ]. ९. मदनतप्त. १०. लांचानें. ११. असवत नाहीं. १२. मान्य करिते. १३. फार. १४. सुखाची समद्धि. १५. मंजुळ गायनानें. १६. मदनसुंदर रूप ज्याचें अशा तूं. १७. उत्पत्ति. १८. वाढ. १९. स्मराग्नींत. २०. चांगला. २१. अधरामृताचा.

तुज विरहदहानिं शमनीं[1] ध्यानें पावों चि तूं चि कीं अनिश[2] मनीं. ४६
सर्वस्वें[3] जो सर्वदा[4] साधिति साधू रमाहृदब्जोत्सवदा[5]!
ज्या पासुनि तव चरणा शिवलों, वनजनसख्या[6]! सुभद्राचरणा[7]! ४७
विटलों ओका[8], रीती भवदन्यांची[9] रुचे न ओकारी ती.
पिकगुण[10] काय जि! [11]भेकीं? कांजी अमृताधिका हि काय जिभे कीं? ४८
करिती देव तपा हो! श्रीसदया! एकदा सर्वदैवत[12] पाहो.
असि ती ही वारि तुळसी, सह पदधूळी धरूं शिरीं निस्तुळसी[13]. ४९
तूं सुरपादप राया! दासींतें दे स्वदास्य, पादपरा[14] या.
तव वदन स्मितरुचिर प्रेक्षुनि, मनिं कामतप्त आहों सुचिर[15]. ५०
श्रीमुख वेष्टित अलकीं[16], अलिकुलपरिवृत्त सुधांशुबिंब, कमल कीं[17]!
कुंडलरुचि [18]गंडांतीं; अधरीं अमृत; वांचवी विरहगंडांतीं[19]. ५१
हारि तापसमूह [20]सितें [20]हंसितें सहवर्तमान जें पाहसि तें.
विश्वंभरभुज[21] गाजे यश देवसभेंत, लाजविति भुजगा [22]जे. ५२
मुत्प्रभवक्षम[23] नांदे जेथें श्री, हें प्रमोद वक्ष मना दे.
वाटे आंबट कीं तें अमृत हि! हें रूप गोड या बटकींतें. ५३
ऐसी कोण हरि! सती त्रिजगीं, जे मधुरवेणुगीत परिसती,
पाहे तुज हि रमेना! त्रिभुवनरुचिरा! व्रत त्यजूनि, रमेना? ५४
खग मृग नग हि जग रतिप्रदरूपें[24] मोहती; न कां तुज गेरती[25]?

---

१. शांतिदायक ध्यानानें. २. नेहमीं. ३. आपलें सर्व देऊन. ४. व्यापार. [५]. हे रमेच्या हृदयकमळास आनंद देणाऱ्या! ६. (आम्हा) अरण्यवासी [ज]नांच्या प्रियकरा! ७. कल्याणकारक आचरण ज्याचें अशा. ८. घरास. [९]. तुझ्याहून इतरांची. १०. कोकिळेचा गुण. ११. बेडकाचे आंगीं. १२. कृष्ण. [१]३. निरुपम अशी. १४. पायांच्या ठायीं तल्लीन अशा. १५. फार दिवसपर्यंत. [१]६. केसांनीं. १७. किंवा. १८. गालावर. १९. विरहरूप अपमृत्यूंत. [२]०. पांढऱ्या शुभ्र हास्यासह. २१. जगास धारण करण्यास [समर्थ] असे भुज. [२]२. भुज. २३. आनंद उत्पन्न करण्यास योग्य. २४. आनंददायक अशा रूपानें. [२]५. कुलीन स्त्रिया.

तूं विश्वंभर साच; प्रसन्न हो; न तारि, देह हा भरसा[1] च. ५५
तप्तस्तनें[2] तापस[3] रे! करकंज[4] न ठेवितां, न हा ताप सरे.
दुर्वह देह; ठकवणें न अतःपर; सह्य होति हे हठ[5] कवणें? ५६
हृदयीं रामा[6] निशितें[7] कामशरें विद्ध सुंदरा; मानिशि तें
करिं; तव संमुख रानीं बडबड केली यथेच्छ या मुखरानीं.' ५७
चिंती भव्य सुरमणी कीं, 'जरि मत्संग दुर्लभ, व्यसु रमणी
होतिल;' यास्तव नातें श्रीचें दे, सफळ करुनि या स्तवनातें. ५८
इच्छिति पदरज सुरतां, गोपी करिती सुखें तयासह सुरता!
चंद्र अर्जुन[9], तारा या भासति; दावी चरित्र जन ताराया. ५९
गज जैसा स्ववशाळीं[10], गोपींला रमवि हरि वनीं स्ववशाळीं[11].
लज्जापर मा केली; लक्ष्मी ऐसी च होय परमा केली. ६०
मानी आपुलि नीच ज्योत्स्ना पूर्णेंदु ही, अशा पुलिनीं[12] च
कृष्णेच्या[13], देव रमे; स्मरतां विस्मय रमा मना दे, वरमे[14]. ६१
धृतकुमुदामोदरसानिळ[15] तेथ करी विलास दामोदरसा;
जाला भीत रवीची कन्या लंघुनि; तिच्या हि भीतर वीची[16]. ६२
'देवूं कां मीं न रसा[17] भक्तांतें?' म्हणुनि देव, कामी नरसा,
ध्याती प्रमदा मनिं जें आलिंगन, दे सुखें मुखें दाम निजें. ६३
'मृदुता न कुसुमदामीं, कठिनें जन्हि तन्हि न लेश हि श्रम, दामीं[18]
प्रेमें बद्ध सदा मीं,' देव म्हणे गोपिकांसि; दे रस दामीं[19]. ६४
तों सौभगमदमानीं[20] त्या स्त्री मळतां, न साधु कामद मानी.
येणें सुखहानी च; प्रभु हि विटे; फार मान मद हा नीच. ६५

१. भारासारखा. २. [ मदनाग्नीनें ] तप्त झालेले स्तन. ३. तपस्वी. ४. करकमल. ५. बलात्कार. ६. स्त्रिया. ७. तीक्ष्ण. ८. देवसमूह(?). ९. कृष्ण. १०. आपल्या हत्तिणींला. ११. आपल्या अधीन झालेल्या अशा गोपींस. १२. वाळवंटावर. १३. यमुनेच्या. १४. लाजे. १५. कमळांचा सुवास व रस धरिला आहे ज्यानें असा वायु. १६. लाटा. १७. आनंदास. १८. दाव्यांचे ठिकाणीं. १९. चुंबनीं(?) २०. आपल्या भाग्याच्या गर्वानें व मानानें.

पावे अंतर्धान प्रभु हा सद्भक्तवृंदहर्षनिधान[1];
कीं, कुमति नसो, सवती श्रीच्या केल्या हि, हे परि न, सोसवती. ६६

---

# अध्याय तिसावा.

क्रीडे स्त्रींसह; साहे गर्व न; सुखमूर्ति विरह दे सहसा हे;
यन्मय चर अग[2] जग; जी वनिं शोधिति, जेंवि यूथनाथ गज गजी. १
हृदया देववि लास[3] स्वविरहहस्तें चि वासुदेवविलास;
स्मरति चरित्रें सुकृतिध्येया[4]; करिती तदात्मिका[5] तदनुकृती[6]. २
विरहें दग्धवपु सती अश्वत्थादिद्रुमांसि माधव पुसती;
गृह न स्मरती; रानीं फिरती, उन्मत्तशा, क्षतशरीरानीं[7]. ३
'जो वधि अलिचिकुर[8] बका देखियला काय चित्तचोर कुरबका[9]!
तूं तरि सांग, अशोका! हे गोपीमंडली करावि अशोका. ४
हे पुन्नागा! नागा! सांग, करी विमद जो महात्मा नागा[10];
भ्यालों कंपकरा या कामशरा, कृष्ण सांग चंपकराया! ५
तूं तरि सदये तुळसी! वद हरिचरणप्रिये! रमेसीं[11] तुळसी[11].
जरि अवलोकन, कपटाकर[12] कोठें? सांग, भूललों कनकपटा.' ६
प्रार्थुनियां मालतिला, पुसती त्या कांतिनिर्जिततमाल[13] तिला
गोपी, 'श्रीमल्लीलानिधि[14] कोठें!' हें विचारिती मल्लीला[15]. ७
'निष्ठुर जे, असु[16] जाती; सुमृदु तुम्हीं जातियूथिके[17]! असु[18] जाती

---

१. सद्भक्तसमूहांच्या हर्षांचें भांडार. २. अचल, स्थावर. ३. चुणुक. ४. पुण्यवंतानीं ध्यान करण्यास योग्य. ५. कृष्णस्वरूप झालेल्या. ६. कृष्ण—[चरित्राचें] अनुकरण. ७. जखमी झालेल्या शरीरानीं. ८. भ्रमराप्रमाणें काळेभोर केश ज्याचे असा कृष्ण. ९. कुरबक=कोरंटीचा वृक्ष. १०. कालियसर्पा. ११. लक्ष्मीबरोबर तुलना पावतेस. १२. कपटखनि. १३. [निज] कांतीनें जिंकलें आहे तमाळवृक्षास ज्यानें. १४. शोभिवंत लीलेचें कोठार (कृष्ण). १५. मोगरीला. १६. असो—

 १७. वृक्षविशेष. १८. प्राण.

ऐसें हृदया वाटे; गेला कीं तो भवत्सुहृद या वाटे? ८
जलदश्यामा, कंदा मोदाच्या, देखिलें तुवां [1]माकंदा!?
यश संपादा दानीं प्राणांच्या; हे किजे कृपा [2]दादानीं. ९
तूज [3]नता पनसा! हे स्त्री[4]संहति हरिवियोगताप न साहे.
सदया! पाव, [5]देवार्ता [5]हरिणीशा; करुनियां कृपा, वद वार्ता. १०
[6]व्याळविदारक सारे न कथा हे [7]असन कोविदार! कसा रे!
[8]यमुनातटतापस! रे! न कसे उपकृति करा? न हा ताप सरे. ११
तुज [9]जंबूद्रो! हातें वंदुनि पुसतों [10]अंघा [10]कृतद्रोहातें
सद्गतिदायक दावा, सांगा भेटेल गोपराय कदा वा. १२
रे! रे! साधो! [11]अर्का! जाणसि, तरि सांग [12]खळतमाच्या [12]अर्का.
वद [13]हृत्साक्षी बकुळा! [14]वारीं आळिच्या, भला कसा, क्षीब [14]कुळा? १३
टाकुनि युवतिकदंबा गेला, [15]तां देखिला न काय [16]कदंबा!?
आणि वनीं पाजाया अधरामृत, टाकि कितव नी[16]पा! [17]जाया. १४
त्वां केलें तप [18]महि! तें नेणों, कीं [19]पुलकिता [20]हरिपदें [20]महितें.
वद, तूं सती[21]वरा, हें सुख त्रिविक्रम[22]पदें किं आदि[23]वराहें? १५
वद हरिणि सखि! प्रभु, ज्या दयिते[24]च्या ठेउनीं निजांसिं स्वभुजा,
गेला या चि [24]पंथानें, कीं तीचीं कुंकुमें सुचार्चित थानें? १६

---

१. आम्रा. २. दादा बाबा जे आपण थोर त्यानीं. ३. शरण. ४. स्त्रीसमूह. ५. वणव्यानें पोळलेल्या मृगीसारख्या. ६. कालियमर्दक (कृष्ण). ७. वृक्षविशेष. ८. यमुनेच्या तीरावरील तपस्वी. ९. जांभळीच्या वृक्षा! १०. मत्सरी अशा अघासुरातें. ११. अर्कवृक्षा! (रुईचें झाड). १२. दुष्टजनरूप अंधाराच्या सूर्यास (कृष्णास). १३. [ सर्वांचे ] हृदयांत असणारा (कृष्ण). १४. अर्थ? १५. त्वां. १६. वृक्षविशेष. १७. भार्या. १८. पृथ्वि. १९. रोमांच उभारले जिचे. २०. पूजित अशा हरि-चरणानें. २१. पतिव्रताश्रेष्ठ अशा पृथ्वि. २२. त्रिविक्रम—वामनाच्या चरणानें (स्पर्शानें). २३. वराहावतारानें. २४. दयितेच्या स्वभुजा निजांसि (आपल्या खांद्यावर) ठेउनीं या चि पथानें गेला.

आलिंगनसहवासें हरिचें कुंदसुमदाम[1] दुःसह वासें
आम्हां हें च सुचवितें, लाधलि तव दृष्टि दर्शनामृतचवितें.' १७
सफळ तरू लवले; यां भाविति,[2] हरिपादधूळिचे लव लेया.
आलिंगित लतिकांहीं त्यांस हि पुसती, मनोज्ञ बोलति कांहीं. १८
दुःखें निजतनु कारा वाटे; मग पूतनावधाद्यनुकारा[3]
करिती वाचाकायस्वांतीं;[4] त्यां धाक या भवाचा काय? १९
करुनी चरितानुकृती, शोधिति जो भवतमक्षयीं भानु कृती,
सुखघन, गावे लीलागुण ज्याचे, पुसति तो नगा वेलीला. २०
वृंदावनिं ताप दयानिधिविरहें धरिति गोपवनिता; पद या
प्रभुचें भुवनादिसतीप्रिय,[5] तन्मुद्रा[6] रजांत नयना दिसती. २१
ते, साधुमनोमठसे[7] दिसती लोचनचकोरपदसोम,[8] ठसे;
जे बहुमंडित लक्ष्मीनयनाब्जरवि[9] ध्वजाद्यखंडितलक्ष्मीं.[10] २२
त्या धुंडिति पदवीतें, तों देखति जें सुसंपदा पद वीतें.
जीं परमसक्रदानीं स्वसुखाच्या दृष्टि वेधिल्याचि पदानीं. २३
पदजलज[11] वळखि जाया[12] जे ते; तों हेतु होय जवळि खिजायां;[13]
कीं, दिसति तयासहितें युवतिपदें; न गमती च मनिं त्यांस[14] हितें. २४
'अगयि! विलासवतीनें प्रेमगुणीं कृष्ण गोविला सवतीनें!
सर्वस्वा हरि; लाजे दे आम्हां, गेलि घेउनीं हारिला जे.' २५
पावति तापा; उलतें उर; जाणों वज्र सवतिचें पाउल तें!

---

१. कुंदपुष्पांचा हार. २. गोपी [असें] समजतात [कीं] कृष्णचरणरजःकण धारण करण्याकरितां [चालवले]. ३. पूतनावध आदिकरून कृष्णचरित्राच्या अनुकरणास. ४. वाणी, शरीर आणि अंतःकरण यांहीं. ५. त्रैलोक्यामध्यें जी आदि सती (आदिमाया लक्ष्मी) तिला प्रिय. ६. कृष्णाच्या [चरण] मुद्रा. ७. साधूंच्या मनास मठ (विश्रांतिस्थान) त्यासारखे ते ठसे. ८. नेत्ररूप चकोरास चरणरूप चंद्र. ९. लक्ष्मीच्या नयनरूप कमळास सूर्यासारखे १०. ध्वजादि सर्व चिन्हांनीं [उत्पन्न झालेल्या] सौंदर्यानें. ११. चरणकमल. १२. स्त्री. १३. रुसाया. १४. हितकर.

तीचें अतुळ तप, नसे संशय, जीचे पदांक[1] ते हि तपनसे[2]. २६
द्वेषें होय तडफडा; म्हणती, 'चिंताब्धिची अलभ्य तंड[3]; फडा
जसि निधिवरि सापिणिची, संगति हारिसीं तसी च या पापिणिची! २७
न लवूनि पळ, विलास त्यागउनीं, हारि! जिणें वनिं पळविलास[4],
असि कोण कृतव्रत ती शृंगारसुरद्रुमीं[5] हि चढली व्रतती[6] ?' २८
ये श्रांत[7] तडागाला[8], जीवन दे हा; न दे क्वचित्[9] डागालीं[10].
कर्मविपाकासारें[11] हें तापविलें सुधाकृपाकासारें[12]. २९
जे प्रीतिस ये कांता, घेउनि गेला मुकुंद तिस एकांता;
करुणा न सये! कांतारांत त्यजितां वधूततिस ये कांता[13]. ३०
स्कंध अनुभवि भुजाचें स्पर्शसुख तिचा, प्रदान करि विभु ज्याचें;
कीं, नियता[14] पदराजी[15] एकिकडे; दे मनास तापदरा जी. ३१
ईश्वरपदसारस[16] ती जाली आराधिती निगमसार[16] सती;
कीं, नेली एकांता ते; अस्मत्स्मृति मनांत हि न ये कांता! ३२
गतिजित[17]बालकरेणुश्रीशपदांभोजभक्तपालकरेणु
हे धन्य; विधि भवानीपति लक्ष्मी वाहती शिरोंबुजें[18]भवानीं. ३३
सिद्धी परमा दे, वी जे जननी हें त्रिविष्टप[19] रमादेवी,
ते[20] ही ताप सराया वारि रज हे, प्रिय शिवा[21] हि तापसराया[21]. ३४
हे पीयूषघन; तगे ताप न; होती विनष्ट[22]विपदघ नत गे!

---

१. पदचिन्हें २. सूर्यासारखीं ( तापदायक ) ३. परतीर. ४. पळविला गेलास. ५. शृंगाररसाचा कल्पवृक्ष च असा जो तूं, त्यावर. ६. वेल. ७. दमलेला. ८. सरोवराजवळ. ९. केंव्हां हि. १०. अपयशाला. ११. कर्माच्या परिणामाप्रमाणें वृष्टि [करणारा]. १२. सुधारूप कृपेच्या कासारानें ( कृष्णानें ). १३. सुंदर कृष्णास. १४. नियमित. १५. पदमालिका. १६. वेदसार असें ईश्वराचें चरणकमल. १७. गतीनें जिंकली आहे बाल हत्तीण जिनें अशा लक्ष्मीच्या पतीच्या चरणकमलावरील भक्तांचें पालन करणारे रेणु. १८. शिरकमलानीं. १९. त्रैलोक्य. २०. वी लक्ष्मी. २१. तपस्विश्रेष्ठ शंकराला हि. २२. नष्ट जहाली आहे विपत्ति व पातक ज्यांचें.

स्वैंविधि कसा गरल वसे? तीचें पद गमति अमृतसागर लव[1] से. ३५
भाग्यास न माप तिच्या; अस्मत्सर्वस्व त्या हरुनि, मापतिच्या,
अधराचा परम पित्ये रस एकांतीं, स्मरे न सख्य किमपि त्ये. ३६
अमृतांत विषलवास स्थिति; कीं सन्मंडळीं महाखलवास;
सुमदामांत वि[2]खारे किंवा वै[3]रमाणिकांत खदिरनिखारे! ३७
तैसें सादर ज्यांत स्वसुखसमृद्धी मुकुंदपादरजांत,
त्यांत पहा, आली हो त[4]त्पदधूळी सुदुःसहा, आली[5] हो!' ३८
वर्णिति वदनिं [6]श्रेणी कृष्णपदांची, विमुक्ति[7]पदनिश्रेणी.
'चं[8]दननिधिनीं अहितें त्यजिलें; कीं न जवळी पदें तीं अं[9]हितें!
भूमीतें नी[10]तळवे, यवसा[11]ग्रीं वि[12]द्ध अपटु गमना तळवे;
यास्तव त्या सुभगेला स्वस्कंधीं बेसवूनि वल्लभ गेला!' ४०
ऐसें त[13]र्कविख बळी हृदयांत शिरोनि बहुत तापवि, खवळी.
जळति मनीं कोपानें, कीं केलीं त[14]च्छिरें तिणें[15] सोपा[16]नें. ४१
'या तरुचीं अतिशयितें प्रेमें कुसुमें हि वेंचिलीं निजदयितें;
येथें प्रमदा मा[17]नें भूपविली स्वकररचितसुमदामानें. ४२
कीं पादाग्रें चि पहा दिसति हरीचीं; प्रियानुकूळ सकृप हा
आपण चि फुलां वेंची; आवडतीच्या गुणाप्रति भुलावें चि! ४३
जा[18]नुयुगीं बसकेला चिह्नें जाणूनि म्हणति, 'हा वश केला;
वेणी तिचि घातलि ही! या भाळीं विधि असा कसा घात लिही? ४४
असि करुनि कृपा, सुमनें लेवविलीं तदधरा[19]सवपिपासुमनें,
नंदसुतें शोभविलें; सवतीनें हा! कसें हृदय लोभविलें! ४५

---

१. अन्वयार्थ? २. सर्प. ३. श्रेष्ठ अशा माणिकरत्नांत. ४. त्या स्त्रियेच्या पायाची धूलि. ५. सख्यानो. ६. मालिका. ७. मोक्षपदाची शिडी. ८. चंदनवृक्षानीं व द्रव्यसमूहानीं. ९. अहितकारक अशीं. १०. न स्पर्शवे. ११. तृणाग्रीं. १२. अकुशल. १३. तर्कविष. १४. त्यांचीं मस्तकें. १५. त्या गोपीनें. १६. पायऱ्या. १७. सन्मानानें. १८. दोन्ही गुडघ्यांवर. १९. तिचें अधरासव पिण्याविषयीं तृषित आहे मन ज्याचें त्यानें (नंदसुतानें).

हीं चिह्नें कथिति, जसीं सूचकनेत्रें, मुकुंद रमला तिजसीं;
पाजुनि अधरास्रव ती, भुलउनियां, भोगिती नगधरा सवती !' ४६
एवं गोपी विकळा विमनस्का धुंडिती हरीतें सकळा.
मनिं भरलें प्रेमपिसें, स्त्रीमंडळ तें वनांत हिंडे कपिसें. ४७
दुर्लभहरिपदयुगली पावुनि ते ही मनांत गोपी फुगली.
कीं, 'बहुतापरि, सकळा स्त्रींत बरी, जाणत्यें तयांपरिस कळा.' ४८
घेउनि वल्लभ गेला जीस, असा गर्व होय त्या सुभगेला;
हे बुद्धि कुडी आली व्रजशापाची च, गर्व न, उडी आली. ४९
पति लक्ष्मीचा लीलानर त्यास म्हणे, 'अशक्त मीं चालीला;
न घडे हा श्रम; जाणें तेथें न्यावें, न एक हि क्रम जाणें.' ५०
हांसे कृष्ण; मग मनीं श्रीकांत म्हणे तिला, 'तुला श्रम गमनीं;
स्पर्शसुखा दासाचा योग्य करीं तरि बसोनि खांदा साचा.' ५१
मानी स्त्रीजित कामी, कीं, 'वर्ते वर्तवीं हरी जितका मीं,'
या मतिनें सोपा हे जाणे; स्कंधीं चढोनि बैसों पाहे. ५२
श्रुतिनुत ऐसा, याला नेणें; स्कंधीं हि जाय बैसायाला
जों ते रामा, लवला; अंतर्हित होय; दीपसा मालवला. ५३
'कंठीं हार विलासी अहा ! प्रमादेंकरूनि हारविलासी ?
चंद्र न हा रवि लीसी; करिल उरीं स्मरशरप्रहार बिलासी ! ५४
करिंचा निधि हारविला, तेणें जो ताप, लाजविल हा रविला !'
करि बहु हारावा हे; स्वउरावरि अश्रुच्या चि हारा वाहे ! ५५
करि फार विलापा हे; हरिविरहीं हिमकरांत रविला पाहे.
गेला जो धव नीतिभ्रंशें, न पवे तदीयशोध वनीं ती. ५६
'चंद्र न भोगे, लासी हृदया, कां प्राणवल्लभा ! गेलासी ?

---

१. चहाडखोराचे डोळे. २. भोगित्ये. ३. गोवर्धनधरा. ४. कलाकुसर. ५. मैत्रिण. ६. [तो] गर्व न [तर] उडी (धाड) आली. ७. मायामानव. ८. घाऊल. ९. वेदस्तुत. १०. भाजी. ११. हा ! आरावा. (आराव=खेदशब्द). १२. चंद्राचे ठायीं. १३. जाई.

धावुनि दे खेंव[1]; दये करिं; मृत्यु घडेल, जरि न देखें; वद ये. ५७
आचरल्यें आगा[2] मीं दुर्मति; नेणें चि ताप हा आगामी[3];
या मानसखेदासी वारीं; टाकीं वनांत न सखे! दासी.' ५८
करि नैक[4]विलाप वनीं, तो ध्वनि गोपींस आयकविला पवनीं.
भेटति तीस झडकरी, जीवारि हरिविरह[5]वाह्निमेघ झड[6] करी. ५९
आळ विटविलास[7]ाचा ज्यावरि, आत्मा हरी विटविला साचा;
वृत्त कथी फार, जिणें गणिलें कमळा[8]सुपतिविणें भार जिणें. ६०
सुखधाम[9] गवळणींस त्यागी; आल्या समस्त मग वळणीस[10].
होय उदासीनमना जेणें, तें स्मरुनि, करिति दासी नमना. ६१
धुंडिति[11] पुनरपि, नाकी[12] वांछिति यच्चरणरेणुला सपिनाकी[12].
त्याला विधु[13]रुचि दिवटी दाविल कसि? वृक्ष[14]मूळतम जिस निवटी[15]. ६२
म्हणती, ' दाट नग[16] वसे; छायातिमिरांत कृष्णवाट न गवसे!
न शमे ताप हि; ' त्याया पदरज, जाती स्थळासि त्या पाहिल्या, यां[17]. ६३
चेष्टा[18]वचनमनांहीं त्या तन्मय सर्व; अन्य उद्यम नाहीं.
नंदकुलभवनदीपा गाती, पुलिनीं बसोनि, शर्म[19]नंदीपा. ६४

---

# अध्याय एकतिसावा.

' व्रज उत्कृष्ट तव जनिस्तव हरि! कीं, श्री वसे सदा मुदित जनीं;
प्राण त्वदर्थ दासी धरुनि, हुडकितों दिशांत; दाविं पदासी. १

---

१. आलिंगन. २. अपराधा. ३. पुढें येणारा. ४. अनेक प्रकारें विलाप. ५. कृष्णवियोग हा च कोणी एक अग्नीचा पर्जन्य. ६. वृष्टि. ७. जारक्रीडेचा. ८. लक्ष्मीच्या प्राणपतीशिवाय. ९. कृष्ण. १०. वळणीस. ११. [ कृष्णास ] शोधतात. १२. शिवादि देव. १३. चंद्रकांति. १४. झाडाच्या खालील अंधार. १५. नाहींसा करी. १६. वृक्ष. १७. या गोपी. १८. हालचाल, भाषण व मन यांहीं. १९. सुखसागरा.

शरदंबुजगर्भरुची[1] चोरी[2] तुझि दृष्टि जे सुखवरदगुरुची[3],
तीणें फुकटा दासी मारिसि; हा वध न काय या प्रमदांसी ? २
विषजळ, दाव, वृष, घन, श्वसनाशनि अन्य भय मयात्मज, अघ, न
बाधों दिधलें, सदया ! संप्रति दुःखांत गोपिका कां वद या ? ३
गोपीकुक्षींतून प्रकट जहालासि विश्वसाक्षी तूं न;
जगदवना उदय जनीं यदुवंशीं तुज सख्या ! विनवि कमलजानि[4]. ४
यदुपति ! भवभीत मनीं जे, तव पद वरिति साधु तद्भयशमनीं[5];
जें पद्ध धरि करिं कमळा[6], वरदा ! ठेवीं शिरीं तया करकमळा. ५
वीरा ! व्रजार्तिशमना ! करिसी गतगर्व तूं स्मितें स्वजनमना;
दासी न विरहदावीं[7] टाकिं, सख्या ! भेटि दे; मुखांबुज दावीं. ६
हरि नम्रांच्या शमळा[8], पशुपाठि फिरे, जयांत नांदे कमळा,
जें नुरवि फणिमदमळा[9], कामं[10] मथीं, ठेउनीं कुचीं पदकमळा. ७
सत्प्रियवाक्यां[11] वाणी जींत नें[11], आसि सुनयना ! तुझि मधुर वाणी,
तीणें दासी मोहाकुल विरहीं; अधर अमृत पाजिं; शमो हा[12]. ८
'तप्तांतें वांचवितें तव सुकथामृत,' कवींद्र वर्णिति चवितें.
'अघमद[13] हरि; सुख करितें श्रवणं,' [14]ते बहुद कथिति जे बहु हरि ![14] तें. ९
प्रेमनिरीक्षण, हसित, ध्याना सुख जें, प्रिया ! विहारविलम्बित,
एकांतविनोद, मना जडले, खवळिति; करीं कपटिया ! शमना. १०
पशु चारित फिरसि वनीं, कांता ! हें कळवळे सदा मन भवनीं.

---

१. शारदीय कमलाच्या गर्भाची कांति. २. हरण करी (तत्सदृश होई, हा भाव). ३. सुख आणि वर देणाऱ्यांच्या गुरूची—तुझी. ४. कमलोद्भव (ब्रह्मा). ५. संसारभयशमनार्थ. ६. लक्ष्मी. ७. विरहाग्नींत. ८. पापाला. ९. कालियसर्पाचा गर्वरूप जो मळ त्याला. १०. वासना. ११. धीरांस प्रिय अशा वाक्यांना जीमध्यें उणीव नाहीं. १२. हा मोह. १३. पापाचा जोर. १४. अन्वयार्थः—हरि ! तें जे (लोक) बहु कथिति ते बहुद (पुष्कळ देणारे) [होतात].

तृणकणिशअंकुरानीं[1], कीं, दुखतिल कमलमृदुल तव पद रानीं. ११
धूळीधूसर[2] अलकीं[3] वेष्टित समधुपरागफुल्लकमल[4] कीं!
सांजे वडिवडि वदना दावुनि, वीरा मनांत अर्पिसि मदना! १२
पुरवि मनोरथ नमनें, श्रीस हि जो पूज्य भूविभूषण हि, मनें
ध्यावा संकटतरणा, ठेवीं स्तनिं त्या प्रिया स्वनीरजचरणा[5]. १३
वाढवि सुरता, नुरवी शोका, दे स्वरित वेणुला[6] रुचि बरवी,
अन्य सुखेच्छा न जना स्मरवि, स्वाधररसासि[7] दे त्या अजना[8]!. १४
फिरसि वनिं दिसा[9], युगेंसी[10] त्रुटि[11] होय तुला न देखतां; जइं दिससी,
*तव कुटिलकचवदनपानीं[12], पातीं[13] करि म्हणुनि मन विधिसि[14] जड[15] मानी. १५
त्यजुनि स्वजनसुतपती आलों निशि निकट तव सुगीतहृतमती;
इंगित जाणसि हि; अति प्रभु शठ तूं; त्यजिल अन्य पुरुष न युवति. १६
श्रीगृह[16], विशाल उर, सप्रेमस्मितदृष्टिमुख[17] विलोकुनि सरस,
तव विजननर्म[18] खवळी स्मर; सुरतेच्छा उठे; मना भ्रम कवळी! १७
व्रजजनदुःखांसि हरी तुझी अभिव्यक्ति[19] सर्वकुशळनिधि[20] हरी!
तव वांछा गद[21] मनिं या; लव तरि दे स्वार्तिहर अगद[22] करुनि दया. १८
जें तव पदकमळ तया, कठिन कुचीं हळु च ठेउं सखया! सभया.
तेणें फिरसि वनिं, खडे खुपति, म्हणुनि जीवना! स्वबुद्धि गडबडे."१९

---

१. गवत आणि कणीस यांच्या अंकुरानीं. २. धूळीनें मलिन. ३. केसानीं. ४. भ्रमर व पराग यानीं युक्त असें प्रफुल्लित कमल. ५. आपल्या कमलासारख्या चरणाला. ६. शब्दयुक्त मुरलीला. ७. आपल्या अधरामृतास. ८. हे जननरहिता! ९. दिवसाला. १०. युगाप्रमाणें. ११. एक चुटकीचा काल, निमिष. १२. कुरळकेशयुक्त मुखास पाहण्याविषयीं. १३. पापण्या. १४. ब्रह्मदेवास. १५. मूर्ख. १६. लक्ष्मीचें निवासस्थान. १७. प्रेम आणि हास्य यानीं युक्त अशी दृष्टि आणि मुख. १८. एकांतींची थट्टा. १९. साकारत्व, मूर्ति. २०. सर्व कल्याणांचा सांठा. २१. रोग. २२. आमच्या व्याधीस हरणारें औषध. * ह्या चरणांत दोन मात्रा अधिक होतात.

एवं बहु आळविती गोपी गुण गाउनीं गळे वाळविती,
तामरसाक्षि[1] बसती, रडति, पडति, विकळमानसा क्षीबसती[2]! २०

---

# अध्याय बत्तिसावा.

त्या युवतिसभे[3] टकळा[4] पतिचा; न[5] सुचे करील जे भेट कळा[5].
जाल्या हिंपुटि; काया सांवरिति न; हरिदया चि तदसु टिकाया! १
वृंदावनिं रमणी या विरहदवें करपल्या लता रमणीया.
करुणामृतघन निववी, दर्शनमात्रें चि त्या समस्त हि जिववी. २
विरहोष्णांत करपल्या युवतिकुमुदिनी, विकासकांति हरपल्या.
तत्परिपाळक रजनीपतिसा उगवे मुकुंद अमृतकर जनीं. ३
पाहे वदनाला जे दृष्टि, म्हणायास रुचिर मदना लाजे,
ऐसा सुखदेह, [6]स्मितें, ताप निवारूनियां, कुशळ दे हँसितें[7]. ४
प्राणांविण अचळ, बळक्षीणेंद्रियगण[8] *जसा करी न चळवळ[9];
तेंवि हरी[10] जवळ अले शक्तिप्रदें[10], तों चि युवतिवर्ग वळवळे, ५
त्यांत प्रकटे सहसा; धांवति, पाहुनि वरास्यजळजा[11] सहसां[12].
अमृतकर सतारके[13] हो! [14]तो स्वचकोरां विवेकरस तारक हो. ६
कोणी धरि करकमळा, स्वीकारी जो अनंतसुखकर कमळा;
घे प्रमदा बाहातें स्वांसीं[15], ज्या साधुमन सदा बाहातें[16]. ७
एकि म्हणे, ‘ तांबोळ प्राशुनि, व्हावें उरीं गुणें त्वां[17] बोळें, ’
एकि धरी पदकमला कुचीं, म्हणे, ‘ हें चि आवडे पदक[19] मला.’ ८

---

१. कमलनयना. २. अमिष्ट व मत्त अशा त्या साध्वी स्त्रिया. ३. युवतिसमूहास. ४. ध्यास. ५. जे कळा (उपाय) भेट करील [तो] न सुचे. ६. स्मितवदन. ७. शुभ्र हास्यानें. ८. शक्तिहीन इंद्रियसमूह. ९. चलनवलन. १०. शक्ति उत्पन्न करणारा कृष्ण. ११. पतींच्या मुखकमलास. १२. हास्यासह. १३. नक्षत्रांसह चंद्र. १४. द्यो-देऊं इत्यर्थः—**पंत.** अध्याहार? १५. आपल्या खांद्यावर. १६. बोलाविते. १७. त्वां. १८. तांबडें. १९. भूषण. * जसा?

एकि करी कोप, तिला प्रीत्याळि[1] म्हणे जन्ही, 'छळुं नको पतिला.'
चाउनि ओष्ठ, कटाक्षीं ताडी; शिरली च काय बद्धकटाक्षीं[2]. ९
एकि परमसार[3] सती अनिमिषनयनें[4] मुकुंदमुखसारस ती
पी बहु जेंवि अधासी; तृप्ति नसे जासि पदाब्जलुब्धबुधासी[5]. १०
एकी नयनांवाटे[6] ने श्रीकांता हृदब्जशयना[7]; वाटे
पावलि शर्म विपुल, कीं नेत्रें झांकी, तनू हि सारी पुलकीं[8]. ११
पावुनि मुमुक्षु निवती ब्रह्मज्ञा जेंवि, तेंवि हरिला, युवती.
गोपींसह बहु शोभे, परमात्मा शक्तिसह जसा; मन लोभे. १२
यमुनापुलिनीं कुंदप्रभृतिकुसुमसुरभिवायु[9] जेथ, मुकुंद
स्त्री ने चांदणियांत क्षीरधिनें दिधलिया स्वआंदणियांत[10]. १३
बसविति हरि संव्यानीं[11] कृतासनीं हृदयपंकजीं भव्यानीं[12];
जो ध्यावा साधूनीं, बहुबहु जन्मीं महासुकृत साधूनीं. १४
निजअंकावर पाया घेती, तत्स्पर्शसुखसुधा वरपाया[13].
करजळजांसि उरोजीं[14] ठेविति, देती न ताप लेश उरों जीं. १५
त्या प्रणयक्रोधवती[15] संमर्दन करिति हळु च चरणीं युवती;
धृतरोमांचवपु सती जनवृत्तांतापरी[16] च अभिनव[17] पुसती.
१६
'एक भजति, जे भजनीं रत त्यांतें; एक अभजकांप्रति हि जनीं;
एक न भजती उभया[18]; सखीजना वद हरी! निवडुनीं शुभ यां[19].' १७
ज्याचें अकृतज्ञपण स्थापिति तें त्याकडे तदुक्तें चि, पण[20]
साक्षी तत्व सखा तें जाणे, जें दुःख युवतिबुद्धिस खातें. १८

१. प्रीति ही च कोणी सखी. २. वैरत्वीं. ३. अत्यंत उत्कृष्ट. ४. निमेषरहित डोळ्यानीं. ५. पदकमलीं लुब्ध झालेल्या सज्जनास. ६. डोळ्याच्या मार्गानें. ७. हृदयकमळरूप शयनावर. ८. रोमांचीं. ९. कुंदादि पुष्पानीं सुगंधी वारा. १०. क्षीरसमुद्रानें स्वतां आंदण दिलेल्या चांदण्यांत. ११. संव्यानीं (?). १२. भव्यानीं (?). १३. उत्कंठेनें प्राशन करण्यास. १४. स्तनीं. १५. प्रेमानें रागावलेल्या. १६. लोकवार्तेप्रमाणें. १७. नवीन बातमी. १८. भक्ति करणारा व न करणारा ह्यांस. १९. यांपैकी निवडून चांगला कोण सांग. २०. परंतु.

कृष्ण म्हणे, “पारिसा, जे भजति परस्पर, न रीति ते बरि साजे;
कीं स्वार्थ चि तें भजन. स्नेहसुकृतहीन[1] ते विधृतदंभ[2] जन. १९
ज्यांस न भजनापेक्षा, वनभवनीं[3] तुल्य चंद्रिकारूपेक्षा[4]
ज्यांची, सदय पितर ते; तद्धृदयीं स्नेह धर्म ही सतत रते. २०
उभयांस हि न भजति जे पुशिले ते सांगणें तुम्हांसि मज [5]तिजे,
‘आत्माराम[6] ज्ञानी एक तयांमाजि,’ वर्णिले तज्ज्ञानीं; २१
कीं आप्तकाम[7] दुसरे किंवा अकृतज्ञ मूढ ऐसे तिसरे;
स्वगुरुद्रोही[8] चरम[9]. स्वांतीं जे सर्वदा हि निष्ठुर परम. २२
सदय परम कोटींत श्रुतिच्या जो ख्यात, तो चरमकोटींत[10].”
गणुनि हळु च हसती, तें जाणुनि, बोले दयैकगेह सतींतेः— २३
‘ऐका सखियानो! हें यांत, परी एक ही स्वयें मीं नोहें.
न भजें भजकांला गे! तरि हि मजकडे न दोष गंध[11] हि लागे. २४
जाणति गुज स्थविर[12] हें, सतत ध्यानप्रवृत्ति होत्ये विरहें;
निर्धन पावे निधितें; मग चिंतौत्सुक्य[13] हरपतां निरवधि[14] तें. २५
लोकश्रुतिस्वजनता[15] टाकुनि जालां तुम्हीं समस्त मज नता;
हो प्रीति असीमा, जी हे मद्विरहें, सुबुद्धि च असी माजी. २६
स्नेह करा गे! जावें मनिंचें मीं कठिन हें; न रागेजावें;
आळ वृथा आली हो! निष्ठुरतेची; न हे खरी आली हो!. २७
दे प्रेमालाप रती[16]; टाकीं मीं यापुढें सुधेला परती[17]!
गुप्त जवळि कां नसणें जरि तपावे तृपार्त हे कान सणें[18]? २८

---

१. प्रेमपुण्यरहित. २. ढोंगी. ३. अरण्यांत व घरांत. ४. चांदण्याचें रूप पाहणें समान च असतें. ५. तिसरें. ६. आत्म्याच्या ठायीं रममाण होणारे योगी. ७. पूर्णमनोरथ. ८. आपल्या गुरूचा ( पोषकाचा ) मत्सर करणारे. ९. शेवटचे. १०. शेवटच्या गुरुद्रोही प्रकारांत. ११. लेशभर हि. १२. वृद्ध. ९. काळजी आणि उत्कंठा. १४. अमर्याद. १५. लोकाचार, वेद ( धर्माचार ), आप्तेष्ट (स्नेहपाश ). १६. प्रेम. १७. पलीकडे. १८. सनईनें (?)

तोडुनियां गृहबेड्या, आलां, जालां न देखतां मज, वेड्या.
न फिटे हें स्नेहारिण; प्रिया[1] तुम्हीं मधुरगीति, वश मीं हरिण. २९
यत्न मनास न च कळे भवदुपकारामृताब्धिमाजि बुचकळे.
न घडे ऋणपरिहार प्रीति चि दे हे महाजयापरि[2] हार. ३०
उपकृतिसागरतरणीं सखि हो! तुमची सुशीलता वरतरणी[3];
स्वप्रत्युपकृति[4] होडी; मज ठावी शक्तिगति इची बहु थोडी!' ३१
हे अजित पराभूती[5] दावी भक्तां; परंतु न पराभूती[6];
शरणागति बहु मानी; बसवी निजकिंकरी प्रसादविमानीं. ३२

---

# अध्याय तेहतिसावा.

मग तेथ हरी रासक्रीडा[7] करि चेतवूनि अशरीरास[8].
वेष्टिति कनकदुकूला[9] मंडळरूपें प्रिया स्त्रिया अनुकूळा. १
बहु जाला घडिमाजी दोघींदोघींत; म्हणति, 'आवडि माजी
पतिला, कीं आपलिया जवळि च;' गोपी अशा भ्रमें व्यापलिया. २
बाहु समर्पी विभु ज्या स्त्रीच्या स्कंधीं, स्वयें हि मग तेंवि भुजा,
अतुळसुखां द्यायाच्या सुरतरुच्या व्रततिसी[10] च खांद्या याच्या! ३
क्षितिचा तो हारमणी[11] मारकतश्यामकांति[11] हरि हा; रमणी
गौरीस्वर्णमणिगणीं[12], भुज[13] गुण[13], सुषमा मनोहरा कोण गणी? ४
भास्वर[14] देवविमान व्योमीं[15] दाटति, अनेकसूर्यसमान;

---

१. अन्वय—तुम्हीं प्रिया मधुरगीति [व] मीं वश हरिण. २. मोठा जय झाल्याप्रमाणें. ३. उत्तम नौका. ४. मी केलेली उपकाराची फेड. ५. मोठें ऐश्वर्य. ६. पराभव. ७. रास नावाचें एक नृत्य करणाऱ्या पुष्कळ स्त्रियांबरोबर केलें जाणारें नृत्य, तद्रूप जी क्रीडा ती रासक्रीडा. ८. अनंगास. ९. पीतांबरधारी कृष्णास. १०. वेलीसारख्या. ११. पाचेचा श्यामवर्ण असा हारांतील मणि. १२. गौर वर्णाच्या स्त्रिया हे च सुवर्णाचे मणि त्यांच्या समुदायांत. १३. बाहु हा दोरा. १४. तेजस्वी. १५. आकाशांत.

वाटे तीं न [1]खयानें; तें मिष केलें चि पद्मिनी[2]सखयानें ! ५
वाजति दुंदुभि केली पाहुनि, सुमवृष्टि [3]निर्जरीं नभिं केली;
सस्त्रीक स्ववासीं जन आला; इष्टलाभ हा सर्वासी. ६
गाती हरिचीं अमळें [4]सांगन गंधर्वपति [5]यशें हृतशमेळें.
नादें नभ तैं कोंदे; त्यांत हि निजगीत विभु तयां ऐकों दे ! ७
सुरजन सविनय नाचे हरिच्या सकळेष्ट ही पुरवि नयनांचें;
म्हणति, 'नको [6]पात्यांची क्रिया रुसे आजिवरि [7]संकोपा त्यांची !' ८
हरिसह त्या [8]कमलास्या करिती पुलिनीं सती मनोरमलास्या;
किंकिणि[9]नूपुरवलयव्रातांचा लावि [10]वृत्तिलागिं रव [11]लय. ९
कृष्ण[12]तनुघनालीकीं स्त्री [13]चपळा भाविल्या बुधमनानीं; कीं
गर्जित गीत; तुषार [14]स्वेद हि; चातकमयूर सज्जन[15]वार. १०
जे त्या नृत्यें गीतें हर्षे, न वदवति विलासकृत्यें [16]गीतें.
वेणुपरिस तानाहीं स्त्रींच्या न भुले, असा परिसता नाहीं. ११
दे भगवान् [17]स्वैर; सकळा गाती बहुविध [18]अमिश्रितस्वर सकळा;
त्या [19]विश्वगुरुवराळी गाण्याची स्तुति करील कोण निराळी ? १२
आयिकतां गीतगती, देहादिस्मृति न अंतरंगीं तगती,
विधिगुरु ही तो मानी; डोलावें कां न [20]सुरशिरस्तोमानीं ? १३
त्या परमोदारासीं नटतां पावति सती प्रमोदा [21]रासीं;
[22]जे [22]श्रांता स्कंधाला धरि, तत्स्पर्शें तिचा निजात्मा धाला. १४
[23]उत्पळसौरभ ज्या ये, तो [24]स्वांसीं हुंगितां चि [25]वल्लवजाये,

---

१. विमानें. २. सूर्यानें. ३. देवानीं. ४. स्त्रियांसह. ५. ज्यांनीं पातकें हरण केलीं अशीं यशें. ६. पापण्यांची. ७. सक्रोध (क्रिया). देवांस पापण्या नाहींत हें प्रसिद्ध आहे. ८. कमलानना. ९. घागऱ्या, पैंजण व कंकण यांच्या समुदायाचा ध्वनि. १०. चित्तवृत्तीचा. ११. एकाग्रता. १२. कृष्णाचीं जीं अनेक शरीरें ते च मेघांचे समूह त्यांमध्यें. १३. विजा. १४. घाम. १५. सज्जनांचा समूह. १६. वाणीतें. १७. स्वानंदाची कळा. १८. स्वरांचें मिश्रण न करितां. १९. कृष्णसख्या. २०. देवांच्या मस्तकसमूहानीं. २१. रासक्रीडेंत. २२. दमलेली जी स्त्री. २३. कमलाचा सुवास. २४. आपल्या खांद्यावर. २५. गोपस्त्रियेस.

हरिभुज निववी रासीं, जे भागे गात नटत यदुवीरासीं. १५
जो योगा यागाला दुर्लभ, त्या गाल मेळउनि या गाला
घे [1]यदुराजविडा जे, ते स्त्री श्रीच्या मनास लाजवि, [2]डाजे. १६
[3]तंतननाताथानीं श्रांता हरिकरसरोज तप्ता थानीं
ठेउनि, युवति निवे; कीं, हें छत्र चि सुखद सेविलें [4]सविवेकीं. १७
लाजुनियां श्री लपती जाली; कीं, गोपिकावश [5]श्रीलें पती;
करि फार रमा नवला; कीं, केवळ वनचरींस वर मानवला. १८
करि [6]सुगुणश्रीशाला गोपी जो, त्या दयाकरा श्रीशाला,
गाती, या नाचविती. भुलवी अत्यंत गगनयाना [7]चवि ती. १९
गोपी सकळा श्रीशीं, तितकें होणें पडे रमाया [8]श्रीशा.
मुदितमना नारी ती[9] रतिरीसीं पावल्या चि [10]नानारीती. २०
युवतिसभे हा रतिला दे, सांपडला [11]रमासुधाहार [12]तिला;
[13]जो कर वारि अनघा मा पुसि सुरतश्रांतगोपिकाननघामा[13]! २१
जळकेली वनकेली करुनि स्त्रीमंडळी सुपावन केली.
विझवी कामज्वलन प्रभु, परि जालें न [14]चरमधातुस्खलन. २२
विश्वात्मा विश्वपती पावनचरितें करी, जया मुनि जपती.
भक्तेच्छा हरि पुरवी विषयि[15]जनाज्ञानदोषतिमिररिपु रवी. २३
बहुदीर्घा [16]अमृतकरद्युतिधवलशरन्निशा, तयांत सुखकर

---

१. कृष्णाचा विडा. २. टोची. ३. गायनांतील स्वरविशेषानीं. ४. विचारी जनानीं. ५. शोभादायक. ६. सद्गुण आणि शोभा यांचीं स्थानें. ७. आवड. ८. लक्ष्मीसारख्या. ९. ती नाना प्रकारची रीत. १०. प्रेमळ रासक्रीडेंत. ११. रमेचा अमृताचा घोट. १२. युवतिसभेला. १३. अन्वयार्थः—जो कर (हात) अनघा मा (पुण्यवान् लक्ष्मीला) वारि [तो] सुरतश्रांतगोपिकाननघामा (सुरतानें श्रमलेल्या गोपींच्या तोंडावरील घामास) पुसि. १४. [शरीरान्तर्गत सप्तधातूंतील] शेवटच्या शुक्र धातूचें स्खलन. १५. विषयी लोकांचें अज्ञान व दोष एतद्रूप अंधाराचा शत्रु. १६. चंद्रकांतीनें शुभ्र अशी शरदृतूंतील रात्र.

प्रभु गोपींतें रमवी; कामज्वरदाह अंगसंगें शमवी. २४
आणिख एक हि माया हरिची दावी असा व्रजीं महिमा या;
मानिति सदनिं जसे जे नित्यव्यवहार युवतिसीं निजसेजे. २५
त्यांसि म्हणे हरि, 'जागे जों नाहीं जाहले स्वजन, घरिं जा गे!'
दे सुखधाम निरोपा, तो विषतरुचा चि होय तन्मानिं रोपा. २६
जाति पहाटे ज्याया गोपांच्या, धरुनि वसतिवाटे ज्या या.
सोडीना मन पाय प्रभुचे; कीं, सौख्यधाम तें अनपाय. २७

---

# अध्याय चौतिसावा.

गोपांसह सानंद व्रजपति तो अंबिकावनाला नंद
गेला; सांबशिवाला पूजी विध्युक्त, जो हरी अशिवाला. १
पशुपतिला अंबेला वाहति गोपाळ भक्तिपूर्वक बेला;
विप्रांला मोदानें देती स्वर्णांबरान्नसह गोदानें. २
सेउनियां नीरासी निजति अधिष्ठुनि सरस्वतीतीरासी;
तों रात्रौ ये जवळी क्षुधिताजगर, व्रजाधिपाला कवळी. ३
आक्रोशे हरितात, स्वसुता बाहे, यदंघ्रि भय हरितात.
'ये कृष्णा ! सांपाया मज रक्षीं; ग्रासितो, वधीं सापा या.' ४
गोप महाउग्रासी ताडिति बहु उल्मुकीं, तथापि ग्रासी.
सद्भिर्भवा सापा या मग लावी शीघ्र पीतवासा पाया. ५
जळलें अशुभ व्यालाकृतिसह, पावोनि पदरजीं भव्यालीं;
दावी तेज स्वीया चरणाचें अहिस देव तेजस्वी या. ६
हरि दग्ध करी राशी पापाच्या; तत्क्षणीं च सुशरीरासी

---

१. आपल्या शय्येवर. २. अपायरहित. ३. अंबिका देवीच्या वनाला. ४. दुःखास. ५. नंदाला. ६. संकटांत असलेल्या मला. ७. कोलितानीं. ८. भाग्यवान् अशा सापाला. ९. सर्पाकृतीसह. १०. कल्याणकारक अशा पायाच्या धूलीस.

विद्याधरपति[1] पावे; त्या तेजें गोपवृंददृष्टि दिपावे. ७
श्रीचतुराननतातें[2] पुशिलें वृत्त स्वपादनलिननतातें[3].
मुनिसर्वस्वा[4] चरणा नमुनि कथी तो सुदर्शन स्वाचरणाः— ८
'श्रीरूपें[5] दर्पित मीं विद्याधर; मज मदीय मद अर्पि तमीं[6];
हिंडें लोक विमानीं बैसुनि, न विरूप[7] अंगिरस कवि मानीं. ९
खळ निस्त्रप[8] हा साधी अघ[9] योजुनि मुनिचिया स्वउपहासा[10] धी.
हे श्रीकर ! अज ! गर[11] ते वमले क्रोधाख्य[11], पावलों अजगरते. १०
सुतपोधन ! शापा या अंत कथिति तव दयैकघन[12]शा पाया;
मदमळ[13] सहसा धूते ज्यांची शापोक्ति ही, सदय साधू ते ! ११
भवशमना देवास प्रार्थितसें, निजपदीं मना दे वास;
नाशिति अवलेपा या, तुझिया ज्ञाते म्हणोनि लवले पाया. १२
वारीं पन्नगलेतें जें तव पादांबुज, प्रपन्नगते[14] ! तें
न बहु; भवभ्रम राहे न, स्मरतां; शक्ति विदित सद्भ्रमरा[15] हे.' १३
आज्ञा, पद वंदुनि, घे; सुदर्शन व्योमपथिं, जसा इंदु, निघे;
अद्भुत गुण हरिचे ते जाणुनि नंदादि होति विस्मितचेते[16]. १४
केली यात्रा सारी; हरि दे गोपांसि विस्मया त्रासारी[17].
आले घोषा; गाती नंदाची मुक्ति[18]; ऐकती सुभगा ती. १५
एका समयीं राती गाती गोपीगणांत असुहृद्राती[19]

---

१. विद्याधरनामक देवांचा राजा; ह्याचें नांव सुदर्शन; हा अंगिराऋषीला हसल्यावरून त्यानें 'तूं साप होशील' असा त्याला शाप दिला. २. ब्रह्मपिता जो कृष्ण त्यानें. ३. आपल्या चरणकमलीं नम्र अशा विद्याधरास. ४. मुनींच्या सर्वस्व अशा कृष्णास. ५. संपत्ति व सौंदर्य यांहींकरून. ६. अज्ञानांत. ७. कुरूप. ८. निर्लज्ज. ९. पातक. १०. ह्यांतील 'स्व' निरर्थक आहे. ११. क्रोध नांवाचें विष. १२. दयेचा मुख्य मेघ अशा. १३. गर्वरूप मळ. १४. शरणागताधार ! १५. साधुरूप भ्रमरास. १६. विस्मितान्तःकरण. १७. दुःखनिवारक. १८. सुटका. १९. शत्रुमारक.

जे बळकृष्ण भ्राते, वर्णें जिंकिति सितासिता[1] अभ्रा ते. १६
स्मरबांधवतारानीं[2] धवल निशामुख; सुगंध भवतां[3] रानीं;
कोलाहल मधुपानीं मत्तानीं कुमुदमल्लिकामधुपानीं[4]. १७
सन्मुनिमानसहंसीं बळगोविंदीं समस्तदेववतंसीं[5],
आरंभियलें अंसीं[6] गायन, ठेवूनि गाल डाव्या अंसीं[7]. १८
गाणें त्या दोघांचें श्रीसच्चित्सुखरसांचिया[8] ओघांचें
देहस्मृति योषांची[9] हारि, तद्यश[10] जेंवि वासना दोषांची. १९
करिती आलापा हे, धनदानुग[11] शंखचूड आला, पाहे
स्त्रीरत्नें; हा कामी धृष्ट[12] 'न नेवूं,' म्हणे, 'स्वगेहा कां मीं?' २०
न गणी देवा; घाला घाली; या गृष्टि[13] भीति त्या वाघाला.
जिकडे उत्तर हरिता[14], तिकडे गोपीजनासि जाला हारिता. २१
साग्रज हरि हा, कानीं लागुनियां विनविला वधूहाकानीं,
कीं, 'रक्षीं निज आली; गातां कसि दीनबंधुला निज आली?' २२
शत्रुतमोरवि[15] शाळद्रुम घेउनि धांवले किशोर[16] विशाळ.
अभयप्रद हाकेला देती; स्त्रीभीतिपात्र[17] खळ हा केला. २३
त्रिभुवनपाळक रानीं आले, कवळूनि उग्र शाळ करानीं;
जों आटोपा[18] पाहे, तों काळ चि वाटले मनीं पापा[19] हे. २४
दुर्मति तदमत्रास[20] व्यापी त्या गुह्यकास परम त्रास.
सोडुनि गोपी रानीं, शीघ्र पळे गांठि घालितां वीरानीं. २५

---

१. श्वेत व कृष्ण अशा मेघास. २. मदनोद्दीपक नक्षत्रानीं. ३. सभोंवार. ४. कमळें आणि मल्लिका या फुलांतील मध प्याल्यानें. ५. सर्व देवांतील श्रेष्ठ अशा. (वतंस=तुरा-श्रेष्ठ). ६. अंवशीं-रात्रीच्या आरंभीं. ७. खांद्यावर. ८. श्रीसच्चिदानंद ब्रह्मस्वरूप रसांच्या. ९. स्त्रियांची. १०. त्या दोघांचें यश. ११. कुबेरकिंकर. १२. उद्धट. १३. एकवार प्रसवलेली लहान गाय. १४. उत्तर दिशा. १५. शत्रुरूप अंधारास सूर्य. १६. गोपबालक. १७. स्त्रीगत भीतीला पात्र. १८. आवेशास. १९. पापी अशास. २०. त्या (गुह्यकरूप) पात्रास. (अमत्र=पात्र).

स्त्री रक्षी बळ शाली[1], गांठी चोरासि कृष्णजी बळशाली.
तोडि करें चि शिर, मणी[2] दे रामा; तुष्टि धरिति फारशि रमणी. २६
हारितां युवति सपत्नें गुह्यकनीचें[3], वधूनि तो लघुयत्नें,
बळ तच्चूडारत्नें[4] भूषविला, लोक निजयशें हि, प्रत्नें[5]. २७

---

## अध्याय पस्तिसावा.

रात्रौ हारिसीं रमती, दिवसा गोपी वियोगदुःखें श्रमती;
गाती लीला सुमती; युगदीर्घदिनासि[6] परमकष्टें गमती[7]. १
गात बसति वृजिनारिप्रभुलीलांतें[8] स्थळस्थळीं व्रजिं नारी;
करिती काळक्रमणा, आळउनी वेणुगानपटुहृद्रमणा[9]. २
नयनां सुख दे वेश; त्रिभंगललिताकृती[10] सुमुख देवेश.
वर्णिति भास्वर[11]; जाती ताप, अशा वेणुच्या शुभा स्वरजाती[12]. ३
अतिसुखदा या दासी गाति कथा स्मरति नंददार्या[13]दासी.
स्थिरचर मोहुनि उरली शक्ति जिची, वर्णिती मनःप्रियमुरली. ४

---

## अध्याय छत्तिसावा.

व्रजजननयनें कुमुदें विकसवि, विरहार्कदुःख नाशुनि संमुदें[14],
यदुचंद्र सदा सांजे उगवे, दे स्मितसुधा, प्रिया दासां जे. १
नामें असुर 'अरिष्ट' प्रभुवरि ये एकवेळ मूर्त अरिष्ट;
हरि गौरव[15] शैलाचें[16] ऐसें धरि रूप दुष्ट तो बैलाचें. २

---

१. शालवृक्ष धारण करणारा बळराम. २. [ मस्तकांतील ] रत्न. ३. शत्रु अशा नीच यक्षानें. ४. शिरोरत्नें. ५. पुराणपुरुषें—**पंत.** ६. युगाप्रमाणें दीर्घ वाटणाऱ्या दिवसास. ७. घालविती. ८. पापभंजक अशा श्रीकृष्णलीलांना. ९. मुरलीच्या [साह्यानें] गायन करण्यांत कुशल अशा हृदयहारक कृष्णास. १०. तीन ठिकाणीं अंग वांकल्यामुळें सुंदर आहे आकृति ज्याची. ११. मूळ पाठ—**नखमणि.** मण्यासारखीं तेजस्वी नखें. १२. स्वरांचे प्रकार. १३. नंदपुत्र कृष्णास. १४. विरहरूप सूर्यापासून उत्पन्न झालेलें सगळें दुःख. १५. गुरुत्व ( महत्व आणि जडपणा ). १६. पर्वताचें.

व्रज कांपवि वृष; भाचा कंसाचा भी न, काळ त्या वृषभाचा.
वप्रांसि[1] उकरि, शृंगें विंध्यगिरीचीं हि लज्जितें करि शृंगें.[2] ३
शब्दें भय दे; हगत, स्वल्प खणित भूसि, दावि बळ देहगत.
ककुदाश्रितजीमूत[3] स्तब्धाक्ष[4], पदोपदीं विसर्जी मूत. ४
उचलूनि अतुच्छातें[5] धरि तो अभ्रंलिहा[6] निजा पुच्छातें.
गोगोपींचे गळती गर्भ रवें ज्याचिया, भयें पशु पळती. ५
भ्याला व्रज या बाहे हारिला कीं, 'रक्षिजे स्वजनता बा! हे.'
कृष्ण बळीवर्दा[7] या दापी[8], इच्छा करी बळी मर्दाया. ६
निजसुहृदंसीं बाहे[9] ठेउनि, त्या चंद्रकावतंसी[10] बाहे.
क्रोधें वृष हि फुंफाटे[11], ज्याच्या खुरकुट्टनें धरातळ फाटे. ७
योजी शृंगा[12], 'राहा' शूळां जीं म्हणति; मूर्तशृंगारा[13] हा
वृष जाय विदाराया विश्वात्म्या मोक्षदा प्रियोदारा या. ८
धांवे उद्दामोक्षा[14] शृंगें हाणावया स्वशुद्धा मोक्षा;
धरि शृंगें हरि हा तीं ज्यां[15] श्रीच्या पाणिपंकजा वारि होतीं.[15] ९
शृंगें धरुनि ढकलिला मागें अठरा पदें हि; तो दृढ कलिला[16]
ये उठुनि हि घामेला; जन भावी, 'वांचला जन्हि मघां मेला!' १०
ये कोपें खवळोनीं, तों श्रीशें तद्विषाणयुग[17] कवळोनी,
पाडुनि तो पादानें, आक्रमिला खळ जगत्त्रयोपादानें.[18] ११
जेंवि[19] पटा ओल्याला पिळितां[19] रक्तांग[20]रांग वृष तो ल्याला[21];

---

१. वप्र=डोंगरांचे कडे किंवा नदीच्या डगरी. २. शिखरें. ३. [ज्याच्या] वशिंडानें मेघाचा आश्रय केला आहे असा. (अतिशय उंच, हा भाव). ४. ज्याचे डोळे ताठ आहेत असा. ५. मोठ्या अशा. ६. आकाशास स्पर्श करणाऱ्या. ७. बैलाला. ८. दडपी, भय दाखवी. ९. बाहु. १०. मयूरपिच्छावरील चिह्नें (डोळे) भूषण ज्यास असा (कृष्ण). ११. उसळे. १२. शिंगें. १३. मूर्तिमंत शृंगाररस च अशा (कृष्णास). १४. दांडगा बैल. १५. ज्या हातानीं. १६. युद्धाला. १७. त्याचीं दोन्ही शिंगें. १८. त्रैलोक्याचें कारण जो कृष्ण त्यानें. १९. ओल्या वस्त्राला पिळिल्याप्रमाणें [त्याचीं शिंगें पिरगळलीं असतां]. २०. रक्त ही च उटी. २१. धारण करिता झाला. (रक्तबंबाळ झाला, हा भाव).

तच्छृंगें तो कुटिला[1]; घातक निजगुण चि होय अंतीं कुटिला[2]. १२
वधिला कनकपटानें वृष, जेणें त्रासिले स्वजन कपटानें.
वर्षति सुर कुसुमानीं, वाद्यस्तुतिगीतनाद उठति विमानीं. १३
संहारूनि अरिष्ट व्रज रक्षी विश्वपाळ सर्ववरिष्ठ.
स्त्रीनयनतृषा राती भेटुनियां, हरि सहाग्रज वृषाराती[3]. १४
वृषमथनोपरि, नातें[4] हरिच्या[4] श्रीनारदें[4] परोपरि नातें
कथिलें कंसा; नंदें रक्षित बळ कृष्ण शौरिसुत सानंदें. १५
स्वरसपिपासू[5] च कसा मुनि[5] घात करील शौरिचा[6] सूचकसा[7]?
सांगे भोजपतीतें यास्तव कीं, 'देवकार्य हो, जपती, तें.' १६
वधिले जे तत्पुरुष[8] प्रकट करि रहस्य सर्व तें सत्पुरुष[9].
दे बहु संतापा जी प्रभुचरितसुधा हि कीं असंता[10] पाजी.
हे वार्ता तों धमनी[11] पेटवि कंसाचिया शिखी[12] क्रोधें[12] मनीं.
'शौरिवधा तरवारी घे,' त्या मुनि, युक्ति कथुनि लघुतर[13], वारी. १८
कीं, 'तातवधा कानें पारिसुनि, बळकृष्ण पळति तव धाकानें;
म्हणवूनि तदसु[14] देवा[15]! रक्षावे; बद्ध मात्र करिं वसुदेवा!'. १९
हतबुद्धि[16] च हा डाया[17] साधाया, मानवे मुनिचहाडा[18] या.
गेला सांगोनि गंडी[19] साधूंचा[19] बांधवूनि शौरी निगंडीं[20]. २०
यत्नद्रुम[21] अवकेशी जाले[21], परि धाडि कंस दानव केशी.
कीं मारवितो भाचे, विलास हे जीविताचिया लोभाचे. २१
धाडुनि हरिरिपु केशी, मल्लामात्यादिकां हि मग न चुकेशी
युक्ति कथी बाहूनीं, वाराया आत्ममृत्यु त्या बाहूनीं! २२

---

१. चंचला, ठेंचला. २. दुर्जनाला. ३. वृषासुराचा शत्रु. ४. कृष्णाचा नातू जो नारद त्यानें. ५. स्वानंदाविषयीं तृषित असा मुनि (नारद). ६. वसुदेवाचा. ७. चहाडखोरासारखा. ८. त्या कंसाचे सेवक. ९. नारद. १०. दुर्जन कंसाला. ११. फुंकणी. १२. क्रोधरूपी अग्नि. १३. लहानशी. १४. वसुदेवाचे प्राण. १५. हे राजा! १६. निर्बुद्ध. १७. द्वेषास. १८. मुनीनें केलेल्या चहाडीला. १९. नारद. २०. बिड्यानीं. २१. प्रयत्नरूप वृक्ष निष्फल झाले.

इतरां [1]ठेविति जे [1]ठी बहुबळ[2] चाणूर मुष्टिकाभिध जेठी,  
त्यां बोधि, 'असा रंगीं सिद्ध चि; व्हा सिंह शौरिसुत[3]सारंगीं. २३  
रे वीर महामात्र[4]! द्वारीं रंगाचिया परम हा मात्र  
तूं हि कुवलयापीड[5] स्थाप, सबळहंस[6]हारिकुवलया पीडें[7].' २४  
रिपुवधयुक्ती सुचवी; कार्मुकमख[8], मल्लरंग मंच हि रचवी.  
आणवि मग अक्रूरा[9]; गोष्टी सांगे तया स्वयें अक्रूरा. २५  
"तूज अशा साधूनीं साधावें यश, सुहृद्यशा[11] साधूनीं[12];  
गुरु[13] बळ सूत्राम्यातें[14], स्वगत[15] गणियलें अदीर्घसूत्रा[16]! म्यां तें. २६  
माजा तूं हित साच, स्वर्गेशा[17] विष्णु, साधु! तूं हि तसा च.  
शौरितनुज आणि, खरे मन्मृत्यू; आप्त मज नसे आणिख रे!. २७  
नंद हि आणावा; हें कळतां, भीतां मदर्थ आणीं[18] वाहे;  
कीं, 'कारि नृप हा यागा[19] धनुरांच्या[19], द्या उपायनें[20], पहा, या, गा!' २८  
मारूं शत्रुस हा; यापरि तद्वधयोग; मल्ल गज हि सहाया;  
यां[21] दहनीं[21] मारुतें[22] हो; शिशुतृण ते; मज न सज्जना! मारुत हो!. २९  
वसुदेवादि तादिष्ट[23], स्वपिता देवक हि, वधिन मीं हतदिष्टें[24].  
जैसी स्त्री नवि, भूमी, भोगिन, निष्कंटका करून, विभू! मीं. ३०  
प्रिय मीं सासुरयातें[25] मगधपतीतें[25]; भिती सदा सुर यातें.

---

१. नांव ठेवितात, निंदा करितात. २. बलवान, सशक्त. ३. कृष्णरूप हरिणाविषयीं. ४. महाता! ५. या नांवाचा एक हत्ती. ६. बळराम हा च कोणी हंस त्यासह असणाऱ्या कृष्णरूप कमलास. ७. नष्ट करून टाक. ८. धनुर्याग. (युद्धामध्यें जयप्राप्ति व्हावी या हेतूनें केला जाणारा एक शिवदेवताक यज्ञ; यामध्यें धनुष्यावर शंकराची पूजा करितात). ९. हा श्वफल्कनामक राजाचा पुत्र कंसाचा दानाध्यक्ष होता. १०. सौम्य अशा. ११. मित्रांच्या कीर्तीस. १२. संपादून. १३. बृहस्पति. १४. इंद्राला. १५. मनामध्यें. १६. चपळ, कुशल अशा (अक्रूरा)! १७. इंद्राला. १८. शपथा. १९. धनुर्यागा. २०. नजराणा, करभार. २१. मद्रूप अग्नीला. २२. वारा. २३. त्याचे आप्त. २४. दुर्दैवी. २५. सासरा जरासंध यातें.

द्विविद[1] सखा, शंबर वा, बाण, नरक, मित्रभाव यांसीं बरवा. ३१
पुरमख[2]तृष्णा नयना उपजउनि, करीं सरा[3]मकृष्णानयना.
तुज बहु नय[4] पाठ; बळा अनुजयुता आणि, जा, सख्या! पाठबळा[5]!" ३२
अक्रूर म्हणे, 'होतें होणार; चुके न शाहणपणें हो! तें.
जरि विधि[6] कर[7] दे, वांचे; फळति मनोरथ हि देवनरदेवांचे.' ३३
तो मानवदेवाचा निरोप घे, जाय, अहित न वदे वाचा.
तत्व कथूनि खळा या काय? सजे धर्मसेतु जो निखळाया? ३४

---

# अध्याय सदतिसावा.

कंसा जो भा[8]केशी दे, धारि हरिघातपापलोभा केशी,
तो तनु घे अश्वाची, ये यदुसिंहावरी पिशाच[9] श्वा[10] चि. १
धरि अद्भुतहयदेहा, भूमि खुरानीं खणी, व्रजा भय दे हा.
वर्णाया योग्य कशा होति, जयाच्या सटा[11] सुरा[12]भ्रांस कशा[13]? २
बहु दीर्घ सटा याच्या; पाठि[14] विमानांचिया[15] हि घसटायाच्या[16].
जैसा वेग मनाचा तैसा चि; उणा न बोलवे गमनाचा. ३
दे त्रास जना, [17]हींसे; तैं होती बधिर कर्ण यां नाहींसे.
असुरा[18]हयवेषाची व्याकुळ गोकुळ करी क्षणें हेषां[19] चि. ४
धांवे हुडकित वाहा[20]; या बाहे हरि तदंतकर कितवा; हा
गर्जे, जेंवि हरि[21] हरी[22], खवळे, शब्दें जरि स्वगर्व हरि[23] हरी. ५

---

१. कंसाचा एक मित्र. २. शहरांत होणाऱ्या यज्ञाची तृष्णा. ३. बळराम-कृष्णांचें येणें. ४. नीतिशास्त्र. ५. साह्यकारि! ६. दैव. ७. हात. ८. [तर] जगतो. ९. शपथेला. १०. क्रूर मांसभक्षक कुत्रा च. ११. आयाळ. १२. देवांस व अभ्रांस. १३. चाबूक. १४. वरच्या बाजू. १५. [आकाशस्थ] विमानांच्या. १६. घासून जावयाच्या. १७. खिंकाळे. १८. घोड्याचा वेष घेतला आहे ज्यानें त्या राक्षसाची. १९. खिंकाळी. २०. घोड्यास. २१. सिंह. २२. घोडा. २३. कृष्ण.

धाउनि घोटक, रायां[1] विश्वाच्यां, ये समीप घोट कराया.
कीं हा राहू नीच ग्रासूं ये विधुस जपत राहूनीं च. ६

कुंकुम ज्यांला थानीं त्या श्रीच्या मुद्रिता उरा लाथानीं
ताडाया हा वाजी झाडी पद; तो प्रहार जों होवा[2], जी! ७

तों चुकउनि, देव हया धरि त्या चरणीं च सज्जनसुखावह; या
फिरउनि गरगर तुरगा उडवि धनुःशत[3] जसा खगेश्वर[4] उरगा[5]. ८

दगड जसा गोफणिचा, पक्षिपतिक्षिप्तभोग[6] कीं तो फणिचा[7]
दूर उडविला साचा; दावी महिमा हरी भुजविलासाचा. ९

संज्ञेसह[8] तो, डायां[9] धरुनि, पुन्हां ये रमाधवा[10] तोडाया.
वाटे साचा विलया नेयिल काळस्वरूपसा चाविल, यां. १०

दानवहयमुखविवरामाजि[11] शिरवि, जो प्रपन्नजन सुखवि वरा
स्वभुजा सव्यां[12], लपती ज्याच्या देखोनि कांतिस व्यालपती[13]. ११

गुण ज्याचा वेदांतें प्रिय बहु, तो बाहु, दुष्ट चावे दांतें;
शिवतां तप्तायातें[14] गळति, तसे रदे[15]; सुदुःख दृप्ता[16] या तें. १२

जायिल जो खंडाया मंदमती परमतप्त लोखंडा, या.
परि, डसतां वरदा, हें सद्य[17] घडे; गळति दंत भूवर दाहें[18]. १३

वाढे भामय[19] समहामणिभुज[20] देहीं उपेक्षितामयसम[21] हा;
मग असदसुरविरोधी[22], वायुसि निर्गमनमार्ग न उरवि, रोधी. १४

ज्यापरि मीन गळाला हा तेंवि, समर्थ विक्रमी; न गळाला,
हें उचित अनाचरणा फिरवी, झाडी, विशाळनयना, चरणा. १५

---

१. जगाच्या पालक कृष्णास. २. व्हावा. ३. चारशें हात. ४. गरुड. ५. सर्पा. ६. गरुडानें उडवलेलें शरीर. ७. सर्पाचें. ८. सावध होऊन. ९. अ. ३६ गी. २० पहा. १०. कृष्णास. ११. अश्वरूपी राक्षसाच्या मुखाच्या आंतील भागीं. १२. श्रेष्ठ अशा आपल्या उजव्या भुजास. १३. मोठाले सर्प. १४. तापलेल्या लोखंडास. १५. दांत. १६. गर्विष्ठा. १७. तत्काळ. १८. उष्णतेनें. १९. तेजोमय. २०. महामण्यानें युक्त अशा सर्पासारखा भुज. २१. दुर्लक्ष केलेल्या रोगासारखी. २२. दुष्ट दैत्याचा शत्रु.

सोडी हा लेंड गळन्मूत्र, परी यासि मरण आलें डगळें;
कीं, याला विभु, ज्याला चिंतिति योगी, अशा हि लावि भुजाला. १६
कर्माच्या परिपाकें, कर्कटिकाफळ[2] उले जयापरि पाकें[3],
हयदेह तसा उलला; भासे रक्तार्द्र, पळस जैसा फुलला! १७
सहज हरूनि गलबा[4] हे काढुनि घे असु हि विश्वमंगल, बाहे.
कीर्त्यमृतपिपासु[5] मनीं सुर पूजिति या क्षतोग्रपापा[6] सुमनीं. १८
असि करि बहुवार दया दासांवरि जो, पहावया नारद या
प्रभुला ये एकांतीं; प्रेमा याचा अपार लक्ष्मीकांतीं. १९
स्तवुनि म्हणे, 'हा केशी ज्याच्या भीती सुधांधस[7] हि हाकेसी
अंता नेला वाजी! यापरि च यशांत कविमनें लावा जी! २०
भूसुरखेदक्षपणीं[8] हे तव भुज यांचिसारिखे दक्षपणीं!
वधि त्यां मूढां; सांळिती[9] साधू, श्रुतिसेतु खळचमू ढांसाळिती. २१
तूं सदवनपर; वांचे कंस कसा? मारिसी दिसीं परवांचे;
कमळांरंगा[10]! माजी दृष्टि निववविसिल मल्लरंगांमाजि[11]. २२
मग वध पंचजनाचा[12] यवननरकमुरमुखामरारिजनाचा[13]
देखेन; तदुपरि भवभ्रमहर[14] कल्पुद्रहरण शक्रपरिभव. २३
बहुतन्ववलग्नांचें[15] स्त्रीरत्नांचें हि कुतुक नव लग्नांचें[15].
मग उद्धरिसिल नृग[16], ती पाहेन द्वारकेंत लीलानृगती[17]. २४

---

१. श्रेष्ठ प्रकारचें. २. कांकडीचें फळ. ३. पिकल्यामुळें. ४. गोंगाट. ५. कीर्तिरूप अमृत प्राशन करण्याची इच्छा ज्यांस असे. ६. मारला आहे भयंकर पापी ज्यानें अशा कृष्णास. ७. देव. (सुधा+अंधस्=अमृत हें च अन्न ज्यांचें असे). ८. ब्राह्मण-संताप दूर करण्याविषयीं. ९. छळिती. १०. लक्ष्मीपते! ११. मल्लांच्या सभेंत. १२. शंख नांवाच्या राक्षसविशेषाचा. १३. यवन, नरक, मुर इत्यादि देवांच्या शत्रुजनांचा. १४. संसारमोह हरण करणारें. १५. अत्यंत कृश कटि ज्यांची अशा उत्तम स्त्रियांच्या नूतन लग्नांचें कौतुक. १६. सूर्यवंशीय ओघरथ राजाचा पुत्र. (हा ब्राह्मणशापानें सरडा झाला होता). १७. लीलामानवाचा आचार.

सुश्रीमंतकरा[1] या स्त्रीरत्नासह मणि स्यमंतक राया !
येइल, तें आळ सरे, स्मरतां यश, कीर्तनीं, हरिल आळस रे !. २५
मृतपुत्रोपादानें[2] विप्र सुखाविजेल विष्टपोपादानें[3].
पिडिल जगा, तव सोंगा घेउनि पौंड्रक, तदंतें[4] गात वसों गा !. २६
मग जळतां काशिपुरी, तव शक्ति कळेल सर्व लोकासि पुरी.
तुज भवगदवैद्यातें[5] गातिल कवि, मारितां मखीं चैद्यातें[6]. २७
हरि ! दंतवक्त्रनिधना करिशिल तूं शंकरादिसर्वमुनिधना !
श्रीद्वारकेंत वसतां, चरितें गायीन, ऐकवीन तव सतां[7]. २८
वरि धनंजय, साच द्वेपिहविप्राशनीं[8] धनंजयसा[9] च;
तूं हि समीरण या गा ! सारथि, पाहेन दास मीं रणयागा. २९
हरिलें महिमानस[10] तां, कवि जगति न, हा प्रसिद्ध महिमा नसतां.
आतां कां मन करणें[12] न वळति ? भजकांस अन्य काम न करणें.' ३०
अंशु[13] वना रदनाचे[14] प्रभुच्या धवळिति; नमूनि नारद नाचे;
कीं, न तसा दास, कळा हे हरिची, पात्र सुप्रसादा सकळा. ३१
चिंतित वदना रदनद्युतिसुभगा जाय, परि मनें, नारद न.
रिझवि रमावल्लभ या, सूचकतेच्या[15] मुनी धरि न वेल्ह[16] भया. ३२
सेवित चिद्रसवर्षिप्रभुगुण[17] गेल्यावरि स्वपुत्रभवर्षि[18],
ये चारित पशु भवन श्रीचें पदिं; काय हो ! करि तप शुभ वन ? ३३

---

१. अत्यंत शोभादायक अशा हातीं. २. [ गुरु सांदीपनीचा ] मृत पुत्र दिल्यानें. ३. त्रैलोक्याचें आदिकारण अशा कृष्णानें. ४. [ कृष्णाचें सोंग घेऊन मी च कृष्ण म्हणून मिरवणाऱ्या ] त्या पौंड्रक राजाचें मरण. ५. ह्या ठिकाणीं 'गज' असा हस्तलेखपाठ आहे. पण तो सदोष असावा. ६. चेदिदेशाचा राजा शिशुपाल यास. ७. साधूंस. ८. शत्रुरूप होमद्रव्य प्राशन करण्याविषयीं. ९. अग्नीसारखा. १०. पृथ्वीवरील लोकांचें अंतःकरण. ११. त्वां. १२. इंद्रियें. १३. किरण. १४. दांताचें. १५. चहाडपणाच्या. १६. वाळभर हि. १७. आनंदरसाला वर्षणारे प्रभूचे गुण. १८. आपला पुत्र ब्रह्मदेव त्याचा मुलगा नारदऋषि.

फलसुम[1]पल्लवजाती घेती, चारीत धेनु बल्लव जाती.
पर्वतसा[2]नूंत नसे भय, होति विनोद मानसा नूतनसे! ३४
हरिसह कौतुकरीती एक असा खेळ तोषहेतु करीती;
किति जाले हो! पा[3]ळ, स्वांगें किति मेष, चोर किति गोपाळ. ३५
चोरिति ते मेषांतें, जे घेते तस्कराचिया वेषांतें.
हांसविति विनोदानें सगुणब्रह्मासि गोप हे मोदानें. ३६
त्यजुनि भयास, मयाचा सुत ये व्यो[4]माख्य विघ्न या समयाचा;
घे बल्लववेष हरिप्रियसख [5]जे ते समस्त तो मेष हरी. ३७
चोरी ज्या, त्यास दरीमध्यें घाली [6]नगाचिया हा सुंदरी;
सुख झांकि घनें उपळें; पुनरपि ये तो दुज्यासि [9]अघ नेंड पळें. ३८
हरि पशुपां, चपळा या न सुचे, उरतां हि च्यार पांच, पळाया;
हा एवंच करानीं प्रभुच्या मरणार साधुवंचक रानीं. ३९
साक्षी चिन्मय भूतें धरि, याविण गति नसे क्वचिन्मय[10]भूतें.
कोठें खळ पळविल या कृष्णधना ज्याचिया नको पळ विलया? ४०
कृष्ण धरि व्योमातें; व्यापी, वाढोनि, तो अरि, व्योमातें;
जरि हा बहुबळ कटकीं असुरांच्या तरि [11]मधुघ्नभुज बळकट कीं! ४१
काळविलोकित वांचे, न परि तगति जीव हरिपुढें कितवांचे.
[12]पावे, अनसुट केला, काळाधीशें हि केंवि जन [12]सुटकेला? ४२
खळवधकाम खरी ती पशुमृतिची दावि बाळकां [13]मखरीती.
शिवसेव्यपदांबु कलित्रासद त्या दे[14]खतां दिवि[14]षदां बुकली! ४३

---

१. फळें, कोळीं पानें व फुलें यांचा समूह. २. पर्वतशिखरीं. ३. मेंढपाळ. ४. व्योम नांवाचा राक्षस. ५. जे हरिसख मेष ते तो हरी-पंत. ६. पर्वताच्या. ७. साधूंचा शत्रु. ८. बळकट अशा दगडानें. ९. पापी, दुष्ट. १०. मयासुराच्या मुलाला. ११. मधुसूदन कृष्णाचा भुज. १२. अन्वयार्थ—काळाधीशें हि (कृष्णें) अनसुट केला (धरलेला) जन केंवि सुटकेला पावे? १३. यज्ञरीति. १४. देव पाहत असतां.

जो साधुजनीं श्वा सद्द्वेष्टा तो मारिला विगतनिःश्वास.
ज्यां स्वपदीं विश्वास प्रभु तारी त्यांसि, करि सुखी विश्वास. ४४
उघडुनि गुहापिधान[1], श्रीपति घे दुर्लभ स्वभक्तनिधान.
म्हणत 'नमस्ते' नाचे सुरजन, वर्णूनि भुज यम[2] स्तेनाचे. ४५
त्या दासां गडियांचें स्तोत्र रुचे बहु भवाब्धिसांगडियाचें[3].
निवती असु खेंवे[4] ची ब्रह्माच्या; प्राप्ति सर्व असुखें वेची. ४६
जातां याला गेहा, म्हणति सखी, "प्राणनाथ आला गे! हा;
नें म्हणा कां वो! वाळा विरहें कां? 'कांतपादुका वोवाळा'?[5] ४७
आलों मुनिसीं समते[6]; त्यां आम्हां दिननिशाव्यवस्था[7] सम; ते
आश्रित सत्यानंदा[8] ते, आम्हीं टाकिला सकळ गृहधंदा. ४८
निंदास्तवनीं समता त्यां परि आम्हां नसे अहंता, ममता,
ते नित्यसुखी लोकीं; आम्हीं च कशा निमग्न होतों शोकीं? ४९
ते मुरली हे वाजे, धरि हरिदंतच्छदामृतीं[10] हेवा जे;
वंशभवा[11] खरि; असुनीं विपक्ष[12] हित कथि; म्हणे, 'पुजा हारि असुनीं[13].' "५०
ऐसें बहु नवसानीं गोपी पाहति हरीस रव्यवसानीं[14],
ज्यांला शिव! शिव! सानीं[15] कल्पशतें[16] दाविलीं विरहदिवसानीं. ५१

---

१. गुहेचें आच्छादन. २. चोराचे [साक्षात्] यम च. ३. सखा व संसार-रूप समुद्रांतून [तरून जाण्यास तयार केलेला] सांगाडा (ताफा) च अशा कृष्णाचें. ४. खेंवें=आलिंगनानें. ५. अन्वयार्थ—विरहें कां वाळा (वाळतां)? 'कांत-पादुका वोवाळा (प्रियकर कृष्णाच्या चरणास ओवाळा)' [असें] कां वो (अहो!) न म्हणा (म्हणत नाहीं)? ६. साम्यतेस. ७. रात्र आणि दिवस ही व्यवस्था. ८. सत्य व आनंद एतद्रूप कृष्णास. ९. मुनि. १०. कृष्णाच्या अधरामृतीं. ११. वेळूपासून झालेली [पक्षीं] सत्कुलोत्पन्न. १२. शत्रु. (हरीच्या अधरामृतीं हेवा धरी म्हणून). १३. प्राणांहीं. १४. सायंकाळीं. १५. लहान. १६. शेकडों कल्पकाळ.

# अध्याय अडतिसावा.

केशिविनाश सकाळ[1] स्वभुजें करि देव दाससाध्वसकाळ[2];
मग भेटे नारद या, व्योमवधें त्यावरी करि अपार दया. १
त्या चि गुरुपदां सांजे अक्रूर नमी; वरीं सकृप दासां जे.
मूर्त पुरमनोरथ[3] वा वृष्णिमनांचा[4] चि ये प्रभुसमोर थवा! २
राशि तपाचा राया! आला अक्रूर हरिस पाचाराया;
प्रेषि स्वपतिस काय श्रीमथुरा मूळ[5] सात्त्विकौघ[6] सकार्य[6]. ३
अक्रूर रथावरुनी व्रजासि येतां सुरस्तुतपथा[7] वरुनीं,
चिंति मनांत नतरार्तिप्रद[8] ऐसें, ज्यांविणें[9] जनांत न तरती. ४
'कंसाचें आग मनीं नाठवि हा; गोकुळाचिया आगमनीं
सुमहाभाग वतन मीं पाहेन,' म्हणे; नृपां[10] हि भागवतें[11] नमी[11]. ५
'आणाया शिशु भाचे मज पाठवि, लाभ फार याशि शुभाचे;
ते पाहिन पाय महासुखनिधिचे; मजवरी करि कृपा यम[12] हा[12]! ६
काय मला पदरींचें सुकृत, कळेना चि; कलिमलापदरींचें[13]
चिद्रसदां[14] चरणाचें दर्शन! हें फळ तरी सदाचरणाचें. ७
विषयीं मन वावरतें, प्रेम स्त्रीपुत्रवित्तविभवावरतें,
त्या तुज हरिभेटि कसी रे अक्रूरा! न तज्जनसभे टिकसी? ८
दुर्लभ सत्सुगमाचें[15] दर्शन मज, शूद्रसंभवा निगमांचें[16]
उच्चारण जेंवि; कसे पद नयना दिसति, या तमीं[17] जें विकसे[18]? ९

---

१. सकाळीं. २. दासांच्या भयाचा काळ. ३. मूर्तिमंत नगराचे मनोरथ. ४. यादवांच्या मनांचा. ५. बोलावणें. ६. मूर्तिमान् सात्त्विक भावाचा ओघ च. ७. देवानीं स्तविलेल्या मार्गाला. ८. शरणागतास प्रियकर (कृष्ण). ९. कृष्णाविणें १०. राजा कंसाला. ११. भगवद्भक्त अक्रूर नमी (नमस्कार करी). १२. यमासारखा क्रूर असा हा कंस. १३. पातक आणि विपत्ति यांचा शत्रु (कृष्ण) त्याचें. १४. ज्ञानांनद देणाऱ्या. १५. साधूना सुलभ अशा कृष्णाचें. १६. वेदाचें. १७. अज्ञानांधकारांत. १८. वाढे. (वचनांतर झालें असावें असें वाटतें.)

उत्साहें स्वमनींचा वाटे भेटेल मज नरोत्तम नीचा.
सरिता हरिती[1] राशी[1]; लागे तृण त्यांत एक तरि तीराशी. १०
सरलीं सारीं दुरितें, जन्म सफळ आज; दुःख गेलें दुरि तें;
जीं ध्याति मुनिजनमनें हरिपदनलिनांसि करिल शिर निज नमनें. ११
पूजिति विधिसुर ज्यांतें, सेविति सात्वत[2] रमा मुनी सुरज्यांतें[3],
पशुमार्गे पदनलिनें फिरति वनीं, गोप्युरोजकुंकुममलिनें[4]. १२
भुलली ज्याच्या रुचितें श्रीभ्रमरी हरिमुखांबुरुह[5] चारु चि तें!
या दृष्टिस उजविलसे[6] शकुन, हरिणपंक्ति माजिया उजवि लसे[7]. १३
जालासे अज नरसा रक्षाया, स्वपद दाउनि, स्वजन रसा[8].
स्वनयनयुग रुचिरंत[9] मीं जडतां, मानीन सफळ त्या रुचिरंतमीं[10]. १४
करिती महि, मानवते[11] धरुनि, सुखी; दाविति स्वमहिमा नव ते.
पाहुनि भाउ[12] तरेन; त्यजुनि रथ, धरूं पदा शुभा, उतरेन. १५
सारसंभव[13] हर पाया ज्या चिंतिति त्या नमीन भव हरपाया[14].
कुंकुम माथांनींचें[15] ज्या, कर तो पाविजेल माथां [16]नीचें. १६
प्रणतांचा दर वारी, भूप्रद[17] बळि ज्यांतें[18] सोडि सादर वारी[19],
भजकजनवनवसंत[20] प्रभुकर, वर वारिति जेथ नवनव संत. १७
जातों कंसाकडुन, स्वांतीं वाटेन यदुवतंसा कडु न;
कीं, क्षेत्रज्ञा[21] त्याला तत्व कळे सर्व ईश्वरा ज्ञात्याला. १८

---

१. ढीगच्या ढीग [वाहून नेतात]. २. यादव. ३. चांगली आहे धूलि ज्या ठिकाणीं [अशीं पदनलिनें] त्यांतें. ४. गोपींच्या स्तनांवरील कुंकुमानें मलिन झालेलीं. ५. कृष्णमुखकमल. ६. कृतार्थ करितील असे. ७. शोभे. ८. पृथ्वी. ९. तेजाचे ठिकाणीं रत. १०. अत्यंत सुंदर अशा कृष्णाचे ठायीं. ११. मनुष्यत्वास. १२. राम, कृष्ण. १३. कमलोद्भव ब्रह्मा. १४. दूर व्हाया. १५. लक्ष्मीच्या स्तनावरील. १६. नीच अशा म्यां. १७. पृथ्वीदान करणारा बळिराज. १८. त्या हातावर. १९. उदक. २०. भक्तजनरूप अरण्यांतील वसंतऋतु. २१. क्षेत्र=शरीर, त्यास जाणणारा तो क्षेत्रज्ञ आत्मा.

मैनिं आलिंगन मा जें इच्छी, तें राहवील लिंग न मार्जे[१].
करिल पवित्र वपु; निवे चकोरसंताप जो क्षुदुद्भव[२] पुनिवे[३]. १९
ज्यास विबुध भजतात ब्रह्मादि प्रभु म्हणेल तो मज 'तात'!
ईश्वरकृतसन्मानप्राप्ति फळ तदन्य[४] जंतुच्यां[५] जन्मा नें. २०
प्रिय अप्रिय, हित अहित, प्रभु या भावें करूनियां जरि रहित,
सुरतरुसा निजभजकां सत्फळ दे; विषम[६] होय यास्तव अज कां? २१
राम भगवदग्रजनीं[७] देयिल आलिंगनें सुख, समग्र जनीं;
सदनीं मज धरुनि करीं नेयिल सत्कार करिल निजजननिकरीं[८]." २२
ऐसें चिंतित काया विसरे; न कळे चि मार्ग तो तितका या;
पावे अस्तास रवी; व्रजा हि हां[९]; मार्गदैर्घ्य[१०] चिंतीं[११] सरवी. २३
तों पाहे, अवनितळीं अमृताचीं भवदवार्तजगदवनिं[१२] तळीं,
कृष्णपदें ज्ञानिहितें[१३], ज्यांतील रजें[१४] हरादिचूडानिहितें[१५]. २४
ज्यांहीं च धरित्रि दिवा रात्रि विभूषित, मनांत न धारि त्रिदिवा[१६];
ज्यां पविपद्मयवांचे[१७] अंकें[१८], न यन्नतजनाघसंचय[१९] वांचे. २५
आठां[२०] ही भावांचा अक्रूर निवास सात्विकां[२०] भावांचीं[२१]
वंदुनि माथां, घोळी तीर्थपदरजांत तनु, करी आंघोळी. २६

---

१. लक्ष्मी ज्या शरीरास आलिंगण्यास इच्छिते तें शरीर माझें लिंग (दोष) हरील. २. भुकेपासून झालेला. ३. पौर्णिमेस. ४. [ तें च एक फळ; ] त्यावांचून अन्य असें [ कोणतें हि ] फळ नाहीं. ५. प्राण्यांच्या. ६. यास्तव ( असा सर्वत्र सम आहे म्हणून ) अज ( भगवान् कृष्ण ) विषम ( कठोर, निष्ठुर ) कां होय ! ७. कृष्णाचा वडील बंधु. ८. आपल्या भक्तसमूहांत. ९. अक्रूर [ पावे ]. १०. रस्त्याची लांबी. ११. [ वरील सर्व ] चिंतन. १२. संसाररूप अग्नीनें पीडिलेल्या जगाच्या रक्षणासाठीं. १३. ज्ञानी लोकांस हितकर. १४. धूलि. १५. शंकरादिकानीं आपल्या मस्तकावर धारण केलेलीं. १६. स्वर्गा. १७. वज्र, कमल व धान्यविशेष यांचे. १८. चिन्हें. १९. ज्याच्या शरणागतांचा पापसमूह. २०. आठ हि सात्विक भावांचें निवासस्थान असा अक्रूर. २१. रामकृष्णांचा.

सेवी साधू लीलानरतीर्थपदांचिया[1] असा धूलीला;
फळले कृष्णवसंतें मनिं लावियले मनोरथद्रुम संतें[2]. २७
न श्रुत मोहस्थानीं[3] जे ते बळकृष्ण धेनुदोहस्थानीं[4]
देखियले भागवतें[5] सहज नतें; अन्यथा[6] न कां भागवतें[7]? २८
श्रीमृगमदकापुर[8] ते निववीति गुणपरिमळें स्वभजका पुरते;
नित्यनवश्रीनिलयें[9], संदळिहितें[10], दिव्यपुंडरीककुवलयें[11]. २९
श्वेतश्यामळ, लीलानिधि, जे दिसती न दृष्टिला[12] मळलीलां[12],
यमुनासुरसरिदोघ[13] व्रजा प्रयागा चि आणिती सरि[14] दोघ. ३०
वर्णें सरसा[15] रूप्या पांचूच्या[15] धरिति धरणिधरसारूप्या[16];
असितीं[17] पीतीं[17] चेलीं[17] ल्याले; सौंदर्य न वदवे वाचेला. ३१
भय ज्यांचें रिपुकटकीं, प्रलंब[18] भुजदंड पीन[19] शोभति कटकीं[20];
असुरांचें उर गांजे यत्स्मरणें, वर्ण्य करिकरां[21] उरगां[22] जे. ३२
लोकत्रयनेत्यांचीं[23] श्रीकेलिगृहें[24] चि वदननयनें, त्यांचीं;
त्या चि कृपाकासारीं जनिं[25] अमृतें भजकचंचरीका[26] सारीं[27]. ३३
अवलोकन गेह; वसे तेथ कृपा; पुरवितां न भागे हवसे[28];
विश्वघटाचें निवणें[29] प्रेक्षण तें; सहज जेथ तसें निवणें. ३४

---

१. लीलामानव जो कृष्ण त्याच्या [ साक्षात् ] तीर्थ [ च ] अशा चरणाच्या. २. साधूनें. ३. मोहांत पडलेल्यांनीं. ४. दूध काढण्याच्या ठिकाणीं. ५. नम्र अशा भगवद्भक्त अक्रूरानें. ६. नम्र नसता तर. ७. कष्ट पडते. ८. [ साक्षात् ] कस्तुरी आणि कापूर [ असे ते बळराम व कृष्ण ]. या ठिकाणीं रंगावरून साम्य आहे. ९. नित्य नूतन अशा कांतीचीं स्थानें. १०. साधुरूप भ्रमरांस हितकारक. ११. तेजस्वी अशीं शुभ्र व कृष्ण कमळें. ( अनुक्रमें राम व कृष्ण ). १२. पापी दुष्टांला. १३. यमुना व भागीरथी यांचे ओघ च. १४. बरोबरी. १५. सरस अशा रुप्याच्या व पाचूच्या. १६. पर्वतसाम्या ( ते रामकृष्ण वर्णें धरिती ). १७. कृष्ण व शुभ्र वस्त्राला. १८. लांबसडक. १९. पुष्ट. २०. कडयांनीं. २१. हत्तीच्या सोंडेस. २२. सर्पांस. २३. त्रैलोक्यनायकांचीं. २४. शोभा किंवा लक्ष्मी यांचीं क्रीडास्थानें. २५. जगामध्यें. २६. भक्तरूप भ्रमरास. २७. सर्व. २८. हौस. २९. घट ठेवण्याकरितां केलेलें गवताचें बेटोळें.

श्रीमद्वदनेंदु, सरें[1] स्मितामृताचीं; तुळे[2] न वचनें दुसरें;
सन्मानसयादां[3] तीं पोषिति सितपद्मखगसमुदया[4] दांतीं[5]. ३५

सुमतुळसीहार गळां चित्तभ्रमरां[6] विमोहिती बारगळां;
सेऊनि त्या सुपरिमळा, देवांचा इच्छिती न त्याउपरि मळा[7]. ३६

मृगमदसत्तिलकांहीं[8] ऊरविला न मद शशिमनांतिल कांहीं;
स्तविजे चंदन काय स्वांगें जो निवविं नंदनंदनकाय[9]? ३७

हरि पापदरा, जीवीं ध्यातां यद्रज, अशा सुपदराजीवीं[10]
ध्यावे निशिदिनिं शांतें ध्वजवज्राद्यंक[11] शंकरादिनिशांतें[12]. ३८

शुभवासारिं दोघांतें प्रेक्षुनियां त्या दयैकसरिदोघांतें[13],
उतरे यानावरुनीं[14], वस्त्रादि स्रस्त[15] जें तया नावरुनीं. ३९

पदसुखनिधिकल्लोळ प्रेम[16] सखा; सूचवी तया कीं 'लोळें[17].'
हें[18] स्नानीं, पानिं बरा उपदेशें, क्षय[19] पळांत तापा निबरा[19]. ४०

दे परिरंभण गा! तें जें दुर्लभ इंदिरेस त्या भिणगातें[20];
जाला आपण साचा रोमांचित सुरगुरू सखा पणसाचा. ४१

त्या सकृपा दासाचें आलिंगन सुखद, तीर्थपादा[21] साचें!
दाटून गळा, याचे नेत्रांतुनि अश्रुबिंदु न गळायाचे? ४२

राम तया धरि वत्सीं[22], चिरदृष्टीं[23] धेनु जसि दया करि वत्सीं.

---

१. हास्यामृताचीं सरोवरें. २. तुलनेला. ३. साधूंच्या मनोरूप जलचरांस. ४. शुभ्र कमलें आणि पक्षिसमुदाय (हंसाचा समूह). ५. दांतानीं. ६. उनाड फिरणाऱ्या. ७. नंदनवन. ८. कस्तुरीच्या उत्तम तिलकानीं. ९. नंदपुत्र कृष्णाचें शरीर. १०. सुंदर चरणकमलावरील. ११. ध्वज, वज्र इत्यादिकांचें चिह्न. १२. शांत अशा शंकरादि. १३. केवळ दयानदीचे च ओघ अशा त्या दोघांतें. १४. रथावरून. १५. विगलित. १६. चरणसुखाच्या समुद्राचे कल्लोळ च असा प्रेमरूप मित्र. १७. लोळण घे. १८. हा स्नान पान वगैरे बरा उपदेश आहे. १९. [कारण या उपदेशानें] पळांत निबरा (कठिण) तापा क्षय [होय]. २०. भिकाऱ्यास. २१. कृष्णास. २२. [लक्षणेनें] हृदयीं. २३. पुष्कळ वेळानें पाहिलेल्या.

मिळला दीन उरा या प्रभुच्या वर्षोपळ[1] हृदीं न उराया[2]. ४३

तो दास खरा मानें तोषविला वडिल दीनसखरामानें;
भक्त सुखाकर[3] केला, भेद नसे सर्वतोमुखा[4] करेंकेला[5]! ४४

दाखविती लोकारिती, पूजुनि गुरुसा कृतार्थ बहु तो करिती.
प्रेमा सज्जनिं त्यानीं आत्मगत प्रकटिला जगज्जानित्यानीं. ४५

गेह सदा नंदाचें वैकुंठ; स्थान तें सदानंदाचें[6].
स्थैर्य अदभ्र[7] मनासी; भगवद्भागवतसंगम श्रम नाशी. ४६

विश्रम[8] हा नंदानें जेवविला भागवत महानंदानें.
पुशिलें स्वसुहृद्वृत्त स्वांतीं[9] नाणून कंस तो उद्वृत्त[10]. ४७

'मृतिदायक सापाची छाया भेकां[11], अवीस[12] हि कसापाची[13];
ज्या कंस विभू[14] तगणें कैसें त्या वृष्णिभोजसंभूतगणें[15]? ४८

कोण नृपा पातेजे[16] जो वधि भगिनीप्रजा अपापा[17] ते जे?
निद्रालाभ व्यसुचे या डोळे न वारितां मला भव्य सुचे.' ४९

नंदाची असि कानें सेउनियां सत्यवाक्सुधा रसिकानें,
त्यजिला दीनपतीनें[18] श्रम; वश ज्याला जगन्निदान पतीनें[19]. ५०

---

## अध्याय एकोणचाळिसावा.

कंसें जो धांवडिला, प्रेमें ही त्या विशुद्धबोधा[20] वडिला
पर्यंकीं निजवीती; ज्याचे, भुवनें अनेक, पद निज, वीती. १

---

१. पावसाळ्यांतील गार. २. वितळून जाण्यास. ३. सुखाची खाण. ४. विश्वमुख अशा कृष्णास. ५. गारेला. ६. सज्जनांचा आनंद जो कृष्ण त्याचें. ७. पुष्कळ. ८. श्रमरहित झालेला. ९. चित्तीं. १०. उद्दाम. ११. बेडका. १२. बोकडांस. १३. कसायाची. १४. राजा, मालक. १५. वृष्णि आणि भोज यांपासून जहालेल्या लोकसमूहानें. १६. विश्वासिजे—**पंत**. १७. निष्पाप, निरापराध. १८. अक्रूरानें. १९. मानानें, अब्रूनें. २०. विशुद्ध बोध[ज्या]स त्या अक्रूरा.

कृष्ण म्हणे, ' हो तात ! स्वजनकजननीस कष्ट बहु होतात;
देतो नृप जो नीच श्रम, ते मीं च स्वयें च उपजोनीं च. २
उद्भव[1] हा ! हा ! काय ! स्वाप्तां[2] श्रम देतसे महा हा काय !
अशुभांचा हा निकर, स्वजना सर्वांस नुपजतां[3] हानिकर. ३
न मनीं[4] अर्ध[5] मामातें, स्पर्शे बंधुघ्नभाव[6] अधमा मातें.
यदुकुळगदनृप[7] जागा मदपथ्यें; दोष माजिया उपजों[8] गा. ४
मति वधकामा[9] ज्यां चि स्वप्रभवें[10] केलि घातका माम्याची;
येतों ना उदरासी, गुरु[11] खेदाचा न देखते उदराशी[12]. ५
तव दर्शन बा ! पांचा प्राणा सुखलाभ; हा जननिबापांचा
नाम[13] चि भेद जिभे दे; तुमचें आत्मैक्य तें कसें आजि ! भेदे? ६
ताता ! सांग मनाचें इच्छित, कारण मला तवागमनाचें;
ऐकावा तो कानीं सारा वृत्तांत तेथिला तोकांनीं[14]. ' ७
धृतवारिरुहर्यंकीं[15] स्वकरीं चुरितां स्वभक्तपद पर्यंकीं,
पुशिलें कोमल तातें विधिच्या; फळ भक्ति दे, न सोमलता[16], तें. ८
ते सुभगौ[17] ' वदा ' ज्ञाते[17] बंधु[17] म्हणाति; तों करी भगवदाज्ञा ते.
सांगे सहस्रशीर्षा पुरुषा स्वागमनहेतु[18] कंसचिकीर्षा[18]. ९
ऐकुनि महानुभावां[19] हांसें ये फार रामकृष्णां भावां.
कीं, तो पामर दीन ' स्वबळें चि ' म्हणे, ' त्रिलोकपा मरदीन !' १०

---

१. [ माझा ] जन्म. २. आपल्या आप्तइष्टाना. ३. उपजला नाहीं तों च. ४. मानतों, किंवा [ तूं ] मान. ५. नीच. ६. बंधुघ्नता. ७. माझ्या [ च ] अपथ्यानें यादवांच्या कुळाला रोग च असा राजा कंस जागृत आहे. ८. जन्मा. ९. वधेच्छु. १०. आपल्या जन्मानें. ११. आईबाप. १२. समुद्र. १३. [ तुझें ] नांव. ( तूं नांवानें केवळ वडिलांहून भिन्न आहेस, हा भाव ). १४. [ आम्हीं जीं ] लहान मुलें त्यानीं. १५. कमल, चक्र हीं चिन्हें धारण केलीं ज्यानीं अशा. १६. सोमवल्ली. ( हिच्या रसाचा उपयोग यज्ञांत होतो ). १७. भाग्यवान् व ज्ञाते बळकृष्ण. १८. कंसाची इच्छा [ हें ] आपल्या येण्याचें कारण. १९. महातेजस्वी अशा.

मग भोजवतंसाची, आज्ञा नंदासि कथिति हे कंसाची;
कीं, 'अक्रूर वहाया आला, मथुरेंत चापयाग पहाया.' ११
'घेउनि गोरस जावें, कारितो नृप चापयाग थोर; सजावें;
अक्रूर वहायाला आला, जावूं समस्त हि पहायाला.' १२
व्रजरक्षाधिकृतातें[1] केली आज्ञा असी च माधवतातें,
तो घोष करि असा, 'रे! मथुरे जायासि सर्व सिद्ध असा रे!' १३
परिसुनि हा हाकारा[2], व्रज जाला गोपिकांसि हा! हा! कारा.
हा वृत्तांत हरि बळां, 'आला अक्रूर न्यावयासि हरिबळां.' १४
गोष्ठि नव्या परिसे जे ते स्त्री गणि तापल्या तव्यापरि सेजे.
होय तनू निज लाहे[3], मूर्छेवांचूनि कोणती निज लाहे[4]? १५
तो दुःसह रायाचा[5] न, यमाचा दूत जीवन हरायाचा.
स्त्रीमानिं बहु धाक सिरे; म्हणति, 'विधे! लिहिलि हानि अबुधा[6]! कसि रे!?'
'धरि नामा दुसरी, ती लोपुनि, अक्रूर, कपटमांदुसरीती[7];
अथवा जन न क्रूर त्रिजगांत दुजा म्हणोनि हा अक्रूर[8]!' १७
'चोर, न साव; धरा हा; निश्चय निजधन हरील; सावध राहा;
कीं, अकृप दरवडा जी! घालुन मनिं सर्वतापपद रव डाजी.' १८
गळती कुंतळ[9] पट हो!, स्त्री म्हणता, अक्रुरा! तुझें तळपट हो;
हरिसी कामसणास[10] द्रेष्ट्या! गेलासि तूं न कां मसणास?' १९
'मनिं कोप हि लेंकांहीं नंदाच्या धरियला, न पाहिलें कांहीं
सख्य स्मरति, न वसती आम्हांहुनि सुंदरी पुरींत[11] नवसती? २०
हे दोघे भाउ दया करितिल; यांची मुखेंदुशोभा उदया
मनिं आणिल रतिपां[12]; तीं त्या स्त्रींचीं कां लवों न विसरति पातीं? २१

---

१. गोकुळ राखण्यासाठीं नेमलेल्या अधिकाऱ्यास. २. हाकाटी, दवंडी. ३. लाही. ४. पावे. ५. राजा कंसाचा. ६. दुष्टा! ७. वी (प्रसिद्ध) कपटमांदुसरीति (कपटाच्या पेटीचा प्रकार) लोपुनि दुसरी 'अक्रूर' नामा धरि. ८. 'अक्रूर' हा शब्द. ९. केस. १०. मदनोत्सव अशा कृष्णास. ११. मथुरानगरींत. १२. मदनास.

स्फुरतां भुज वामाक्षि[1], प्रमुदित असतील सर्व पुरवामाक्षी[2];
समयीं गोदोहाचे[3] स्वप्न हि सूचक सुलाभ संदोहाचे! २२
भाग्यें लक्ष्मीसम या स्वोभयकुळमंदिरींचिया मणिसमया[4],
ज्या हरिमुख पाहतिल स्तंभें[5] चित्राकृती तशा राहतिल. २३
त्यांचे सुविलास गळा धरितिल हरि मोहितील महिला सगळा;
त्याग कसा करवेल स्त्रींचा यां[6]? सोडि न तरुचा कर वेल. २४
हा जन[7] रानट काय! स्त्री त्या चतुरा, हरी बरा नटकाय[8].
मिळतां नयना[9] नयन, व्रजपत्यनधीन पुत्रनयनानयन[9]. २५
अस्मत्प्रेमा[10] अळणी[10], कीं आम्हीं वनचरी प्रसिद्ध गवळणी;
प्रेमा त्यांचा[11] लवणें युक्त चि, लागेल माधवा चालवणें. २६
हे सजतां तडक, रिती दाखविति नवी च; गोप तांतड करिती.
प्रिय[12] न वदावे, दारप्राणहर[13] प्रकट अदय दावेदार. २७
अंध[14] निजस्थविर[14] हि तद्दोष असो हा जन व्रजस्थ विरहित.
न जगे चि असें तरुणीं न देखिजे डोळसीं खळीं निष्करुणीं? २८
वेष प्रिय सावांचे; रिपु चोर चि हे; वधूजन कसा वांचे?
मान चि कापलि; केला घात खरा, दाखवूनि आपलिकेला[15]. २९
राक्षस, मानवधव[16] ते नव्हति; इतरथा स्वदार यां न वधवते.
कीं कंसपुरा रिपुसे प्राणधना नेति, कांहि न मुरारि पुसे! ३०
अक्रूरासह साची जायाची सिद्धता कसी सहसा चि
केली? आम्हां तारा; न निघे हा; नंद विचळला म्हातारा. ३१

---

१. डावा डोळा. २. मथुरेंतील स्त्रिया. ३. गायींची धार काढतेवेळीं (पहाटे) [पडलेलें] स्वप्न उत्तम लाभांच्या समूहाचें सूचक असतें. ४. रत्नजडित समया. ५. तटस्थपणें. (हा एक सात्विक भाव आहे). ६. या कृष्णाला. ७. आम्ही गोपीजन. ८. नटाप्रमाणें शरीर ज्याचें असा. ९. [त्या स्त्रियांच्या] दृष्टीला [कृष्णाची] दृष्टि मिळाली असतां [नंतर] पुत्राचें (कृष्णाचें) नेणें व आणणें नंदाचे स्वाधीन नाहीं. १०. आमचें प्रेम गोडीविरहित. ११. मथुरेंतील स्त्रियांचा. १२. प्रियकर. १३. स्त्रियांचे प्राण हरण करणारे. १४. आंधळे [असे कोणी] आपले वृद्ध. १५. आपलेपणाला. १६. मनुष्यपति.

न म्हणे बाइल याला कीं, 'ठेवा रामकृष्ण' बाइ! 'लयाला
व्रज जातो हा;' नीति त्यजिलि; यशोदेसि लाभ जी हानी ती. ३२
जरि हृदया त्रासाची झळ झोंबति, राहती च यात्रा साची.
हें निघणें तों, डास व्याळ न घे, विघ्न दाविना तोंडास[1]! ३३
मेघसखी[2] देवी जे ती पडती, परि न मति विधी दे वीजे;
जरि एखादा मरता, तरि म्हणता, नंद 'विघ्न[3] जाला, परता.' ३४
जाउं न द्यावा हा, या पथिं लावूं अश्रुच्या नद्या वाहाया;
दृढ कास धरुं धिराची; घालुं बरी आण हरिस गळरुधिराची[4]. ३५
भय न धरा लेश; पथीं वारूं; हरिपाय काय चाले शपथीं?
माथां पाय नमुं, रडों; मग तरि हि म्हणेल कृष्ण काय न 'मुरडों[5]'? ३६
गुरुपितृपतिसुतह्रीतें[6] भूषण म्हणती कुळस्त्रियांस, तऱ्ही, तें
दूषण; कीं अंत रतिप्रदपदविरहें[7] इणें सुखें अंतरती. ३७
हरि गेल्यावरि, साचें होइल भांवंड वडिल पळ[8] वरिसाचें.
सरल्या जरि तेल, टिके दीपार्ची, म्हणति बोल तरि ते लटिके. ३८
व्रज विषपाथोराशी[9] होइल, विधु करिल आंतपा[10] थोराशी.
तापजनक वणवा गे! मारुत, जीवंत मग जन कवण वागे? ३९
मागावें सखि! तपतां[11], 'देवा! देवूं नको मृतीस, खितपतां[12].'
भाजिल विरहानल गे! क्षणक्षणीं मृत्यु, ज्या उशिर हा नलगे. ४०
सुखकर परि हा रास, स्मरतां भाजील देह; परिहारास
नेणों त्या गे! हिंवसा[13] जो करिल हरीविणें; कशा गेहिं वसा?' ४१
ऐसी चिंता ज्या त्या स्त्री जागोजाग करिति भीरू जात्या;
अश्रुजळें जंबाला[14] करिति, पहाति व्रजीं न अवलंबाला[15]. ४२

---

१. आरंभीं च. २. मेघप्रिया वीज. ३. हा शब्द येथें पुल्लिंगी आहे. ४. गळ्याच्या रक्ताची. ५. मुरडूं या. ६. लज्जेस. ७. कृष्णचरणविरहें. ८. पळ हें वर्षाचें वडील भावंड होईल (वर्षापेक्षां हि विरहामुळें मोठें वाटेल, हा भाव). ९. विषाचा सागर. १०. तापास. ११. संताप झाला असतां. १२. हाल होत होत. १३. हिंवाप्रमाणें. १४. चिखलास. १५. आश्रयास.

वदनीं[1] हा रावा हे स्त्रीसंहति, तदुरें[2] अश्रुहारा वाहे;
प्रियविरह नको; मळकीं जालीं बहु आननें मनें कोमळ कीं. ४३
'साधुनियां कांबु[3] कसीं स्त्रीवृंदें रडवितोसि उकसाबुकसीं?
अक्रूरा! हा! हा! रे! तूजपुढें अंतक हि खरा हा हारे. ४४
तुजि सुखधामा! नवली[4] कसि फिरलि, जिला जगत्रयी मानवली?
जालें खरें[5] मृदु, धातें मन जेणें त्या विषत्व जेंवि दुधातें.' ४५
विरह जळा[6] यादासी हा; तापें लागल्या जळाया दासी;
जें नाहीं तेज[7] चिते तें दावी शीतमृदु हि जी सेज[8] चि ते. ४६
ओष्ठांतें वाळविती श्वासें; हरिला परोपरी आळविती;
करिती रोदन दीना कीं, पी अक्रूरघटज[9] मोदनदीना[10]. ४७
तापसमुदयास विता पावे अक्रूरमित्र उदया सविता,
भंगुनि आशे, वधिला स्त्रीजन; कीं हरि तदेकसुखशेवधिला[11]. ४८
प्राण चि हरि रामांचे[12] देह द्विविधौघ[13] मूर्त हरिरामांचे;
धरि मथुरापथ हा कीं श्वफल्कसुत[14] सूतें[15]; विभु म्हणे, 'रथ हाकीं.' ४९
रथिं वाहुनि चालविलें मूर्तव्रजभाग्य तें, जया पाळविलें[16]
मथुराश्रीनें पदरें, अक्रूरें निर्मळें विगततापदरें[17]. ५०
पाहुनि नाथरथरया[18], कांपति विरहें व्रजांगना थरथर या.
आत्मा यांचा हरि तो, त्यातें कीं कंसदूत देखत हरितो. ५१
'जाउ न तो रथ, परतो' स्त्रीमनिं हें; करें न दे[19] मनोरथ[19] परें[20] तो;
भ्रमती चिंतावर्तामाजि, म्हणे न हरि भय 'न चिंता; वर्ता[21].' ५२

---

१. हाय हाय! शब्दाला [वाहे]. २. त्या गोपींचें उर. ३. ताबा. ४. स्वभाव. ५. तीक्ष्ण. ६. जळासी. ७. चितेला. ८. शय्या. ९. अक्रूर हा च कोणी अगस्त्य-मुनि. १०. आनंदसागरास. ११. त्या (गोपींचा) एक च सुखनिधि (कृष्ण) त्याला. १२. स्त्रियांचे. १३. दोन प्रकारचे मूर्तिमंत देह. १४. अक्रूर. १५. सारथी. १६. बोलाविलें. १७. ताप व भय यांपासून मुक्त झालेल्या अक्रूरानें. १८. कृष्णाच्या रथवेगास. १९. मनोरथ हात न दे. २०. परंतु. २१. [स्वस्थ] रहा.

मागेंमागें दीना चालति; कीं आगमावधि[1] निवेदीना.[2]
श्रम हि दिला हो! पीनीं[3] वक्षोजीं, पारि न मानिला गोपीनीं. ५३
करुणाब्धि परिवृढ[4] वळे, कीं गोपीप्रेममंदरें[5] मनिं ढवळे.
रंजवि मानस यांचें, सादर पाहोनि सबहुमान सयांचें.[6] ५४
दूतमुखें सामातें[7] करि, 'येइन; कीं प्रिया बहु असा मातें;
प्रेम धरा, गे! जावें सदनातें; मजवरी न रागेजावें.' ५५
सांत्वुनि गेल्यावारि, त्या स्त्री धैर्यस्थैर्यलेश जाल्या वारित्या.
तनु[8] ठाकलिया, न मनें; हळु चालाया रथा करिति या नमनें. ५६
प्रार्थिति रथकेतूतें,[9] 'विलोकितां दूर दृष्टि न थके तूतें;
दिसतां दूर नदि, सरे तृष्णेचा क्षोभ; धीर धरु मन, दिस रे!' ५७
गोपजनवधू लीलानरतनुहरिरथसमुत्थनवधूलीला[10]
पीति; मन रमे; घाली त्या चातकतति[11] सुखांत ते मेघाली.[12] ५८
हरिरथपादरज्यांतें[13] पाहत होत्या दुरूनि सादर ज्यांतें,
तीं ही त्यांसि न दिसतीं; मग दुस्तर देखती स्वदुःखनदि सती. ५९
व्यग्र न हो स्वाधीनें[14] गोपीजन, म्हणुनि करुनि तत्स्वाधीनें
निजचरितें, हरि मधुरापथ धरि; तद्रुचि[15] वधूहृदय हरि मधुरा. ६०
लभ्य अनंततपानें जें कृष्णयशोमृतैकसंततपानें,[16]
प्रियविरहाग्नींत, गणें[17] गोपींच्या, देखिलें चि कांहीं तगणें.[18] ६१
मग जगदीश क्रमुनी पथ, अक्रूरास मज्जनीं,[19] शक्र मुनी
ज्या नत लाख, विभु वनीं यमुनेच्या तें स्वरूप दाखवि भुवनीं.[20] ६२

१. येण्याची वेळ. २. सांगेना. ३. पुष्ट स्तनानीं. ४. प्रभु. ५. गोपींच्या प्रेमरूप मंदरपर्वतानें. ६. सख्यांचें. ७. समजुतीतें. ८. शरीरें स्थिर झालीं; मनें न. ९. रथाच्या ध्वजातें. १०. लीलेनें मानवशरीर धारण करणाऱ्या हरीच्या रथानें उडालेल्या नूतन धूलीला. ११. [त्या गोपस्त्रियारूप] चातकपंक्ति. १२. [धूलि-रूप] मेघपंक्ति. १३. कृष्णरथाच्या चाकाच्या धूलीतें. १४. आपल्या काळजीनें. १५. त्या चरित्राची गोडी. १६. केवळ कृष्णयशोरूप अमृताच्या च नित्य प्राशनानें. १७. समूहानें. १८. जीवन. १९. स्नानाच्या वेळीं. २०. जलामध्यें.

'होयिल हानि खळा, या बाळांपासूनि केंवि ?' हा निखळाया
शंकाशंकु[1] अशेष, प्रकटी स्वाकार, ज्यास मंचक शेष. ६३
त्रिभुवनभासक लेश स्वजनमनीं धाक नुरवि हा सकलेश.
दावि पद समस्त वनीं, ज्याच्या ब्रह्मादि निरत परम स्तवनीं. ६४

## अध्याय चाळिसावा.

तो अघमर्षणसमयीं[2] अक्रूर बुडे ह्रदीं[3] निजानंदमयीं.
प्रेक्षि सदाराध्यातें[4], स्तवि भावें विश्व ज्या उदारा ध्यातें. १
तें शेषांकावरिलें[5] दावुनि निजरूप मागुती आवरिलें.
मनिं अक्रूर समजला, 'दे अळिस पदाब्जिचा विभू रस मजला.' २

## अध्याय एकेचाळिसावा.

मग यमुनाडोहातें त्यजि, विभुच्या शीघ्र कंस नाडो[6] हातें
म्हणउनि; उत्साहानें मथुरे सबळा सुवर्णवासा[7] हा ने. १
मथुरोपवनीं[8] टिकले तीचे पाटीरमृगमदाचे[9] टिकले[10].
सद्भ्रमरां[11] यश वास प्रिय ज्यांचा, तदितरास[12] काय शवास[13]! २
होतां कंसांत, वनप्रभवाक्ष[14] म्हणे, 'करूनि गुरुसांत्वन[15],
तवसदना मज कार्यानंतर येणें असे खरें भजकार्या[16]!. ३
अक्रूरा! जा गेहा; संकल्प स्वांतरीं बरा जागे हा,
न्यावें या याना हीं; विस्मृति तूझी मदाशया या नाहीं.' ४

---

१. शंकारूप खिळा. २. स्नानसमयीं. ३. आत्मानंदानें भरलेल्या डोहांत. ४. सत्पुरुषसेव्य अशा कृष्णातें. ५. शेषाच्या मांडीवरील. ६. निरुद्ध—नष्ट होवो. ७. पीतवासा कृष्णा. ८. मूळ पाठ—**यमुनोपवनीं.** ९. मूळ पाठ—**पाटीरकस्तुरीचे.** १०. [चंदन आणि कस्तुरी यांचे] टिळे. ११. साधुरूप भ्रमरांस. १२. दुर्जनास. १३. प्रेतरूपास. १४. कमलनयन. १५. वडिलांचें (वसुदेवदेवकीचें) सांत्वन. १६. भक्तश्रेष्ठा!

सुमहाभाग वतन तें साधूंचें नमि [1]शिरें सुभागवत [1]नतें;
पावुनि [2]भव्य, वसाया जाय पुरीं, करुनियां शुभव्यवसाया. ५

[3]सद्धृदयांबुजग [4]दिनव्ययसमयीं शकट उतरवि [5]त्रिजगदिनें,
[6]गोपबळासह मग ती मथुरा पाहों निघे [7]गजेंद्रसमगती. ६

जींत [8]कनकनगरीति प्रासाद अनेकविध असी नगरी ती,
कांचनसन्मणिखचितें भवनें; वैभव जगत्रयीं [9]अणिख चि तें. ७

ते यदुवासव तीतें पाहाति अमरावतीचिया सवतीतें;
[10]पुरयौवत [11]अभि रामा [11]कृष्णा [11]सादर [12]विलोकि त्या [12]अभिरामा. ८

रुचि अवलोकनिं, [13]वळघे सदनशिरीं; लाभ युवतिलोक निवळ घे;
ते क्षुधित चकोर सदा प्रभुचंद्रा म्हणाति, 'पद पळ टिको [14]रसदा!' ९

त्यजिल्या महिला भानें तनुच्या; भुलल्या अनंतसुखलाभानें;
विसरति भवना; वेधी नयनें मुख; लिगटली च [15]भवनावे धी. १०

म्हणती, 'पाय कवळिती ज्यांचे उरीं गोपि, लोकनायक वळिती
नंदपशु; सुतनु रवि ते हे गे! बळकृष्ण दुःखतिमिर नुरविते!' ११

प्रभुवरि [16]सुमलाज्यांतें वर्षति पुरयुवति, हर्ष गमला ज्यांतें;
द्विजसमुदाय नहाती या अमृतीं, घेउनीं उपायन हातीं. १२

पूजिति साधु [17]वसुमतीसुर सादर पौरलोक सोत्सव सुमती.
वर्णिति गोपी [18]लपनीं, देखति ज्या जागरीं हि हारिला सपनीं. १३

नाशी [19]तम [19]रज कानें पीतां यद्यश [20]सुतीर्थतम, रजकानें
तो महिचा न [21]धणि [22]वर [22]श्रीचा गणिला, न पाहिला हि [23]धणिवर. १४

---

१. नम्र अशा मस्तकानें. २. कल्याण. ३ सज्जनांच्या हृदयांत वास करणारा. ४. सायंकाळीं. ५. त्रैलोक्याधिपति. ६. गोपसैन्यांसह. ७. गजेंद्रासारखी [ धीरोद्धत ] गति ज्याची असा कृष्ण. ८. मेरुपर्वतासारखे राजवाडे. ९. [ कांहीं ] निराळें च. १०. नगरवासी तरुण स्त्रियांचा समूह. ११. रामकृष्णांविषयीं आदरयुक्त असा [ आहे ]. १२. सुंदर रामकृष्णांस विलोकि. ('पुरयौवत' हा कर्ता). १३. चढे. १४. आनंद देणाऱ्या! १५. संसारनौकेस (कृष्णास). १६. फुलें आणि लाह्या ह्यांतें. १७. भूसुर, ब्राह्मण. १८. मुखानीं. १९. तमोगुण व रजोगुण. २०. फार मोठें तीर्थस्थान च अशी ज्याची कीर्ति. २१. मालक. २२. लक्ष्मीपति. २३. स्वामिश्रेष्ठ.

भेटे हरि, परि टाचें[1] पुण्य खळा कंसकिंकरा परिटाचें.
मोक्षद[2] याचकरीती[3] मागति वस्त्रें; प्रभू दया च करीती! १५
परि अर्पि न रजक पट, प्रकट वदे शब्द, ज्यांत तम रज कपट.
शुभसामग्री[4] वेची म्हणुनि हरि करि च्छिदा[5] खळग्रीवेची[6]. १६
तापहर न तापविता, रक्षी हरिकर दयाकर[7] नता पविता[8],
धरि जरि जितनीरज[9]; कीं खर[10] परभावानुरूप[11] कुजनीं रजकीं. १७
पडतां चि रजकमाथा, पळती तदनुग[12] भिवूनियां उन्माथा[13].
जातां टाकुनि वासें[14], सबळें स्वीकारिलीं त्रिलोकनिवासें. १८
स्वीकारिति शिशु पगडी, आंगडि, सेला, विजार, ते पशुप गडी.
धरुनीं शोका, पडतें जालें धूळींत टाकिलें कापड तें. १९
सर्वस्वें निष्कपटीं अर्चित विभु जे जगत्रयीनिष्क[15], पटीं[16]
मंडितकाय विशेषें[16] केले मग भक्ततंतुवायविशेषें[17]. २०
दासा, देव वरद, या दे सारूप्यादि[18], करुनि, मुक्तिवर[19] दया.
तरला वायक[20] रीती असि; यास्तव साधु पदक पाय करीती. २१
माळाकार सुदामा करि पूजन सानुगा, समर्पि सुदामा[21],
वरि[22], तारी जीव सती हरिची पदभक्ति, सन्मना जी वसती[23]. २२

---

१. उणें. २. मोक्षदायक बळ व कृष्ण. ३. भिक्षुकासारखें. ४. पुण्यसामग्री. ५. छेदन. ६. दुष्टाच्या गळ्याची. ७. दयेची खाण च असा कृष्णाचा हात. ८. वज्रत्व. ९. [स्वमृदुत्वें] जिंकलें आहे कमल ज्यानें. १०. तीक्ष्ण, कठोर. ११. शत्रूंच्या अभिप्रायानुरूप. १२. त्या परटाचे अनुचर. १३. मथनास. १४. वस्त्रें. १५. त्रैलोक्यामध्यें भूषणभूत. (निष्क—सोन्याचें नाणें, अलंकार). १६. विशेष उत्तम वस्त्रांनीं. १७. कोणी एक कोष्टीजातीच्या भक्तानें. १८. सारूप्यादि मुक्ति. (सारूप्य, सालोक्य, सामीप्य आणि सायुज्य अशा चार प्रकारच्या मुक्ति आहेत). १९. मुक्तिपति. २०. [तो] कोष्टी. २१. उत्तम पुष्पमाळा. २२. स्वीकारी. २३. आधारस्थान.

# अध्याय बेचाळिसावा.

देवकिकुक्षिककुब्जा[1] मित्रा,[2] नलिनी[3] नमी सकौतुक कुब्जा;[3]
देहीं वक्रा, सरळी मनिं; तीसीं रुचलि गोपशक्रांस[4] रळी.[5] १
कथि परिपाटी;[6] राज्या द्यायाला नेत होति पाटीरां[7] ज्या,
तेणें दे उटि काया, कीं हरिपदिं पद मनास देउ टिकाया. २
प्रपदावरि[8] ठेवि पदा तीच्या हरि, यन्नतोपरि नुठे विपदा;
सुरतरुसंदोहनुतें[9] उजरि करांग्रें चि, उंचलुनि तो हनुतें. ३
जाली वरतनु,[10] सरली कुदशा, कीं स्वर्द्रुसेवनीं[11] अनुसरली.
तींठायीं[12] लवलीला[12] दावी हरि भजनसुकृतवरलवलीला.[13] ४
क्षितिचाठायीं दुसरी न तसि; मुखाची तिच्या करि न इंदु सरी.
रूपा करि आवास ब्रह्मपिता, निजकरें चि भरि आवासें.[14] ५
विभुचा धरुनि पदर ती, मागे प्रमदोत्तमा नमूनि पद रती.
स्मर सूचवि भोग मना; 'स्वगृहासि' म्हणे, 'करा अजि! विभो! गमना.'
नेउं गृहा सेला जे वोढि, न [15]ते, परि हरी च हांसे, लाजे.[15]
'सह गोपा दादासी न गणुनि वरित्ये बळें चि पादा दासी! ७
आप्तजनस्वाधी[16] न ध्वंसीं तों मीं शुभांगि! न स्वाधीन.
तन्मानसकृत्स्नेहा[17] पुरउनि येइन; करीन असकृत्स्नेहा.[18]' ८
जडालि घनां[19] यां[19] विजसी; तसि समजाविसि[20] करी मना यावि जैसी;[20]

---

१. देवकीची कूस ही च कोणी दिशा तिच्यापासून उदयास आलेल्या. २. सूर्यास. ३. कमलिनीरूप कुब्जा. ( कृष्णाची दासी ). ४. गोपेंद्र कृष्णास. ५. आवडी, प्रीति. ६. नित्यक्रम. ७. चंदनास. ८. चवड्यावर. ९. कल्पवृक्षाच्या समूहानीं स्तविलेल्या बोटानीं. १०. सुंदर तनु. ११. [ साक्षात् ] कल्पवृक्ष च [ अशा कृष्णाच्या ] सेवेला. १२. तीन ठिकाणीं वांकलेली जी तिला. १३. भजनाच्या पुण्याईचा जो श्रेष्ठ अंश त्याची लीला. १४. स्नेस. १५. ती कुब्जा लाजे. १६. आप्तजनांच्या मनांतील मोठें दुःख. १७. त्यांच्या मनांतील सर्व इच्छा. १८. नित्य स्नेहास. १९. कृष्णरूप मेघास. २०. मनास आवडेल अशी समजूत करी.

प्रीतिचि तो बेडि कसी सोडवि हरि, जी करासि झोंबे डिकसी[1]? ९

स्वसुरधराजनि[2] रोपा[3], दे सामें तीस, विबुधराज, निरोपा.
करि, तारित नत, गमला; स्त्रींच्या, ज्या निरखितां, निघे न तग मना.
त्रिभुवननायक बरवा दिसतां, न स्मरति वसन, काय, कैंबर[3], वा.
स्त्री चित्राकृति वारिती; हरिमूर्ति मनोहरा खरी क्षितिवरि ती. ११

पुसुनि जना विबुधनुतें[4] स्थान, निरखिलें महेंद्रधनुसम[5] धनु तें.
जें अर्चित, भोजपतिप्रियभट[6] भलत्यासि देति न शिवों, जपती. १२

तें घेतां, धन्ववनस्थितभट[7] बहु रूक्ष[8] जेंवि मरुधन्ववन[9];
म्हणति, 'शिउन कोदंडा मरणें जरि, हारि! तरी भिउ नको दंडा.' १३

जरि भुंकिति भट कुतरे, धनुरिक्षुजिवृक्षु[10] पुरुषगज[11] मद नुतरे;
सोडुनि ओझें पावे लघुपण तें उरगिं गरुड तो झेंपावे[12]. १४

न गणुनि वारण[13] साच, प्रभु घे सज्जुनि, उंसास वारणसा[14] च.
ओढुनि चापलतेतें, मोडी, साहति न वीर चापल[15] ते तें. १५

भवतरुमोड[16] करपवी, चित्र न करि धनुलतेस मोड करें पवी[17];
सुरदुष्कर दुःसह जें तें जो दावी स्ववीर्य कुतुकें सहजें. १६

भटजन धाके, तुकडे होतां धनु; धूमपूर्वका केतुकडे[18]
धांवे, आयुध राहे धरुनि पथिं; म्हणे, 'न यांस आयु, धरा हे!' १७

वेद मता पाखंडा, तेंवि प्रभु दाविति प्रतापा; खंडां[19]
धनुच्या घेवूनि करें, मारिति वीरांस, मुक्ति देवूं निकरें[20]. १८

---

१. डिंकासारखी. २. स्वभक्तबालकल्पवृक्ष (?). ३. वेणी. ४. देवस्तुत कृष्णानें. ५. इंद्रधनुष्यासारखें. ६. कंसाचे प्रिय योद्धे. ७. धनुष्याचे रक्षणास राहिलेले वीर. ८. कठोर. ९. मारवाडांतील अरण्य. १०. धनुष्यरूप ऊंस घेऊं इच्छिणारा. ११. पुरुषोत्तम कृष्ण हा च हत्ती. १२. ओझें बाजूला ठेऊन हलका झाल्यावर गरुड सर्पावर धांवे. १३. निवारण. १४. हत्तीसारखा. १५. चपळपणा. १६. संसारवृक्षाचा अंकूर. १७. हात हें च वज्र. १८. धूमकेतूकडे. १९. (धनुष्याच्या) तुकड्यास. २०. एकदम (समूहानें).

'गमन मनिं जरि, पुसा रे! पतिचें[1] प्रस्थान,' म्हणति[2]; निजरिपु सारे
वधुनि, भुवनहेतु[3] कडे[4] निघती, धनुचे मग त्यजिति हे तुकडे. १९
जाले नृपबळ हारिते ऐसें त्रिजगत्पती सकृप बळ हारि ते.
हांसे आलेख्या[5] ती नगरी, असि विभु करूनि आले ख्याती. २०
करि शयना शकटाळीप्रति[6] येउनि; रात्रि दुरितनाशक टाळी,
जींत[8], 'नृपा! मरशील,' स्वप्न म्हणति, परि गणी न पामरशील. २१
शोभा परमा रंगीं आणवि तो शत्रुमति[9] नृप रमारंगीं.
लोक वरिति मंच; रवि[10] प्रकटे[10], तों तेथ मल्लवर संचरवी. २२
शीक्षित जे ठीक, रणीं बाहूंची दाविणार जेठी[11] करणी,
ते चाणूरादि. सले हृदयीं हरि; परि बळाढ्य लोका दिसले! २३
मिळती आटोकाट[12], 'स्वदृष्टिचा,' म्हणति लोक, 'आटो कांट[13];
पाहों हरिबळलीला, चातक घनपंक्तिला जसे वळलीला.' २४
गर्जति भेरी, घनसे मल्ल हि; सामंत किति उभे; रीघ नसे;
वरमंचीं नृप हा या जेठींचें बैसला नियुद्ध[14] पहाया. २५
नेतां सोपायन 'मीं नंद' असें कथुनि साश्र तो पाय नमी.
वार्षिक कर भूधव घे; मंचीं बसवी सनाथ बल्लव अवघे. २६
त्यजि कंसा धीर; 'चला' प्राणां हि म्हणे, असा महाधी रचला.
हृदया जरि कातर ते चिंता कापी, न दावि परि कातरते. २७

# अध्याय त्रेचाळिसावा.

धरुनि मनीं रिपुरोषा, आयिकतां मल्लतालदुंदुभिघोषा[15],
बळ हरि, निजगुण दोषावरि, तैसे जाति, हर्षवित पुरयोषा. १

१. [तुमचा] राजा जो कंस त्याचें गमन. २. याचा कर्ता 'रामकृष्ण.' ३. त्रैलोक्यास कारण. ४. बाजूला. ५. चित्रास. ६. गाड्यांच्या रांगेंत. ७. घालवी. ८. ज्या रात्रींत. ९. रमापतीचे ठायीं शत्रुबुद्धीचा कंस. १०. सूर्योदय होई. ११. बलवान्. १२. खूप. १३. इच्छा. १४. बाहुयुद्ध, कुस्ती. १५. मल्लांच्या टाळ्या व दुंदुभि यांच्या ध्वनीस.

रंगद्वारानिकटीं, ज्याच्या अळि मत्त दानधारानिं[1] कटीं[2]
होता मर्दनाग[3]; मनीं जाणे हरि त्यास हेतु मंदनागमनीं[4]. २
भवरोगमहामात्रा प्रभुची मूर्ति हि रुचे चि न महामात्रा[5];
प्रेरि हरिवरि करींना[6] गतायु खळ तो; विवेक लेश करीना. ३
मग बळसिंधु पैरिकरा[7] बांधे अलकां हि उंचलुनि उपरि करा.
कृष्ण म्हणे, 'कोपरता काढीं, आधोरणा[8]! गजा; हो परता. ४
गोचर हो यमहाता तुमचा आत्मा, न दूर होय, महाता!
आला बळसिंधु; रहा आर्यासन्मुख, न काढिं खळसिंधुर[9] हा.' ५
ये समरा शितदंतीं[10] गज; हरिमन धरि सुवीर्यराशि तदंतीं.
धाउनि येउनि जवळी, शुंडादंडें निजांतका द्विप कवळी. ६
दाटति सुरयुवतिगळे; करिहस्तांतुनि तदश्रुबिंदुसह[11] गळे.
चूर्ण चि करिता डिखळापारि; कोपवि, मुष्टिनें चि हरि ताडि खळा. ७
जन करिति नवल, पाला तेंवि रगडिता, पदांत सजवें[12] लपाला.
भी सुरपुंगवसेना; गज करि बहु यत्न, परि हरी गवसेना. ८
शुंडाग्रें तो गिंवसी[13] गज, ज्यातें न शकती धरूं योगिवशी;
तों करुनि बळ, हठ, कडे ये, ज्या जिंकिति न निर्मुनि कळह ठकडे[14]. ९
ओढी हा सेंप[15] शुभें हस्तें; सुर होति विवश हासें; पशु भें
धारि; शतहस्त खरखरा ने, अहिस जसा खगाधिप प्रखर खरा[16]. १०
पार्श्वीं एके वळतो, तों इतरीं[17] हरि; गज श्रमे केवळ तो;
पाहे न वपुच्छाया[18]; खेळे शिशु काय धरुनि नवपुच्छा या! ११
पुच्छ त्यजि; मग जाला सन्मुख, ताडी करें निकाम गजाला.

---

१. मदाच्या धारानीं. २. गंडस्थळीं. ३. मदोन्मत्त हत्ती. ४. मीं न यावें अशासाठीं. ५. महातास. ६. गजश्रेष्ठास. ७. कंबरपट्टा. ८. हे महाता! ९. हत्ती. १०. तीक्ष्ण दांतानीं [युक्त]. ११. देवांगनांच्या अश्रुबिंदूंसह. १२. वेगानें. १३. शोधी. १४. ठक, लुच्चे. १५. शेंपूट. १६. उग्र, भयंकर अशा. १७. दुसऱ्या (बाजूस). १८. [कृष्णाच्या] शरीराची छाया.

कौतुक दावि पळांत; द्विप धावे, गांठिली चि भोंवि पळांत! १२
पळतां सहसा पडला हरि; गज मानी 'भला स्वरिपु सांपडला!'[1]
ताडी वरदा[2], घातीं[3] तों चुकवी; सांपडे चि न रदाघातीं. १३
झणझणलें सशिरकलेवर, रद भूमींत, चुकुनि हरिस, शिरकले.
मदमत्त असा पडतो तोंडघसीं; त्यासि सज्जन न सापडतो. १४
केला सोद्यम[4] हातीं माथां थोपटुनि तो सकोप महातीं,
धांवडिला अंतकसा; परि गज हरिचा करील हा अंत कसा? १५
न धरी हरि खेद मनीं, मुग्धा[5] भीती, सुरौघ हरिखे दमनीं.
कवळुनि, जितमुर[6], गाळी द्विप तो मळमूत्र, करें असा मुरगाळी. १६
पाडी अवनीवर हा हरि गज कीं, 'तापलासि; निज, नीव, रहा'.
पतितशिरोपरि चरणें आक्रमिला, ज्याचिया तरति परिचरणें. १७
दशन तदंता वलयालंकृतहस्तें[10] हरूनि, दंतावल या
दंडें समहामात्र[11] प्रभुनें वधिला; प्रयास न[12] महामात्र. १८
हो न कुवलया[13] पीडा, म्हणुनि वधी हरि गजा कुवलयापीडा[14].
कीं, तत्संगीं केली[15] न बरि; दलिततनु[16] धरा[17] तदंगीं[18] केली. १९
ऐसा असदंतकर, द्विपास्त्रमदबिंदुचित्रतनु[19], दंतकरें[20],
शोणितजंबाल[21], हरी करि, करिमथनीं, बळांबुनिधि[22] बाळहरी[22]. २०
राम हि हरिसम दांत स्वीकरि, दुष्टांत अशनि[23] जो समदांत[24].
गोपांसह सारंगीं[25] सिंह, तसे देव शिरति सहसा रंगीं. २१

---

१. सांपडला च [असें] समजे. २. कृष्णास. ३. मारते वेळीं. ४. सावेश. ५. मुग्ध (नाजूक, सुंदर) स्त्रिया. ६. मुरारि. ७. सोंड. ८. सेवनें. ९. त्याला मारण्यासाठीं. १०. आंगठीनें सुशोभित अशा हातानें. ११. महातासह हत्ती. १२. किंचित्. १३. भूमंडळास. १४. हें त्या हत्तीचें नांव. १५. क्रीडा. १६. विदीर्ण शरीर जीचें अशी. १७. पृथ्वी. १८. त्याच्या अवयवानीं. १९. हत्तीच्या रक्ताच्या व मदाच्या बिंदूनीं चित्रित आहे शरीर ज्याचें असा. २०. दांत ज्याच्या हातांत असा. २१. रक्ताचा चिखल. २२. बलसागर बालसिंह. २३. वज्र. २४. गर्विष्ठ अशा दुष्ट लोकांमध्यें. २५. हरिणांवर.

कौतुक दावि पळांत; द्विप धावे, गांठिली चि भोंवि पळांत! १२
पळतां सहसा पडला हरि; गज मानी 'भला स्वरिपु सांपडला!'[1]
ताडी वरदां[2], घातीं[3] तों चुकवी; सांपडे चि न रदाघातीं. १३
झणझणलें सशिरकलेवर, रद भूमींत, चुकुनि हरिस, शिरकले.
मदमत्त असा पडतो तोंडघसीं; त्यासि सज्जन न सापडतो. १४
केला सोद्यम[4] हातीं माथां थोपटुनि तो सकोप महातीं,
धांवडिला अंतकसा; परि गज हरिचा करील हा अंत कसा? १५
न धरी हरि खेद मनीं, मुग्धा[5] भीती, सुरौघ हरिखे दमनीं.
कवळुनि, जितमुर[6], गाळी द्विप तो मळमूत्र, करें[7] असा मुरगाळी. १६
पाडी अवनीवर हा हरि गज कीं, 'तापलासि; निज, नीव, रहा'.
पतितशिरोपरि चरणें आक्रमिला, ज्याचिया तरति परिचरणें[8]. १७
दशन तदंता[9] वलयालंकृतहस्तें[10] हरूनि, दंतावल या
दंडें समहामात्र[11] प्रभुनें वधिला; प्रयास न[12] महामात्र[12]. १८
हो न कुवलया[13] पीडा, म्हणुनि वधी हरि गजा कुवलयापीडा[14].
कीं, तत्संगीं केली[15] न बरि; दलिततनु[16] धरा[17] तदंगीं[18] केली. १९
ऐसा असदंतकर, द्विपास्रमद[19]बिंदुचित्रतनु, दंतकरें[20],
शोणितजंबाल[21], हरी करि, करिमथनीं, बळांबुनिधि[22] बाळहरी[22]. २०
राम हि हरिसम दांत स्वीकरि, दुष्टांत अशनि[23] जो समदांत[24].
गोपांसह सारंगीं[25] सिंह, तसे देव शिरति सहसा रंगीं. २१

---

१. सांपडला च [असें] समजे. २. कृष्णास. ३. मारते वेळीं. ४. सावेश. ५. मुग्ध (नाजूक, सुंदर) स्त्रिया. ६. मुरारि. ७. सोंड. ८. सेवनें. ९. त्याला मारण्यासाठीं. १०. आंगठीनें सुशोभित अशा हातानें. ११. महातासह हत्ती. १२. किंचित्. १३. भूमंडळास. १४. हें त्या हत्तीचें नांव. १५. क्रीडा. १६. विदीर्ण शरीर जीचें अशी. १७. पृथ्वी. १८. त्याच्या अवयवानीं. १९. हत्तीच्या रक्ताच्या व मदाच्या बिंदूनीं चित्रित आहे शरीर ज्याचें असा. २०. दांत ज्याच्या हातांत असा. २१. रक्ताचा चिखल. २२. बलसागर बालसिंह. २३. वज्र. २४. गर्विष्ठ अशा दुष्ट लोकांमध्यें. २५. हरिणांवर.

जरि हि चिदेकरसद[1] हा पाहति मल्लादि तेथ लोक रस दहा[2].
धरि नृपमति काळजिला, वाटति ते रामकृष्ण निजकाळ जिला[3]. २२
न रुचे नीचाशि शुची[4]; विप्रमुखां प्रीति देवकीच्या शिशुची;
सुख होय बहु भल्याला; जो तो स्तंभादि[5]भूषणें शुभ ल्याला. २३
सुरुचिकर[6] चि दोघांचें जन वर्णिति चरित शुचिकर[7] चिदोघांचें[8];
निजयदु गोकुळ ही; न प्रेम असें जेथ लेश तो कुळहीन. २४
चाणूर वदे वाचा, 'ऐका हो! रामकृष्ण! नरदेवाचा[9]
काम नियुद्ध पहाया; कारण हि तुम्हांसि येथ हें च वहाया. २५
राजाज्ञा जन नीतिज्ञाते पूजिति सदा; प्रजाजननी[10] ती.
तुंम्हीं हरि बळ कटकीं गोपांच्या भुजरणीं महाबळकट कीं.' २६
कृष्ण म्हणे, 'धन्या या नृपप्रसादा नसे निषेध न्याया;
तुष्ट धरापाळक हो; खेळों तुल्यांसवें[11]; असों बाळक हो!' २७
चाणूर म्हणे, 'बळ हा क्रीडो या मुष्टिकासवें परबळहा[12];
दिसतां जरि बाळकसे, लोकप्रख्यातशक्ति तरि, बाळ कसे? २८
त्यजुनि, भय व्रीडा, या आम्हां दोघां जणांसह क्रीडाया,
मजसीं तूं हरि! भीड[13], द्विप वधिला दशशतेभबळ[14] तरि भीड[15]!' २९

---

# अध्याय चव्वेचाळिसावा.

नीतिविरुद्धा लोकीं[16] नृपरीति विनिंदिली नियुद्धालोकीं[17],
'नेणे चि विकल भाचे, विक्रम गणि तुल्य मत्तगजकलभाचे[18]! १

---

१. शुद्ध ज्ञानरस देणारा, किंवा ज्ञान हा अद्वितीय रस देणारा. २. रौद्र, अद्भुत, करुण, शृंगार, वीर, वत्सल, भयानक, बिभित्स, शांत व भक्ति हे दहा रस. ३. ज्या मतीला. ४. शुद्धि, पवित्रता. ५. स्तंभादि सात्विक भाव. (स्तंभ=ताठ). ६. अत्यंत प्रेम उत्पन्न करणारें. ७. पवित्र करणारे. ८. ज्ञानाचे ओघ च असे बळरामकृष्ण त्यांचें. ९. राजा कंसाचा. १०. राजाज्ञा. ११. बरोबरीच्या संगतीं. १२. शत्रुबळनाशक. १३. लगट कर. १४. सहस्र हत्तींच्या बळाचा. १५. लज्जा. १६. जगामध्यें. १७. द्वंद्वयुद्ध पाहतांना. १८. माजलेल्या बाळहत्तीचे.

लागो न ढका यांला; मल्लांला[1] वश न होत दढकायांला.
रगडवि जळजा उपलें[2] या[3] खळवदनांत, सतिळजळ जाउ पळें. २
न नया मान सभा जे दे, जातां तेथ, साधुमानस भाजे.
हानि च, अन्या यालों[4] सिद्धि न; करितो नृपाळ अन्यायाला. ३
वदना[5] घर्मकणवहा यांच्या निराखि न; परंतु धर्म कणर्व[6] हा.
अहह! नृपा! सुकुमारप्रकृति नियुद्धश्रमें पिपासु कुमार.' ४
जनभाव सकळ कळती प्रभुला कीं, निजजयार्थ बहु कळकळती;
क्रीडारस संपविला. चाणूर क्षीणशक्तिगति[7] कंपविला. ५
कळला हरि दुःसहसा; मुष्टियुगें ताडि भगवदुर खळ सहसा.
भासे लोकां पवि[8] भूधरिं पडला; परि वरी न तो कांप विभू. ६
सज्जन ज्यास बुक्यानीं पूजिति, हाणी तया उरास बुक्यानीं!
त्या चि भुजांसि तदैव[9] प्रभुनें चाणूर कवळिला हतदैव; ७
विनतासुत सापातें, चाणूरा फिरवि गरगर तसा; पातें
जों नयनीं न लवे ची, द्वेषिपतंगायु[10] हरिबलानल[11] वेची. ८
आफळि भूवरि हातें; कौतुक दावी जनासि हरि आरिहा तें;
इंद्रध्वजसा पडला; वाचे अहि काय खगपतिस सांपडला? ९
मुष्टिकमद या रामें हरिला सहजांत साधुहृदयारामें;
वधिला रंगांत तळें[12]; भरिलें रक्तें तदंगभंगांत[13] तळें. १०
काळपदोत्तरकूट[14] क्रूर तसा उसळला बळावर कूट[15];
विंध्यधराधरकूटप्रतिभट[16] ये निकट; मूर्त दुर्धर कूट[17]. ११

---

१. बळकट शरीरांचे मल्लांला. २. दगडानें. ३. या दुष्ट कंसाच्या मुखांत. ४. कंसाला. ५. घामाचे कण ज्यावर आहेत अशा वदना. ६. दयाळु. ७. क्षीण आहे शक्तीची गति ज्याची. ८. वज्र. ९. तत्काळ. १०. शत्रुरूपी पतंगाचें आयुष्य. ११. कृष्णबलरूपी अग्नि. १२. तळहातानें. १३. त्याच्या अंगाचें मर्दन करते वेळेस. १४. "काळ" या पदाच्या मागून "कूट" हें पद जोडिलें असतां जो शब्द होतो तो काळकूट=एक विष. १५. या नांवाचा मल्ल. १६. विंध्याद्रीच्या शिखरापवढा उंच व शूर. १७. कपट.

कूट[1] अचल[1] तोडावा, हें मनिं येतां चि, रामभुज तो डावा
कृतमुष्टि मिरवि पविता, रिपुहृन्नयनीं बळें चि तिमिर विपवितां[2]. १२
शल तो शलक हरीनें वधिले कुतुकें, गजेंद्र जेंवि हरीनें.
उरले मल्ल न तगती, पळति, न जाणोनि देवदेव नतगती. १३
जइं बळदेव हरि खलाग्रेसरवधलब्धविजय[3], लोक हरिखला;
प्रभुभुजविक्रमसूर्यें अरितम गिळिलें, म्हणोनि गर्जति तूर्यें[4]. १४
जे गोप सखे दास क्रीडति त्यांसीं, सुरारिस[5] सखेदास
अति दुःसह; तो सेनामल्लबलक्षय समक्ष बहु सोसेना. १५
वध करितिल हें मनिं भें, परि नेत्रें[6] फिरवि तप्ततरहेमनिभें[6];
तूर्यें वारूनि करें, बोले तो लेखरिपु[7] शरारू[8] निकेरें[9]. १६
'उद्वृत्त चि हे कपिसे वसुदेवात्मज अनादृतविवेक[10] पिसे;
घाला बाहिर, नगरीं न वसोत क्षण हि; इष्ट संनिधि[11] न गरीं[11]. १७
जालें पुष्कळ जवळी द्रव्य म्हणुनि फार माजले खळ गवळी.
व्यय[12] न करुनि वांचविलें, वित्त हरा तें असेल जें सांचविलें. १८
बांधा नंदा निबरा[13], गोपानीं मानिला सुमंदानिं बरा.
योग्य न मोकळिकेला दुर्मति हा; या खळें चि हो! काळि केला. १९
आझुनि कां न वधा रे! शौरिस? खड्गाचिया धुवा नवधारे.
वधुनि, करा हित साची आज्ञा; हे मुख्य शत्रु, बा[14] हि तसा ची. २०
कंसा दुष्टा कुपितों[15] वाटे वसुदेव शत्रु सुपिता कुपिता[16].
न शिवति संत तमा[17] जे, त्यांसि म्हणे, 'हे चि अहितें[18] संतत माजे.' २१

---

१. कूट नांवाचा मल्ल हा च कोणी पर्वत. २. उत्पन्न करणारा. ३. दुष्टाग्रणी मारण्यांत ज्यांस जय मिळाला आहे असे. ४. वाद्यें. ५. असुरास (कंसास). ६. फार तापलेल्या सुवर्णासारखीं नेत्रें. ७. देवशत्रु. ८. घातुकः—**पंत.** ९. निकरानें, अगदीं एकेरीवर येऊन. १०. अविचारी. ११. विषाचे ठायीं सन्निधि (सान्निध्य). १२. नाश. १३. वृद्धा. १४. बाप उग्रसेन हि. १५. रागावलेल्या. १६. दुष्ट बाप. १७. पापास, अज्ञानास. १८. शत्रु.

गुरुलंघन हानि, सरे आयु जिणें नृप पदींहुनीं हा निसरे.
होइल विपरीतमतें भद्र कसें? ज्ञान दाखवि, परी तम तें. २२
दुरुदितें[1] नायकवे चि क्षांतिधन[2]कण त्रिलोकनायक वेंची;
हरिसा[3] च ठिके[4], वळघे मंचीं; कीं, कोप चित्त हठि केवळ घे. २३
म्हणती, ‘मर! पड!’ ताळी वाहुनि, सुर, कंस जैं असी[5] पडताळी[6].
‘कोण म्हणे मातुळ त्या व्याघ्रवृकांसीं[7] हि न जगदधमा तुळल्या?’ २४
केसरिमथना[8] गजसा हरिवरि ये कंस, खगवरीं[9] नाग जसा.
धरिला परि आव रिता पडला; कीं, विमुख [10]विधि धृतिस आवरिता.
खड्गवरा नागविया धरुनि उभा, परि हरी खळा नागवि या.
कवळुनि केश, वनींच्या तरुपरि रंगांत लोटि केशव नीच्या. २६
वरुनि रिपू ढकलीला, न उठे जों पतित कंस मूढ कलीला[11].
वरि पडला शत[12]कोटिब्रह्मांडाश्रय, नगीं जसा शतकोटि[13]. २७
हरिभारें असुजाती[14] दडपे, रंगांत तत्क्षणीं असु जाती.
विक्रम[15] तो ढिग[15] जाला क्षितिवरि त्या सिंह जेंवि ओढि गजाला. २८
खळ वधितां हा हेतीविणें[16], शब्द उठे, जनाननीं ‘हाहेति[17].’
म्हणती, ‘मावळियाला[18] रविला, अस्ताद्रिकृष्ण[19], मावळि[20] याला.’ २९
धाकें अशनीं[21], शयनीं, पानीं, यानीं, वनीं, जनीं, मनिं, नयनीं,
हरि पाहे परें[22]; मरणीं होय हरिच; वरि अरी हि गति परम रणीं! ३०
कंकाद्यष्ट[23] अनुजनीं निरखुनि रंगीं व्यसु स्वबंधुतनु जनीं,

---

१. दुर्भाषण. २. क्षमारूप द्रव्याचे कण. ३. सिंहासारखा. ४. स्थिर होई. ५. तरवार. ६. पेलून धरी, हातांत तयार धरी. ७. वाघ व लांडगा यांसीं तुलना पावणाऱ्यास. ८. सिंहवध करण्यासाठीं. ९. पक्षिश्रेष्ठीं-गरुडावर. १०. दैव. ११. युद्धाला. १२. कृष्ण. १३. वज्र. १४. दुष्टाजातीचा कंस. १५. पुष्कळ पराक्रम. १६. शस्त्राविण. १७. हा! हा! या प्रकारचा. १८. मामा जो कंस तद्रूप रवीला. १९. कृष्णरूप अस्ताचल. २०. मावळे असें करी. २१. खाण्यांत. २२. शत्रु कंस. २३. कंकादि आठ बंधु.

आनृण्यार्थं[1], उसपिती असि[2] अहि[2] रिपुरक्त जे[2], धरुनि हउस, पिती. ३१
फेडाया स्नेहारिण भ्रात्याचें धांवल चि, परि ते हरिण;
यदुसिंहें बळभद्रें देखिलिया, तगति केंवि असुबळभद्रें[3] ? ३२
उठले समरा; माजे कलह; न जाणति कृतांतसम रामा जे.
बळदहनीं शलभानीं पडिजेलें त्या विनष्टकौशलभानीं[4]. ३३
सानुजकंस खपविला जेणें, त्या स्तवि, न त्यां[5] शचीसख, पाविला;
येउनि आशु[6], भवादित्रिदश करिति पुष्पवृष्टिला शुभवादी. ३४
अवकाश गगनिं रसितीं[8] स्वर्भेरींच्या[7] उरे चि न मग निरासितीं;
संसृतिचीं वरदयशें[9] गाती गंधर्वतद्वधूसमुदय शें. ३५
भोजेंद्ररसावर[10] ज्या मारी साग्रजजगत्पती[11] सावरज्यां[12];
करिति चिर विलापा तद्दार; म्हणति, “जाहला चि रविला पात ! ३६
मन जरि नाकीं[13] जाया उत्कंठित फार, सोडिना काजायां[14];
त्यजुनि स्त्री वसु जाणें केलें कां कठिन करुनि जीव सुजाणें[15] ? ३७
हें अव बहुविध; ‘वांचा,’ प्राण म्हणति, घात करिति बहु विधवांचा;
जाचिति हे हितारिपुसे; आम्हां मृत्यु न, जरि स्तवूं हि, तरि पुसे ! ३८
छाया कसि तग तरुची धरिल तरुविणें ? पुरीसहित विगतरुची[16]
जालों तुजवांचोनीं; अवलंबावा विलापभुज[17] वांचोनी ! ३९
स्त्री, जैशा अपरिचिता त्यजिल्या; शय्या चि होति याउपरि चिता !
मृत्यु[18] गमे रुसवीं. हे भीरु[19] मती[19] केंवि शोकमेरुस वाहे ? ४०

---

१. ऋणमुक्त होण्याकारितां. २. जे तरवाररूपी सर्प. ३. प्राण, शक्ति व कल्याण. ४. नष्ट जाहलें आहे कौशल व भान ज्यांचें त्यानीं. ५. कृष्णास. ६. लवकर. ७. स्वर्गीय नगाऱ्यांच्या ध्वनीनीं. ८. पसरलेल्या (रसितीं). ९. कृष्णाचीं यशें. १०. भोजकुलाधिपति राजा कंस. (रसावर=पृथ्वीपति). ११. वडील बंधूसह कृष्ण. १२. कनिष्ठ बंधूसह ज्या कंसाला. १३. स्वर्गाला. १४. ‘काजाया’ अर्थ काय ? १५. जाणत्यानें. १६. निस्तेज. १७. शोकरूप भुज. १८. रुसणें हा च मृत्यु वाटतो. १९. भित्रीं बुद्धि.

न सुखकर क्षण भूतें जालासि, न पावलीं च रक्षण भूतें[1];
स्वकृततरुफळदशेतें[2] भोगिसि; बीजानुरूप चि फळद शेतें ! ४१
प्रस्थानीं[3] धव[4] पुसती, सांत्विति ही; स्मरति तूज न स्ववपुसती[5].
नेले भाउ चि; तगती न तदसु; हे स्त्रींस वल्लभा ! उचितगती !' ४२
'हानि असी मार्मीचि व्यर्था हरूं ' हरि म्हणे, 'असीमा[6] मीं चि,'
योजुनि सामा वळणी आणी त्या विकळमानसा मावळणी. ४३
मृतसंस्कार करवि तो; सद्गतिनलिनीप्रबोधकारक[7] रवि तो
आप्त सदाचा[8]; राशी करुणेचा, त्यजिल कां सदाचाराशी ? ४४
पितरांच्या भवलिंगडासह[9] तोडी देव दीनबांधव निगडीं[10];
पुत्र चिदुदधी[11] नमनें करिति गुरुपदीं लवोनि मुदधीनमनें[12]. ४५
'यन्माया विश्व रची ते हे, न स्वसुत मनुज, जगदीश्वर चि,'
ऐसें जाणुनि पितरें भेटति, न स्वांत होय शंकित भितरें. ४६
कळवी संयुगलीला[13] तत्वें[14] म्हणुनि जोडिति स्वकरयुगलीला.
श्रम न मनामधिल टिके. तम हरितिल न, तरि दिव्यधामधिलटिके[15]. ४७

---

## अध्याय पंचेचाळिसावा.

स्वार्थीं तोटा कवि जे होवूं देती न, म्हणति तो टाकविजे;
निजपरहित साधूनीं स्वच्छचरित निर्मिलें जनीं साधूनीं. १
'न सुतसुखरुचिद[16], धिग मीं !' कृष्ण म्हणे, "नाडिले चि गुरु चिदधिगमीं[17].
हा योग्य नसे उमज क्षण, यांचें पुत्र म्हणुनि, मन सेउ मज. २
तात सदार समीहा[18] हे चि धरू इच्छितों, सदा रस मीं हा !

---

१. प्राणी. २. स्वकर्मरूप वृक्षाच्या फळावस्थेस. ३. बाहेर जाते वेळीं. ४. पति. ५. स्व (तुझें—स्वतःचें) शरीररूप अशा [आम्ही] सती. ६. अमर्याद दुःख. ७. सद्गतिरूपी कमलिनीस प्रबोधकारक. ८. नेहमींचा. ९. भवबंधनासह. १०. बेडी. ११. ज्ञानसागर. १२. आनंदाधीन मनानें. १३. युद्धक्रीडा. १४. [ कृष्ण ईश्वरांश हें ] तत्व. १५. दिव्यधामकोश. १६. पुत्रसुखाची रुचि देणारा. १७. चित्प्राप्तीविषयीं. १८. इच्छा.

त्रप्रेम चि शुभ, तें, दुर्लभ लोकीं जसें सुरभिचें दुभतें. ३
ंदिल माथां[1] बातें ज्ञान स्मरतां[2] येदूत्तमा, 'थांबा,' तें,
: म्हणत, सन्नत यातें[3] होयिल हें वश चि, मीं प्रसन्न तयातें." ४
रुनि विचार असा, या पितरीं; मायेसि करि निदेश असाया;
ीं, 'पुत्रप्रेमातें धरुनीं, सेउत सुखांबुनिधितें मातें.' ५
:खशमन मायेनें[4], पितरांचें, करुनि विवश मन मायेनें[5],
ोले मोहकरीती; ते शब्द मुदब्द[6] हरिति मोह, करीती. ६
हे अंब! अहो तात! क्लेश असे या मनास बहु होतात;
उनि भवदुदरातें सुख न दिलें लेश हरुनि शत्रुदरातें. ७
वेंता या वाळविला[7] पाळूनि तुम्हीं स्वदेहतरु वाळविला.
ाश गळां तो कांचे[8]; वध अनुभविले स्वदुर्बळां तोकांचे! ८
ाहीं आबाळ[9] पण स्वसुतांचें पाहिलें नसा बाळपण;
रमृत जयांत अनुभवीं[10] सुरदुर्लभ पावती कृतार्थजनु[11] भवीं[12]. ९
ाम्हीं दैवहतानीं निजपितृगृहवास बहुसुखावह, तानीं
यांत सुरभवन[13] वसुधा[14] गणिति, न तो पाहिला, जयांत नव सुधा. १०
[15]कळार्थदकृतिकायप्रदपितरांची फिटेल उपकृति काय?
याला चिंतुनि गमजे[16] त्यजिति विषयिकामपूरक[17] स्वरगम जे. ११
शुश्रूषु, भला, भजनीं रत पितरांच्या; तयासि शुभ लाभ जनीं.
ृण न फिटे परि; साचें हेम कसें होय हो! अनृण परिसाचें? १२
ुत्र समर्थ न देहें वित्तें, पितरांसि [18]जीविकेसि न दे, हें
घ, त्या ने अंध[19]; मास स्वीय[20] चि खाणें पडे पुढें अधमास. १३

---

. बापातें—वसुदेवातें. २. कृष्णास. ३. वसुदेवास. ४. ममतेनें. ५. मोहानें. ानंदाचे मेघ. ७. एक प्रकारचा अतिदुष्ट कीटक त्याला. ८. कांचला, आवळला. वेपत्ति. १०. अनुभवाच्या योगेंकरून. ११. कृतकृत्य जन्म ज्यांचें असे. १२. ामध्यें. १३. देवलोक, स्वर्ग. १४. पृथ्वी. १५. निखिलपुरुषार्थप्रद असें देणाऱ्या पितरांची. १६. डौल. १७. संसारी लोकांचे मनोरथ पुरविणारे. उपजीविकेस. १९. अधोगतीला. २०. आपलें.

हें[1] कंसा राज्याचें करणें, भय मानि लोक सारा ज्याचें;
सुहृदांच्या अंतरतें[2] भूपें[3] पडलें, क्षमा करा, अंतर तें. १४
पोष्यजनासि न पोषी, तो जीवंत हि असोनियां शव दोषी.
आम्हां घडलें कांहीं न भजन; दिधलें न सुख उघड लेंकांहीं.' १५
तों परमगभीरहितें प्रभुवागमृतें पिवूनि मग भीरहितें
हृदयें, डिंभ[3] द्रवती मानुनि, दोघें विभूक्ति[4] असि भद्रवती. १६
वाटति कायज[5]; नातें हें मोहक ठाउकें न काय जनातें?
अंकीं स्थापुनि, [6]शिशिरीं वर्षति नेत्रोदकीं स्वसुख[7]राशिशिरीं. १७
जननीजनकमनीं या भरल्या सुखसिंधुमूर्ति [8]जनकमनीया.
तनुजयुग[9] अमृतसर तें; तापत्रय जाहलें चि देखत सरतें. १८
पूज्य सदा जो बाला[10], करि यदुनृप उग्रसेन आजोबाला.
'करुं पदभजना तूतें उचित' म्हणे हरि, 'अभीष्ट मज नातूतें. १९
मीं तव किंकर; भारा वाहिन; देतील नमुनि सुर करभारा;
योग्य विमानवरा जे ते भजतिल; मग न केंवि मानवराजे?' २०
मग आणवि [11]वरदेश स्वजना, ज्या नृपभयें दिला परदेश;
त्यास वदे, वसुधा, 'मीं तुमचा,' दे द्रव्य, वसवि, देव सुधामीं[12]. २१
अमृतरस सुखें [13]दुभले स्वजनचकोरीं बळाच्युतमुखेंदु भले;
ताप न लेश तशांचे उरति कुभूपातपें[14] दिले शतशांचे. २२
हरि रीति न दावि नवी; प्रांजलि साग्रज सबाष्प नंदा विनवी,
कीं तो बा पहिला; जे वत्सळता, तीस शौरि बाप हि लाजे. २३
"करुणासरिदोघानीं तात! तुम्हीं वृद्धभाव पारि, दोघानीं

---

१. कंस राजाचें हें करणें. २. नाशाविषयीं तत्पर असा जो भूप त्याच्या योगानें. ३. मुलगे. ४. कल्याणकारक असें कृष्णाचें भाषण. ५. पुत्र. ६. थंड अशा. ७. आत्मसुखाचे राशि जे बळ व कृष्ण त्यांचे मस्तकांवर. ८. लोकरमणीया. ९. दोन मुलगे. १०. बाप जो वसुदेव त्याला. ११. कृष्ण. १२. उत्तम घरांत. १३. प्रसन्न झाले, देते जाहले. १४. दुष्ट राजा [ कंस ] हा च कोणी सूर्य त्याच्या उन्हानें.

आधि[1] अजी! वाहूनीं, प्रिय केलें रक्षुनि स्वजीवाहूनीं. २४
स्वमुखें बोलाल न तें रक्षण, पोषप्रकार तो, लालन तें,
नित्य निरवधिक[2] तोकीं प्रेमा, आत्म्यापरीस हि अधिक तो कीं! २५
रक्षाक्षम[3] निजजन; कीं, नृपभीत त्यागिलें हि जननीजनकीं.
आम्हां बाळां अवनीवरि पितर तुम्हीं च पोषणीं पटु अवनीं[4]. २६
तुमची दृष्टि नवि सर[5] प्रेमघनाची, तिचा पडेल न विसर.
अमृताचें अनवसर[6] त्वद्गृह यांया[7] न तेथ मज अनवसर. २७
कंसें चित्त दुखविलें सुहृदांचें म्यां न तें यथेष्ट सुखविलें.
इष्टरसद[8] या लोका होइन, तुमच्या हि पात्र संदयालोका[9]. २८
न करिं विलंबा बा! जे मत्प्राणा[10] ते न धरु मदंबा[11] बाजे[12].
पदमुदुदधि[13] देखाया देइन; मागेन 'साय, दधि दे खाया!' २९
'मेला, मारक राजा; निजगोवत्सांसि आकुमार[14] करा, जा,'
म्हणतो राम, 'जतन या, हें चि मनीं, या चि द्या वरा मज तनया.'"
ऐसी सांत्वनवाणी हरि बोले, जींत मधुरतेसि न वाणी.
भोजकुळकळंकारी स्वपित्यासह बल्लवांस हि अळंकारी. ३१
जें कां कांसें, पितळ स्वच्छ तयाचीं सुरम्य पात्रें नितळ,
कांति जयांवरि झळके ऐसीं दे बहु, न ज्यांत गोरस कळके. ३२
नंद, 'स्वसुखा[15] या मीं पुसों,' म्हणे, ये परंतु न मुखा 'यामि[16];'
वाट फुटे कसि? रोधी वाणीतें शोक बाष्परुद्धशिरोधि[17]. ३३
देतां परिरंभ[18], गळे दाटति; नेत्रांतुनीं हि अंमुदंभ[19] गळे.

---

१. मानसिक दुःख. २. अमर्याद. ३. रक्षणास असमर्थ. ४. रक्षणीं. ५. सरोवर. ६. पुरातन सरोवर. ७. यावयाला वेळ नाहीं असें नाहीं. ८. इच्छित सुख देणारे. ९. सदय अशा अवलोकनास. १०. माझा जीव कीं प्राण. ११. माझी आई. १२. बाजेला. (बाजेस धरणें, म्हणजे विरहानें अस्वस्थ होऊन बिछान्यावर पडून राहणें). १३. आनंदसागर असे चरण. १४. मुळापासून. १५. स्वानंदरूप जो कृष्ण त्यास. १६. जातों. १७. अश्रूनीं दाटला आहे गळा ज्याचा असा. १८. आलिंगन. १९. दुःखाश्रु.

नंदादि अनघ[1] राशी दुःखांचे वारिति; जाय न मन घरासी! ३४
कृष्णसुखनिधी राहे; विरहें धरिती न गोप मनिं धीरा हे.
होय अपाय; नवा हे असिधारा[2] वाट काय? पाय न वाहे. ३५
न धरावा विश्वास स्त्रीचा हें ठाउकें असे विश्वास;
कीं मथुरेनें, जवळी येतां सर्वस्व हरुनि, ठकिले गवळी. ३६
स्वस्थानीं[3] च, न गमनीं, दैवें दिधला, न तर्किला चि नग मनीं;
होय महाउत्सव, घे ज्याचा तो, तेंवि गोप भासति अवघे. ३७
पुत्रविरह[4]बहळहळ स्वांत विदारी; करि व्रजेश हळहळ.
तो तेथुनि जावासा समय नव्हे, पावला परि निजावासा[5]. ३८
शौरी गर्गाकरवी द्विजातिसंस्कार[6] आत्मजांचे करवी;
कथिलीं जीं वेदानें, तीं सत्पात्रीं समस्त ही दे दानें. ३९
सांदीपिनिभवनिं बटु प्रभु वसती ब्रह्मचर्य तें भवँ[7] निवटु;
सर्वज्ञानखनि गदाग्रज[8] साग्रज घे, दुज्या न, गुरुमुखनिगदा[9]. ४०
अद्भुत अभ्यास; कळा, विद्या, शिकले भजोनि सभ्या सकळा;
दोघे भावु करीति कौतुक; दाविति जनास भावुकरीती[10]. ४१
प्रभुमत कीं, 'महिमा[11] जे, प्रिय[12]सत्यहितोक्ति साधुनिगम[13] हि माजे
सांगति; आचरण तरी करूं; तरो जन धरूनि गुरुचरणतरी[14].' ४२
प्रणत शुचि सदा सत्वें भजति, धरुनि गुरुपदीं रुचिस, दासत्वें;
म्हणुनि अवंतीवासी[15] दे ज्ञान, कृतार्थ जें करी जीवासी. ४३
गुरुसि गमे धात्यांची[16] विश्वाच्या[16] अद्भुता चि मेधा[17] त्यांची.

---

१. निष्पाप. २. नवीन तरवारीची धार. ३. अन्वयार्थ–मनीं न तर्किला चि नग (कृष्णरूप अलंकार) दैवें गमनीं न, स्वस्थानीं च दिधला. ४. पुत्रविरहरूपी मोठा नांगर. ५. स्वस्थानास. ६. क्षत्रियांस अवश्य ते संस्कार. ७. संसार. ८. कृष्ण. ९. गुरुमुखांतून [ निघालेल्या ] शब्दांस [ घे, दुज्या न घे ]. १०. चांगली रीति. ११. सामर्थ्य, ऐश्वर्य. १२. प्रिय, सत्य आणि हितकारक अशीं वचनें ज्यांत असे. १३. साधु आणि वेद. १४. गुरुचरणरूप नौका. १५. सांदीपनि. १६. विश्वनिर्माणकर्त्यांची. १७. बुद्धि.

न बहुत अभ्यास, कळा दिवसांत चि धरिति, त्या अलभ्या सकळा. ४४
विनविति विप्रा ज्ञाते, द्याया गुरुदक्षिणा, कवि; प्राज्ञा ते
स्वस्त्री; ब्राह्मण तीतें सांगे जें शिष्य आपणा म्हणती तें. ४५
'अतुळप्रतिभा[1], उमज, द्युति यांची; ईशसे गमति भाउ मज;
जरि नरबाळवपु सती! प्रभु हे,' ब्राह्मण म्हणे, "स्वअभिमत[2] पुससी.
ईश्वर हे; महिम्यातें जाणोनि अनर्घ्य रत्न हेम हि म्या तें
कांहीं न च्छात्रांसी मागितलें; कीं मनास इच्छा त्रासी. ४७
त्वद्वांछा ब्राह्मणि! जे कळली; 'द्या सिंधुमग्न[3] पुत्रा' म्हणिजे.
त्यांचा महिमा गाया, लोकीं हें योग्य असुगम[4] हि मागाया. ४८
स्वव्रत[5] या मागें न क्षत[6], परि 'सुत द्या' असें तया मागेन."
करुनि विचार असा, या अर्थी[7] वरि, बहुत काळ कीर्ति असाया. ४९
नोहे लुंब्रा[8], म्हणतो परि हें निज कल्पतरुस सुब्राह्मण तो,
'सागरहृत पंडित हो! सुत द्या; तुमच्या यशें भुवन मंडित हो.' ५०
ज्या सकृपा ध्यायाला सादर मुनि, नमुनि तो उपाध्यायाला,
साग्रज विप्रस्थानापासुनि करि भवतमोरवि[9] प्रस्थाना[10]. ५१
जाय सुरथ वेगानें प्रभुचा; हर्षे महीसुर[11]; थवे गानें
ऐकविती दासांचे, ज्यांच्या मनिं हरियशोमृत सदा सांचे. ५२
कृष्णरथाचा कानीं ध्वनि शिरतां हारि भवव्यथा चाकानीं.
पूर्णसुधाकर साचा लाजविला; मृतिसें[12] या चि धाक रसाचा. ५३
गुरुसुतरक्षे[13] त्राते गेले देव प्रभासक[14]क्षेत्रा ते;
सागर धांउनि वेळास्थितविभुचरणा[15] नमी, न लाउनि वेळा. ५४

---

१. नवनवोन्मेषशालिनी बुद्धि. २. स्वतःस आवडलेलें. ३. समुद्रांत बुडालेल्या. ४. दुर्लभ. ५. न मागण्याचें आपलें व्रत. ६. भग्न. ७. पदार्थाला, वस्तूला. ८. तोंडपुजा. ९. संसारांधकारास सूर्य (असा कृष्ण). १०. गमनास. ११. ब्राह्मण (कृष्णगुरु सांदीपनी). १२. मृत्यूस. १३. गुरुपुत्राच्या रक्षणासाठीं. १४. एक पवित्र क्षेत्र. १५. तीरावर असलेल्या प्रभुचरणास.

मंजुळवर्णवयांतें[1] पाहे डोळे भरूनि अर्णव यांतें
'भवसागरनावा हे पाय,' म्हणे, रत्नभूषणमना[2] वाहे. ५५
शौरिभव नदीपातें म्हणती, 'दे विप्रकुळभवनदीपातें[3];
रत्नाकर[4] पर[5] तूं, न स्वीकारुनि देसि रत्न जें परतून.' ५६
सिंधु म्हणे, 'हा[6]! तनया विप्राच्या सत्य लाविला हात न; या
हरुनि ब्रह्मस्वा[7], मीं कैसा भवदंघ्रिपूजनार्ह[8] स्वामी!? ५७
मज्जळवासी जो गा! पंचजनासुर[9] चि या कुकर्माजोगा;
तुम्हीं सर्वज्ञानीं शोधावें; हें कळेल सर्व ज्ञानीं.' ५८
मग शोधुनि उदराशी[10] विभु पंचजना वधी, चिरी उदराशी;
त्या यत्ना तें[11] ही न प्रभुच्या करि सफळ; कीं द्विजसुतें[12] हीन. ५९
तो करि पंचजनाचा वध, जो हरि संहरी प्रपंच जनाचा.
शंख तदंग[13] हरुनि घे सिंधूबाहेरि भक्तकल्पतरु निघे. ६०
गेले संयमनीतें[14], साधाया कार्य जें स्वकीयमनीं तें.
वाजवि तेथ हरि दरा[15], जो भजकभवाचिया समूळ हरि दरा. ६१
प्रभुच्या सहसा दरज्या नादा यम सेवि, पीति मुनि सादर ज्या.
जाय विनत सामोरा; उत्सव जळदागमीं हि न तसा मोरा. ६२
अवलोकीना शमन[16] स्वांगा, कीं भूललें चि कीनाशमन[17].
हा बहु सात्विक, भावां यां[18] पाहुनि, वश चि होय सात्विक भावां. ६३
प्रभुचे पाय मनाचे प्रिय गुरु वंदूनि, सत्तपां[19] यम नाचे.
सर्वस्व निवेदी; न ज्ञाता शठ होय, शठ चि; न निवे दीन. ६४

---

१. सुंदर कांति आणि वय (तारुण्य) ज्यांचें अशा या बाळकृष्णांस. २. रत्नें, भूषणें व मन यांस. ३. ब्राह्मणकुलरूप घरांतील दिव्यास. ४. रत्नांचा आकर (खाण). ५. परंतु. ६. आश्चर्यार्थक अव्यय. ७. ब्राह्मणांच्या धनास. ८. आपले चरणाची पूजा करण्यास योग्य. ९. शंखासुर. १०. उदकसमूह—समुद्र. ११. उदर. १२. ब्राह्मणपुत्रानें. १३. त्या असुराचें अंग. १४. यमनगरीतें. १५. शंखा. १६. यम. १७. यमाचें मन. १८. या बाळकृष्णांस. १९. चांगलें तप ज्याचें असा.

चरितें नरकायासप्रशमार्थ करावयास, नरकायास[1]
धरिते सध्येय[2] महापुरुष, पुजी श्रेष्ठ साधुमध्ये यम हा. ६५
'करिजे आज्ञा; पाया नत जन हा, योग्य होय आज्ञापाया.
कांहीं सेवा याला सांगा जी! मन सकाम सेवायाला.' ६६
प्रार्थित माज्यानि[3] यमें, बोले, 'आज्ञेंत वससि माज्या नियमें:
येणें आर्यांस[4] मज त्वन्निकट स्वगुरुच्या स्वकार्या समज. ६७
तूं उग्रनयें[5] न दीनीं, निजकर्में मग्न विप्रतनय नदीनीं[6]
त्या, सुवयां[7] दे; शिकवी जो आम्हां ज्ञान, तो तया देशिक वी[8]. ६८
सुत गुरुवर्या देशी, तरि तूं प्रभु पाळिता स्वमर्यादेशी.'
भाव असा जाणविला, यमधर्मे शीघ्र तो चि शिशु आणविला. ६९
त्रिजगत्पाळक वळसा[9] करुनि असा, रक्षि बाळ काळकवळसा[10].
हें उपदेशि, कराया लोकां; दे पुत्र यदुप देशिकराया. ७०
आलिंगुनि वत्स तिघे, विप्र म्हणे स्त्रीस, 'सुत यथावत्[11] सति! घे.
यां पसरिति पदरा जे स्वरगादि[12] हि, त्या प्रजांत हरिपद राजे. ७१
ज्यांचा सन्मनुं[13] जपणें, अवतरले ईश ते चि हे मनुजपणें.
निजजनविपदवसादा[14] बोभातां[15], देति दुरितवनदव[16] सादा[17].' ७२
हर्षे तो कवि तरणिप्रभवपुरानीतनैजतोकवितरणीं[18].
विनवी आणिख; रीति प्रभुची कपिलेसि उणिव आणि खरी ती. ७३
तो गतलोभ, 'वश मला मन आहे,' मुनि म्हणे, 'मनोभव[19] शमला;
हे चि पुरे देशिकता तुमची; मणिहुनि न मोद बहु दे शिकता[20]. ७४

---

१. मानवी देहास. २. साधूनीं ध्यान करण्यास योग्य. ३. लक्ष्मीपति कृष्ण. ४. श्रेष्ठ अशा मज. ५. जुलमी. ६. समुद्रीं. ७. तरुण. ८. गुरु प्रसवे, जन्म देई. ९. फेरा. १०. काळाच्या तोंडांतील ग्रासासारखा. ११. यथाशास्त्र. १२. कल्पवृक्षादि. १३. चांगला मंत्र. १४. आत्मजनांची विपत्ति दूर करण्याकरितां. १५. बोलावितां. १६. पातकरूप वनांतील अग्नि. १७. हाकेला. १८. सर्यापासून उत्पत्ति ज्याची त्या यमाच्या नगराहून आणिलेल्या आपल्या पुत्राच्या दानानें. १९. मनोवासना. २०. वाळू.

ज्यां गुरुराजे, पण जे ज्ञानी, तैसे चि बाप, आजे, पणजे,
त्यां हि दिली रसिकानीं शिष्यानीं दक्षिणा श्रुत न असि कानीं. ७५
कीर्तिस वीरमणी हो! तुमच्या लज्जित पयोधिंची रमणी[1] हो;
लाजो रात्रिधवें[2], लता देवांची, दुग्धराशिची हि धवलता. ७६
तरतिल लोक च्छंदें तुमच्या; भजतिल भवद्धृदोक[3] च्छंदें[4];
नतचित्त न भोगु रुंजे[5], रक्षूत भवद्गुणागद[6], नभोगुरु[7] जे.' ७७
करुनि बहु पवाड[8] वदे आशी; आज्ञा तयां सकृप वाडवें[9] दे.
वंदुनि आले मथुरे; लोक म्हणति, 'मूर्त हे निजानंदथु[10] रे!' ७८

---

# अध्याय शेचाळिसावा.

व्रज आनंदावासा[11] करुनि विचार, स्वभक्त नंदावासा[12]
पाठवि; जो उद्धव दे, उद्धव[13], देवप्रियाप्त[14], हित शुद्ध वदेः– १
"बहु पाहति वाट, कळाहीन[15] व्रजनयन, नित्य हि नवा टकळा[16]
घालुनि मजवरि; साचा क्षण देतो दुःखभोग ज्यां वरिसाचा[17]. २
भोगिति दुःखैकदंबा[18] नंदपिता वृद्ध शुद्धबुद्धि मदंबा[19];
वाटे व्रज ओस, कळाहीन जना ताप देतसे 'ओ!' सकळा. ३
जें दव[20] करि न वनीं, तें विरह; मनें[21] केंवि सोसितिल नवनीतें[21]?
गुरुजनें[22] तो हवि, घर तें कुंड चि; दहनीं कठोर लोह विघरतें[23]! ४
शृंगारांबुजसरसी[24] गोपवधूमंडळी वसे मजसरसी.
हरिच्या सेजारा ती पावलि मृगि, तिस चिता चि सेजा राती! ५

---

१. क्षीरसागराची स्त्री. २. निशापति चंद्र. ३. तुमचीं हृदयें हीं च घरें. ४. गातें, वेदानें. ५. पीडेला. ६. तुमचे गुण हीं च औषधें. ७. आकाशाहून मोठे. ८. स्तुति. ९. ब्राह्मण. १०. आमचा आनंद. ११. आनंदावा असा. १२. गोकुळास. १३. उत्सव. १४. देवाला प्रिय व आप्त. १५. निस्तेज. १६. हौस, उतावळी, उत्कंठा. १७. वर्षाचा. १८. दुःखसमूहा. १९. माझी आई यशोदा. २०. वणवा. २१. लोण्यासारख्या मनानें. २२. आईबाप. २३. वितळतें. २४. शृंगाररूप कमळें ज्यामध्यें असें सरोवर च अशी.

तीव्र मनोगद; वांचे कोण? तृण प्राण ते वियोगदवांचे.
मज जोडुनि कर, 'पावें,' म्हणति, 'किती विरहपावकीं करपावें?' ६
स्वतनु[1]जननिवासासुप्रियसुत हि न मानुनीं जननि वा सासु,
मिळति नद्या वाहात स्वपतिस मज; र्‍यां कसा न द्यावा हात? ७
गोपी सारखि जे ते; छळ हि न मानुनि मनीं असार खिजे ते;
'तव पद या लोभ जनीं वाढवि,' म्हणती, 'वसों दयाळो! भजनीं.' ८
पसरिल कसि कर पेजे, चातकरसना तृषेकरुनि करपे जे?
तेंवि मदितरनर मतिप्रति न, स्वप्नीं हि वाटति वर न, रमती. ९
मीं जीवन[2], मीन सतीप्राण; कुशळ उद्धवा! स्वधामीं नसती.
प्रथम हि मन घाबरवी दिन[3]विरह हि; तद्रती न अनघा! बरवी. १०
होइल संगम नाशा, यास्तव पावति न कीं मदागमनाशा;
मत्प्रिय तो जन वाटे[4] देखत चि असेल अकृतभोजन वाटे! ११
यास्तव जा, पितरांतें समजावीं, गोपिकादिकां इतरांतें.
जाणसि साम, निरोपें स्वसुखाचीं लाविं त्यांचिया मनिं रोपें. १२
घेऊनि निरोप वनें[5] आज्ञारूपें[6] हि, शीघ्रगति हो पवनें;
रथगगनीं[7] वेघ; न ते व्रजाटवी विरहदव गिळो; घे घनते[8]. १३
उद्धवनामसदभ्र[9], प्रभुसंदेशाख्य अमृत ज्यांत अदभ्रें[10],
त्या व्रजजनकेकींतें[11] भेटों जाय; प्रमोदउं[12] सके कीं तें[13]. १४
रवि बहुधा मावळला; लाजे, कीं, साधु[14] नंदधामा वळला.
आपण तापद, वारिप्रदसा[15] तो सर्वलोकतापदवारि[16]. १५
पाहुनि सहसा, नंदें पूजियला साधु युवतिसह सानंदें;

---

१. आपलें शरीर, लोक रहाण्याचें ठिकाण (घर), प्राण व आवडता मुलगा. २. पाणी. ३. एक दिवसाचा वियोग हि. ४. मार्गाला. ५. उदकें. ६. आज्ञारूप अशीं. ७. रथरूपी आकाशांत. ८. मेघत्वाला. ९. उद्धव नांवाचा उत्तम मेघ. १०. पुष्कळ. ११. गोकुळवासिजनरूपी मोरांस. १२. आनंदवूं. १३. संदेशाख्य अमृत. १४. सत्पुरुष उद्धव. १५. मेघासारखा. १६. सर्व लोकाना संतापदायक अशा वणव्याचा शत्रु.

त्या सुघना चातक वा मोर भजे हा; दिसे मनाचा तकवा.[1] १६
वाढवि पायस खाया; पुशिला,[2] 'कुशळी ?' चुरूनि पाय, सखा या.
धैर्याचा नग हि, वैर व्रजभूचा,[3] परि तया धरे न गहिवर. १७
नंद वदे, "सांग, मन स्मरतें आम्हां ? घडेल कृष्णागमन ?
पाहों मुखराजीवा ? अमृताचा लाभ तो बहु खरा जीवा. १८
दावादिकमृत्यु[4] चि तें कृष्ण निवारी भुजें सदुपकृत्युचितें;[5]
त्या वीर्या, त्या तिथिला,[6] स्मरतां होति क्रिया समस्ता शिथिला ! १९
त्या प्रथमावस्थानीं,[7] दुष्टांची ओळखोनि भाव[8] स्थानीं
ज्या, खळसंहृति केली, स्मरतां कुंठित करी मनोगति केली.[9] २०
त्यजिलीं यदुकुलतिलकीं, विरहदवें तीं स्थळें गमति उलतिल कीं.
रोदन शुकपिकरव तें; हृदय चिरे कृष्णपदवियोगकरवतें.[10] २१
कर्मैं काय करवती ? निष्ठुरबळहरिवियोग कार्य[11] करवती.[12]
श्रम ज्यांहीं हरपावे, श्रम ते देताति हे मनोहर पावे ! २२
बोल खरे गर्गाचे, 'अवतरले ईश्वर त्रिदशवर्गाचे'
भयहर भूस्वर्गाचे; गेयगुण[13] चि रामकृष्ण हे भर्गाचे.[13] २३
कृष्णा रामा नवलें चरितें, जनमन दयाकरा मानवलें.
केलें यश शुद्ध रणीं खळदमनीं, सप्तदिन नगसमुद्धरणीं. २४
पडली चरमा[14] माजे दृष्टिस गति,[14] वरि सहानुचर मामा जे.
न क्षम[15] नर पर मरणा, पावे न इतरकरें हि सुरपर[16] मरणा ! २५
जे बहुधा मायावी खळ, ज्यांची भीति जिष्णुधामा[17] यावी;

---

१. हुषारी. २. कृष्ण 'खुशाल ना ?' [ असें ] विचारिला गेला. ३. गोकुळाचा पति नंद. ४. वणवा इत्यादि मरणप्रद संकटें. ५. चांगले उपकार करण्यास योग्य अशा भुजानें. ६. सैल, ढिली. ७. बाळपणीं. ८. कपट. ९. पोपट आणि कोकिळा यांचें गायन. १०. कृष्णचरणवियोगरूप करवतानें. ११. शरीर. १२. कापतो (?). १३. शंकरानें गाण्यास योग्य गुण ज्यांचे असे. १४. शेवटची गति–मरण. १५. समर्थ, योग्य. १६. देवशत्रु. १७. इंद्रलोकास.

ते ही जाले शलभ ज्वलनीं कृष्णीं, बळीं[1] हि सिंहीं कलभ." २६
ऐसीं पुत्रचरित्रें वर्णी, विकिलें जयांसि चित्त [2]गिरित्रें;
तों ये फार गहिवर; स्रवति जळें लोचनें अपार महिवर. २७
होय यशोदा विकळा, प्रेमाश्रु तदीक्षणांबुजीं दावि कळा;
पुत्रोदारकथानीं ये पान्हा कंचुकीविदारक थानीं. २८
त्यांचा उद्धव दे हा प्रेमा; विसरे मुहूर्त उद्धव देहा.
स्वमनिं म्हणे, 'या लाभें, संसृतिचें सर्वथा नसे याला भें.' २९
सुख उद्धवपिक लाहे, कृष्णप्रेमाम्र गोकुळीं पिकला; हे
सत्संगम मधु; [3]रव दे सुभजन[4]कामासि बळ, असें मधुर वदे:— ३०
'धन्य तुम्हीं; परिसा, जे सुतभावें[5] प्रीति ईश्वरीं परि साजे;
विश्वगुरु[6]जगजनकीं लाजविले या सु[6]भक्तिनें सज्जन कीं. ३१
यांच्या चरणस्मरणीं जो जन वसवी मन क्षण्ण स्थिर मरणीं,
होतो मुद्राशि, शुची त्यांहीं क्रीडार्थ धरिलि मुद्रा शिशुची! ३२
साधुपरित्रात्यांच्या गातां, आकर्णितां चरित्रा त्यांच्या,
जालीं तत्पर क[7]रणें; काय तुम्हांला असे अतःपर करणें? ३३
मातेला जनित्याला सत्वर भेटेल वत्सलां, जनिं त्याला
क्षणमात्र नसे विसर; प्रियमान[8]सं हंस कां मग न सेवि सरें[9]? ३४
मारुनि कंसा राज्या, तुजसीं गोष्टी स्वयें वदे सारा ज्या,
करिल चि त्या सत्या गा! धैर्य नसे वत्सळास त्यास त्यागीं[10]. ३५

---

१. बळरामरूप सिंहीं. २. गोवर्धनधारी कृष्णानें. ३. शब्द. ४. चांगलें भजन करण्याची इच्छा ज्याना अशा लोकांस. ( उद्धवानें असें मधुर भाषण केलें कीं, त्याच्या भाषणांतील शब्द, ऐकणाऱ्या भक्तजनास भजनाची अधिक शक्ति व आवड देत असत हा भाव). ५. सुतभावें जे प्रीति [ आहे ] परि [ ते ] ईश्वरीं [ अतएव ] साजे. ६. ब्रह्मदेव व जगत् यांचा जो बाप कृष्ण त्याच्या ठायींच्या भक्तीनें लाजविले इ०. ७. इंद्रियें. ८. प्रेमळ अशा. ९. प्रिय. असें मानस-सरोवर. १०. [ तुमचा ] त्याग करण्यास.

दे[1] सुखसंदोह, गळे त्यांचे होता धरूनि तो मोह गळे;
तत्त्व असें आयकवी श्रीउद्धव बुद्धवस्तु[2] बुधराय कवी. ३६
सत्संग क्षण दे तें सुख अद्भुत; कोण आठवि क्षणदेतें[3]?
परमामृतखनि शांतप्रेमरस पितां चि, दाखवि मुख निशांतें[4]. ३७
व्रजयुवतिजन रहाटे[5] दधिमथनीं; कृष्णचरित गाय पहाटे.
प्रेमोद्दीपन गानीं करिति, हरिति[6] तम हि, जेंवि दीप नगानीं[6]. ३८
तें हरि तम हो! दधिचें मथन, यश जयांत सुचरितमहोदधिचें[7].
गाती डुलत, नुरवि तें प्रेम श्रम; फिरविती मृदुलतनु रवितें[8]. ३९
बाष्पें[9] कंठ निरुद्ध, स्वर गद्गद, परि न गीतरीति विरुद्ध.
स्वसुखाचे कोंब, रवे[10] प्रेमसुधेचे चि, वर्ण ते हो! बरवे. ४०
भानुकृशानु[11] उगवता जाला, जाळूनि तमों[12] जुन्या मउ गवतां;
लागे धूर बळकट, स्वच्छांबरें[13] यामुळें चि होय मळकट! ४१
स्त्रीजन ते, जेंवि रवी, रथ देखति जो तम स्वतेजें विरवी;
त्या कांचनमणिखचितें आश्चर्य दिलें व्रजेक्षणा[14] अणिखें[15] चि तें. ४२
म्हणती बल्लवमहिला[16], जो अस्मत्प्राणपश्यतोहर[17] पहिला,
तो अक्रूर कुनर पी व्रजजीवन[18], पातला असेल पुनरपि. ४३
त्या कंसा अधमास, व्रजयुवतींचा करूनियां वध मास,
श्राद्धीं पिंड कराया, नेणार असेल तृप्तिदायक[19] राया. ४४

---

१. अन्वयार्थ—सुखसंदोह ( पुष्कळ सुख ) दे. [ तसें च ] त्यांचे गळे धरून असणारा मोह गळे ( नाहींसा होई ). २. जाणलें आहे तत्त्व ज्यानें असा. ३. रात्रीतें. ४. सकाळ. ( निशा+अंत ). ५. वर्ते. ६. जेंवि दीप [ तेंवि ] नगानीं ( अलंकारानीं ) तम हि हरिति. ७. उत्तम चरित्राचा सागर च जो कृष्ण त्याचें. ८. मंथनदंडास. ९. अश्रूंनें. १०. कण, गोळे. ११. सूर्यरूप अग्नि. १२. अंधाररूप वाळलेल्या गवतास. १३. स्वच्छ आकाश, [ पक्षीं ] वस्त्र. १४. गोकुळवासी जनांच्या नेत्रांस. १५. निराळें. १६. गोपस्त्रिया. १७. आमच्या प्राणांस ( कृष्णास ) आमच्या समक्ष चोरणारा. १८. गोकुळाचे प्राणरूप उदक. १९. अक्रूर.

स्वामी नृप शूर हि, तत्प्रिय[1] करि मागें[2] हि साधु अक्रूर हित.
त्यजुनि अशा हि जिवलगा, कंसा! गेलासि हें तुझें हि नवल गा! '४५
वदति असें, तों सुरसा[3]पुष्करमालाधर स्मितानन सुरसा[4]
पाहे भगवदनुग या अंतर्धृत[5]विष्णुचरणयुवतितनु गया. ४६

---

# अध्याय सत्तेचाळिसावा.

दृगतिथि[6] उद्धव यांहीं केला कृष्णोपभुक्तशुद्धवयांहीं[7];
जेंवि विशदयज्ञानीं निर्मळमोक्षेच्छुनीं[8] च सदय ज्ञानी. १
म्हणति हृतनयन रमणी, ' हा अच्युतवेषभूष[9] कोण नरमणी?'
देववधूप्रतिमाशा[10] वेष्टिति त्याला, जशा मधूप्रति माशा. २
ते गोपस्त्रीजनता जाली हरिदासचरणसरसीजनता[11];
मग एकांतीं बसका[12] केली, प्रकटावया निजाशय असका[13]. ३
रासीं हरिच्या तूर्यें[14], स्त्रीरत्नें ज्यांत कोटिभरि चातुर्यें,
हो[15], महिमा जीवाचा; तदुक्तिरससिंधुमग्न[16] माजी वाचा. ४
सप्रेमा कोपांचे बोल वदति फार दार ते गोपांचे;
' जाणों यदुपाळाचा[17] सेवक तूं उग्रसेनसुतकाळाचा. ५
पाठविलेंसे स्मरणा धरुनि, तुला येथ निजपितृप्रियकरणा;

---

१. त्या ( कंसाला ) आवडता ( अक्रूर ). २. मेला तरी हि. ३. सुरस अशा कमलमाळा धारण करणारा. ४. देवासारखा. ५. अंतःकरणांत धरले आहेत विष्णुचरण ज्यानीं अशा स्त्रीशरीरधारी गया च ( गया=एक क्षेत्र ). ६. दृष्टीचा अतिथि केला. (त्याकडे प्रेमानें पाहिलें, हा भाव ). ७. कृष्णानें उपभुक्त म्हणून शुद्ध आहेत वयें ज्यांचीं अशा गोपीनीं. ८. हें मोक्षेच्छूंचें विशेषण. ९. कृष्णाचा वेष आणि अलंकार धारण करणारा. १०. देवागनांच्या आकृतिसमान. ११. कृष्णभक्त अक्रूराच्या चरणकमलीं लीन. १२. बैठक. १३. सर्व. १४. वाद्यें. १५. उद्धव हि–पंत. १६. तद्भाषणरूप आनंदसागरांत निमग्न. १७. कंसशत्रु कृष्णाचा.

जो [1]अपवर्गद मुनि ही स्वस्नेहा[2]धीन, [3]करणवर्ग दमुनि ही. ६
आठविजे काय दुजें या घोषीं, त्यजुनि जननिजनका [4]यदुजें ?
इतरीं कार्यापुरती मैत्री; संस्कार ते मनीं मग नुरती. ७
पुरुष रस[5]पिपासु मनीं; स्त्रीठायीं सख्य, जेंवि मधुपा [6]सुमनीं.
त्यजिजे आंगणिं, कानीं ऐकुनि [7]चाटू हि, [8]हृतधना गणिकानीं. ८
जेथ कृपा सत्य, [9]जिती प्रजा तया; गतबळा नृपास त्यजिती.
जो विद्या दे, शिकते जे शिष्य सुविद्य, सोडिती देशिक ते. ९
धरि पदतोयज, मान [10]प्रत्यह करि जो असा हि तो यजमान,
टाकिति ऋत्विज, यजनीं होतां [11]निजदक्षिणोदशीतशय जनीं. १०
खग हि त्यजिति [12]अगातें विफळातें, स्मरति तदुपकृत न अगा! तें.
दातृगृहांत अतिथि जे, तन्मन ही [13]यावदशनमात्र अति थिजे. ११
दग्धवना मृग विटती; भोगुनि टाकी अतृप्त जी स्त्री विटें[14] ती.'
ऐसें बहुत चि वदती निर्लज्जा, रडति कृष्णपदरति सुदती. १२
तों [15]व्रजवामान्यतमा कळवाया भाव उद्धवा मान्यतमा,
बोलतसे मधुपासीं; तो रस नाहीं [16]सुधाकरा [16]विधुपासीं. १३
'स्नेह मनीं आठविला, म्हणुनि मधुपदूत वल्लभें पाठविला,'
कल्पुनि ऐशी च वदे [17]मधुपान्योक्ती; सुधा न तैशी चव दे. १४
" इच्छा कायशि ? वाया मधुपा ! धांवसि धरूनि पाय, शिवाया;
विदित अससि कितवाचा बंधू तूं; वदसि मधुर सचकित वाचा. १५
वनमाळा सवतीच्या भरली कुचकुंकुमें विलासवतीच्या,

---

१. मोक्ष देणारा. २. स्वकीयावरील प्रेमाच्या अधीन. ३. इंद्रियवर्ग. ४. कृष्णें. ५. शृंगाररसाविषयीं तृषित. ६. पुष्पीं. ७. विनोदी भाषण. ८. हरण केलें आहे धन ज्यापासून अशाला. ९. जिवंत. १०. प्रत्यहीं. ११. आपल्या दक्षिणेच्या उदकानें थंड आहेत हात ज्यांचे. १२. वृक्षातें. १३. भोजन मिळे-पर्यंत. १४. जार. १५. गोकुळवासी स्त्रियांपैकीं एक. १६. अमृताची खाण च अशा चंद्राजवळ. १७. [ अक्रूरास ] उद्देशून मधुपाशीं केलेलें भाषण.

तें त्वज्जीवन[1]; मिशियां[2] पिवळ्या कीं निरुपा ! पदासि नमिशि या ? १६
स्वाधरमधु पाजी जी, आवडती त्या शठासँ[3] मधुपा ! जी जी
समजावीं मानवती[4] त्या कितवा, तुज तयास ज्या मानवती. १७
जेंवि रसपिपासुमनें तूं चुंबुनि टाकितोसि मधुपा ! सुमनें;
त्यजिलें आम्हां हि तसें, भुलउनि अधरामृतें; म्हणों त्या हितँसें[5] ? १८
मन मोहुनि टाकि तव स्वामी, ऐसा प्रसिद्ध जनिं हा कितव;
कसि चरण शिवे कमळा याचे ? तीचा कसा धरि विवेक मळा[6] ? १९
कळलें पिउनि भुलिल तें अनृतकथामृत तँदाननें[7] चि सुँललितें,
नेणुनि भाव, सुरा ती पी; न धरि विवेक, जसि विभावसु[8] राती. २०
कंसाचा रिपु, राणा वृष्णींचा, स्वेष्टकामचारि[9], पुराणा,
गासी येथ तशास भ्रमरा ! इतराजनासमीप कशास ? २१
येथुनि मधुपा ! जावें; हरिसखियांतें स्वगीतमधु पाजावें;
करितिल भवदिष्ट; गदाग्रज[10] त्यांच्या हरि निरंतर उरोजगदा[11]. २२
ज्या स्त्री लोकात्रितयामाजि दुरापा, न त्या अरे ! पत्रि[12] ! तया;
भ्रूयुग कनकपटाचें नाचे बहु रुचिर, हसित गृह कपटाचें ! २३
करुनि महा तप, दासी श्री लावि रजोर्थमात्र[13] हात पदासी;
तेथें काय कँद[14] वँनालयदारांचा[15] ? नँ कामसायक दँवना[16]. २४
तद्यपि दया जरि कृपणावरि करिसिल, ‘ उचित उत्तमश्लोकपणा ’
ऐसें चि कळिव, राजा कितवांचा जो, तयाप्रति, अळिवरा ! जा. २५
कां चरणा शिवशि ? वहा न शिरीं पाय; प्रणाम भर शिवशिव ! हा.
तन्मुखरस चाटूनीं आलासि; कळे, वळे न मन चाँटूनीं[17]. २६

---

१. तुझें अन्न. २. मिश्या. ३. ठकास (कृष्णास). ४. मानी स्त्रिया. ५. हितकारक असें त्या कृष्णाला म्हणावें काय ? ६. मलिनपणाला. ७. सुंदर अशा त्याच्या मुखानें. ८. सूर्य. ९. आपल्या इच्छेप्रमाणें भोग भोगणारा. १०. कृष्ण. ( गद या नांवाचा कृष्णाचा एक कनिष्ठ बंधु होता). ११. स्तनपीडा. १२. हे पक्ष्या ! भ्रमरा ! १३. चरणरजःकणासाठीं. १४. पदार्थ, किंमत. १५. अरण्यवासी आम्हां बायकांचा. १६. दवना कामसायक न. १७. मागें ८ वी गीति पहा.

करुनीं खोलसि कविता, जाला तो कितव तूज बोल सिकविता;
तें आम्हां सकळ कळे; आठउनि मुकुंद या जनास कळकळे ! २७
हें सुख दावि; श्वासें ओंठ करपले, रडों सदा विश्वासें,
तळमळ दिननिशि, वांचे न व्रज, होतिल¹ विलास सदनिं शिवांचे. २८
ज्याकरितां निजपतितें, तोकें² जगद्वय हि ज्यास सुमुनि जपति ³तें,
त्यजुनीं ध्यासें, त्यजित्या जालों; त्या वाटलों मृता सत्यजित्या. २९
त्या अजितस्वांतातें⁵ काय भजोनीं ? भजों हितदंतातें⁶;
सख्य पुन्हां फटकळ, तें फळ कळलें, अन्न बहु शितें अटकळतें⁷. ३०
रावण ज्या वोवाळी स्वमुकुटमणिदीपकीं⁸ असा जो वाळी,
त्यास वधी लुब्धकसा, सेवावा व्यर्थ परनिधनलुब्ध कसा ? ३१
आपण तों स्त्रीजित, कीं सीतावश, करि तदीयवाक्यें जितकीं.
निर्दयपण अणखी तें काय विटंबी रतेच्छु सूर्पणखीतें⁹? ३२
दाता, शूर, मृदु, बळी¹⁰, ज्याच्या कीर्तीपुढें सुधारुचि दुबळी,
छळिला तो, करि पूजे सर्वस्वें तरि, न देति शोक रिपू जे ! ३३
वर्णी महिमा, गेहा जाउनि त्याच्या, त्रिपादमहि मागे हा.
देतां, सर्व हरि हरी, बांधुनि घाली रसातळीं च हरिहरी ! ३४
ऐसा भोजपरिपु¹¹ रे ! तत्सख्यामाजि बहुत चोज, परि पुरे.
म्हणसी जरि 'कीं¹² गातां, भजिजेतें कंज बांधि तारि कां गा ! तां¹²? ३५

---

१. कोल्ह्यांचे विलास होतील=घरें ओस पडतील. २. अपत्य. ३. तोक. ४. मुलावाळांचा ध्यास. ५. ज्याचें अंतःकरण जिंकलें नाहीं (आमच्या हातीं आलें नाहीं) त्यातें. ६. हितकर अशा आपल्या मरणास [च] आम्ही पतकरतों. ७. समजतें. ८. आपल्या मुकुटांतील रत्नरूपी दीपकांनीं. ९. मूळ पाठ—**वरि तन्वर्पण खीजे, बहुत विटंबी तशी हि शूर्पणखी जे.** १०. वामनावतारांत ज्याचा छळ झाला तो प्रह्लादाचा पौत्र. ११. कंसशत्रु कृष्ण. १२. सायंकालीं मीलन पावून कंज (कमळ) तुला [आपल्या अंतरंगांत] अडकवून टाकितें; असें असतां, मग पुन्हां तूं कां त्या कमळाचें सेवन करितोस ?

जाणों [1]व्यर्गलतेतें कृष्णकथेच्या, खणी त्रिवर्गलतेतें;
पारि हरिभृत्या! गाया रसना रत, न [3]क्षमा सकृत् त्यागाया. ३६
कृष्णानुचरितलीला तें कर्णामृत धुतें कुपंकैकलीला;
तीची जे कीं कणिका लाजे साध्वीस [5]त्या सुधाख्या गणिका. ३७
तीचें सेवन करिते [6]द्वंद्वंवियोगासि पावती लोकारि ते;
म्हणुन चि होति विनष्ट, त्यजिति गृहकुटुंब दीन ज्यांत सुकष्ट. ३८
आपण ही बहुदीन भ्रमण करिति [7]सर्वभोगसौख्यविहीन,
ऐसे बहुत विहंग प्राणार्थ हि भीक मागताति असंग. ३९
कृष्णकथासवकणिका मोहितसे चतुरमानसा! जसि गणिका.
न धरि तयाउपर मती; लोकव्यवहातिरुचि क्रिया उपरमती. ४०
सकुटुंबसदन सुटतें; श्रुतिलज्जास्नेहलोकबंधन तुटतें;
मानलव जनांत नुरे; स्मरे [11]स्वपूर्वप्रिया हि न मना तनु रे!. ४१
गेले कामांतूनि च्छंदें या बहुत जन फुका [12]मौनूनि;
मग हाता पसरीती उदरार्थ; पडे गळां चि [13]तापसरीती. ४२
हें जाणत गोपी तों जावू; कीं जीव हा क्षण तगो, पीतों
हें परमामृत कानीं, मानियलें व्रजजनीं हि या मृतकानीं. ४३
गेला ओकित वमना आम्हां वार्ता चि ते असो; कितव मना
याची काय रुचि? रहा उगला आतां; [14]गमे न काय रुचिर हीं. ४४
[15]मृगयु जसा गाय महा मधुर, [14]गमे साधु मानसा गा! यम हा;
[16]मांससंतृष्ण वधूं तें करि कपट कळे न [17]शुद्धकृष्णवधूंतें. ४५

---

१. विशेष प्रकारच्या अडचणीला. २. काम, क्रोध व लोभ या त्रिवर्गाच्या लतेला खणून काढते. (कर्ता 'कृष्णकथा'). ३. समर्थ. ४. भयंकर पातक व कलह यांस. ५. त्या कणिकारूप साध्वीस. ६. शीतोष्ण, सुखदुःख, रागद्वेष इत्यादि, द्वंद्वें. ७. सर्वत्यक्त, विरक्त. ८. पक्षी किंवा पक्ष्यासारखे. ९. लोकव्यवहारांची आवड. १०. विद्या, लाज, प्रेम व लोकबंधन. ११. स्वतःस च पूर्वी आवडत असलेलें शरीर हि. १२. उन्मत्त होऊन, गुंग होऊन. १३. तपस्व्याची पद्धति. १४. [हें आमचें] शरीर [आम्हांला] सुंदर वाटत नाहीं. १५. पारधी. १६. मांसाभिलाषी. १७. सरळ, साध्या अशा ज्या [आम्ही] कृष्णस्त्रिया गोपी त्यांतें.

तों खाया पळें[1], उर तें भेदिति शर, आयु काय मग पळ उरतें!
होयें[2] गति भ्रमरा! हे; प्राण मधुरगीत हा हि न भ्रम राहे. ४६
हरिणींस न पाप, शुची परि आम्हीं त्या वनेचरी बा! पशु चि,
त्या या ही भीरु च; तें हें दृग्युग सम; न गीत दे भी, रुचतें. ४७
'न[3] पडो भव्या धामीं तोटा[3] त्याच्या,' म्हणें, 'शुभ,' व्याधा मीं;
कीं हरिणी माराया उशिर न लावी; दया न ये मारा[4] या. ४८
भुलवी विश्वा, सोंगा घेउनि; आम्हीं तयास विश्वासों गा!
जाणों सुखजनक[5] रवे[5] तच्छब्द, त्यागबुद्धि सहज न करवे. ४९
गणितां तद्वचन खरें करिति कुचीं शिउनि तीव्ररतिपति[6] नखरें;
अनुभउनि स्वमन खरें, 'हारिपारिस' म्हणे, 'दुराग्रही कवि नखरें.' ५०
स्मर करि अर्हा[7] पीडा, कीं भूत; न बोल बर्हिबर्हा[8]पीडा.
भीरुसि होय झडपणी; करिती ब्रह्मग्रहादि[9] काय धडपणीं? ५१
तूं चिरंजीव[10]; दवातां वृष्टि तसी, मधुकरा! दुजी वद वार्ता;
कीं झांकुनि मुख राहें; किति कथिलें परि न ऐकसी मुखरा[11]! हें. ५२
न स्थापुन राग मनामाजि भ्रमरा! किमर्थ पुनरागमना
केलें? तुज पाठविलें, प्रिय सखया! काय केशवें आठविलें? ५३
आगमन तव पुन्हां या निववाया, विरहदहनगतवपु न्हाया[12],
प्रियसंदेशामृत कीं द्याया? जावें न काळदेशा मृतकीं[13]. ५४
हृदयेप्सित[14] कुशळिवरा मागें तूं पारितोषिकार्ह[15] अळिवरा!

---

१. मांस. २. अन्वयार्थ—भ्रमरा! हे (ही) गति [तशी] होय; प्राण [व] मधुरगीत हा हि भ्रम न राहे. (दोन हि जाती, हा भाव). ३. घरीं कल्याणाचा तोटा न पडो. ४. [साक्षात्] मदन च अशा या कृष्णास. ५. सुख उत्पन्न करणारे गोळे. ६. भयंकर [मदनबाधा]. ७. योग्य. (ही मदनपीडा कृष्णाला उद्देशून होत असल्यानें ती आम्हांला मान्य, असा भाव). ८. मयूरपिच्छाचा तुरा आहे ज्यास असा कृष्ण. ९. राक्षसादि. १०. पुष्कळ जगणारा. ११. वाचाळा! १२. स्नान घालण्यास. १३. मेलेल्यानीं (आम्हीं). १४. मनोभिलषित. १५. बक्षिसास योग्य.

तत्संगम तों लंबा[1]लोलदलग्रांबुबिंदुसम रोलंबा[2]!. ५५
जा वेड्या! नव घडतें प्रेम त्रुटित? न जडे, पडे अवघड तें;
हें हि असो, हारिशील द्वंद्व[3]त्यागासहिष्णु हि न हरिशील[4]. ५६
न वदें फार कथकसा[5]; अस्मन्नयनोचित[6] प्रकार कथ कसा.
किति सुकुमारा! खणिसी नग नखरें? सह[7] चि ते रमा राखणिसी[8]! ५७
यश रोलंबा! गाजे बहु म्हणती ‘श्री हारिप्रिया;’ बागा जे
नांदे तदुरोधामीं; साहे न तिसीं पळार्ध न विरोधा मीं. ५८
ऐसें बहु संकट, कीं, निधिपरि वारि वेढिला फणींच्या कटकीं;
तदुरोवासवतीतें[9] माने न विपक्षजन नवा सवतीतें. ५९
करुनीं गुरुकुळवासा आला कीं विजितचंचळा[10]कुळवासा?
मथुरेंत चि वनमाळी आहे कीं आर्यपुत्र जनवनमाळी[11]? ६०
केंव्हां तरि वदतो रे! या दासींची कथा प्रियंवद तो रे!?
तूं साधु अली कानीं पडली तरि सांग, फटिव न अलीकानीं[12]. ६१
जो स्वर्द्रुमगुरु सुरभीनाथ[13] श्रीकृष्णबाहु सद्गुरुसुरभी[14],
तो केंव्हां निववील, छत्रत्व धरूनि, किंकरी जिववील?” ६२
इत्यादि व्रजवनितासूक्तिसुधा[15] तन्मुखामृतद्युतिजनिता[16];
उद्धवसुचकोर तिला सेउनि, पावे महारसिक तो रतिलों[17]. ६३

---

१. लंबा पद्मालया गौर्योस्तिक्त तुंब्यामपि स्त्रियामिति मेदिनी–**पंत**. कडू भोपळ्याच्या हालणाऱ्या पानावरील पाण्याच्या थेंबाप्रमाणें [क्षणिक, चंचल]. २. भ्रमरा! ३. शीतोष्णसुखदु:खादि द्वंद्वांच्या त्यागाविषयीं असहनशील. ४. श्रीकृष्णाचा स्वभाव. ५. गोष्टी सांगणाऱ्यासारखा. ६. आमच्या नेत्रास योग्य असा. ७. बरोबर च–जवळ च ती लक्ष्मी राखण करणारी अशी [आहे]. ८. त्याच्या उरस्थळावर. ९. कृष्णवक्ष:स्थळीं वास करणारीस. १०. जिंकलें आहे विजेस ज्यानें अशा स्वगृहास. ११. जनरूपी अरण्यांतील माळी. १२. खोट्या गोष्टींनीं. १३. कामधेनूचा स्वामी. १४. उत्तम चंदनाप्रमाणें सुगंधी. १५. गोपींचे गोड बोल हें च अमृत. १६. त्यांच्या (गोपींच्या) मुखचंद्रापासून उत्पन्न झालेली. १७. गोडीला, आनंदाला.

वक्तृवरा[1] जीवाचा[2] शिष्य, मधुप कृष्णचरणराजीवाचा,
बोले या वामांतें कीं, "भवदवधानलेश[3] यावा मातें. ६४
धन्य तुम्हीं! कवि भुवनीं गाति यशा, 'सेविला त्रिलोकाविभु वनीं;'
बहुसुकृती बहुजननीं[4] साधे हरिभक्ति सर्वमंगळजननी. ६५
बहु बरव्यापरि चरणीं हरिच्या भक्ति प्रवर्तविलि परिचरणीं[5].
त्यजुनि पतिगुरुकुलभया; मुनिवर्यांला हि नव्हति सिद्धि सुलभ या. ६६
तुमचें प्रेम न मापीं सांठे; मोजील कोणत्या? मन मापीं[6].
जालों कृतकृत्य; हिमीं तप्त निवालों तसा चि, हरिभृत्य हि मीं. ६७
मानस आनंदेशा[7] सूक्ति जयांत प्रियाचिया संदेशा[8]
त्या वेडनि आलों मीं, ऐका; ताप न टिकेल एका लोमीं[9]. ६८
प्रीति धवा चि कदा त्या न उणि म्हणा, मज हि सत्य वाचिकंदात्या[10].
संदेशसुधाधारा प्या हे, स्वांतीं धरूनि विबुधाधारा[11]. ६९
'प्रेमामृतभरितांला हृदयसखींला तुम्हां सुकृतसरितांला,
त्रिजगदुपादानासीं[12] मजसीं न वियोग कृतकृपादानासीं[13]. ७०
खानिळशिखिजळभू[14] तीं हेतुत्वें वसति जसिं चराचरभूतीं;
मीं तेंवि मनोसुमतीकरणगुणानुगत[15], जाणतो जो सुमती. ७१
भेद नगा[16] हेमा[17] या विश्वा मज हि न दिसे, उगा हे माया;
मीं ज्ञानघन सती हो! आत्मा स्वगतादिभेद[18] लव नसती हो!. ७२

---

१. वक्तृत्व करणाऱ्यांत श्रेष्ठ अशा. २. बृहस्पतीचा. ३. तुमचें किंचित् लक्ष. ४. अनंत जन्मांनीं. ५. सेवेंत. ६. लक्ष्मीरमणाचे ठायीं. ७. आनंद पावेल अशा. ८. निरोपास. ९. रोमरंध्रीं. १०. निरोप देणाऱ्यास [ सत्य म्हणा ]. ११. देवांना आधारभूत अशा कृष्णास. १२. त्रैलोक्याच्या उपादान कारण अशा कृष्णासीं. (उपादान कारण=समवायी कारण, कार्यान्तर्गत कारण तें उपादान कारण. उदाहरण, तंतु वस्त्राचें हें उपादान कारण). १३. केलें आहे कृपादान ज्यानें अशा. १४. आकाश, वायु, अग्नि, पाणी, पृथ्वी. १५. मन, सद्बुद्धि आणि इंद्रियगुण यांमध्यें अनुगत असा. १६. अलंकारास. १७. सुवर्णास. १८. आपल्यामधील (आत्म्या-आत्म्यामधील).

अहिस न जरि हार विते, भासे[1] तत्सत्यता न परि, हारवि तो[1];
नसुनि[2] विलोकवि[2]; वर्ता, जाणा मजमाजि तेंवि लोकविवर्ता[3]. ७३
शोणरुचि स्फटिकाची, दावि जपापुष्प[4] भाव तो लटिका चि,
तसि माया स्वच्छा या आत्म्या लावी अनेकता, स्वच्छाया[5]. ७४
नियमा[6] मन; घाबारिया वृत्ती न करा; असा हि अनघा[7] बारिया.
मदुदितयोगांत[8] रती नाव[9], इणें साधु मद्धियोगा तरती. ७५
स्थिति[10] माने दूर सती! कीं प्रेमाचा विटों चि नेदूं[11] रस ती.
मद्ध्यान बहु घडावें, स्वसुखनिधिद्वार आपण चि उघडावें. ७६
दूर प्रियजन वसती; देखाया करिति नित्य नवस नव सती;
सहवासीं त्यासम न, प्रेम धरुनियां, भजे सदा त्यांस मन. ७७
मीं सुखधाम जपावा, ध्यावा, गावा, पथें अशा मज पावा.
सुखनिधिला गिवसाल[12] स्वपदीं, भेटोनि शांतिलागिं, वसाल. ७८
न रति घडो जारासीं मजसिं म्हणुनि धव निरोधिता ज्या रासीं
अर्पुनि निजमानस त्या विरहीं मज, पावल्या मुनिसमान सत्या." '७९
प्रियतम जो हरि, त्याचा संदेशाख्यप्रसाद भवहरित्याचा
ऐकुनि, वरतनु[13] रागें वदति स्वांतांत[14] पूर्ण परि अनुरागें:— ८०
" वधिलो[15] कंस; अरिचिता शमली, जी ज्ञातिबुद्धिसीं सुपरिचितो[15].
द्विडिभांचा[16] अंकुश तें करि बरवें; हरिसें[17] काय रिपुरंकुशतें[18]? ८१
धनसन्मान समुदितज्ञातिस[19] देवूनि, करुनि मानस मुदित,

---

१. परंतु त्या अहीची सत्यता वाटते [व] तो ( अहि ) हारवि ( मनास भ्रम उत्पन्न करी ). २. [ आपण ] नसताना [ लोकाना ] दाखवितो. ३. लोकरूपी भ्रमास. ४. जास्वंदीचें फूल. ५. आपली कांति. ६. आवरून धरा. ७. निष्पाप, दुःखविरहित. ८. मीं सांगितलेल्या उपायांत. ९. नौका. १०. राहणें. ११. न देऊं. १२. पावाल. १३. सुंदरांगी गोपी. १४. मनांत. १५. मूळ पाठ—'**वधिला कंस अराती; उद्धरिली ज्ञातिहृद्गता चि अरा[*] ती.** * धार, अग्र. १६. शत्रुरूपी हत्तींचा. १७. कृष्णरूपी सिंहास. १८. शत्रुरूपी शेकडों हरिणानीं. १९. संमिलित ( एकत्र जमलेल्या ) आप्तांस.

त्यांसह उद्धवजि! वसे हारि कीं, [1]अन्योन्यलब्धउद्धव जिवसे? ८२
पुसतों हारिदासां गा! उद्धवजी! कीं यथार्थ चि वदा सांगा.
[2]श्रुतिरति पुरवा; माया पति चि असे काय, भजति [3]पुरवामा या? ८३
कृष्ण रमविला; सकळा जाणति त्या [4]तन्मनोरमविलासकळा?
पुसणें हें काय? शतें जन्मांच्या ये न, करुनि [5]हेंको, यश तें. ८४
सुहृदंबुज[6]रवि दग्धा निजविरहाग्नींत [7]या जना अवि[8]दग्धा,
आठवितो गोष्टीं[9]च्या केव्हां तरि काय [9]अवसरीं गोष्टीं[9]च्या? ८५
तूं यदुवीरासरसीं[10] वससि, पुसों म्हणुनि; आठवी रासरसा,
कीं, हरि जाला रमता नाचत, गात, प्रिया जया फार मता? ८६
जाले [11]जेवण व्याला स्वविरह शोका तया च, जे वणव्याला,
हे जन शुष्क अरण्य; प्रभुकरुणाघन करील शांत [12]शरण्यें? ८७
न धरुनि परवा, टोळें कंसें छाळिलें उदंड, पर वाटोळें
जालें या [13]दवपातें, वश यास्तव सर्व आप्त [14]यादवपातें? ८८
नृपवरकन्या वरिल, प्रेम कसें हो! तगेल [15]वन्यांवरिल?
याया या [16]दावांतें काय अधिक फळ वदोनियां? दावा तें. ८९
आम्हीं रानींच्यानीं काय तया लाभ ईश्वरा नीच्यानीं?
नृपकन्या ही न [17]वरों तो आत्माराम [18]भूतिचा कीं नवरा. ९०
' सुख नैराश्यापरतें नाहिं म्हणे, ' [19]पिंगळाख्यवेश्या, पर तें

---

१. परस्पराना उत्सवप्राप्ति झालेले असे. २. कानाची हौस. ३. नगरवासी स्त्रिया. ४. कृष्णाच्या मनास आराम देणारा असा विलास. ५. हट्ट. ६. आप्तांच्या हृदयकमळास सूर्य. ७. अडाणी अशा आम्हांस. ८. गोष्ठ्यांतील. ९. गोष्टींच्या प्रसंगीं. १०. कृष्णाजवळ. ११. उपभोगानें शांत (कृतोपभोग). १२. रक्षण करणारा. १३. अग्नीमध्यें पडल्यानें. १४. कृष्णातें. १५. रानटी स्त्रियांवरील. १६. अरण्यातें. १७. सुंदरा, बरी. १८. लक्ष्मीचा. १९. पिंगला या नांवाची एक वेश्या आपल्या नित्यक्रमाप्रमाणें एके दिवशीं सायंकाळीं परपुरुषाची वाट पाहत असतां कोणी च न आल्यामुळें निराश होऊन विरक्त झाली व पुढें नैराश्यावस्थेंत च तिला सुख वाटूं लागलें, ही कथा येथें अनुसंधेय आहे.

न घडे देखा, परिस स्वर्णत्वप्रद[1] हि तें न दे खापरिस. ९१
कोण सये! कांताच्या वार्ता सोडूं शकेल एकांताच्या?
इच्छीना हरि, पर ती श्री, पद सोडुनि, न होय पळभरि परती. ९२
दुःख न होतें विसरीं[2], दवदाह जसा तटीं, न हो तेंवि सरीं.
न स्वमतिस दावि मुख श्रीपतिचा विसर कां सति! सदा विमुख[3]? ९३
स्मृति[4] नुठवी मनिं यमुना, तरि काय क्षण मुकुंदकाम नियमुना?
नामें रूपें कृष्णा स्मरवि, ठकवि, शुक्ति जेंवि रूपें कृष्णा[5]. ९४
जेथ वधी सदरींतें, तें तें स्थळ मोहितें चि धीस, दरींतें
होय क्षोभ वनातें विलोकितां, करि जयांस तो भवनातें. ९५
शुचिहृदया! गा ईतें, पाहों जेव्हां हरिप्रियागाईतें,
वाटे आला पीतद्युतिवसन[6], स्वरसमूह आलापीत. ९६
हें सर्व हि आठव दे, मन मतिसीं तद्गुण प्रहर आठ वदे,
जें तें हि स्मरवीतें, स्मरण हरीचें सुदुःसह स्मर वीतें. ९७
असति उमटलीं पँदकें[7] श्रीधरणीच्या उरस्थळींचीं पदकें,
नयनांतें लोभविती, शोभविती भूमितळ, मन क्षोभविती. ९८
स्मित गॅत[8] ईक्षण ललितें मधुरोक्तें पाहुनि स्वबुद्धि भुललि तें.
न शकों विसरा विसरें[9] स्वसुखाचा, चातकीं न विसरावि सँर[10]. ९९
विरहांबुधि करि लगट व्रजासि; तव शोकवाडव[11] चि करिल गट.
'निजजनजीवित राहो' हें दान वदान्यनाथजी[12]! वितरा हो!. १००
शोकांबुधि तीव्र, तरे न व्रज; तूं रक्ष महदुपकृतीव्रत रे!.

---

१. सुवर्णपणा देणारा. २. विस्मरणीं. ३. पराङ्मुख. ४. यमुना मनांतील [ कृष्णाची ] स्मृति न उठवी–घालवीत नाहीं ( यमुनेला पाहिलें असतां कृष्णाची आठवण झाल्याशिवाय राहत नाहीं हा भाव.) तर काय [ मग ] क्षणभर देखाल आम्ही मुकुंदकाम ( कृष्णाचा अभिलाष ) नियमुना ( आम्हांला ताब्यांत ठेवतां येणार नाहीं )? ५. यमुना. ६. पीतांबरधारी. ७. पाउलें. ८. गमन. ९. समूह. १०. पावसाची धार. ११. शोकाग्नि. १२. वदान्यजनसद्गुरो! ( दातृपुरुषांतील श्रेष्ठा! ).

जो निकट उभा नुतरी, बंधु कसा? न निववी, अमृतभानु तरी?" १०१
वारिवहाभा गाल्या जाल्या ऐसें सती महाभागा त्या.
प्रियसंदेशीं अगदीं आधिव्याधि शमले, परि न ते अगदीं. १०२
तो प्रियकर मित्राचा पूजिति, नलिनी जशा स्वकर मित्राचा.
प्लवंग समीहित सीते, मानी हरिदास मंडळी हि तसी ते. १०३
त्यजि आत्माराम हि, ने तो उद्धव काळ गोकुळीं बहु महिने;
करि सत्सहवास, वदे, सेवी यश; सुख तसें न यदुवासव दे. १०४
लावि दयाळकथानीं भजनीं मन, माय जेंवि बाळक थानीं.
बहु सुख दे वासर; ते जाले क्षण, चिंतितां चि देवा, सरते. १०५
गोपींचें कृष्णीं तें प्रेम जसें, सर्वथा नसे वृष्णींतें;
सर्व हि शुद्ध वरीती ब्रह्मसगुण, गाय ते चि उद्धव रीती. १०६
"गोपी सफळजनु जनीं, आत्माधिक इष्ट ज्यांसि शौरितनुजनी.
भक्त मुमुक्षु ज्ञानी काय अधिक? यांसि पूजिजे सुज्ञानीं. १०७
वांछिति ज्या प्रेम्यातें साधु सकळ, येथ देखिलें से म्यां तें;
जरि गोपवधू, तरि ते सिद्धि असे; यांसि अन्य अवधूत रिते. १०८
'हें ब्राह्मणजननीं च प्रेम शुचित्वें घडे, इतर जन नीच,'
म्हणतां अन्यायाची जोडि असे; योग्यता चि अन्या याची. १०९
यन्मन बाळक थानीं लावियलें सदयविश्वपाळकथानीं,
त्यास अशा सन्मानीं काय? अधिक विप्रविप्रवरजन्मानीं. ११०
हेतु महत्वा चरणप्रसाद हरिचा; तयास जात्याचरण
ज्ञान हि न हेतु; भजन प्रभुचें केवळ तदिच्छु सर्व शुभ जन. १११

---

१. जर संताप दूर करीत नाहीं तर चंद्रास 'अमृतमय किरणाचा' असें कां म्हणावें? २. मेघश्यामास. ३. प्रियकराचा निरोप हें च कोणी औषध त्यानें मानसिक व शारीरिक रोग नाहींसे झाले; पण अगदीं निःशेष गेले नाहींत. ४. सूर्याचा किरण. ५. वानर ( हनुमान ). ६. आवडता. ७. हरिभक्त उद्धवास हि त्या गोपी तसें च समजतात. ८. यादवेन्द्र. ९. दिवस. १०. वसुदेवपुत्र कृष्ण. ११. असें. १२. दयाळु जगपाळक कृष्णाच्या कथा-[ रूप मातानीं ].

युवति सदा रानींच्या, व्यभिचारपरा हि, गोपदारा, नीच्या;
या कोठें! अजितरती कोठें! भजतां न जाणते अजि! तरती.[1] ११२
बोध न लेश वसे, जे दीर्घस्वापार्थ[2] पहुडले शव सेजे[3]
त्यां हि अजीवां चवितें नेणतयां, अमृत कीं अजी! वांचवितें. ११३
जड न चुके; शवरक्षा होतां ही उठवि अमृत; 'केशव रक्षा
न करी कां जी भजनीं?' कथि हें श्रुतिची च भाविकां जीभ जनीं. ११४
श्री स्त्री ही परि रंभाद्यमरवधूसुंदरी[4] च बहु परिरंभा
नेणति ही लव ज्या, या रासीं त्या पावल्या चि बल्लवजाया. ११५
यांचें भाग्य बहु चि; तें वानाया दशशताननें हि न उचितें.
शक्ति नसे, वानावे किति? गाउनि परि करावि सेवा नावें. ११६
कृष्णकृपा होउ, वडो प्रार्थित, हें सदय दैव पाहो उघडो.
वांटे मज लाभ लतागुल्मतृणोद्भव[5] हि येथ मजला भलता. ११७
जन्म असें न मनीं च क्षुद्र, घडो हरि; सुखी असेंन मनीं च;
साधुकृपा हि लहानीं दिसते, हें जाणता न पाहिल हानी. ११८
इच्छीं अवरजनुसें[6], [7]तें यास्तव कीं पदसरोजभवरज[8] नुसतें
गोपींचें असुलभ या माथां ठेवूनि पाय, हरिल कुलभया. ११९
जरि अनुकंपा दीनस्वद्रुम हरि करिल, हें चि संपादीन,
गोपींचें पायतण स्पर्शो, व्हावें करूनि सदुपाय तण[9]. १२०
ज्यांचें दुस्त्यज नातें, त्यजिल्या जाल्या तृणापरि स्वजनातें,
धर्माला ही नमनें केलीं, गणिलें हि मृत्युला हीन मनें. १२१

---

१. या व्यभिचारिणी गोपी कोठें आणि अजिताची (विष्णूची) भक्ति कोठें! दोन्हींमध्यें फार च अंतर; [तथापि] न जाणते (अज्ञानी मूढजन हि) भजतां (भजन केलें असतां) अजि (अहो!) तरती. २. चिरकाल झोंप घेण्यासाठीं (मरण्यासाठीं). ३. शय्येवर. ४. रंभादि देवांगना. ५. वेली, जाळ्या व गवत यांचेमध्यें [झालेला] जन्म ही मला भलता (विलक्षण) लाभ वाटतो. ६. नीच जन्मास. (नीच जन्म यावा अशी मी इच्छा करितों). ७. जन्म. ८. पदकमलांपासून जहालेले रजःकण. ९. तृण.

जें श्रुतिशतपद[1] [2]वीची स्वसुखांबुधिची, मुकुंदनिजपदवीची,
जरि परिभव हि, वरिलि; हे पुण्यर्धी[3] चित्रगुप्त न वहिवरि लिहे. १२२
ज्याची सतत अर्पचिती[4] श्री करि, तपली तदर्थ तीव्र तप चि ती;
जे मुनिदैवत, शाला शांतीची, ध्याति शुद्धदैव तशाला. १२३
स्कंदापिता पार्थांनीं[5] ज्याच्या[5] विपदाह शमवि, तापा, थानीं
ठेउनि त्या हरिचरणा, विज्ञविति गोपी, करूनियां परिचरणा. १२४
गोपींच्या पायांला नमन, नसे भेद शार्ङ्गचापा यांला[6].
भजती हरिस ख्यातें, चरितें गाती, स्मरोनि हरिसख्यातें. १२५
केलें हँतरिपुनीं[7], तें गाउनि सच्चरित सौख्यकारि, पुनीतें
भुवनें[9] करिती, नमनें, असोत यां नित्य जन्मभरि, तनिं[8] मनें." १२६
ऐसें तो उद्धव या गोपींतें गाय साधुतम शुद्धवया,
स्मरशरजा[10] मनिं घाया करुनि, बरें विनवि गंतुकाम[11] निघाया. १२७
'नाहीं मनिं जावासा प्रिय उद्धव माधवासम निजा[12] वासा[12],'
जाय तई असा नंदप्रभृतिजन वदे कृतांजलि असानंद[13]. १२८
'अस्मन्मानसवृत्तीहंसींला हरिपदाब्जमानस वृत्ती[14]
द्या,' ऐसें वरदास प्रार्थी जातां चि, मागतों वर दास. १२९
वाणीस हि लाउ चटी हरिनाम, न विस्मृति क्षण जिला उचटी[15],
आम्हां हा हो सण, तां विनवावा हरि, मुखास ये वोसणतां[16]. १३०
त्या सदुदारा[17], बावा उद्धवजी! माग कीं सदा राबावा
सेवेंत चि देह, रितें पळ न टळो, फार दास्य रुचि दे हरि! तें. १३१

१. वेदशतांचें स्थान. २. लाट. ३. पुण्यवृद्धि. ४. पूजा. ५. ज्या भगवंताच्या [पाद–] जलानीं. (भागीरथीनें हें तात्पर्य). ६. कृष्णामध्यें व या गोपींमध्यें. ७. ज्यानीं शत्रु मारिले त्या बळरामकृष्णानीं. ८. 'सज्जन' हा कर्ता. ९. तीन भुवनें, त्रैलोक्य. १०. मदनबाणापासून उत्पन्न झालेल्या. ११. जाण्यास इच्छिणारा. १२. आपल्या घरीं. १३. दुःखी. १४. राहण्यास स्थान किंवा उपजीविकास्थान. १५. दूर करी. १६. वाहत असतां, बुडत असतां. १७. अत्यंत उदार अशा कृष्णदेवास.

कर्मैं चि परिश्रमतां वारावा कर्मभोग न, परि श्रम तां
उरवावा न, मनांत प्रेम असो फार माधवा! नमनांत. १३२
निष्कामत्वें शुचितासंपन्ना सत्क्रिया घडाव्या उचिता.
स्वावनदक्षभुजातें[1] वद, ' आश्रय दे पदांबुजें चि सुजातें. १३३
न पदापरती राहो मति, सदर्य भवांबुराशिपरतीरा[2] हो! '
हें हरिस वदा, ' विसरा न तृषार्तां, ' जो कुळप्रसव दावि सरां[3]." १३४
सांजलि, साश्रु तदा सव्रजपतिजन कामं[4] करि असा श्रुत, दास
दे विविधोपायन तें घे उद्धव; नमि शिरें चि तो पाय नतें. १३५
पावे मथुरापुर; तें व्रजवासिप्रेम हरिस सांगे पुरतें;
वंदुनि मृदु पाय नतें स्वशिरें, अर्पी यथोक्त सदुपायन तें. १३६

---

# अध्याय अठ्ठेचाळिसावा.

मांडुनि पाटी[5], रतिचा योग पुसे जे, गृहीतपाटीर[6] तिचा
ताप दयाघन सारा[7] हरि; वंदूं सांवळ्या तया घनसारा.[8] १
दे सकुतुक मलयर्ज, न प्रभुचें घडलें दुजें पदकमलयजन.
दीनांचा भाउ, जरी अल्पभजन, दे असीम शोभा, उंजरी[9]. २
सुरुचिरदेहा रमणी भोगी, जाउनि गृहासि दे हारमणी.
काम पुरविला साचा; ते दुर्मति घे वर स्मरविलासाचा. ३
सैरंध्री[10] कृतकृत्या केली, जी तनु[11] करूनि धिक्कृतकृत्या[12],

---

१. स्वकीयाचें रक्षण करण्याविषयीं सावध भुज ज्याचे अशा कृष्णातें. २. भवसागराचें पैलतीर च अशा हे दयालु कृष्णा! ३. जो कुलप्रसव (कुलीन) [ तो ] सरा (सरोवरा) दावी. ४. अभिलाष. ५. परिपाटी, पद्धत. जी कुब्जा [ आपली ] रीति प्रकट करून प्रेमाचा उपाय पुसे. (कृष्णप्रेम कोणत्या उपायानें संपादावें हें विचारी, हा भाव). ६. जिनें चंदनाची उटी लाविली अशा कुब्जेचा. ७. मेघांचा [ केवळ ] सार च अशा. (अत्यंत कृष्णवर्णाच्या अशा, हा भाव). ८. चंदन. ९. नीट करी, भूषित करी. १०. शिल्पदासी, वेणीफणी करणारी दासी. ११. तनूनें. १२. धिक्कार केला आहे कृत्येचा जिनें अशी.

पावे श्रीपरिस रतिप्रसाद; ज्यांस न सुरांगना परि [१]सरती. ४
वरद जळजनाभ जनीं दावी ऐसें महाफळ जना भजनीं,
संगें अत[२]नुशि खंडी त्या स्त्रीच्या देव, जेंवि अहिस शिखंडी. ५
अक्रूराला भवना भेटाया, द्यावया बरा लाभ वना
त्या दय[३]मानवसंतप्रभु जाउनि, सुखवि देव, मानव, संत. ६
स्मरला भाके कीं तें वदला होता; दयाब्द हा केकींतें
भक्तांतें विसरेल प्रभु कां? तत्ताप सर्व केंवि सरेल? ७
पूजुनि शुद्ध[४]वपूतें, अक्रूरें साधिला सदु[५]द्धवें पूतें.
तो उत्सव दोंदीं[६] न ब्रह्मांडसमीं धरे; किति वदों दीन?
"पसरुनियां आ, ज्यां चि स्वांबेच्या सेविली सुधा आम्याची. ८
गोडी आहे नामीं, तैसी हरि! [७]तींत लेश पाहेंना मीं. ९
[८]पसरवि 'आ' म्हातारी दे अमृत. तुझी हि कीर्ति आम्हां तारी;
अज्ञानां आ[९]मांतें जें दे आरोग्य, बा! न दे आमा तें. १०
बहु [१०]चिटि तों, कांटाळा ये मग दे माय ते हि तोकां टाळा.
'नित्य चिटा कीं नामीं श्रम न,' म्हणे 'क्षण हि हें चि टाकीना,' मीं.
[११]त्राणीं आळस, दापी जाणतयीं[११], [१२]अचिरजातबाळ सदा पी;
थोरीं आणि लहानीं, कीर्ति समप्रीतिला न आणिल हानी. १२
कोणा हि न भी; डसती ते अहि पाजी; विलंघि हि न भीड सती
कीर्ति तुजी, जननीच्या परिस भली; कारि सुखै[१३]कभाजन नीचा. १३
कीर्तिसम हि मातेला म्हणतों; ये काय आज्यमहिमा तेला?
हे माता अमृताची न, मृताची, कीर्ति तों मृता अमृताची. १४

---

१. बरोबरीस पोहोंचतात. २. अनंगास ( मदनास ). ३. दया करणारा ऋतु वसंत च असा प्रभु कृष्ण. ४. कृष्णातें. ५. उत्तम आनंद. ६. स्थूल उदरीं. ७. मातेच्या स्तनांतील दुधांत. ८. यशोदा मुद्दाम तोंड पसरून दूध पाजते. ९. आम्हांला. १०. पितो किंवा बिलगतो. ११. जाणत्या मुलाला दटावते व त्याचें रक्षणाविषयीं आळस करिते. १२. नुक्तें च जन्मलेलें बालक. १३. केवळ सुखाला च पात्र.

तूझ्या पद्युगलीची, रीति पहातों मनांत जो उगली चि,
सुरभीची[1] आजि कडे घे दीना, धांवत्ये पसरि 'आ' जिकडे. १५
धरिते भाव शनीच्या दृष्टीचा, भूतिवल्लभा! वश नीच्या
करि पीडा परम; उशी शांतीची, अघनगाशनी, पर मउशी. १६
सुख यद्रज दे, वांचे ज्या अमृतें विश्व, पाय मज देवांचे
हे नौका नाविक ते घ्यावे, देवूनि चित्त काना, विकते! १७
लागो मोघां[2] भावां[3] आगि; तुम्हां भेटले न दोघां भावां.
गेले भव[3] देवां! जे नेणत, एक हि न त्यांत फळ दे, वांजे[4]. १८
धन्य चि हा दीन; वेमीं नामें अगदें अहंममादी नव मीं[5].
हे तूज असे विनती, मात्रा भवगदचिकित्सका! सेविन ती." १९
करि बहुशःस्तव, देहा चरणीं अक्रूर ठेवि, शस्त[6] वदे हा.
तेथ असाया दास प्रार्थि असे; लोभ जळिं असा यादास.[7] २०
देव वदे, 'अजि! तातें प्रेमें या जिंकिलें तुवां अजितातें.
यदु चि अहो! भागवतश्रेष्ठा! न पवे उंशरिशोभा[8] गवत. २१
तुजला जनका कांहीं भेद न; हा पोष्य होय जन काकांहीं;
जो हित तो काकानीं पाजावा सदुपदेश तोका कानीं. २२
तुमचा संता पद वा रज चि स्मरतां निवारि संतापदवा;
जरि मन सेविल याला अशुभांच्या डशिर पळ नसे विलयाला. २३
बहुतापरि साधूतें श्रेष्ठ म्हणों, तें चि लेश परिसा; धूतें
सत्पदरज भजकमळा; तत्पूर्तोला सदा भजे मज कमळा[9]. २४
सुखद न भजका पुंरते[10], स्वार्थपर चि देव, गमति मज कापुर ते.
न धरी जरि लोक टुकें[11], स्वच्छ हिम हि सुरभि[12] होय परि तो कटुक. २५

---

१. कामधेनूची आजी (कामधेनूपेक्षां श्रेष्ठ अशी तुझी पदयुगली). २. व्यर्थ झालेल्या जन्मांला. ३. जन्म. ४. व्यर्थ. ५. नामें अगदें अहंममादि नव [रोग] मी वमीं (ओकतों). ६. प्रशस्त. ७. वाळ्याची शोभा. ८. सज्जनांच्या चरण-धूलीनें पवित्र झालेल्या. ९. लक्ष्मी. १०. पूर्णपणें. ११. ह्या शब्दाचा अर्थ काय? १२. सुगंधि.

साधु भले! साधु भले! हे सर्वां सर्वकामसुरसा दुभले.
त्यजिति न दीना, वाडे शांतीचे, संसृतीनदीनावाडे. २६
दीनां तो भाउ खरा साधु, न घन; दे न सस्यशोभा[1] उखरां[2].
हो खळ हि, तथापि कवी तद्धृदयीं शांति[3]शाळि सुकथा पिकवी. २७
तीर्थें तें तोय, शिळामृन्मय देव, प्रसाद तरि होय शिळा;
कीं करिति शुभा उशिरें; सुख द्या नमितां तुम्हीं सदय भाउ शिरें. २८
शुद्धविवेका काजें लोकोपकृतें चि समुचितें काका! जें
हित परिसा; बापाजी! रुग्णापत्यासि सद्रसा बा पाजी. २९
श्रीकुंती आका जी पांडुवियोगार्तमानसा, काकाजी!
श्रमते बहुविध, वेंचे जीवन शोकांत; ताप बहु विधवेचे. ३०
ती पंचसुता, पतिचें मरण, नवें भोगितें मन सुताप तिचें.
बाळां चुलता चुलती पोषिति; वाहे प्रदीप्तचिंताचुल ती. ३१
वाटे जनदेव[4] शतें पुत्रांच्या मुग्ध; त्यांसि मन दे वश तें
पुत्रस्नेहा; लाहे कोण न मोही महामते! हाला [5]हे? ३२
सुत बहु नीच क्षुर[6] जें, तें करिल तिजें हि झांकुनीं चक्षु रजें;
बहु अस्वस्थ विरहिता; आत हि पाहत असेल न स्थविर हिता. ३३
वैधव्य चि आधीं तें अंगारस्नान; दे सकळ आधींतें;
शोकाचें गांव; तणें[7] प्राण, तयांतें दवाग्निचें आंवर्तणें. ३४
दुःखक्षोभा, ऊन च्छत्र तसें, हरुनि, करुनि लोभा, ऊन
पूर्ण करा. भावू न त्यजिती, आचार हा बरा भावूनं. ३५
बाळसुता आत; पतिच्छत्र न माथां; असह्य हा आतप[10]; ती[11]
जातिव्रतति[11], फुलांतें तीच्या साहेल ताप काय मुलांतें? ३६

---

१. धान्याची शोभा. २. उकिरड्याला. ३. समाधान हें च कोणी भात. ४. राजा धृतराष्ट्र. ५. अन्वयार्थ–हे मोही हाला कोण न लाहे=हें पुत्रस्नेहरूप मोहकर मद्य कोण पावत नाहीं? ६. वस्तरा. ७. तृण. ८. बोलावणें. ९. चांगल्या तऱ्हेनें लक्ष्यांत घेऊन. १०. संताप. ११. कुंती ही जाईची वेली.

समय निका काजा या सत्वर चि गजाह्वयासि काका! जाया;
कळतां वृत्त मनाशी, तें चि करूं, जें बरें सुहृत्तम नाशी.' ३७
मग सोद्धव बळहरि ते गेले सदनासि सकळखळबळहरितें,
प्रिय शुभदैवा, राजे विधिचे, शुचिच्या चि घेति कैवारा जे. ३८

---

# अध्याय एकोणपन्नासावा.

स्वामिकृपा साधुनि, घे आज्ञा अक्रूर; सत्तपा साधु निघे.
वृत्तांत जसा, व्हाया विदित तसा, पावला हि गजसाह्वा या. १
भेटे धृतराष्ट्रातें, भीष्मातें नीतिधर्मधृतराष्ट्रातें;
मोहमहानगभिदुरा हरिचरणा जो भजे तया कविविदुरा; २
'काय वृथा जीवा हे श्रम भोग?' म्हणे तनू पृथा जी वाहे
तीस; खळजना भाचे जे रिपु पाहे सखे जळजनाभाचे. ३
भेटे द्रोणा सकृपा, अन्यास हि; हा न इष्ट कोणा सकृपा?
करिती कौरव ते जें युक्त तया त्याचिया चि गौरव तेजें. ४
याच्या पौर वलक्षज्ञाना गाती; सुबुद्धि पौरव लक्ष
लाभ म्हणति; शिर काया अर्पिति, हरिजनपदीं सुखीं शिरकाया. ५
कुंतीचा भाउ मग स्थिर राहे, घेत आप्तलाभा, उमग
वृत्ताचा कुरुपाच्या व्हाया, भगिनीमनांतिल्या कुरुपाच्या. ६
करि बहुमास कळाया स्थिति रीति, कळे सदुत्तमा सकळा या.

---

१. हस्तिनापुरास. २. मोहरूपी मोठ्या पर्वतास वज्रासारख्या अशा कृष्णचरणास. ३. कोणा दयालु जनास हा अक्रूर आवडत नाहीं? ४. अन्वय—त्याचिया चि तेजें जें गौरव युक्त [तें] ते कौरव तया करिती. ५. शुद्ध ज्ञानातें. ६. सुखप्रद अशा कृष्णभक्त अक्रूराच्या चरणीं. ७. शोध. ८. आंत कांटा राहून झालल्या रोगाच्या. (रोगाप्रमाणें दुःख देणाऱ्या अशा. "कुरुपाच्या" याचें विशेषण ).

कीं[1] नृप सुतपोरहित, द्वेष्टे ज्या गमति पांडुसुत, पोर हितें. ७
पाहुनि तो भाउ, सरी[2] देवी न करी जिची, विशोभा उसरी[3]
जाली; बहुविध वाहे ताप; रडे, आठवूनि बहु, विधवा हे. ८
'आप्तमतिस दादा! ही स्मरल्ये कीं, जीस दुर्गति सदा दाही.
पितरांस आल्यांतें, ज्यांची पहिली दया अदभ्रा[4] त्यांतें? ९
बहिणिभावजयांचा स्नेह असे? पूर्ण आप्तभाव जयांचा,
स्मरती सन्मति आली[5]? कुंतीची आजि बारि तुम्हां स्मृति आली! १०
स्मरला मजला भाचा कृष्ण हि कीं? आज दिवस मज लाभाचा.
जालें मन अभि[6] राम[6]! स्मरतो कीं मत्सुतांसि या अभिराम[7]? ११
अग नग पौर वनीं च, आल्या! मीं ही मृगी च, पौरव नीचें.
भय फार; कशा वांचे यत्नें? असु हारिति दुष्टवृक शावांचे[8]. १२
वदतां, मन भी माजें, करिते जाले सपत्नजन भीमा जें.
हा अज्ञान, गरातें चारियलें; विदित सर्व या नगरातें. १३
स्वसुतां सुख भावो[10] जी इच्छा, अनुमोदिती तिला भावोजी[11];
कुगति असीमा माजी तळमळती देखतां असी मामाजी[12]. १४
मन चि न नृप दे शतशा विदुरोक्ता; काय करूनि उपदेश तशा?
सत्यवती सासू, या, असती तरि, वारिती सती, सासूया[13]. १५
भव भजतां हरि; माय त्रिजगीं जीची दया न; ते हरिमाय[14]
दीनजना थानातें लाविल कीं, स्मरुनि या अनाथा नातें? १६

---

१. मूळ पाठ—**कीं मुनिसुत पोर, हितद्वेषी प्रियसाधु अहित, सुतपोरहित.** अन्वयार्थः—मुनिसुत (हा धृतराष्ट्र) पोर, (अडाणी) हितद्वेषी, अहितप्रियसाधु (शत्रु प्रिय आणि चांगले वाटतात ज्यास असा), [व] सुतपोरहित (चांगल्या तपानें रहित) [असा आहे]. २. बरोबरी. ३. सुकलेली वांगी. —**पंत**. ४. पुष्कळ. ५. या मैत्रिणी. ६. अभिराम=प्रसन्न—निर्णय० (?). ७. समीप आहे राम ज्याच्या असा कृष्ण (बळराम व कृष्ण). ८. अन्वयार्थ ? ९. मुलांचे. १०. होवो. ११. विदुर. १२. व्यास किंवा भीष्म. १३. मत्सरी धृतराष्ट्रास. १४. हरिरूपी माता.

मीं प्रहर हि आठ विल्यें चिंता; चिंतामणिप्रभुस आठविल्यें;
स्तविल जग श्रुतरीती[1], पितृभगिनीचें पुशील अश्रु तरी ती. १७
तूं सदुदार; कपाळीं पदरज लावूनि, दीनदारेंक[2] पाळीं.
घे, घेशिल आतर[3] जें; तारीं; न, भवीं बुडो, मळो आत, रजें. १८
नाहिं अनाथा, राया! दीनाच्या बांधवा! जना थारा या.
दे सकृपा दान, तमीं न बुडें सें अभयमात्र; पादा नत मीं;' १९
अक्रूर म्हणे, 'न सती शोकार्हा तूं; तुला अभद्रें नसती.
निर्भय आका! राहें; आलें ब्रह्म चि दयाळु आकारा हें. २०
त्या मुनिवित्ता सारें ठाउक आहे करील चित्तासारें[4].
पुत्र तुझे वाढविल; त्रिजगच्छल्यें[5] हि या करें काढविल. २१
न मळे आकाश मळें, सद्वत्सलदेवयश[6] हि आका! शमळें[7],
नससी आका! रानीं; जाणवती सुत समर्थ आकारावीं.' २२
विदुर वदे, "वहिनी! ती पाहिली सोडील काय देव हि नीती?
प्रभु दयमान सहाय स्वजना; तुमचें म्हणो न मानस 'हाय!'" २३
अक्रूर म्हणे, "मजला दे आज्ञा; येथिंचा विचार उमजला.
'येतों' ये तोंडासी प्रभुनामास्तीक[8] असदहि[9] न तों डासी." २४
मग जाउनि उर्वीशा[10] भेटे अक्रूर कवि; म्हणे, "कुर्वीशा[11]!
मेला पांडु; रहातें यश; जोडिति सुज्ञ तें चि पांडुर हातें. २५
भाग्यमदें उतण्यांत स्थिति न बरी, वर्त सम सुतापुतण्यांत.
न कुमतिवश गा! ऊत; श्री जीवन चपळ; साधु यश गाऊत. २६
कवि न वदे, हासाचें पद होतें वचन म्हणुनि, देहा 'साचें;'
भावुनि देव, पुजा तें, आस न; विरह क्षणांत दे, वपु जातें. २७
कांताबांधवसुत, या तनुचे संबंधिजन धनांध[12] वसु तया-

---

१. ऐकलेले स्वभाव—निर्णय०. २. दीन मूल (पांडव). ३. नौकेचें मोल. ४. मनाजोगें. ५. त्रैलोक्याचीं दुःखें. ६. सज्जनांवर प्रेम करणाऱ्या देवाचें यश. ७. पापानें. ८. ईश्वरनामरूपी आस्तिक ऋषि. ९. दुर्जनरूपी शत्रु. १०. राजा धृतराष्ट्राला. ११. कुरुश्रेष्ठा! १२. धनानें आंधळे असे.

पासुनि, दावुनि माया, हरिति; कसे आप्त ज्यांचिया मनिं माया?[1] २८
न गणुनि पातक, पाळा;[2] येतो पारि उग्र नरकपात कपाळा;
दुर्गतिहेतु जन मनें धूर्त, करिति वारिवरी च हे तुज नमनें. २९
मीं मम हे भार[3] तमीं बुडविलि; वदतों हितेच्छु हे भारत! मीं.
टाकुनि लोभ, व्यासप्रभवा![4] विश्रांत पात्र हो भव्यास. ३०
बुडविति इष्टा पूर्ते हे कामक्रोधलोभ इष्टापूर्ते.[5]
प्रज्ञाचक्षु! द्रव दे तव हृदया, अहित जरि सुत क्षुद्र वदे. ३१
हा तनय न, अहि; तातें त्वां वारावा; करील बहु अहितातें.
नयपथविमुखा बानें[6] शिक्षावें कुरुगृहांचिया खांबानें. ३२
बहु म्हणतिल 'फटें'[7]; काळ ग्रासिल तुज अयश केवळ चि फटकाळ.
वृत्त[8] जना सुखउ, जळ श्रांता जैसें; कुळीं तरि च मुख उजळ. ३३
उपजे जेव्हां प्राणी, वद, तेव्हां संगतीस कवणा आणी?
जेव्हां भूपा! मरतो, कोणातें संगतीस घे पामर तो? ३४
सुकृतासुकृता आंगें भोगी, कीं त्या सहाय असतो? सांगें.
सहवास हि तो मूर्तश्रेयःप्रत्यूह[9] कृतसुहृन्मिष[10] धूर्त. ३५
मग कुजकी जशि दोरी, आयुष्याची तुटे; स्वपापशिदोरी[11]
घे लुटिला तो नर; कीं स्वार्थपरिभ्रष्ट रडत जातो नरकीं. ३६
म्हणुनि स्वप्नासम या लोकास पहा; स्मर श्रुतीच्या समया.[12]
हो शांतमना; शील स्वच्छ धरीं; गा हरीस; तम नाशील. ३७
वाटे चतुरा ज्या जी रीति बारि, भजे तिला चि बहु राज्याजी!
पारि करि जो निजहित, जी! धरि साधुपथ, क्षुधा तृषा निज हि तजी.[13]"
भूप वदे, 'वसुधेतें[14] येउनि, रुग्णासि पाजि देव सुधेतें,

---

१. कपट. २. रक्षण करा. ३. [ अहंकाररूपी ] ओझें. ४. व्यासपुत्रा हे धृतराष्ट्रा! ५. यज्ञयाग व तलाव, घाट वगैरे परोपकारी कृत्यानीं. ६. बापानें. ७. छीः. ८. सद्वर्तन. ९. मूर्तिमंत कल्याणास विघ्न. १०. मित्राचें सोंग घेतलेला असा. ११. आपलें अनाचरण हीच शिदोरी. १२. आचाराना. १३. त्यागी—**पंत.** १४. पृथ्वीवर.

साधो! तूं हि तसा च श्रेष्ठ कथिसि बोध हा मला हित, साच. ३९
श्रुतिस[1] सुविद्या वीचि[2] प्रमुदब्धीची च हे नवी द्यावी चि;
पसरी वपु, ढेंकर ही दे न, मिटकिया चि दे, कारि पुढें कर ही. ४०
उक्ति तुजी परम मता; सोडीना दुष्टचित्त हें पर ममता.
न तगे हृदयीं विषमीं; जाणतजाणत हि सेवितों बा! विष मीं! ४१
ऐसें मन मम, ताकीं आवडि फार, प्रिया जया ममता कीं.
भवदुक्त्यमृतांत रुची न चिर धारि अभाग्य, सावुलि न सुरतरुची. ४२
वागमृतसुधारा हे भग्नमनोभाजनांत[3] न बुधा! राहे;
न धारि हृदयतितउ[4] पळ त्वदुदितजळ[5], शुष्क सिंधुनिपतित उपळ[6]. ४३
माया भ्रमहेतु जगा भगवंताची, असे विदित हे तुज गा!
कोप करुं नको; टिकवे न इच्या मथनीं, प्रयत्न जारि कोटि कवे! ४४
कोणा हि नको टिपँरी[7] हे नाकींची, श्रमे हि जन कोटि परी.
हारि करिल दया, तर ती हारिल चि; मायाब्धि सेतुनें या तरती. ४५
तो प्रभु यदुराज गतिप्रद अवतरला; करील विर्भरा[8] जगती.
त्या करितों मीं नमन; श्रीशपदामृतनिधींत हो मीन मन.' ४६
अक्रूरास कळे, हा नृप वदतां आणि पाहतां, सकळेहा[9].
मग सुहृदाज्ञा त्यानें घेउनि, नमिलें विमुक्तिदा[10], ज्ञात्यानें. ४७
करुणाघनदेवाचे पाय नमी; वृत्त सर्व हि वदे वाचे[11].
पुरले काम मनाचे; अक्रूरमयूर, विसरुनि श्रम, नाचे. ४८



१. कानास. २. आनंदसागराची लाट. ३. मनोरूपी फुटक्या भांड्यांत. ४. अन्तःकरणरूप चाळण. ५. तुझें भाषणरूप पाणी. ६. दगड. ७. चिमटा. (नाकास टिपरी लावणें ही एक शिक्षा आहे) –निर्णय०. ८. भाररहित. ९. सर्व इच्छा. १०. कृष्णास. ११. वाचें=वाचेनें (?).

# सज्जनप्रार्थना.

( श्लोक )

माझा प्रेमा सुदामा हरिसख दुबळा; शब्दसंदोह[1] जो, हे
साधूपासीं श्रुतीनें[2] पदर पसरुनीं, जोडिले स्वल्प पोहे;
या दीनोपायनातें बुधजनभगवान्[3] प्रीतिनें, फार गोडी
आणूनि, श्रोत्रवक्त्रीं भरिल, बहु दया मानुनीं ते हि थोडी. १

नसे तादृक् चेतोहर[4] गुण जरी, साधु तारि या
वरू, चूडारत्नीकृतविधु[5] हि जैसा धुतारिया[6];
भले सद्विद्यांचे नद करिति ते लोभ, विहिरीं[7]
तयांचा मीं; कर्त्या जड हि घडिला शोभवि हिरा. २

अभय दिधलें आहे, वाहे शुचिप्रतिभा झरा[8];
विधुमणिचिया[9] सारा तारापें[10] कारण पाझरा;
जड हि कविता [11]जोडी, गोडी गुणीं हरिच्या धरी;
सहज तुमचा दीना हीना प्रसाद समुद्धरी. ३

प्रसाद तुमचा कळानिधिहुनीं[12] गुणें आगळीं[13];
हरी नतमनोमळा[14], निजसुरद्रुमांचा[15] मळा.
करी रत सदा बळानुजपदीं[16] मना चंचळा;
सुखें चि पुरवी लळा; सुचिर कीर्ति दे उज्ज्वळा. ४

---

१. शब्दांचा समूह. २. कानानें. ३. पंडितजनरूपी भगवान् कृष्ण. ४. मनोहर. ५. शशिशेखर शंकर. ६. धोतऱ्याला. ७. झरा. ८. शुद्ध नवीन कल्पना सुचविणारा बुद्धिरूप झरा. ९. चंद्रकांतमण्याच्या. १०. तारापति चंद्र. ११. [हरीला] जोडी. १२. चंद्राहून. १३. अधिक. १४. विनयशीलांच्या मनांतील पापास. १५. आपल्या (?). १६. श्रीकृष्णचरणीं.

श्रीमद्भागवतामृतोदधि तुम्हीं, अर्थज्ञ ते मेघसे,
आम्हीं चातक पाहतों मुख, तृषासंशुष्क[1] ज्यांचे घसे;
पीतां द्वित्रि कण, क्षणीं सुख गमे तृट्युत्थ[2] गाढें[3]; कर
ब्राह्मीचा[4] हि लिहों शके चि न, असो तें, ग्रंथ हा ढेंकर. ५

रामकृष्णचरणीं समर्पित ग्रंथ; हो रसिकचित्त तर्पित[5];
न प्रमादभवदोष राहवू; सत्प्रमोदनयनोद[6] वाहवू.

इति श्रीमत्कृष्णविजये श्रीरामनंदनमयूरेश्वरकृतिकृतौ सज्जनप्रार्थना
समाप्तश्चायं श्रीमत्कृष्णविजयः । श्रीरामकृष्णार्पणमस्तु ।
श्रीराम जयराम जयजयराम ॥

कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा बुद्ध्याऽऽत्मना वाऽनुसृतस्वभावात् ।
करोमि यद्यत्सकळं परस्मै नारायणायेति समर्पयामि ॥ १ ॥
शुभं भवतु। श्रीरामचंद्रः शरणं श्रीरस्तु ॥



१. तहानेनें अत्यंत सुकलेले. २. तृषेपासून उत्पन्न झालेले. ३. मोठें.
४. ब्रह्मदेवाची मुलगी जी सरस्वती तिचा. ५. तृप्त. ६. सज्जनांचे आनंदाश्रु.

# निंदकपंचक.

दान[1]स्नानजपोपवासनियमें पापासि जें वारितें,
  देतें पुण्य जनासि, तीर्थ म्हणुनी सन्मानिसी वारि तें.
जो एतन्निरपेक्ष निंदक गुणें, तैसा चि पापाप[2]हा
  त्याला साधु न कां मना! म्हणसि रे!? सन्मार्ग बापा! पहा. १
पापांचे बहु दाट काट चढले फारां दिसांचे लया
  नेल्ये सर्व मना! पुन्हां मिळवितां तैसें न सांचेल या.
दे आम्हां कुतुकें परेष्टकरणोद्योगीं फुका जी भ[3]रे,
  सन्मान्या! चिरजीविनी तुझि असो ती निंदका! जीभ रे! २
घेती माथां परांचा दुरितभर, बळें तुल्य थोरीं लहानीं,
  देती पुण्यें सुकष्टें करुनि मिळविली मानिती ही न हानी.
एवं ज्यांची परार्थ स्थि[4]ति सदुपकृती सज्जना सोयरी ती;
  साजे निंदा तिला ही अजि! कविजन हो! हे बरी होय रीती. ३
आम्हां श्रीरामभक्तां अजितनुतिविणें स्वस्तुती तों न अ[5]र्हा,
  पापघ्नी, पुण्यदात्री, करिशिल जरि तूं निंदका! होय ग[6]र्हा.
मानूं तोषा, न रोषा; परि म्हणति तुम्हां निंदकां वेद, 'वाटे
  स्वर्गाच्या चूकले हे, पडतिल नरकीं,' हा मना खेद वाटे. ४
सुमार्गीं ही हेतु स्खलनपतना जेंवि खळगा,
  प्रमादी जे त्यांला अचुक चि मना! तेंवि खळ गा!
न कांटे धोंडे ही करिति गतिचा रोध ड[7]बरे,
  तयांच्या जे आंगें कुशळपद चालों धड बरे. ५

---

१. हे पांच श्लोक कृष्णविजय—पूर्वार्ध लिहून झाल्यावर अगदीं अखेरच्या पृष्ठावर कवीनें लिहिले आहेत. वर्णितविषयाला धरून 'निंदकपंचक' हा पदरचा मथळा घातला आहे. २. पापनाशक. ३. उत्साहाला. ४. अस्तित्व. ५. योग्य. ६. निंदा. ७. खळगे.

श्रीः

# मोरोपंतकृत

# कृष्णविजय.

## उत्तरार्ध.

( आर्यागीतिवृत्त )

## अध्याय पन्नासावा.

अस्ति[1] प्राप्ति जाया कंसाच्या मागधाचिया[2] तनुजा या,
सांगति दुःसह तापा आपुलिया शीघ्र रडत जाउनि बापा. १

निजकन्या दुःखार्ता पाहुनि, हे आयकोनि अप्रिय वार्ता,
चित्तांत धरि क्रोधा वीर जरासंध धीर अप्रतियोधा[3]. २

मानी तो नृप कोपें यदुकुळसंहारकर्म केवळ सोपें,
शूरवरांच्या सोळा सात हि अक्षौहिणी चमू[4] करि गोळा. ३

सहसा मथुरा रोधी शूर जरासंध उग्र परमक्रोधी,
तो लोकगिलनलुब्ध प्रलयोदधि काय जाहला संक्षुब्ध ! ४

जालें निजपुर रुद्ध, स्वजन भयाकुल गिरिव्रजेश[5] विरुद्ध
सहसोपस्थित युद्ध, प्रभु जाणे, मनिं म्हणे, 'करूं यश शुद्ध; ५

आलें रिपुबळ फार; क्षितिचा उतरीन हा सुदुर्वह भार;
मगधपतिस सोडावें कीं याणें यापरी च बळ जोडावें.' ६

'भूभार हराया मीं अवतरलों कीं स्वयें त्रिभुवनस्वामी,

---

१. अस्ति आणि प्राप्ति या नांवाच्या कंसाच्या भार्या. २. मगधदेशचा राजा जरासंध याच्या मुली. ३. अजातशत्रु, ज्यास कोणी प्रतिस्पर्धी नाहीं असा. ४. १६+७=२३ अक्षौहिणी सैन्य. ५. गिरिव्रजनामक पुराचा ईश.

साधूंतें ताराया, दुष्टांतें आपुल्या करें माराया '. ७
ऐसें ध्यातां तर्क क्षण मानी ज्यांसि गगनमार्गीं अर्क,
ऐसीं प्रभुरथरत्नें उतरति, जय देति जीं रणीं लघुयत्नें. ८
कृष्ण म्हणे आर्याला, 'अवतरलों यदुकुळांत ज्या कार्याला,
त्याची आली वेळा; बैसा स्वरथीं, रणांगणीं या, खेळा; ९
नाशुनियां भूभार व्यसनापासुनि करा स्वजनतोद्धार,
यदुचक्र[1] विलोकु, तुका हरिसीं[2], रिपुमृगगणीं करा हो! कुतुका.' १०
करुनि असा शुभ मंत्रें[3], प्रभु झाले सज्ज सज्जनीं परतंत्र.
घेउनियां बळ अल्प द्वेषिवनीं शिरति वह्निमारुतकल्पें[4]. ११
हरिदरनादें कंपा पावति, गर्जे न तेंवि पडतां शंपा[5].
हस्तीतें हरिनाम व्याकुळ करि; गर्जतां नये कां घाम? १२
करि मागध तो निंदा, पाहुनि युद्धेच्छु साग्रजा गोविंदा,
'आलासि बरा कामा स्वभुजीं रंगांत, सुखविला बहु मामा. १३
तुजसीं अधमा! बाळा! युद्धीं मज लाज वाटत्ये भूपाळा;
मजसह समरीं गोपा! योग्य न तूं, नव्हसि पात्र मागधकोपा. १४
श्रद्धा जरि तरि रामा! धैर्य गदा धरुनि ठाक तूं संग्रामा.
निजबाणाच्छिन्न शिवासेव्य[6] असो काय, काय रक्षुनि आशिवा[7]?' १५
कृष्ण म्हणे, 'राज्या! जे शूर न बोलति मुखें, भुजें तें साजे;
बोले आसन्नमृती तैसा तूं शब्द, कोण घेईल कृती?' १६
धरि मोटा आव रणा, करि सैन्यें प्रभुरथांचिया आवरणा,
रविला मारुत अभ्रें कीं पटळें रेणुच्या शिखीस अदभ्रें[8]. १७
हें पाहोनि पुरस्त्री भ्याल्या, कीं शस्त्रवृष्टि करिती शस्त्री,
दिसती केवळ केतू[9], न प्रभु, जे सर्वलोकजीवनहेतु. १८
मेघांचे आवांके किति? वृष्टिभरें नगेंद्र कैसा वांके?

---

१. यादवसमूह. २. सिंहासीं सम व्हा. ३. मसलत. ४. सदृश. ५. वीज. ६. कोल्ह्यांस भक्ष्य. ७. देह. ८. अन्वयः—मारुत [जसा] अभ्रें रविला कीं रेणुच्या अदभ्रें (विपुलें) पटळें शिखीस (अग्नीस) [झांकितो तसा]. ९. ध्वज.

इतरासह्यें अजि तीं परि करितिल काय शत्रुसैन्यें अजितीं? १९
शार्ङ्गाभिध वरधनु तें केलें रविमंडल क्षणें विबुधनुतें,
शर ते हि अहो! किरण, द्विड्बळ तम, अमरवृंद अवलोकि रण. २०
प्रभुबाणदलितशूरद्विपहयपादातकायशोणितपूर
वाहति, उसळति दूर, व्योमपथीं, रक्तबिंदु न्हाणिति सूर. २१
रामकरीं हळमुशळ प्रेक्षुनि पावेल काय रिपुबळ कुशळ?
वाहति फार चि खोल क्षतजनदी, तत्तटांत मांसचिखोल. २२
मायामानुषवेष प्रभुपासुनि राहिला जरासुत शेष,
लुप्तोडुकरस्तोम व्योमीं विच्छाय जेंवि दिवसा सोम. २३
सिंहातें सिंह जसा राम धरी विरथमगधपतितें सहसा,
वारुणपासीं बद्ध द्वेष्टा केला विनष्टयुद्धश्रद्ध. २४
'न वधा' म्हणउनि जोडी कर हरि, जाणोनि भाव, राम हि सोडी.
मग दोघे जयशाली म्हणति मनीं, 'अल्पसी धरा हळु झाली.' २५
होय मगधपति खिन्नस्वांत, म्हणे, 'विधिविलास केवळ भिन्न;
मुख अश्रुजलक्लिन्न, स्वजनमनोरथतरू करील च्छिन्न. २६
जावें, तप चि करावें विजनवनीं, भूमिधरगुहेंत भरावें,
आप्तांसि न या तोंडा दावावें, नृपपदावरि पडो धोंडा.' २७
जाली मोटी हाणी, ऐसें चित्तांत तो जरासुत आणी;
वनमार्गीं नृपवर्या भूप म्हणति, 'तूज योग्य न तपश्चर्या. २८
हो सावध नृपरत्ना! पुनरपि विजयार्थ सिद्ध हो, करिं यत्ना;
आम्हीं सर्व सहाय, प्रभु तूं, यादव वराक ते किति काय? २९
कोण पराभव नाहीं पावत हें नीतिबुद्धिच्या भवनाहीं

---

१. कृष्णाचे ठायीं. २. शत्रुसैन्य. ३. अर्कातें—**पंत.** ४. नक्षत्रसमूह ज्यानें लुप्त केला असा. ५. निस्तेज. ६. हलकी. ७. अश्रुस्नपितमाननं पश्यन्तः स्वजनाः जये निराशाः भविष्यन्ति इति मागधचिंता—**पंत.** (अश्रूनीं मुख भिजलेलें पाहून स्वकीय आप्त जयप्राप्तीविषयीं निराश होतील ही जरासंधास काळजी पडली). ८. शिरावें. ९. दुर्बळ—**पंत.**

आणावें स्वमनीं च, व्याकुळ होताति पावतां श्रम नीच. ३०
निजनगराला चाला; यदुमृगयूथीं फिरोनि घाला घाला;
सिंह तुम्हीं; हा काय व्यर्थ उपेक्षा[1]; विचार आजि हा काय ?' ३१
इत्यादि प्रियें याचें[2] बोलति ते बोल वाटले बहु साचे;
मग टाकुनियां दैन्य, स्वपुरा जावूनि, मेळवी नृप सैन्य. ३२
बळकृष्णां उपरि सुरीं केली सुमवृष्टि, हर्ष होय बहु पुरीं;
अक्षतबळ बळशाली जाती, सर्व प्रजा सुखी बहु झाली. ३३
करुनि असें वरयुद्ध, प्रभुवर्यं अनंत जोडिती जें शुद्ध,
त्या करिति धना पात्र स्वनृप स्वीकारिति स्वयें यश मात्र. ३४
मगधेंद्रें संक्रुद्धें केलीं पहिल्यापरी च सतरा युद्धें
अंतीं आपण चि उरे, कीं, चित्त भरीं भरे, म्हणे न 'रण पुरे'. ३५
तो समरांगणकुंडीं बळहरिबाहुप्रतापपावकतुंडीं
होमी आणूनि बळें तेविस अक्षौहिणी, वरी अयशफळें. ३६
आणिख ही 'अठरावा संग्राम प्रभुसवें' म्हणे चि 'करावा'.
तों यदुचक्रद्वेषी काळयवन ये, सुरर्षि ज्यास प्रेषी. ३७
रोधी मथुरा कोटित्रय वीर म्लेच्छ, रीति ज्यांची खोटी.
पाहुनि जिस शतकोटिप्रहरण[3] ही भी, असी चमू बहु मोटी. ३८
श्रीकृष्ण म्हणे, 'आर्या! काळयवनवाहिनी असी अनिवार्या;
आजि उद्यां कीं परवां नृप येइल, न धरि आमुची जो परवा. ३९
आम्हीं दोघे यवनध्वंसीं गुंतों, अशांत तो जरि जवन
येइल, दुःसह पवनज्वलन तसें[4] मग वडे कसें सुहृदवन? ४०
नरदुर्गम दुर्ग करूं, ज्ञाती ठेवूनि तेथ मग शस्त्र धरूं,
काळयवन खळ मारूं, ऐसें व्यसनार्णवांत यादव तारूं.' ४१
नाशाया यदुकष्टा देवें आज्ञापिला सुनिपुण त्वष्टा.

---

१. देहोपेक्षां वृथा करोषि–**पंत.** (व्यर्थ देहाची काळजी वाहतोस). २. जरासंधाचे आप्त, प्रियकर. ३. वज्रायुधः–**पंत.** ४. मागधयवनौ भविष्यतः–**पंत.** मागध व यवन [ हे पवनज्वलन ] होतील.

दुर्ग समुद्रीं रचिलें, तेणें जें रजतहेमरत्नीं खचिलें. ४२
द्वादशयोजन रचना दुर्गाची, अद्भुता चि न विषय वचना[1].
मुक्तिपुरी असि साजे, स्वर्ग हि ज्या द्वारकेसि पाहुनि लाजे. ४३
योगबळानें अजनें[2] क्षणमात्रें तेथ ने समस्त स्वजन.
न कळों दे प्रभुवर्य स्वपरांस हि तें असें करी आश्चर्य. ४४
ठेवी मथुरेंत बळा संरक्षाया निजप्रजांस प्रबळा.
मग आपण जयशाळी स्वपुराबाहिर निघे सरोरुहमाळी[3]. ४५

---

# अध्याय एकावन्नावा.

तों यवनांचा भूप प्रभुचें पाहे जगन्मनोहर रूप;
नारदकथितें सारीं ओळखिलीं लक्षणें भगवदाकारीं. १
यवन म्हणे, 'एकाकी पत्ति[4] हरी यानसैन्यशस्त्रें टाकी,
तरि आपण काशाला घ्यावे? भुज हे चि फार रिपुनाशाला.' २
प्रभुमागें मंदमती एकाकी धांवला स्वयें यवनपती.
'योगिमनोदुष्प्रापा धरिन' म्हणे पापमूर्ति हा 'निष्पापा'. ३
सांपडलों सें दावी प्रभु, खळ धरितों क्षणांत ऐसें भावी.
यवनास असें फटवी, ने दूर विलंघि फार भूमिभृदटवी[5]. ४
यवन म्हणे, 'पाठ शुभा देसी मज चि न, यदूद्वहा! ठाक उभा;
काय पराङ्मुख पळसी? अयशःकज्जळ कुळासि लाविसि मळसी.' ५
शंभुवर[6] प्रतिपाळी; स्वीकारी भीरुरीतिला वनमाळी.
स्वाधिक्षेपं[7] न मानी, हांसे खळ, परि न पूज्यसत्कृतिहानी. ६
मग विश्वनिवास दरीमाजि शिरे, तो हि त्या चि मागें सर्दरी[8];
जाला प्रभुवर गुप्त, म्लेच्छेंद्रें तेथ देखिला नर सुप्त. ७
'आणुनियां दूर मला, साधु निजेला गुहेंत, पळतां श्रमला.'

---

१. अनिर्वाच्य अशा. २. अजः—**पंत.** कृष्ण. ३. कमलमालाधारी. ४. पादचारी.
५. गिरिवनानि—**पंत.** ६. 'एकदां कृष्णपराभव करिशील' असा यवनास शिवाचा वर होता तो. ७. आपली निंदा. ८. बलाढ्य शत्रु.

ऐसें श्रीमदमत्ता वाटे मग मूढ त्यास मारी लत्ता. ८
स्वप्राणांचा अत्ता[१] सिंह उठविला गर्जे चि मारुनि लत्ता.
मग कैंचें कल्याण ? द्विपमाथां घालि केसरी पल्याणें[२], ९
उघडुनि नेत्र न्यहाळी, तों निजतनुवह्नि काळयवना जाळी.
ऐसा चि विजयशाळी मुचुकुंदनृप स्वयें सुरां जो पाळी. १०
इक्ष्वाकुकुळीं ख्याता कीर्ति जयाची नृपाळ जो मांधाता.
तत्सुत असुरव्राता भयदायक हा स्वैरीश्वराचा[३] त्राता, ११
देवांच्या सेनानीं हा वरिला, मग महेशसुत सेनानी[४].
जाले बहुयुग कष्ट व्यासंगें आप्त[५] सुचिरकाळें नष्ट. १२
न पहाती सदृश वर स्वपरित्रात्यासि द्यावया त्रिदशवर.
'चिरनिद्रा सेव, रहा, उठविल तो भस्म हो' म्हणति 'घे वर हा'. १३
तो हा जागा केला जेणें तत्काळ काळयवन हि मेला.
तों उगवे अमृतकर[६] श्याम श्रीवत्सकांक नततापहर. १४
पाहे त्रिभुवननम्या[७] रम्या वेदांतसाधुसेवनगम्या.
साहे तेज न तो तें, जरि चित्तीं धैर्य शौर्य पुष्कळ होतें. १५
भूप म्हणे, 'महनीया ! तूं कोण ? भ्रमसि कां पदीं गहनीं[८] या ?
चरण तुझे मृदु, कांटे कठिनांचे नगदरीवनें हे वांटे. १६
दिससी अद्भुतकाय, प्रकटित तेजस्वितेज तें तूं काय ?
ताप न करिसि, न भानू, अकलंक म्हणोनि चंद्र तूज न मानू. १७
इंद्रासीं बहु दाटी, जाणें मीं सर्व निर्जरांची घाटी.
तूं विष्णु असें वाटे, तम हरुनि तुझें गुहेंत तेज चि दाटे. १८
श्रवणीं क्षुधित श्रोत्र, स्वमुखें वद आत्मजन्मकर्म हि गोत्र[९].
लंघावा रुचिपंथ[१०] न, स्वांता मानेल तरि करावें कथन. १९
आम्हीं क्षीरांब्धितुळीं[११] झालों क्षत्रिय सुविश्रुतेक्ष्वाकुकुळीं.

---

१. भक्षयिता—**पंत**. २. खोगीर. ३. स्वर+ईश्वराचा=स्वर्गाधिपति इंद्राचा. ४. सेनापति. ५. आप्त ही नष्ट जाले—**पंत**. ६. (साक्षात्) चंद्र. ७. त्रैलोक्यवंद्य. ८. अरण्यामध्यें. ९. परिचय. १०. मदिच्छामार्गः—**पंत**. ११. क्षीरसमुद्रासारख्या (शुभ्र).

अस्मद्देहविधाता युवनाश्वसुत क्षितीशपति मांधाता. २०
हा नामें हि मुकुंदप्रियजनपदपद्मरेणुधन मुचुकुंद.
चिरजागरसुश्रांत प्रबळा निद्रा म्हणोनि मोही स्वांत. २१
येथें निद्रित होतों, कोणेंकें उठविलें बळें चि अहो! तों.
जाला तत्क्षण भसित[1] प्राणी तो तें तदीयकर्मविलसित[2]. २२
मग या सुतृषितदृष्टिप्रति दिसली मूर्ति हे सुधाघनवृष्टि.
हा लाभ महाभागा! कैंचा जरि जाहलों न असतों जागा?' २३
ऐसें ऐकोनि, कृपा करुनि, म्हणे देवदेव तो, "ऐक नृपा!
लोकीं नुपजे कवणा इच्छा मज्जन्मनामकर्मश्रवणा? २४
मज हि न लागे पार स्वीयांचा[3], कीं तसीं च तीं बहु फार.
करुनि उपक्रम संत ज्ञाते परमर्षि पावले चि न अंत. २५
मोजिल ही भूमिरजें बहुजन्मीं तरि करील बहुदुष्कर जें.
शक्य विधीस हि पण न त्रिजगीं मज्जन्मकर्मगुणपरिगणन. २६
परि परिसा, अद्यतन[4]प्रभवादिक[5] सांगतों, कराया जतन[6];
धर्म जगद्भद्रार्थी पूर्वी मजला स्वयें विरिंच प्रार्थी. २७
असुरचमू बहु भार क्षितिस, तयाचा करावया परिहार
विनवि सुरव्रज चतुराननसह निर्जरक्षणक्षमा[7] मज चतुरा. २८
मग यादव ताराया धरिता जालों तयांत अवतारा या,
मज वसुदेवापत्या ठेविति कवि 'वासुदेव' अभिधा सत्या. २९
वधिला सानुग कंस स्वभुजें जो काळनेमि असुरवतंस[8]
त्वल्लोचन या यवना भस्म करि, नृपा! जसा दहन खाय वना. ३०
तो मीं आज वरद या स्थाना आलों, न केलि आजवर दया;
त्वां हा श्रीवर मागें प्रार्थियला फार, पार्थिवा[9]! वर मागें." ३१
ऐसी ऐकुनि वाणी, वंदी मुचुकुंद भूप जोडुनि पाणी;

---

१. भस्म. २. फळ. ३. स्वकीय जन्मनामकर्मांचा. ४. सांप्रतचें. ५. जन्मादिक. ६. येथें हस्तदोषानें 'जनत' असें पडलें आहे. ७. आपल्या (देवादिकांच्या) रक्षणाविषयीं समर्थ अशा. ८. श्रेष्ठ. ९. राजा मुचुकुंदा!

गर्गभविष्य स्मरला, जाणे नारायण स्वयें अवतरला. ३२
स्तवुनि यथामति लागे पायांला, वर तदीय भजन चि मागे.
देव म्हणे, 'तूं धन्य त्रिजगीं, कीं तुज नसे चि इष्ट मदन्य. ३३
सृष्टि पहा, मद्रूपा विचर सुखें या जगांत निर्भय भूपा!
कृपणाची जसि वित्तीं प्रीति असे तसि च भक्ति तुझिया चित्तीं. ३४
मृगया घडली मागें तदघक्षपणार्थ तीर्थभजना लागें.
सज्जनवृंदीं वागें, माझाठायीं च मन असों दे जागें. ३५
मग भूतसुहृद्विप्र क्षितिवरि होसील साधुचरित क्षिप्र.
पुढिलया जन्मीं मातें ब्रह्मातें पावसील सुखधामातें.' ३६

---

## अध्याय बावन्नावा.

जेणें भव परिहरिला नृप वंदुनि त्या प्रदक्षिणा करि हरिला.
त्यजुनि गुहेसि निघाला; राहुवदनमुक्त काय विधु तो झाला ! १
तो क्षुल्लकता पाहे अचरीं हि चरीं हि जी न पूर्वीं राहे.
जाणे कलिची चेष्टा, भूप म्हणे, 'या दिशेंत वसती नेष्टा.'[1] २
या लोकांत न ठेला, सत्वर इकडोनि उत्तरेस चि गेला.
कंसप्रमुखासदरिप्रियकिंकर[2] भूप पावला श्रीबदरी. ३
तेथें श्रुतिसारा[3] धीवृत्ति स्थिर करुनि साधु तो आराधी.
एकांतीं सुसमाधी अभ्यासुनि शुद्धबुद्धि निजहित साधी. ४
आला यदुराय वन त्यागुनि तत्काळ, जे निजपुरा[4] यवन
वेष्टुनि बसले होते, नेले युद्धांत सर्व हि लया हो! ते. ५
करुनि यवननिधनातें नेववितां द्वारके तदीयधनातें.
मगधाधिप समराला तेविस अक्षौहिणी बळासह आला. ६
तें बळ पाहुनि पळ ते[5] न टिकति, टाकूनि वित्त जाले पळते.
जाणों केवळ भ्याले, देशधडी प्राणरक्षणास्तव जाले. ७

---

१. न+इष्टा (इष्ट नाहीं). २. कंसादि दुष्टांचें हनन करणाऱ्या कृष्णाचा प्रियभक्त. ३. वेदांचें तत्त्व अशा ईश्वरातें. ४. मथुरेला. ५. बळराम व कृष्ण.

केवळ कोमळ पाय, प्रभु पळती शस्त्रहीन कीं न उपाय.
मगधपती करि हास्य स्वोत्कर्षें न समजोनि पसरुनि आस्य. ८
सेना घेउनि धावे. कीं दोघे ही धरूनि शत्रु वधावे.
आज्ञुनि ईश न ठावे, अंध जरासंध केंवि त्यांप्रति पावे? ९
ते बहुयोजन दूर प्रभु गेले कौतुकी जसे चि न शूर.
मगधपतीतें गमलें कीं, 'हे आतां धरीन बाळ श्रमले.' १०
त्याच्या चढति मग वर प्रभु नामें जो प्रवर्षणाख्य नगवर[1].
त्याला मागध रोधी, आपण सेनासमेत यांतें शोधी. ११
नाहीं आले हाता, परि दुष्ट म्हणे, 'करीन त्यांच्या घाता.
आतां कोण त्राता? आले हुडकित, भला जड[2] नग भ्राता. १२
होती न जरि प्रकट द्वेष्टे तरि या प्रवर्षणाद्रीसकट
जाळा, काष्ठें आणा, या चि उपायें हरूं रिपूंच्या प्राणा. १३
माझ्या ही जरि अरितें आश्रय दिधला महीभृदधमा[3]! तरि तें.
घे बळवद्वैरफळ स्वांगें शरणागतां खळांसकट जळ.' १४
आज्ञा घेउनि सेना रचिती काष्ठें, तयांत अद्रि दिसेना.
श्रीमदमत्ता उचिता रीति 'शरण्या नगा' म्हणे 'खाउ चिता'. १५
मगधनृपें अतिरुष्टें लावविला चहुंकडोनि पावक दुष्टें.
दहनासि[4] सखा भेटे, प्रळयीं जैसा तसा चि तेव्हां पेटे. १६
जाणुनि रिपुबुद्धि कुडी, प्रभुवर गिरिवरुनि टाकिती दूर उडी.
त्यांस न कळत पळाले, आले स्वपुरासि, मूढ म्हणति 'जळाले.' १७
मग जाय मगधराज स्वपुरास, म्हणे, 'कृतार्थ जालों आज.'
मानुषवेषनिगूढप्रभुतें[5] जाणेल काय तो खळ मूढ? १८
नृपभूषण आनर्ताधिप रेवत 'रेवतीसुतेतें भर्ता
योग्य कवण सर्वगुणें?' विधिस म्हणे, 'घटित तूं वदावें निपुणें.' १९
चतुरानन 'भुवनवरा यदुरामा दे' म्हणे, 'सुतोचित नवरा.'

---

१. श्रेष्ठ पर्वत. २. मूर्ख [पक्षीं] अचेतन. ३. पर्वताधमा! ४. अग्नीला [त्याचा] मित्र वायु. ५. मनुष्यवेषानें गुप्त अशा प्रभूतें.

दिधली आणुनि कन्या धन्या, ज्योत्स्ना चि योग्य विधुसि, न अन्या.२०
राजा भीष्मक सुमती धर्मज्ञ नयज्ञ शुचि विदर्भाधिपती.
तत्सुत रुक्मिप्रभृती पांच तदनुजा हि रुक्मिणी सुप्रकृती. २१
भीष्मकसदनीं अतिथी अभ्यागत साधु कृष्णचरितें कथिती.
जों जों सेवी कृष्णामळयश, धरि फार रुक्मिणी श्रुतितृष्णा[1]. २२
ज्याचा गुणगण मोही वैदर्भीतें स्वयें गुणाकर तो ही.
'मज ते योग्या पत्नी' कृष्ण म्हणे, 'चित्त जाय त्या स्त्रीरत्नीं.' २३
वैदर्भी 'नवरा हो हरि च' म्हणे 'प्रेम तेथ अभिनव राहो.'
कृष्ण म्हणे, 'नवरी न स्वसमा दुसरी, न ती त्यजीन, वरीन.' २४
बंधुमना ये नवरा कृष्ण; म्हणे एक मात्र रुक्मी 'न वरा;'
न मनी भवगदवैद्या तो खळ, देऊं करि स्वसा नृप चैद्या. २५
हें कळतां [2]भूस्वर्भीहरभुजहरिचरणतत्परा वैदर्भी
जाली बहु विमनस्का, कृष्णाविण जीस लोक शून्य चि अस्का[3]. २६
जाली चिंताव्याप्ता, कृष्णाप्रति पाठवी द्विजा परमाप्ता.
सुहृदुपकारी विप्र ज्ञानिवर द्वारकेसि पावे क्षिप्र. २७
होता प्रभु ज्या स्थानीं तेथें नेला द्विजेंद्र तो द्वास्थानीं.
[4]साध्ववनुदासीनातें अवलोकी कांचनासनासीनातें[5]. २८
पाहुनि आसन सोडी यातें [6]ब्रह्मण्यदेव तो कर जोडी.
पूजियलें स्वस्थानीं बैसउनीं, आपणा जसें स्वःस्थानीं[7]. २९
जेवविला, [8]पर्यंकीं निजउनि, घेउनि हळू च तत्पद अंकीं,
स्वकरें चुरि; करि सेवा; हे चित्तांतूनि फार आवडि देवा. ३०
सत्कल्पलता उक्ति प्रभुच्या, ज्यांचीं फळें चतुर्विध मुक्ति,

---

१. श्रवणेच्छा. २. भूस्वर्गभयहरा भुजा यस्य तस्य हरेश्चरणतत्परेति—**पंत.** पृथ्वी आणि स्वर्ग यांवरील लोकांचें भय हरण करणारे भुज ज्याचे अशा हरीचे चरणीं तत्पर अशी रुक्मिणी. ३. सर्व. ४. साधूंच्या रक्षणाविषयीं तत्पर. ५. सुवर्णासनावर बसलेल्यातें. ६. ब्राह्मणांचें रक्षण करणारा देव कृष्ण. ७. स्वर्गस्थ देवानीं. ८. पलंगावर.

देति सुख निष्कामें[1] धुनी[2] अमृताच्या त्या, निघोनि वदनामधुनीं. ३१
'मार्गीं तुज आर्यास श्रम जाले येथ वरि जया कार्यास,
येणें केलें सांगें, जरि मीं श्रवणार्ह करिन सर्व हि आंगें.' ३२
ऐकुनि हे देवाची उक्ति, कथी वृत्त, पत्रिका[3] दे, वाची[3],
वैदर्भीची चेतोवृत्ति च जे पत्रमूर्ति आली ते तो.[4] ३३
"श्रोतृमनस्तापहर त्वद्गुण ऐकोनि, रूप दृष्टिरुचिकर
रुचिरवरा! मन शिरतें तुजमाजि अलज्ज जें सुखेच्छु सुचिर तें. ३४
कोण सुगुणरत्नखनी कन्या उचिता जगन्मनोज्ञास जनीं?
न वरिल लग्नावसरीं, तृषित शिरेल चि मुकुंदजी! अमृतसरीं. ३५
वरिलें, दिधलें काया, तूं पति च, विभो! करीं मला निजजाया,
तव भागा शिशुपाळ स्पर्श न करु, सिंहबळिस जेंवि शृगाळ. ३६
पूर्तेष्ट[5]नियमदानव्रतसुरमुनिगुरुसमर्चनीं भगवान
बहुजन्मीं पूजियला तरि हरि च वरू, न अन्य चैद्यादि मला. ३७
लग्नाच्या पूर्वदिसीं ये न कळत, युक्त होय मग बळपतिसीं,
चैद्यादिबळें वधुनीं, राक्षसविधिनें[6] वरीं, हरीं अरिमधुनीं. ३८
'न वधुनि बंधु तुज कसी' म्हणसि 'हरूं?' तरि वदेन युक्ति हरि! असी,
प्रथमदिनीं कुळिं नवरी बाहिर देवीस नेति ती वेळ बरी. ३९
चरणरजस्नान हरी! तव वांछिति मुनि तमःक्षया शंभुपरी.
तो तूं करिसिल न कृपा, घेइन शतजन्म, करिन असुशमनतपा.[7]" ४०

---

१. अतिशय. २. नद्या. ३. आदावर्पितां पश्चादीश्वराज्ञया स्वयं वाचयामासेति–**पंत.** प्रथम अर्पण करून नंतर श्रीकृष्णाच्या आज्ञेनें स्वतः, आपण वाचूं लागला. ४. ब्राह्मण. ५. तळीं, विहिरी इत्यादि बांधणें (पूर्त), यज्ञ करणें (इष्ट), तीर्थाटनादि नियम धरणें, दान देणें, व्रतें पाळणें, आणि देव, मुनि, गुरु यांचें पूजन यांहींकरून. ६. हा आठ प्रकारच्या विवाहांपैकीं एक विवाह आहे. (कन्यापक्षीय लोकांचा नाश करून अथवा त्यांचे शरीराला जखमा करून प्राकारादि फोडून, रोदन करणारी आणि पित्याला व भ्रात्याला आक्रोशपूर्वक हाका मारणारी अशी कन्या गृहांतून नेणें हा राक्षसविवाह होय). ७. प्राणनाश होईल अशा तपाला.

विप्र म्हणे, 'या देशा आलों घेऊनि रुक्मिणीसंदेशा,
हें कर्तव्य चि आधीं प्रभु! कन्यारत्न उचित सत्वर साधीं.' ४१

# अध्याय त्रेपन्नावा.

पत्रार्थ मनीं आणी; विप्राचा कर धरूनि पंकजपाणी,
हांसोनि म्हणे, 'रात्रीं मज हि निज न ये, मनांत ते चि सुगात्री. १
रुक्मी करितो दावा, आहे हा भाव सर्व मजला ठावा;
काय तयाचा लेखा? करितों कौतुक कसें बरें तें देखा. २
नलगे चि बहुत कथन, द्वेषिनृपांचें करूनि युद्धीं मथन,
मीं च हरिन ती बाळा काष्ठापासूनि जेंवि वह्निज्वाळा.' ३
परवां रात्रि सदृक्षें[2] स्वमनीं जाणे असें स्वजनसुरवृक्ष,
स्थिर नसवे क्षण दात्या मुक्तीच्या; काय कंठवे क्षणदा[3] त्या? ४
वैदर्भीनें पाश प्रेमाचा घातला गळां, अवकाश
लग्नाला बहु थोडा, 'स्वरथाला' दारुका म्हणे 'हय जोडा'. ५
मग तो दारुक रीती ज्यांची शुचि[4], गमन जे सुचारु करीती,
शैब्यादि[5] तुरगराजे योजि रथीं, ज्यापुढें न रविरथ साजे. ६
देव रथावर वेघे, विप्र हि बैसोनि सोहळे बरवे घे.
वैदर्भा आनर्तापासुनि रात्रींत जाय तो श्रीभर्ता. ७
भीष्मक रुक्मिस्नेहा वश जाला, करि जसें कुबुद्धि वदे हा.
कीं[6] दे न रिपु त्रास ज्ञात्या, लौकिक चि; मान्य करि पुत्रास. ८
ये न मना, परि बाळा देववि तो दुष्ट सुत बळें शिशुपाळा.
करवी कर्म विवाहापूर्वीचें आग्रहें, करी कवि बा 'हा!' ९
त्याचिपरी दमघोष[7] स्वसुताभ्युदयार्थ कर्म करि, धरि तोष.
द्विज करिती श्रुतिघोष प्रभुवांचुनि, परि मुहूर्त त्यांसि सदोष. १०

---

१. पर्वा. २. उत्तम नक्षत्र. ३. राव. ४. सुंदर. ५. शैब्य, सुग्रीव, मेघपुष्प व बलाहक. ६. अन्वयः—ज्ञात्या रिपु त्रास न दे, लौकिक (जन) [त्रास दे]. ७. शिशुपालपिता.

कुंडिननगरा चेदिप्रभु ये, हें पुत्र भीष्मकास निवेदी.
निजभाव दिसों नेदी, नृप पूजी सर्व, रुक्मिमत न च्छेदी. ११
देवविले जानिवसे[1] ज्यांत सबळ साप्त चेदिभूजानि[2] वसे.
उतरविलें तत्पक्षक्षितिपांचें सैन्य सुस्थळीं बहुलक्ष. १२
ते ते नृप चेदिपतिप्रिय घूक प्रभुरवीपुढें जे दिपती.
प्रतिनिमिष उणी होत द्युति ज्यांची जाय; काय ते खद्योत? १३
आले बांधोनि फळी[3] शाल्वजरासंधदंतवक्त्रादि बळी.
कीं, येतिल कृष्णहळी कन्या साधावया कराया हि कळी. १४
बळभद्रास सकळ हा वृत्तांत कळे, मनांत शंके कळहा.
गेल्या हरि येकटका यास्तव घेवूनि आपण हि ये कटका. १५
प्रस्थानाची रात्रि प्रभुच्या जी तींत ती जगाची धात्री[4]
पडली चिंतावर्तामध्यें, कीं द्विज दिसे न जो प्रियकर्ता. १६
चिंतासिंधुनिमग्नस्वांता देवी म्हणे, 'अहो! मम लग्न
एकक्षणदांतरित[5]; प्रभुवर यावा चि! कां न आला त्वरित? १७
चिंतासागरसेतू ज्यास्तव येना, कळे न तो मज हेतु;
माझें भाग्य चि मंद! प्राप्त कसा होय मूर्तपरमानंद? १८
चिंता चित्त व्यापी, कां तो आला न विप्र ही अद्यापि?
विस्मृति पडली काय? स्वसुखीं जाला निमग्न साधु सकाय? १९
विप्र विलंब न साहे, परि वरवाक्यें कृतार्थ झाला आहे,
माझाठायीं पाहे प्रस्थानीं[6] किमपि निंद्य मग हरि राहे. २०
न मला विधि अनुकूळ, श्रीश न ये त्यास हें चि केवळ मूळ;
विमुख महेश्वर गौरी झाली वाटे, म्हणोनि दुर्लभ शौरी!' २१
ऐसें चिंती बाळा, लावी मग बोल आपुल्या चि कपाळा.
हळु च रडे; यदुपाळा आठवि; पाहे मनीं तदागमकाळा. २२
'करिल दया यदुपाळ प्रभु, तरि आहे' म्हणे 'तदागमकाळ;

---

१. वऱ्हाडी मंडळीना राहण्याकरितां दिलेली जागा. २. भूपति. ३. जूट. ४. पोषणकर्त्री. ५. एका रात्रीच्या अवकाशानें. ६. प्रस्थानसमयीं.

उशिर तयाला काय प्रणतजनालागिं दाखवाया पाय ?' २३
असि चिंतेनें झुरली चित्तीं, तों वामबाहुवल्लि स्फुरली,
ऊरुनयन ही वाम स्फुरती, म्हणती, 'तुझा सफळ हृत्काम.' २४
पहिलीं अप्रिय भार स्वांगें चिंतेंत विटविलें मन फार.
स्फुरतां करि सत्कार प्रेमें, तें[1] भूषणें फुलें हळवार. २५
या नलिनीतें अरुण द्विज दर्शन दे, प्रियार्क तदनु सकरुण.
भेटुनियां शर्म करें स्पर्शुनि देणार ईस बहु धर्मकरें. २६
देवीतें आर्याची वदनश्री सिद्धि सूचवी कार्याची.
तदपि करि कृपा कर्णावरि च पुसे कीं 'प्रियोक्तिला आकर्णी.' २७
'आला वरद वराया देवि! तुला हा, विपक्षकीर्ति हराया.'
हे उक्ति सुधावृष्टी तीवरि पडली च, कृष्णमूर्ति हि दृष्टी. २८
जो जाला करुनि दया सेदसुलभानंतसुखदवस्तुवरद[3] या
गुरुवर्यास वितरणा[4] प्रिय न दिसे, निजशिरें नमि द्विजचरणा. २९
त्या श्रीतें जे नमिती त्यांच्या संपत्सुखासि भुवनीं न मिती.
काय न दे आपण ती? स्वशिरें कीं या करि द्विजाला प्रणती. ३०
आधीं चरणीं ठेवी मस्तक, मग वस्त्रहेममणि ही देवी;
यश काय दिलें थोडें? ब्रह्मांडें ज्यास भासती बहु रोडें. ३१
कळलें चिंतामग्ना भूपा देखावया स्वकन्यालग्ना
आले यदुचक्रयुत श्रीमन्मणि रामकृष्ण वसुदेवसुत. ३२
जलदाभिगमीं ग्रीष्मारण्यमयूरासि तेंवि सुख या भीष्मा.
साग्रजकृष्णागमनीं 'धन्य' म्हणे आपणा महाभाग मनीं. ३३
प्रभु घन तैसा मोरा पारि भीष्मक भूप जाय तैं सामोरा.
पाय नमी आद्यांचे, होती बहु घोष तेधवां वाद्यांचे. ३४
वाजत असतां वाद्यें केलीं प्रभुपूजनें यथोक्त सपाद्यें.

---

१. अंगें–पंत. २. हलकी. ३. साधूना दुर्लभ [व] अनंत सुख देणारी [कृष्णरूप] श्रेष्ठ वस्तू देणारा. ४. देण्यास. ५. पाद्यासहित. पाद्य=पाय धुण्यासाठीं उदक.

वेदशिरः[1]प्रतिपाद्यें स्वीकारुनि तें दिलें परमसुख आद्यें. ३५
वश न सुता[2] तें; मिथ्या कृष्णीं वरमति[3] करी यथोक्तातिथ्या
मग दे जानिवसा या त्रिभुवनसदनास भूमिजानि[4] वसाया. ३६
अर्पी विभवा हातें त्यां, आले जे नरेंद्र उद्वाहातें[5];
सर्व यथोचित अर्चीं, दीपाची वस्तुमात्र भूषवि अर्चीं[6]. ३७
आला साग्रज कृष्ण श्रुत होतां हें सदार पौर सतृष्ण.
येउनि नेत्रें चि पसे भरुनि प्राशिति मुखा, घना चातकसे. ३८
पोट भरुनि हरिमूर्ति प्राशिति, परि होइना तृषापरिपूर्ती.
चंद्रें ताप निवाले, देहीं रोमांच कंप काय हिंवाले[7]? ३९
पौर म्हणति, 'नृपकन्या हे च समुचिता वधू हरीस, न अन्या;
हा चि वर तिला धन्य प्रभु समुचित, अन्य न त्रिदश राजन्य[8]. ४०
सुकृतें त्रिभुवनकर्ता तोषो, हो कृष्ण रुक्मिणीचा भर्ता.'
ऐसें वदती पौर, प्रेमें गाती मुकुंदयश शशिगौर. ४१
वर्णिति अभिनवरीति प्रभुची जन, तों चि रुक्मिणी नवरी ती.
पूजाया गौरीतें राजगृहांतुनि निघे स्मरत शौरीतें. ४२
वैदर्भीचें सद्म स्पष्ट दिसे लोचनासि परि तें पद्म,
कन्या हि श्री च सती, नाहीं तरि भक्ति कांति ऐसी नसती. ४३
वेष्टिलि सारिखियानीं सखियानीं, देखिली न पारखियानीं[9],
चाले, बसलि न यानीं, युक्ता धृतिरीतिमतिसतीविनयानीं. ४४
भंवत्या माता धात्री, चाले त्यांमाजि मौन धरुनि सुगात्री,
जवळि सती विप्रस्त्री रक्षिति संनद्ध[10] शूर नृप भट शस्त्री. ४५
दुंदुभिदरमुरज्यांचे गण गर्जति, नाद ऐकती सुर ज्यांचे;
जे जे वाद्यविशेष ध्वनि ते ते करिति उत्सवांत अशेष. ४६

---

१. उपनिषदानीं वर्णिलेला. २. चैद्येयज्जामातृत्वप्रदर्शनम्–**पंत.** ३. कृष्ण च कन्येचा वर असावा अशी इच्छा करणारा. ४. भूपति. ५. विवाहातें. ६. स्त्रीलिंगेऽप्ययं–**पंत.** ७. शांत झाले. ८. क्षत्रिय. ९. परक्यानीं. १०. सज्ज, कवचयुक्त.

गायक सुस्वर गाती, नाचति नट नर्तकी, मनोज्ञ कळा ती,
जो तो जन आनंदी, स्तवन करिति साधु, सूत मागध [1]बंदी. ४७
तर्पी [2]वैरविभवानीं श्रीकरवीं जे नतास वरावि भवानी
[3]तीची च रमा आली हे पूजायास होय परमा आली. ४८
कृष्णपदध्यान तिला करविति त्या विप्रयुवतिवृद्धा नतिला,
श्री च जरी न नरी ती दावितसे पूजनादिकीं जनरीती. ४९
तीच्या हातीं आर्यापूजन विध्युक्त करविती द्विजभार्या.
आइकिली च न कवणीं ऐसी करि हळु च अंबिकेसि विनवणी. ५०
'करिन सदा नमन शिवे! सपतिसुते! तुज; दुज्या वरा न मन शिवे;
नतर्जनसुरलतिकेला मानो हें, म्यां मनें अजित पति केला.' ५१
जी पावे निर्वाणीं भावें आराधिली सदा [6]गीर्वाणीं,
यश जीचें स्ववर्णी गाय सदा ते समार्चिली शर्वाणी. ५२
गुरुभजना जपति, मती धर्मी ज्यांची, द्विजातियुवति पतिमती,
त्यांचे भरि कर वाणीं, ऐकविती रुक्मिणीस सुखकर वाणी. ५३
सौभाग्यद्रव्यानीं भूदेवी पूजिल्या स्वयें भव्यानीं.
आशीर्वादा आर्यानिर्माल्यासहित देति त्या द्विजभार्या. ५४
मग जोडुनियां पाणी नमिली आर्या महासती रुद्राणी,
देवीचें सदन मुनिव्रत हि त्यजिलें द्विजांगनापद नमुनीं. ५५
कर द्याया आलीला धरि मणिमुद्राधरें करें आलीला.
मद हंसांचा लीलालेशें जी जुरवि दावि त्या चालीला. ५६
श्रीमूर्तीची शोभा पाहुनि पावे नृपाळचित्त क्षोभा,
तो तो गिळिला मोहें, देखे स्मरमोहनास्त्र योधा जो हें. ५७

---

१. स्तुतिपाठक, भाट वगैरे. २. उत्तम ऐश्वर्यानें. ३. या पूजयितुमागता रमा इयं तस्याः शिवायाः सखीति–**पंत.** जी पूजा करण्याकरितां आलेली रमा, ही पार्वतीची मैत्रीण. ४. भक्तजनाची कल्पलता जी तूं त्या तुला. ५. शेवटीं. ६. स्वःशब्देन तत्स्था गृह्यंते–**पंत.** ८. गौरी. ९. वायनानीं. १०. ११. मौन. १२. रत्नखचित आंगठी धारण करणाऱ्या हातानें.

त्रिभुवनमोहनरूपप्रेक्षण तें मोहवृक्षदोहदधूप[1]
स्मरशिखिकुंडें भूप स्मितमुग्धकटाक्षमोक्ष[2] तें वरि तूप. ५८
शुचिरससंपदगूढस्मितसव्रीडेक्षणस्मरेषुविमूढ,[3]
तच्छस्त्रें हि गळालीं, लाजुनि कुसुमायुधासि काय पळालीं? ५९
रथतुरगगजारूढ क्षितिपति शूर स्मरेषुहत संमूढ
पडति न, ते कुसुमशरा नमिति, म्हणति, 'तूं चि एक वीरवर खरा'. ६०
लोक प्रकट विपक्षस्मयकक्षज्वलन[4] शस्त्रशास्त्रसुदक्ष
स्मरशरविदलितवक्षस्थळ मूर्छित पतन पावले बहुलक्ष. ६१
हरदृगनळदग्धतनू, कुसुमविशिखपंच,[5] मधुपगुण,[6] कुसुमधनु
परि करि अदितिदितिदनुप्रभव वश श्रीकटाक्षबळ चित्तजनु.[7] ६२
साक्षान्मातापितर त्रैलोक्याचे तयांसि म्हणती इतर,
'करिती रक्षण काय स्वीय हि ज्यां रक्षवे चि न क्षण काय[8]?' ६३
ज्यांच्या हस्तीं नग्न प्रखरायुधनिकर ते कुसुमशरभग्न
जाले मोहनिमग्न, श्रीचें हारिसीं तया मुहूर्तीं लग्न. ६४
न दिसे कां श्रीचक्रप्रवरायुध म्हणुनि नयन जों करि वक्र
तों आला यदुशक्रद्युमणि[10] तदुदयीं उलूक रिपुनृपचक्र. ६५
श्री कर देतां च पळामाजि सुखघनावरास[11] मिनली[12] चपळा;
श्रीस महाभाग हरी जेंवि शृगाळांमधूनि निजभाग हरी. ६६
ऐसा घालुनि घाला स्त्रीरत्न हरूनि वृष्णिवीर निघाला.
किति मोहित किति हो! ते टकमक वदनाकडे चि पाहत होते. ६७
गेला घेवूनि बळें मग हळहळ करिति सकळखळनृपतिबळें.

---

१. मोहवृक्षाचा डोहाळा जो धूप तद्रूप असें. २. हास्यानें सुंदर अशा कटाक्षांचें जें सोडणें तें. ३. शृंगाररसबाहुल्यानें गुप्त जें स्मित तें, [आणि] सलज्ज ईक्षण हे च मदनबाण त्यानीं मोहित. ४. शत्रूच्या गर्वतृणास जाळणारे. ५. पुष्पें हें च आहे बाणपंचक ज्याचें. ६. भ्रमर ही च [धनुष्याची] दोरी ज्याच्या. ७. मनोजः--**पंत.** मदन. ८. परकीय. ९. देहः--**पंत.** १०. यादवेंद्र कृष्ण हा च सूर्य. ११. सुखाचा मेघ कृष्ण याला. १२. मिळाली.

म्हणती, 'कन्या हरिली कीर्ति हि जी बहुत दिवस आम्हीं वारिली. ६८
दिवसा ढवळ्या नीतिभ्रष्टानीं हारिलि कीर्ति गवळ्यानीं ती
सिंहांची जसि एणीं; शस्त्रें शोभति न जेंवि विपतिस लेणीं.[1] ६९
मागधमुखनृप मानी साहति न क्षण हि कीर्तिची असि हानी.
कोपें द्विजें[2] निजवस्त्रें खंडिति, नग्नें[2] चि जाहलीं बहुशस्त्रें. ७०

---

# अध्याय चौपन्नावा.

ते भूमिधव शैयानीं[3] शस्त्रें कवळूनि कोपपरवश यानीं
बैसुनि उद्दामरणा धांवति साधावया जया वा मरणा. १
रिपुबळसागरवेळा यदुसेना प्राप्त जाहली रणवेळा,
भटनट उठले, खेळा प्रेक्षाया ये नभीं सुरांचा मेळा. २
यदुचक्रनगीं वृष्टी शस्त्रांची करिति शत्रुघन, तें दृष्टी
पडतां वैदर्भी ती पावे स्वनिमित्त म्हणुनि लज्जा भीती. ३
पावुनि परितापा हे निजसुखसागरमुखासि सरिता पाहे.
हांसोनि म्हणे साक्षी, 'सावध हो, भय नको धरूं, वामाक्षि![4] ४
सुंदरि! यादव कल्पज्वलन[5] चि, हें शत्रुभूपबळ तृणकल्प.
झगडाया कोटि करी येतां होईल काय भीतिवश हरी? ५
यदुदहनीं जळतील द्वेषिभटपतंग भीरु! बहु पळतील.
विजयश्री तुज देवी! सेवाया येतसे, खळांसि न सेवी. ६
ज्याच्या स्वरथीं ताळध्वज तूझा दीर वीर यादवपाळ
बळ बळसागर हा तीं हरिल[6] बळें धरुनि मुसळ नांगर हातीं. ७

---

१. विधवाया भूषणानीवोपहासहेतुः—**पंत.** विधवेला अलंकार म्हणजे थट्टेला कारण [ होतात ]. २. अत्र कुतुकं । दंताः द्विजाः तद्वस्त्रे ओष्ठपुटे । कोशान्निष्काशितानि शस्त्राणि नग्नानीत्युच्यंते तत्र क्षोभोत्प्रेक्षा—**पंत.** या ठिकाणीं [ एक ] चमत्कार [ तो हा कीं ] दंत=द्विज, त्याचीं वस्त्रें=ओंठ, म्यानांतून बाहेर काढलेलीं शस्त्रें—नग्न [ झालीं ] असें म्हणतात. ३. हातानीं. ४. हे रुक्मिणि! ५. प्रलयाग्नि. ६. मूळ पाठ—**संहारिल.**

पूर्णेंदुमुखि! पहा गे! जाले यदुवीरसिंह सर्व हि जागे.
शरदंष्ट्रासंकीर्णें[1] यद्वदनें चापमंडळें[2] विस्तीर्णें. ८
तो गद, तो अक्रूर, श्रीमान् बळसिंधु तो मदग्रज शूर,
करिती शरजळवृष्टी कल्पांतांभोद पडतसे कीं दृष्टी.' ९
सुटले उग्र यदुभटानिळ रणरंगीं, नभीं अहितजलदघटा
पळमात्रांत वितुळती, त्यांची लोकीं प्रसिद्ध शक्ति अतुळ ती. १०
निजरक्तें नाहविले, शोणिततटिनींत भट सगज वाहविले.
तृणवसधर[3] चि राहविले, अमरां नृत्यत्कबंधनट[4] पाहविले. ११
ते प्रलयनटच्छात्र[5] ज्ञानतपोवेदमंत्रविद्यापात्र,
परिभयकंपितगात्रत्राण रमापत्यधीतिं[6] हें यां मात्र. १२
युद्धीं यत्न न चाले, मगधपतिप्रमुख नृप पराङ्मुख जाले.
शिशुपाळाला नवरी देती, अपकीर्ति ती सती त्यासि वरी. १३
तच्चित्त जसें बोधे, वदति तसें मगधनाथभूपतियोधे.
समजाउनि नृप देशा आपुलिया नेति करुनियां उपदेशा. १४
रुक्मी ही परमर्षिप्रियहरिचा शत्रु दुष्टबुद्धि अमर्षी
ऐकत असतां राजे बळगर्वें काळमेघ तैसा गाजे. १५
'हरिरक्तें न्हाणीन क्षितिला, भगिनीस सोडउनि आणीन,
मीं मृगपति कळवीन स्वबळ, यदुकुरंग दशदिशा पळवीन. १६
करितिल न परित्राण स्वयशाचें भगिनिचें न हे जरि बाण
हारितिल न हरिप्राण, स्वपुरा येईन तरि असे मज आण.' १७
माराया यदुपाळा[7] घेउनि अक्षौहिणीबळा खळ साळा
सोडित उष्णश्वासा धांवे हरिवरि पिसाळला चि श्वासा[8]. १८

---

१. बाणरूप दाढानीं व्याप्त. २. समुदाय. ३. [दांतीं] तृण धरणारे. ४. नाचणारे शिरोहीन देहरूपी नट. ५. हरिहरशिष्याः—**पंत**. यांतील "हरि" हा अर्थ 'रमापति' या शब्दाचा असून "हरशिष्य" हा अर्थ "प्रलयनटच्छात्र" या शब्दाचा समजावा. ६. हरीपासून मिळालेलें शिक्षण. ७. मेहुणा (रुक्मी). ८. श्ववत्—**पंत**.

तो मनुजाकृति भूत क्रोधारुणनयन खळ म्हणे, 'रे सूत!
लंघीं लघु पथ हा, कीं जावूं द्यावा न चोरटा, रथ हाकीं. १९
निजलंघन जगिं नीचें असमर्थें साहिजे चि, मीं भगिनीचें
हरण न साहें, गोपें मज न वळखिलें म्हणोनि गमलें सोपें. २०
सिंहशिरीं[1] वामपदन्यास श्रृगाळासि भद्र? हें तूं चि वद.
नाशिन खळवीर्यमद स्वरिपुक्षतजें भरीन मीं आजि नद.' २१
फार खवळले दोष ज्ञानतरणिराहु काम लोभ सरोष,
बोले बोल पिसा जे ते योग्य, न त्याविणें पिसेपण साजे. २२
त्यजिली सेना मार्गे धांवे खळ दांत ओंठ खात चि रागें.
सज्जितधन्वा कोपी रुक्मी ईश्वररथासि त्या आटोपी. २३
गर्जे, दाखवि कोपा, तो मूढ म्हणे, 'उभा, उभा रे! गोपा!
उत्तम पाहुनि होरां[2] मद्भगिनीरत्न नेसि चोरुनि चोरा!' २४
उग्रशरत्रय जोडी, ओढुनि दृढचाप, पाप हरिवरि सोडी.
'चोरीची बहु गोडी' दुष्ट म्हणे 'सोडवीन मीं हे खोडी. २५
चोरुनि दिवसा ढवळ्या दुर्लभरत्नासि पळसि कोठें गवळ्या?
यदुवंशकलंका! मीं रुक्मी आलों खळा! भवद्वधकामी. २६
क्षणमात्र उभा ठाक, प्राण हरायासि पातलों मीं, काक
पात्र न जैसा हविला, आयुःशेषें चि दोष पळ साहविला. २७
तूं कपटी हें जाणें, परि मीं त्वद्वीर्यमद विनाशिन बाणें.
कन्यारत्नस्नेह त्यज, जों जाला न मदिपुचूर्णितदेह.' २८
ऐसी ऐकुनि वाणी हांसे जगदीश शार्ङ्गमार्गणपाणी[3],
सत्वर सा शर सोडी, ताडुनियां श्यालकासि तद्धनु तोडी. २९
आठानीं हय वेधी, सूताचें हृदय दों शरानीं भेदी.
ध्वज तीं बाणीं ताडी, मारुत वृक्षासि तेंवि भूवरि पाडी. ३०
पुनरपि रुक्मी पाप क्रोधें करि सज्ज शीघ्र दुसरें चाप,
पांचा बाणीं वेधी हरिला, तों देव तें हि धन्व च्छेदी. ३१

---

१. काकः–**पंत.** प्रश्नार्थी वाक्य. २. मुहूर्त. ३. बाण.

तिसरा घे इष्वास[1] ज्या[2] जोडी तों चि कृष्ण तोडी त्यास.
ऐसें होय परि घतो[3] प्रभुला म्हणवूनि घे विमूढ परिघ तो. ३२
तोडी हरि परिघाला, परि घालाया पुन्हां हि तदुपरि घाला
घे पट्टिश, मग शूळ, स्पष्ट तया लागलें चि केवळ खूळ. ३३
केला न प्रणिपात, त्रिभुवनगुरुवरि उगारिले ही हात.
तद्गत[4] शस्त्रव्रात क्षणमात्रें धूळि होय, योग्य चि घात. ३४
करवालासह चर्मा[5] जों घेता जाहला सुनिंदितकर्मा,
तों दांभिककृतधर्मापरि निष्फळ होय, पावला चि न शर्मा. ३५
दावाया भुजशक्ती हरिला रुक्मी धरी सुदुःसह शक्ती.
खंडी तीस हि, भक्ती जेंवि कुमतिला, परंतु न वारि विरक्ती. ३६
पुनरपि घे तोमर तो, जेंवि अपथ्यास आग्रही, तो मरतो.
त्यातें ही करि चूर त्रिदशवरगुरु प्रभु प्रतापी शूर. ३७
परि सोडी न मति कुडी, टाकी धृतखड्ग तो रथावरुनि उडी.
धांवोनि रमारंगज्वलनावरि जाय मूढ रुक्मिपतंग. ३८
बाणांहीं क्षिप्र चुरा करि खड्गा खंडुनीं गदा हि प्रचुरा.
घे नंदककरवाळा[6] रुक्मिवधार्थ प्रभू द्विपज्जनकाळा. ३९
पडतां हें सर्व दिठी, प्रणताभयदानपटुपदीं घालि मिठी,
विनवी करुणाब्रा त्या, 'प्रभुजी! द्या प्राणदान माझ्या भ्राता.' ४०
आली होती चीड द्वेष्ट्याची परि पडे सतींची भीड.
देउनि अभया, चेलें[7] बद्ध खळश्यालकास सत्वर केलें. ४१
खड्गें चि मिशा दाढी डोईचे केश मध्यमध्यें काढी.
मरणाहुनि ही गाढी लज्जा, हें त्यास तत्क्रिया फळ वाढी. ४२
आला जों शत्रुबळद्विपसिंह सयादवप्रवीर विभु बळ,
तों हें भीष्मकभूपज्येष्ठसुताचें विलोकि सहसा रूप. ४३
आली रामास दया, सोडि स्वकरें कृतापराधा हि तया.

---

१. धनुष्य. २. गुण—प्रत. ३. मारी—पंत. ४. रुक्मीजवळील. ५. ढालीला. ६. खड्गाला. ७. वस्त्रानें.

थोरांचें मन पोळे रिपुचें ही दैन्य देखती जरि डोळे. ४४
तो करुणेचा अब्द प्रभु बळ लावी निजानुजाला शब्द.
'संबंधी जरि दुष्ट ज्ञाते होती असे कदापि न रुष्ट.' ४५
वैदर्भी मनिं भावी खेद, तिला ज्ञान सांगुनी समजावी
कीं, 'प्राणी निजकर्मैं पावे अनिवारितें चि दुःखें शर्मे.' ४६
राम स्वमुखें बोधी, वैदर्भीच्या मनोमळातें शोधी.
परि तो रुक्मी क्रोधी लेश सदुपदेश घे न साधुविरोधी. ४७
उग्र जयापरि भूत प्रभु तो पंचाक्षरी करी परिभूत,
तेथें चि तया गाडी, निजलीलेनें बळप्रभा हरि[1] नाडी. ४८
जेथ पराभव लाहे वसउनि तेथें चि भोजकट पुर राहे,
न पुन्हां कुंडिन लक्षी, मानी रुक्मी कृतप्रातिज्ञा रक्षी. ४९
भीष्मककन्याहरणीं श्रीकृष्णें जिंकिले प्रबळभूप रणीं;
स्वपुरा आणुनि विधिनें वरिली लोकैकनायकें सुखनिधिनें. ५०
प्रथम हि नव्हता तोटा, परि हा तों द्वारकेंत उत्सव मोटा;
कीं, तें श्रीचें लग्न स्वसुखसमुद्रांत लोक होय निमग्न. ५१

---

# अध्याय पंचावन्नावा.

## ( श्लोक )

पूर्वीं रुद्रललाटलोचनाशिखिज्वाळामुखीं जो जळे,
तो रुक्मिण्युदरासि ये रतिपती हें शंबराला[2] कळे,
कीं, 'स्वप्राणहर स्मर प्रकटला, जों अप्रगल्भ स्वयें
तों मारीन,' म्हणे 'उपेक्षित रिपू देतो अनल्पें भयें.' १
ऐसें चिंतुनि कामरूप[3] खळ तो पावे पळें द्वारका,
प्रासादांत शिरे, हरी हरिचिया मायाबळें दारका[4];
ने व्योमीं सहसा अनिर्दशशिशू[5] प्राणक्षया दांडगा

---

१. हिराऊन घेई. २. शंबरासुराला. ३. इच्छेस येईल तें रूप घेणारा. ४. मुलास (प्रद्युम्नास). ५. जन्मून ज्याला दहा दिवस हि झाले नाहींत असा बालक.

जैसा कीं मृगशावकास पळवी भक्षावया लांडगा. २
काम श्रीहरिजात बाळ वधवे कैसें सपत्नीकरीं?
टाकी झांकुनि नेत्र निर्दय बळें तें रत्न रत्नाकरीं.
तो मीनें नवनीतपिंडमृदुल प्रेक्षूनियां भक्षिला,
जाणों रम्यकरंडकीं च सुमणी रत्नाकरें रक्षिला. ३
दुष्टें नेउनि पुत्रशोक दिधला श्रीरुक्मिणीच्या मना,
जाला खेद महोत्सवांत सहसा त्या द्वारकेच्या जना;
जो देतो बहुतांसि दुःख कुमति स्वार्थार्थ तो नाडिला,
कामाद्युग्ररिपुत्रयें चि नरकीं बांधोनियां पाडिला. ४
भक्षावा जळजंतुनीं म्हणउनीं टाकूनि तो अंबुधी-
मध्यें बाळक शंबर स्वसदना निश्चिंत गेला कुधी;
जो निःशेष न जाहला जरि हरक्रोधानळें जाळिला,
केला अंबुधिमग्न; दुर्मति म्हणे, 'मृत्यु स्वयें टाळिला.' ५
पसरुनीं गुरुजाळक धीवरीं धरियले बहुमीन नदीवरीं;
यदुदरीं शिशु तो झषें सांपडे, विधिबळें व्यसनीं सहसा पडे. ६
दाशाहीं बहु पीनें मीननिकरीं जो देखिला तो बरा,
भावें भेटविला तया चि असुरा राष्ट्राधिपा शंबरा;
तेणें सूदकरीं दिला मग तिहीं पाकस्थळीं कापिला,
पोटीं बाळ करंडकांतुनि निधे जैसा मणि स्थापिला. ७
होती तेथ पतिव्रता रति पतिप्राप्त्यर्थ रम्याकृती
आच्छादूनि महानसीं करि तदादेशें चि पाकाप्रती,
मानी पाचकमंडळी स्वगुरुता देवूनि सारी तिला,
कीं तो शंबर मानवे बहु तिच्या पाकाचिया रीतिला. ८
परम कोमळ रम्य शरीर ती झिजवि, दुर्जनदास्य करी रती;
प्रियपदीं च सती धरि भाव कीं, उचित मृत्यु तदर्थ हि पावकीं. ९

---

१. शत्रुहस्तें. २. समुद्रांत. ३. मोठें जाळें. ४. मासा. ५. धीवरानीं, कोळ्यानीं. ६. पुष्ट. ७. पाककर्त्यांच्या हातीं. ८. स्वयंपाकघरांत.

जैसें रूप तसें चि नाम दुसरें 'मायावती' हें धरी,
शत्रूच्या सदनीं, न पाक तप ती पत्याप्तिसाटीं[1] करी;
सूदाहीं शिशु पोषणार्थ दिधला प्रार्थूनि तीकारणें,
त्याचें रूप विलोकितां चि घडलें तल्लोचना पारणें. १०

मायावतीस शिशु अर्पिति सूपकार,[2]
सांगोनि तत्व[3] कारि नारद सूपकार;
होतां अकल्पित चि तो पतिलाभ जाया
पोषी सुखासह तया पतिला भजाया. ११

रक्षी ज्यासि पतिव्रता प्रियतमा मायावती मायसी,
शंभूची अभयोक्ति[4] ही, मग तया चिंता असे कायसी?
संसाराब्धिनिमग्न जे जन तयां ज्याचीं पदें पारदें,
योगींद्रें अवलोकिलें हि करुणालीलालयें नारदें. १२

जो श्रीकुक्षींत जन्मे मदन सुत अनौपम्यकांत्यर्णवाचा,[5]
कैसी वर्णील चेतोहर तदुदित[6] तद्रूप तद्वर्ण वाचा?
स्वल्पा काळें चि जाला तरुण, सकरुणश्रीमहेशप्रसाद,
स्वैर क्रीडावयाचा रतिनिजमतिचा[7] दीर्घपूर्वप्रसाद.[8] १३

कामत्वाच्युतजत्वयौवन अशा अत्यद्भुता चि त्रया
जेथें गांठि विलोकितां न युवती होती कशा चित्र या?
जी स्वप्नांत हि मन्मथाविण सती चिंती च ना येर, ती
एकांतीं सुरतार्थ भूषिततनू होवूनियां ये रती. १४

लज्जाव्यालोलदृष्टि,[9] स्मित रुचिरमुखीं, भ्रूयुगीं नृत्य, नर्मे[10]
व्याहारीं,[11] कोमळांगीं अभिनव मिरवे वर्म रोमांचवर्म;[12]

---

१. पतिप्राप्त्यर्थ. २. अन्न शिजविणारे. ३. गुह्य. ४. रक्षी—**पंत.** कर्ता 'अभयोक्ति'. ५. अतुल कांतिसागर जो कृष्ण त्याचा. ६. त्याचें भाषण. ७. रतीच्या स्वकीय मतीचा. ८. प्रासाद इत्यर्थः—**पंत.** ९. लज्जेनें चपल दृष्टि जिची अशी. १०. विनोद. ११. भाषणांत. १२. रोमांचरूप कवच.

ऐसी मायावती जी तिस मदन म्हणे, 'माय तूं, धेनुधर्म-[1]
स्वीकार व्रीडकारी[2], तुज मज हि न दे शर्म हें निंद्य कर्म. १५
रीति जे बहु जगीं अधमा ते, हे चि हो त्यजुनि सावध माते!
सेविति स्वजनता सुरता[3] तें इष्ट इच्छिसि कसी सुरतातें?' १६
प्रथम गमला ऐसा मोटा अधर्म चि तो, दिलें
न मन वचना कामें नाहीं च तें अनुमोदिलें;
मग कथि तया जाया[4] जाया स्वसंशय वृत्त, 'मीं
रति, मदन तूं,' हें तें होय प्रभा[5] स्मरहृत्तमीं. १७
महामाया[6] माया रति पतिस दे जी न उरवी
अनेकां मायांतें, निबिडतिमिरा ज्यापरि रवी;
गदा ही दे मायाशतनिपुणशत्रुप्रमथन-[7]
क्रियासिद्ध्युत्साहा उपजवि, करी युक्तिकथन. १८
उठे काम क्रोधें करुनि कलितोद्दामगद[8] या
रिपूतें माराया, कलह करि, कैंची मग दया?
सभेमध्यें होता असुरपति त्याच्या चि जवळी
बसे, बोले कार्ष्णि[9] श्रवणकटु, दुष्टास खवळी. १९
स्वाधिक्षेपविवृद्धमन्यु[10] खळ तो दंडाहतव्याळसा
धांवे शीघ्र, तदा गदा धरि न जी हिंसोत्सवीं साळसा[11],
कोपानें करि अस्त्र शस्त्र कपटें वेचूनियां युद्ध तें,
तैसें जें हरिबाळकोन्मुख[12] बळें[13] येणें गजें उद्धतें. २०

---

१. पशुधर्मस्वीकार. २. अकारांतोपि—**पंत**. ("व्रीड" शब्द आकारान्त हि आहे. व्रीडकारी=लज्जाप्रद). ३. सुरसमूहः—**पंत**. ४. स्त्री (रति). ५. मदनाच्या हृदयांतील अज्ञाननाशाविषयीं प्रकाश. ६. महामायानामक कपटविद्या. ७. शेंकडों मायेचे प्रकार जाणणाऱ्या शंबरासुराच्या वधकर्मसिद्धींतील उत्साहाला. ८. घेतली आहे मोठी गदा ज्यानें असा. ९. कृष्णपुत्र (प्रद्युम्न). १०. आपल्या धिक्कारानें ज्याचा क्रोध वाढला आहे असा. ११. आळशी. १२. सिंहाच्या छाव्यासमोर. १३. चालून येणें.

१४—

भृंगांची पंक्ति मौर्वी[1], कुसुममयधनू, बाण ते ही प्रसूनें[2],
लीळेनें दास केले असुर सुर नर प्रौढ ही त्रैह्मसूनें[3],
तो चि प्रद्युम्न साक्षादजितसुत युवा, ज्यौं[4] रणीं शस्त्रपाणी
बाहे, पाहे, तदाशीं[5] तिळसहित तया सोडिजे कां न पाणी? २१
काळव्याळविषाग्निची च धरिली जाणों करीं जीभ[6], या
माराया तरवारि वारिदनिभा[7] देवां हि दे जी भया;
शत्रूचें सकिरीटकुंटलशिर च्छेदी क्षणें, होय ज्या
कांहीं न श्रम, कोमळें हि खुडितां जैसें नखें तोयज्या. २२
जे होते उत्सवा त्या निरखित अमर व्यापुनीं अंबरा, 'रे!
दुष्टा! जा दुर्गतीतें' म्हणति 'निजपुरा जा, प्रभो! शंबरारे!
प्रद्युम्ना! तूं स्मर, स्त्री रति, बहुदिवसां युक्त जाला, बरा हो!
हा योग स्वाप्तमूर्तोत्सव चि, न घटिका यावरी लांब राहो. २३
ऐसा चि प्रार्ज्य[8] नित्योत्सव खळमथनें सज्जना दे, वसेना
शत्रुत्रास त्रिलोकीं, करुनि यश असें हर्षवीं देवसेना;
दुष्टांचें साधुपीडाकर खर असिनें ते रणीं बाहु ताशीं,
व्हावे द्वेषी पतंग, त्वदिषुमुखिं वसो शक्ति जी बा! हुताशीं[9].' २४
गेले ते पुष्पवृष्टि स्तुति करुनि सुखें, शंबरांतोत्सवासी
पाहोनि, प्रेक्षणीयाकृतिरतिपतिसि स्त्रीसख[10] स्वर्गवासी;
नेला मायावतीनें मग गगनपथें मन्मथ द्वारकेला,
विद्युन्मेघभ्रमें चि क्षणभरि कुतुकी तो सुहृद्वारें[11] केला. २५
व्योमापासुनि जेधवां उतरला, अंतःपुरीं देखिला
दारानीं प्रभुच्या क्षण स्वहृदयीं तो श्रीहरी लेखिला;
शोभा आकृति वर्ण वेष सकळ भ्रांतिप्रद, स्त्री सती

१. धनुष्याची दोरी. २. फुलें. ३. मदनानें. ४. ज्यातें—**पंत**. ५. ज्या बाहे त्याच्या आशानीं. ६. काळासर्पाच्या विषरूप अग्नीची जीभ च [अशी तरवार]. ७. मेघासारखी (नीलवर्णाची). ८. पुष्कळ. ९. अग्नींत. १०. सस्त्रीक देव. ११. मित्रसमूह. (वार=समूह).

लज्जेनें लपती, मग प्रतिनिधित्वें[1] तींच[2] त्यां दीसती. २६
पतिप्रतिनिधिप्रति प्रभुवरस्त्रिया पाहती.
तया चि भंवत्या उभ्या परमकौतुकें राहती;
परस्पर असें तदा वदति कीं, 'कसें यास ये
मुकुंदनिजरूप, हें हारिस जाणवूं या सये! २७
कृष्णासीं जसि रुक्मिणी तसि च हे यासीं सुशोभा सती;
आदर्शीं प्रतिबिंबकें हि न असीं तुल्यें गुणें भासती.'
ऐसें बोलति यादवेंद्रयुवती त्या विस्मिता सन्मती,
तों ये तेथ पहावयासि उदरीं याचें जिच्या जन्म ती. २८
वैदर्भी यास पाहे, द्रव हृदय धरी, तत्क्षणीं स्तन्य[3] वाहे,
कीं ते आनंद लाहे, जन्हि तनुज असें ज्ञात होणें चि आहे;
बाष्पानें कंठ दाटे, सकळतनुवरि क्षिप्र रोमांच थाटे,[4]
शोकाचा सिंधु आटे, त्वरित परम तद्दर्शनीं लाभ वाटे. २९
म्हणे, "हा कोण श्रीयदुपतिसम श्रीनरमणी,
गमे या पुत्रास प्रसवलि नराची[5] न रमणी;
अशा रत्नाची जी खनि जनिं तिचा धन्य कुसवा!
स्वयें याचें वृत्त प्रियसखि! पुसा, गे! न[6] पुसवा. ३०
या लावण्यांबुधीला अनुसरलि असे जी अनन्या नदींचें[7]
पत्नीचें भाग्य लोकीं अतुळ, सुकृत जें मोजवे तें न ईचें;
ती धन्या होय ऐसें विमळ उपजलें रत्न जीच्या कुशीला,
न स्पर्शावी तुला बा! रुचिरतरतनो! दृष्टि जी कीं कुशीला[8]. ३१
माझा ही पहिला अनिर्देश[9] शिशू नेला स्वगेहांतुनीं;
दैवें हारपला अनर्घ्य[10] सुमणी जैसा पडे हातुनीं;

१. कृष्णाचे प्रतिनिधित्वें. २. शोभादीनि—पंत. ३. दूध. ४. उभारके. ५. मानवली. ६. [दुसऱ्याकडून] विचारवूं नका. ७. नदीचें. ८. दुष्ट. ९. नुकता च जन्मलेला. १०. अमूल्य.

तो जीवंत असेल शंकरदयाधाम[1]निजांकीं जरी,
वाटे बुद्धिस एवढा चि सुवयें झाला असावा तरी. ३२
देता जाला कृपेनें वरद सुरमणि[2]स्वर्द्धे तें तोकदान[3],
ज्ञानिध्येयांघ्रिपद्म[4] प्रभु हरिल पुन्हां बाळसा तो कदा न;
'दैवें नेला' म्हणावें, तरि जगदुदयत्राणसंहारशक्त
श्रीकंठाचे कसें तें अशिवनतबळी[5] पंगु गांजील भक्त? ३३
हा कैसें पावला हें असुलभ हरिचें दिव्य सारूप्य, शंका
हे मोटी, राजयाच्या तनुजनिविण[6] तल्लक्षणप्राप्ति रंका,
वाटे मत्पुत्र आला श्रवण हितमुखें[7] वृत्त जालें असेल,
प्राप्तप्रौढत्व सिंहीतनय पळभरी न श्वयूथीं[8] वसेल. ३४
घडेल काय हें आला मत्सुत द्वारकापुरा?
निवेल आलिंगुनि त्या स्वसुहृद्दार कापुरा[9]? ३५
दिसे याचाठायीं सहज अधिक प्रीति, भुज ही
स्फुरे डावा, 'आहे विदित' म्हणतो[10] 'रीति तुज ही;'
मला लग्नापूर्वीं प्रियकथनदक्षें कळविली
स्वयें कृष्णप्राप्ति स्फुरुनि निजचिंता पळविली." ३६
प्रभुप्रियतमा असा मनिं विचार जों ते करी,
स्वतातजननीसह[11] त्वरित तेथ आला हरी;
कळे परि न तो वदे किमपि विश्वसाक्षी, धरी

१. शंकराची कृपा ही च कोणी दाई तिच्या मांडीवर. २. कल्पवृक्ष [ च ] असा महादेव. ३. पुत्रदान. ४. ज्ञानी लोकानीं स्मरण करण्यास योग्य चरण-कमल ज्याचें असा. ५. न शिवे नता अशिवनता तेषु शिवभक्तेतरेष्वेव बळवत्—**पंत.** ( नाहीं जे शिवाचे ठिकाणीं नम्र ते अशिवनत, त्या शिवभक्त नसलेल्यांचे ठिकाणीं बळवान् ). ६. राजशरीरापासून जन्म झाल्यावांचून. ७. आप्तमुखें. ८. मूळ पाठ—**न पळ हि क्रोष्ट्र.** ९. कळपीं. १०. भुज म्हणतो. ११. वसुदेवदेवकीसह.

अविज्ञजनरीतिला[1], तरि चरित्र तें उद्धरी. ३७

जो लोकत्रितयीं फिरे, स्थिर नसे, ताटीं[2] जसा पारद[3],
स्वांतें[4] ध्येयपदीं च निश्चळ, भवांभोधींत जो पारद[5],
जो वर्णे गगनोदरीं क्षण दिसे पूर्णेंदु कीं शारद[6],
श्रीशांतःपुरचत्वरीं[7] च उतरे तो सन्मुनी नारद. ३८

'नाभिस्थानासि नेणे मृग, हुडकि जसा घेत रानांत वास,
तैसें दोघें हि नेणा, जवळि हि हृदयीं या धरा नातवास;
शौरे! हा वासुदेवात्मज सुतसुत हा देवकी! वोळखावा,
तो हा वैदर्भि! जेणें प्रथम चि तुजला लागला बोळ[8] खावा. ३९

वर्णाकारनिरीक्षणस्मितगतिव्याहार[9] हे सांगती
कीं, कृष्णप्रतिबिंब हा, न वळखा, सर्व भ्रमा सांगती[10];
जो निःशंक गृहांत ये; इतर तो कैसा? तुम्हीं धीरधी
नेणा हो बळकृष्ण! कौतुक करा लोकांत चिन्नीरधी[11]! ४०

टाकी यासि पयोनिधींत हरुनी दुर्बुद्धि तो शंबर,
ग्रासी मीन, असे सुखें तदुदरीं, जैसें घटीं अंबर[12];
दाशानीं दिधला खळासि झष तो, तत्रापि विश्वंभर
त्राता होय जयास काय करिती विघ्नें तया शंभर? ४१

नेत्रें पाहुनि मीन शंबर धरी तो भक्षणेच्छे, दिला
तेणें सूदकरीं[13] च पाकसदनीं, त्यांहीं मग च्छेदिला;
तों हा बाळ विशाळभाळ उगवे आभाळ[14] जातां जसा
तारापाळक[15], पाचकीं निरखिलें तैसें चि या राजसा. ४२

करीत होती तेथें चि नवसा गौरती[16] रती,

---

१. मूढजनांच्या रीतीला. २. ताटांत. ३. पारा. ४. चित्तानें. ५. भवसागरांतील परतीराला नेणारा. ६. शरत्कालचा पूर्णचंद्र च. ७. कृष्णाच्या अंतःपुरांतील अंगणांत. ८. बाळंतबोळ या नांवाची एक औषधी वस्तु. ९. भाषण. १०. पुनःपुन्हा. ११. चैतन्यरससागर असे तुम्ही. १२. आकाश १३. स्वयंपाक्याच्या हातीं. १४. ढग. १५. चंद्र. १६. पतिव्रता—**पंत.**

पावे त्यापासुनीं चिंतानवसागरतीर[1] ती. ४३
मीनोदरीं सांपडला अकल्पित लहानसा,
ओळखेना रती हे तों मीं गेलों त्या महानसा. ४४
ज्यां सारें कथिलें रहस्य; न म्हणे निद्रा शरीर क्षण;
स्नेहें माय तसी रति स्वपतिचें तेथें करी रक्षण;
झाली आपुलि आपण प्रियपरित्राणार्थ सासू, नती-
स्तुत्यर्हा, परि गौरवा समुचितें, सासू असा, सून ती. ४५
पावे प्रद्युम्न हा त्या निजरिपुपतगीं वह्निभावा, युवा हे[2]
सद्विद्यानीतिवृत्तस्मरण करुनि दे, तो महावायु वाहे;
सेवाया दूर आली क्रमुनि पथ रती ही पिपासू, नद्या हो!
पाजा आशीरसा जें हृदभिमत इला आजपासून द्या हो!. ४६
प्रद्युम्ना वसुदेव राम हरि हे सप्रेम भव्या कुळ-
ज्येष्ठा भेटति, होति हुंगुनि शिरीं बाष्पोद्गमव्याकुळ;[3]
तत्पत्नी हि सदारदारकतनुस्पर्शामृतीं मज्जना
पावोनी, निवती, न तोष वदवे तो लेश धीमज्जना. ४७
जाहला चि न परा सुकुमार प्राप्त होवोनि परासु[4] कुमार;
वांचला नव लहान गरांत[5], प्राज्य दे नवल हा[6] नगरांत. ४८
आला काढूनि कांटा अमरहृदयिंचा मन्मथ द्वारकेला,
होतें शोकाख्य शल्य स्वजनहृदुदर्जी[7] तत्समुद्धार केला;
जी स्वीकारी हराया विषयरतजगद्धृन्मळाला[8] विभू[9] ती
दुष्टां संत्रास, शिष्टां अभय, सुख हि दे प्रेमळांला विभूती. ४९
सौंदर्याकर सोहळे पुरविता जो दृष्टिचे तो रमा-
लीलामंदिर ज्या नसे चि उपमा त्रैलोक्यचेतोरमा[10];

१. चितारूप नवीन समुद्राचें परतीर. २. ही रति. ३. गहिंवरानें ज्यांचा गळा दाटला असे. ४. मृत. ५. विषांत-**पंत.** ६. वृत्तांतः कुमारो वा-**पंत.** (वृत्तांत किंवा कुमार). ७. स्वकीयांच्या हृदयकमळांत. ८. विषयी जनांच्या हृदयांतील पापाला. ९. कृष्ण. १०. त्रैलोक्यसुंदरास.

ऐशाचें प्रतिबिंब कां न इतरस्त्रीचित्त मोही? लया
मातांची क्षण ने धृती, न कविची धी केंवि मोहील या? ५०
मेघाचें प्रतिबिंब पाहुनि सुखें नाचों चि लागे, भुले,
मानी सर्व मनोरथद्रुम फळीं ओथंबले आपुले;
ऐसा भक्तमयूर चातक हि जो नेणें दुजीं भावुकें,
तो साक्षाद्घनदर्शनीं किति सुखी तें प्रेमळां ठावुकें. ५१

---

# अध्याय छपन्नावा.

जो सप्रेम उपासिला सुनियमें सत्राजितें, तो रवी
भेटे, सख्य करि, स्यमंतकमणी दे, वाढवी थोरवी;
आला द्वारवतीप्रति द्युमणिसा[2] रत्नप्रभामंडला-
संलक्ष्याकृति[3] पौर हें कळविति श्रीयादवाखंडला[4]. १
'तूं देवेश्वर गुप्त या यदुकुळीं, आलें फळा दैव तें;
वैकुंठ त्यजिलें, तुला हुडकिती जाणों सदा दैवतें;
भेटाया वळखोनियां तुज जगच्चक्षु स्वयें आज गा!
येतो, दृष्टिस रश्मिमंडळ[5] हरी, रक्षीं हरी! या जगा.' २
हांसे कृष्ण, म्हणे, 'न तो रवि, तुम्हीं होवूं नको भीत, या,
ऐका हो! कथितों यथार्थ चि तुम्हां कीं, जाणतों मीं तया;
जो सत्राजित सूर्यभक्त तुमचा इष्ट स्वगेहास तो
येतो, भास्करदत्तरत्नधर तत्तेजें तसा भासतो.' ३
तो सत्राजित येउनि स्वसदना, पूजूनियां ब्राह्मणां
प्रार्थी कीं, "मणिकारणें मज तुम्हीं 'स्वस्त्यस्तु' ऐसें म्हणा."
स्थापी देवगृहांतरीं च, मिरवी जैसी सुशोभा रवी,
स्वर्णाचे वसुसंख्य[6] नित्य हि मणि श्रीमंत तो भार[7] वी. ४

---

१. कल्याणें. २. सूर्यासारखा. ३. रत्नप्रभेच्या मंडलानें पाहण्यास अशक्य आकृति ज्याची असा. ४. श्रीयादवेंद्रास. ५. किरणसमूह. ६. अष्टसंख्य. ७. आठ हजार तोळ्यांचें माप.

आधि व्याधि भुजंग दुष्ट कपटी दुर्भिक्ष मारी असे
 कल्याणेतर[1] दुःखहेतु नसती, जेथें मणी तो असे;
सच्चिंतामणि[2] हि स्यमंतकमणी मागे नृपाकारणें,[3]
 कीं, वृष्णीश्वर उग्रसेन रविसा शोभेल तद्वारणें. ५
श्रीमत्कृष्णप्रसादापरिस बहु मनीं मानिलें स्वर्ण दीनें,
 त्या मूढें, थिल्लरींचें[4] जळ वर गणिलें बाहतां स्वर्णदीनें[6];
दुष्प्राप स्पर्शरत्न त्यजिल तरि न तो होय कां हीन सोनीं ?
 रक्षी, लक्षी कुबुद्धि स्वहित, करि असें लाभ कांहीं नसोनीं. ६
दे सोनें मात्र तें ही परिमित चि, दिला भास्करें एक गोटा,
 साधु 'प्रत्यूह जाला' म्हणति, तुज कसा वाटला लाभ मोटा ?
तत्त्यागें विश्वचिंतामणिमणि मिळतां मानिला फार तोटा,
 हा ! हा ! सत्राजिता ! तूं सकळबुधमतें या जनीं मूढ खोटा. ७
लोकत्रयीं हो शुभकीर्ति यांची, याकारणें श्रीपति रत्न याची;
 कांहीं च लोकांत उणें असेना, कृष्णप्रसादास्तव उग्रसेना. ८
पूज्य श्रीभगवत्पदीं न करितां सद्वस्तुचें अर्पण
 प्रारंभीं करि आपुलें चि जन जो तेणें मनस्तर्पण,
तें इष्टप्रद ही अनिष्ट फळ दे, कीं चूकलों[10] सूचितें,[11]
 ज्ञाते जाणति या कथेंत इतुकें सत्तत्व हें सूचित. ९
त्याचा सोदर जो प्रसेन मणिला बांधोनि कंठीं वना
 गेला, हो ! मृगजातिच्या शरकरें[12] शोषावया जीवनां[13];
एकाकी तुरगासमेत विपिनीं पंचाननें[14] मारिला,
 ने जों रत्न अशांत ऋक्षपतिनें[15] तो सिंह संहारिला. १०

१. कल्याणविरुद्ध. २. साधूंचा चिंतामणि. ३. उग्रसेनासाठीं. ४. डबक्यांतील. ५. उत्तम. ६. भागीरथीनें. ७. परीस. ८. विघ्न. ९. या स्यमंतकमण्याची. १०. [सत्राजित] चुकला. ११. योग्य कृत्य. १२. बाणरूप हस्तानें. ("कर" शब्द श्लिष्ट आहे. कर=हस्त किंवा किरण ). १३. प्राणातें [ पक्षीं ] उदकातें. १४. विस्तृत आहे आनन ज्याचें त्या सिंहानें. १५ अस्वलांचा राजा जांबवंत यानें.

तो घेऊनि मणि स्वकीयविवरीं नेऊनियां बाळका
  खेळाया दिधला, न दुर्लभ गमे त्या ऋक्षभूपाळका;
ज्याचे[1] श्रीपदरेणु केवळ जगच्चिंतामणी आंगणीं
  भाग्यें वेंचिति देव, तत्पर[2] सुधी या प्रस्तरा[3] कां गणी? ११
पावे संताप सत्राजित बहुत, म्हणे, 'हा मणिग्रीव[4] सेना-
  हीन स्वच्छंद गेला तरि जरि मृगयाशील रानीं वसेना;
आता कां हो! न आला? हय जवन[5], नसे काळ आतां, अरीनें
  प्रायः संहारिला तो वरमणिकरितां क्रूरकर्में हरीनें.' १२
हा त्याचा बोल जाला प्रसृत पुरजळीं केवळ स्नेहबिंदु,
  या अंका[6] पात्र ही तो[7] अमृतकर[8] परी यादवोदन्वदिंदु[9];
हा[10] तों आल्हादकारी शुचि[11], करुनि मळारोप या मूढ निंदू,
  आम्हां दासां चकोरां बहुमत, करिती सद्गुणस्तोत्र विंदु[12].' १३
ऐसें ऐकुनि तें निघे नरतनू लीलासुधासागर[13]
  क्षाळाया निजदुर्यश प्रभु सवें घेऊनियां नागर[14];
तो सन्मृग्यपद[15] प्रसेनपदवी शोधीत गेला वना,
  'आली आळ तुला हि' साधु म्हणती, 'देवा! जगत्पावना! १४
गेला जों त्याचिमागें हुडकित विपिनें तो असा, क्षिप्र सेना
  पौरांची वेडनीयां तव निराखि मृता विश्वसाक्षी प्रसेना;
जेणें हा साश्व केला व्यसु, मणि हारिला काढितां माग रानीं
  तों सिंह प्राप्तमृत्यु क्षितिधरकटकीं[16] देखिला नागरानीं. १५
जो सत्वें[17] समदें[17] वनांत नुरवी देऊनि हांके[18], सरी

---

१. श्रीरामाचे-**पंत.** २. त्या भगवंताचा भक्त. ३. दगडाला. ४. कंठीं मणि बांधून गेलेला प्रसेन. ५. वेगवान. ६. दूषणास, कलंकास. ७. तो कृष्ण. ८. अमृतमय किरण ज्याचे असा. ९. यादवसमुद्रांतील चंद्र (यदुकुलोत्पन्न हा भाव). १०. हा श्रीकृष्ण. ११. शुद्ध. १२. वक्ता-**पंत.** १३. क्रीडामृताचा समुद्र. १४ नगरवासी लोक. १५. साधूनीं शोधण्यास योग्य पद ज्याचें तो कृष्ण. १६. पर्वताच्या कड्यावर. १७. मस्तीला आलेले दांडगे पशु. १८. गर्जनेला.

ज्याची ये न दुज्यासि, तो हि वधिला कोणें पहा केसरी!
ऋक्षाचीं[1] दिसती पदें, न हारिसीं तो दक्ष भांडों, गळा
मीन ग्रास करूनियां हि जगला[2]? कीं विंगळा[3] डोंगळा? १६

त्या ऋक्षाचा तेथुनीं माग रानीं, कृष्णाज्ञेनें काढिला नागरानीं,
मार्गे स्वार्थस्थानदर्शी[4] मिळाला, भल्लूकाच्या[5] सर्व गेले बिळाला. १७

स्वयें दे 'येतों मीं त्वरित चि' असा धीर, जनता
बहिर्देशीं संस्थापुनि निजपदक्षीरजनता[6];
मनीं ध्यावा मात्र व्यपगततमीं जो कविवरीं[7],
शिरे तो ऋक्षाच्या भयकरनिरालोकविवरीं[8]. १८

गेला वृष्णिकुलप्रदीप विवरीं त्या दूर जों तो भलें
पावे सुंदर ऋक्षमंदिर, मणिस्वर्णादिकीं शोभलें;
बाळक्रीडनकीकृतस्वमणिच्या[9] ये वोळखोनि ग्रहा
धात्री आरडली भिवोनि सहसा, ये जांबवान्निग्रहा[10]. १९

गेला मात्र समीप हा, न मणिला त्या हात लावि ग्रहा,
तों स्वागारपराभवें[11] खवळला, तो पातला विग्रहा[12];
क्रोधांधेक्षण वोळखे चि न धण्या कीं, लाज लावि ग्रहा-
धीशा[13] जो द्युतिनें, विलोकुनि अशा ही निस्तुला विग्रहा[14]. २०

जन्म श्रीवामनाच्या प्रथम बहु युगें, हें असे आयु, धाला
नाहीं, रामायणीं ही दशमुखसमरीं हांसला आयुधाला;
तो हा मोटा प्रतापी रघुवरचरणोपासक प्राज्ञ ऋक्ष,
स्वस्वामीसीं नियुद्ध[15] प्रबळ करि रणीं वेचुनी ग्रावे[16] वृक्ष. २१

---

१. ऋक्ष. २. गळाचा ग्रास करून मीन जगला काय? ३. निखारा. ४. स्वार्थ जो मणि त्याच्या स्थानातें दाखविणारा (मार्ग). ५. अस्वलाच्या. ६. आपल्या चरणकमळीं नम्र झालेला. ७. गतभ्रम जे कविवर त्यानीं. ८. भयंकर आणि प्रकाशरहित अशा गुहेमध्यें. ९. बाळाचें खेळणें केलेला जो निजमणि त्याच्या ग्रहणाविषयीं. १०. शासनास. ११. आपल्या घरांत शिरल्यामुळें. १२. युद्धाला. १३. सूर्यातें. १४. शरीराला. १५. बाहुयुद्ध, कुस्ती. १६. दगड.

मण्यर्थी वीर अठ्ठाविस दिवस निशा ते अविश्रांत, बोटें
ज्याला पाहोनि वक्त्रीं धरिति सुरवधूवर्ग, अत्यंत मोटें,
श्येन क्रव्यार्थ[1] जैसे, झगडति विजयाकारणें मत्त मल्ल,
स्वर्वासिस्वांतगर्वापह[2] करिति भुजायुद्ध गोविंदभल्ल[3]. २२
पुराणदेवभक्तांसीं[4] न घडे संगर क्षण;
शुद्धसत्वप्रेमवर्म[5] तें करी अंगरक्षण. २३
म्हातारा, त्या नियुद्धीं अजितभुजबळें सेवटीं भागला, जे
वज्रें[6], ते बाहु जाले शिथिल म्हणुनियां तो महाभाग लाजे;
देहाचे संधिबंध[7] प्रबळ हि ढळले चक्रभृन्मुष्टिपातें[8],
पाडी ऐसा अपूर्व स्वपरिभव महाविस्मयीं ऋक्षपातें. २४
सततरामपदाब्जपरा[9] भव श्रम न दे, मग कोण पराभव?
करि[10] सुविस्मित त्या अनघा महा प्रथम दावुनि आनन घाम हा[10]. २५
' नियंता काळाचा पुरमदनहंता[11] परि भव
त्रिशूळी ही नेदी अजितनतसंतां[12] परिभव;
मनीं वाटे रामा! त्रिजगदभिरामा! नवल या
मला न्याया जाला समुचित कसा मानव लया? २६
ऐसें सौंदर्य अत्युत्तम, अतुळ बळ स्थैर्य गांभीर्य कांहीं
श्रीमद्रामेतराला, द्विजगुण अवरां[13] प्राप्त होणें चि नाहीं;
माझा स्वामी च साक्षाद्भजकसुरतरु श्रीश विश्वाभिराम,
स्वांगें आला कराया सफळ सुचिर जो हा नियुद्धाख्य काम. ' २७

---

१. मांसासाठीं. २. देवांच्या मनांतील [ युद्ध- ] गर्व घालविणारें. ३. कृष्ण आणि अस्वल. ४. प्राचीन जे देवभक्त त्यांसीं. ५. शुद्धसत्वरूप प्रेमकवच. ६. वज्रतुल्य. ७. सांधे. ८. कृष्णाच्या मुष्टिपातानें. ९. निरंतर रामचरणकमलरत अशाला. १०. अन्वयार्थः-प्रथम [ जो ] घाम [ आला ] हा [ आपलें ] आनन ( मुख ) दाखवून त्या अनघा ( निष्पाप जांबवंताला ) महा सुविस्मित करी. ११. त्रिपुर आणि मदन याना मारणारा. १२. कृष्णाला शरणागत अशा साधूना. १३. नीच जातीच्या मनुष्यास.

गृहीं भेटला सर्वलोकप्रभू, ती सुसंपत्ति, नोहे परापूर्वभूती[1],
विचारूनि ऐसें महाभाग्यवंत स्तवी हस्त जोडूनि तो जांबवंत. २८

'अहो! अतुळलक्षणीं अमृत वर्षसी ईक्षणीं,
भुज स्वजनरक्षणीं सुपटु हे असच्छीक्षणीं[2];
प्रचंड महिमा रणीं दशमुखाचिया मारणीं,
इनान्वयशिरोमणि[3], प्रकट आमुचा तूं धणी. २९

शिळेसि दिधली गती, जिस महामुनी मागती,
द्विषत्सहज[4] सन्नती[5] करि, तयासि अत्युन्नती,
करूनि न तपा यती वरिति सिद्धि दे पाय ती,
जयास खळ कांपती अजित! आमुचा तूं पती. ३०

महर्धिकुळभाजन[6] स्वपितृराज्यशोभा जन
त्यजूनि, सकृपा! वनव्रजन दाविलें पावन;
तपस्विपरिपालनप्रणतबालसंल्लालन-
प्रवीण सुखसाधन, प्रकट आमुचें तूं धन. ३१

भल्यांस करुनि च्छळ व्यसनिं पाडिती जे खळ,
क्षपाचर असृक्पॅळप्रिय[7] असंख्य पापाचिळ[8],
तया वनिं दवानळ स्वजनहृज्झषांचें[9] जळ,
त्रिविष्टपतपःफळ प्रकट आमुचें तूं बळ. ३२

अहो! नयन हो! न हो श्रम तुम्हांसि, हा ओळखा;
मुखास विधु, कांतिला जलद, भानु लाजे नखा;
तधीं जलधिबंधनोत्तर करि त्रिकूटीं मखा,
मिळे सहितलक्ष्मण प्रथम ऋष्यमूकीं सखा[10]. ३३

तुवां वधुनि वाळिला, सुगळ[11] दीन सांभाळिला,

---

१. पराभूति–**पंत**. २. दुष्टांचें शासन करण्याविषयीं. ३. सूर्यकुलतिलक. ४. शत्रूचा बंधु बिभीषण. ५. नमस्कार. ६. मोठ्या संपत्तीचें उत्तम पात्र. ७. रक्तमांसभक्षक. ८. पापपर्वत. ९. स्वभक्तांच्या हृदयरूप मत्स्यास जळ. १०. मित्र (सुग्रीव). ११. सुग्रीव.

नतांगद हि पाळिला, जन यशोमृतीं क्षाळिला;
द्विषत्पतग[1] जाळिला, तदनुजाधि[2] ही वाळिला,
प्रियाविरह टाळिला, भरतभक्त कुवाळिला.'　　३४
म्हणे वंदूनिया पाय, 'देवदेव! क्षमस्व कीं,
सापराधीं परीं नम्रीं जसा तोकीं[3] क्षम स्वकीं[4].'　　३५
हरि तनुविकळत्व[5] क्षिप्र तो देव देहा-
वरि कर फिरवूनीं, वृत्त सारें वदे हा;
मग मणिसह कन्या अर्पिली पादपद्मीं,
कवि सकळ निवेदी ये जयीं पात्र[6] सद्मीं[7].　　३६
बिळाच्या त्या द्वाराप्रति धरुनि बारा दिवस ते,
सवें जे जे आले जन सकळ जाले निवसते;
पुरेना श्रीकृष्णागमनधृततृष्णा[8] मुरडले[9],
'मुकुंदा! हा! हा! रे!' म्हणुनि बहु सारे हि रडले.　　३७
वार्ता जाणवितां चि साश्रुनयनीं शोकातुरीं नागरीं,
जाली सर्व पुरी निमग्न सहसा शोकाचिया सागरीं,
ऐसें ऐकुनियां म्हणे नृपति, "हा! तो तात, हा! माय हा,
स्त्री हा, जो न नभीं हि वृत्तजठरीं या काय हीं[10] माय हा?　　३८
हा! हा! सत्राजिता रे! हरिवरि च कसा घातला आळ? साचा
तूं पापी, संहरावें त्वरित तुज, नव्हे काळ हा आळसाचा;
दुष्टा! अंगार कीं तो यदुकुळभवनीं लाविला, भूललासी,
मूर्खा! दीपा पतंग स्वमनिं जन्हि म्हणे 'हें खरें फूल' लासी[11]."　३९

---

१. शत्रुरूप पतंग (रावण). २. त्याच्या बंधूची (बिभीषणाची) मनोव्यथा. ३. समर्थ पिता. ४. आपल्या. ५. शरीरशैथिल्य. ६. सत्पात्र. ७. घरीं. ८. कृष्णाच्या आगमनाची धरलेली इच्छा. ९. माघारे फिरले. १०. यो नभःकुक्षौ न माति स्म 'हा! हा! हा!' इति शोकशब्दोऽस्मिन् शार्दूलविक्रीडित-वृत्तोदरे कथं लब्धावकाशः स्यात्—**पंत.** जो हाहाःकार नभीं हि न माय तो ह्या शार्दूलविक्रीडितवृत्तांत काय मावेल? ११. भाजितें.

कृष्णप्राप्त्यर्थ सर्व प्रणति करुनि ते प्रार्थिती चंद्रभागे,[1]
'माते! त्वत्पाणि साक्षादमृतकर खरा वांटितों[2] चंद्र भागे;
हस्ताचा कोण वर्णी निरुपम महिमा? पाय हे काय रायें
स्वर्वृक्षांचें न [3]देती? रज चि बहु शिवे[4]! संहराया अपाय. ४०

ज्या लाभे या पदींचा शुभेनियतिबळें[5] सेवका एक रेणु,
त्यातें माथां वहाया सविनय सहसा जिष्णुर्चा[6] ये करेणुं;[7]
आदेश[8] स्वर्द्रुचिंतामणि सुरकंपिला[9] कां न त्याचा करीती?
कीं मोटा भाग्यलाभ स्वसुकृत फळलें तें नव्हे चाकरी ती. ४१

आम्हां वांचविलें तुवां चि, जननी! त्या दुष्टकंसारसा-[10]
शल्यापासुनि दाविला सकरुणे! लोकांत संसारसा;
वैदर्भी दुहिता चि, भूषउ इला त्वत्पाणि कांसारसा;
अन्यां दे परितुष्टि पुष्टि, न निजां दे पाणि कां सारसीं?[11]' ४२

एवं नानाप्रकारें प्रणतजनमनःकामदा जी भवानी,
सर्वांची[12] ही तिचे ते अमृतगुण दिवारात्रि ही जीभें[12] वानी;
जीच्या पायांचिपासीं निरवधि करुणाकन्यका नित्य रांगे,
'स्वप्नीं देखाल साक्षात् त्वरित हरि' असें त्यां समस्तांसि सांगे. ४३

तिच्या पायांपासीं बहुदिन उपासीं च सकळ,
प्रभूसाटीं हो! ते जन करित होते कळकळ;
जसें जातां वित्त क्षण कृपणचित्त स्थिर नसे,
पहाती ते निद्रामुखें[13] असुखेंविद्रावित[13] कसे? ४४

परंतु ईश्वरीनें चि ती निद्रा क्षण आणिली,
जीवच्छवचमू[14] आशीःसुधा वर्षोनि न्हाणिली. ४५

---

१. एका देवीचें नांव. २. अमृत देतां—पंत. ३. हे पाय स्वर्वृक्षांचे राय, काय न देती? ४. हे देवि! ५. सुदैवाच्या सामर्थ्यें. ६. इंद्राचा. ७. हत्ती (ऐरावत). ८. हुकूम. ९. कामधेनूला. १०. दुष्ट कंसरूप भूकंटकापासून. ११. कमळास. १२. सर्वांची जीभ. १३. शोकानें पिटाळून लाविलेलें निद्रेचें मुख. १४. जिवंत प्रेतांचें सैन्य.

चंद्रभागाप्रसादानें प्राप्त होतां चि जागर,
सस्त्रीरत्नमणिग्रीव प्रेक्षिला सुखसागर. ४६

आला कृष्ण कृपासुधाघन घनानंदप्रद प्रेक्षणें
स्वीयादर्शनजातदुःसहमहाताप क्षया ने क्षणें;
ते पौराप्त मयूरचातक सुखें अत्युत्सवें नाचती,
त्यांची भाग्यसमृद्धि हर्षविवशा यों[1] बोलवेना च ती. ४७

सभेंत सत्राजित आणवीला, वृत्तांत सारा मग जाणवीला;
दिला मणी जो न सदा रहाता, अन्यत्रें[2] येणार सदार हाता. ४८

आला श्रीकांतहस्ता मणि मिळउनियां निस्तुळा जांबवज्ञा,
हस्ता सत्राजिताच्या पुनरपि वरिता होय जोडूनि लज्जा;
कीं तत्वज्ञा उदारा सद्भिमतगुणा अर्थ दे लाभ, हानी
तद्भिन्ना,[3] हें यथार्थ स्वहित कळाविलें सन्मतीच्या गृहानीं.[4] ४९

ऐसे नाना अनर्थव्रज पडति गळां आग्रहें यन्निमित्त,
व्यामोहाचें[5] निदान स्थिर हि न धरितां पोटिसीं होय वित्त;
सत्पात्रीं त्याग याचा अगुण नुरवि हें नैकती[6] मूढचित्त,
व्यर्थ क्लेशी च होती म्हणुनि उसळतें सज्जनांचें हि पित्त.[7] ५०

यांचा भंग प्रभूचा, कृपणपण दुजें, तीसरी बंधुहानी,
शोकाप्ति[8] श्रेष्ठनिंदा घडलि, न उरला मान थोरीं लहानीं;
माथां लज्जा शिळा चि, प्रकट चि पडला भूपतीसीं च दावा,
ज्याचा तो मात्र जाणे जन, सकळ कसा ताप आम्हीं वदावा? ५१

निवाराया पापा हृतविनततापा[9] यदुहिता!
समर्पी पद्मापा[10] मग धुवुनियां पाय दुहिता;
जन्हि केला यत्न, प्रभुवर न रत्नग्रह करी,

१. कवीस—**पंत**. २. कालांतरीं. ३. अनुदार आणि अतत्त्वज्ञ अज्ञाला. ४. व्यासशुकसूतानीं—**पंत**. ५. अज्ञानाचें आदिकारण. ६. ऐकत नाहीं. ७. सत्पात्रीं धन अनर्पणें दुःख देतें, असें कथितां हीं न मानितात म्हणोनि भले ही कोपतात—**पंत**. ८. शोकलाभ. ९. शरणागताचा ताप दूर करणाऱ्या हे श्रीकृष्णा! १०. कमलापतीला.

वरी प्रेमें कन्या हृदयिं न तदन्याय हि धरी. ५२

ऐसें सत्राजिताला स्मितवदन म्हणे तो प्रभूत्तंस, 'मामा!
आम्हां कन्या दिल्ही, हे उचित उदधिनें जेंवि सर्वोत्तमा मा;
या रत्नें चि प्रमोद प्रचुर, जतन हें आमुचें रत्न ठेवा,
सेवाया योग्य आम्हीं फळ चि, न भजलों धारणा सूर्यदेवा.'[1] ५३

वैदर्भी प्रथमा, रमा भगवती भार्या दुजी सन्मती,
देवी जांबवती तसी च तिसरी श्रीसत्यभामा सती;
कृष्णें भक्तमयूरजीवनदयांभोदें[2] तिघी कामिनी
केल्या, शोभति त्यासि सेउनि[3] जशा मेघासि सौदामिनी[4]. ५४

---

## अध्याय सत्तावन्नावा.

कुंतीसीं पांडव स्वप्रियकृतविवरांतूनि[5] ठावे पळाले;
वार्ता कानासि आली असि जनवदनें कीं, 'अकस्माज्जळाले';
गेले श्रीरामकृष्ण त्वरित गजपुरा, भेटले आंबिकेया[6],
भीष्मा द्रोणा कृपा हि श्रितवरविदुरा, जो स्वचित्ता विके या. १

जैसा अंध कुबुद्धि पुत्रवशग स्वांतीं निवाला, पृथा
माद्री पांडुसुतांसि आठवि, रडे, झांकूनि डोळे वृथा;
तत्वज्ञ प्रभु ही तसे च रडती, आच्छादुनि श्रीमुखें[7].
क्षत्ता[8] भीष्म हि हे खरें हि रडती, कीं मूढ[9] भावी सुखें. २

प्रभू गेल्या मागें सुमति कृतवर्मा, पारि बळी
विधी[10] त्या अक्रूरास हि भुलवि, कीं सूचवि कळी[11];

---

१. सूर्योपासकें त्वां चि धरावा—**पंत**. २. भक्तमयूराला जीवन (पाणी) [देणाऱ्या] दयामेघ कृष्णानें. ३. मूळ पाठ—**शोभविती तयास हि**. ४. विद्युल्लता. ५. आपला हितकर्ता (विदुर) यानें केलेल्या बिळांतून. ६. अंबिकापुत्र धृतराष्ट्रास. ७. शोभासंपन्न मुखें. ८. विदुर. ९. धृतराष्ट्र—**पंत**. १०. बलवत्तर दैव. ११. कलह.

कुमंत्रीं क्षीणायू शतधनु मिळे त्यांस तिसरा,
सुबुद्धीच्या झाले[2] स्वनियतिबळें पात्र विसरा. ३

दोघे[1] ही बोधिती त्या शतधनुसि, 'अहो! शूर तूं धीर मानी,
ज्ञानी ही नै[3] स्वनाशीं घणमणति, न त्यां साहवे मानहानी;
मानी आम्हांसि सत्राजित उचित वर स्वात्मकन्याप्रदानीं,
सानी हे काय लज्जा? न[4] पुसत[5] हारिला प्रार्थुनीं दे निदानीं. ४

आम्हां द्यायासि केली असत चि, दिधली ते चि गोपूर्वविंदा[6],
दोषांध्यारोप[7] शब्दें न करुनि हि खळें फार केली च निंदा.
आहे तें कां न घेसी? प्रभुस हि न दिलें, मागतां हि स्वरत्न,
आता याचा प्रसेन प्रियमणि, तरि तूं दाखवीं सिंहयत्न.' ५

तयांचे मनें मानिले शब्द वेद, क्षणामाजि केला तिहीं बुद्धिभेद;
गळा सुससत्राजिताचा सुपापी, स्वहस्तें चि रात्रौ शतेष्वास[8] कापी. ६

गतायूस ते वाटले शब्द वेद, क्षणामाजि केला तिहीं बुद्धिभेद;
सहस्राकरांचा[10] सखा ज्या तथापी, तयाचा गळा शत्रु साना हि कापी. ७[9]

तेजस्वी विश्वचक्षु[11] द्रुतगति[12] निमिषार्धांत ही नित्य चाले
गावें बेवीसशें[13] जो युगुळ[14] हि, परि ते अश्व न श्रांत जाले;
नामें कर्मे हि मित्र[15], स्वकर[16] दशशतें ख्यात ज्याचे प्रतापी,
ऐश्याच्या ही सख्याचा, रिपु, विधि फिरतां, कंठ तत्काळ कापी. ८

प्रार्थिती विलपती बहुशः स्त्री; न द्रवे अदय हा बहु शस्त्री;

---

१. तिघे ही—**पंत.** २. तिघे हि दुर्दैवामुळे सुबुद्धीच्या विस्मरणास पात्र झाले. ३. न धाबरती. ४. [आम्हांस] न विचारितां. ५. असतां. ६. गोविंदा—**पंत.** ७. दोषारोप. ८. शतधनु. ९. हा श्लोक मागील श्लोकाचें पाठान्तर म्हणून कवीनें रचिलेला असावा. १०. सूर्याचा. ११. जगच्चक्षु सूर्य. १२. शीघ्रगामी. १३. योजनानां सहस्रे द्वे द्वे शते द्वे च योजने । एकेन निमिषार्धेन क्रममाण नमोस्तु-त इत्युक्तेः—**पंत.** १४. जोडी. १५. सूर्य (सूर्याचें नांव हि 'मित्र' व त्याची कृति हि मित्र या नांवास साजेसी हितकर). १६. आपले एक हजार किरण.

अर्थलुब्ध वध दस्यु[1] करिती, तेंवि दावि पशु[2]सौनिकरीती. ९
घेऊनि गेला मणिला स्वधामा[3], शोकासि पावे बहु सत्यभामा,
तो ठेविला देह परासु[4] तैलद्रोणींत[5], चित्तांत हि दुःखशैल[6]. १०
शोकार्ता सत्यभामा त्वरित गजपुरा जाय, कीं तेथ कर्ता
धर्ता लोकत्रयाचा, बळसहित वसे दुर्जनप्राणहर्ता,
भर्ता श्रीकृष्ण, त्यातें कथि निजवदनें वृत्त हें साश्रु; तीचें
रक्षाया चित्त 'हा! हा!' म्हणुनि गहिंवरे, तें रहस्य[7] श्रुतीचें. ११
जाणों ते प्रभु सिंह, केवळ गुहा त्यांची पुरी[8] मोकळी,
तेथें निर्भय हीनसत्त्व[9]निकरीं झाला असा तो कळी[10];
आले ते यदुकेसरी, शतधनु त्रासासि पावे करी[11],
जेव्हां स्पष्ट हरी खरी निजमुखें घातप्रतिज्ञा करी. १२
हत्या अत्यादरानें करि, अरि गणुनीं, दुष्ट सत्राजिताची,
लोभी तो भी स्वचित्तीं शतधनु अधम, प्रेक्षुनीं हानि साची;
प्राणत्राणप्रयत्न स्वमतिस न सुचे साधुनी कार्यु[12] जाला,
हाके हा केसरीच्या परिसुनि हरिण भ्रांतवर्त्मा[13] बुजाला. १३
हार्दिक्यासि[14] म्हणे, 'सहाय मज हो'; तो हात कानावरी
ठेवी, जो अनळीं[15] स्वयें चि ढकली तो हात कां नावरी?
बोले, 'ईश्वर रामकृष्ण, न घडे यांचें मला हेलन[16];
स्वामीचा अपराध जो जन करी, तो क्षेम लाहेल न. १४
ज्याया भारापनोदें[17] प्रभु अवतरले हे प्रमोद क्षमेला[18],
यांच्या द्वेषें चि बंधुस्वजनसह जऱ्ही कंस तो दक्ष मेला;
केला त्या मागधाचा[19] परिभव सतरा वेळ, पायीं पळाला,

१. चोर. २. पशूला [मारणाऱ्या] कसाबाची रीति. ३. आपल्या घरीं. ४. मृत. ५. तेलाच्या कढईत. ६. दुःखपर्वत. ७. वेदाचें रहस्य—वेदगम्य—कृष्ण. ८. द्वारका. ९. दुर्बलप्राणिसमूहांत. १०. कलह. ११. हत्ती. १२. इष्टकार्य—निर्णय०. १३. मार्ग चुकलेला. १४. कृतवर्म्याला. १५. अग्नीमध्यें. १६. तिरस्कार, अनादर. १७. ओझें उतरून. १८. पृथ्वीला. १९. जरासंधाचा.

ज्याचें तेवीस अक्षौहिणि बळ, विजयप्राप्ति कैंची खळाला? १५

अक्रूराच्या गृहाला सभय शतधनू ये, सहायत्व[1] यांची,
हा साधु स्वादु[2] बोले मग, परिसुनियां सर्व विज्ञप्ति याची.
'बापा! सर्वेश कीं हे; बळ विदित असे ज्यास यांचें, न तो या
चित्तीं आणी विरोधा, पळ हि न जगति द्वेषितां मीन तोया. १६

जो हें लीलेकरूनि त्रिभुवन रचितो, रक्षितो, नाशितो ही,
चेष्टा ब्रह्मादि ज्याची नुमजति कवि, कीं त्यांसि माया विमोही;
बाळ च्छत्राक[3] जैसें धरि, गिरि धरिला, कांपतां वात वर्षें,
गोगोपीगोप रक्षी, करि हरि जइं हें तैं वया सात वर्षें. १७

ऐसा जो जगदादिभूत भगवान् कूटस्थ[4] आत्मा, कृती
ज्याची अद्भुत हे, अनंत, परि हा लीलामनुष्याकृती;
जाला साधु असाधु जे असति कीं ते तारणें मारणें,
माझें वंदन सर्वकाळ हि असो त्या कृष्णजीकारणें.' १८

कृष्णें केली प्रतिज्ञा म्हणउनि उरली मृत्युची वेळ थोडी,
साधू[5] रक्षील ऐसें शतधनु समजे, स्वावना[6] हात जोडी;
तों तो वर्णू चि लागे हरिचरित मुखें त्यांत तैसी च गोडी
हा पापी एकदां चि स्वजनभरवसा, रत्न, निश्वास, सोडी[7]. १९

जेव्हां त्यातें म्हणे तो शतधनु, 'करुणा रत्न हें ही असों द्या.'
बोले अक्रूर ही हा मृदु, 'बहुत बरें, आप्त आम्हीं असों, द्यां[8];
जातां, जावें, करावें स्वहित, यदुवरा! माधवा! कंसकाळा!
कैसें आतां तपस्वी करिल शतधनू, काय आलें कपाळा!' २०

---

१. मागे. २. मधुर. ३. पावसाळ्यांत उगवणारी लहान छत्रीसारखी एक वनस्पति. ४. निर्विकार. ५. अक्रूर. ६. स्वतःच्या रक्षणाविषयीं. ७. स्वकीयांचा विश्वास, रत्न, (रत्नाची आशा) [व] सुसकारा [अशीं तीन] एकदम शतधनूनें सोडलीं. ८. [आपली] दया [हि नको], हें रत्न हि असों द्या (आमच्याकडे ठेऊन घ्या). ९. मणि द्या; नाहीं कसें म्हणावें?—पंत.

समुपगत[1] ही अन्न त्यागी, न तो करि भोजन,
प्रणतशिव[2] जें माथां घे तें हि पादसरोज न.
सजुनि बसला त्या अश्वीं जो पळे शतयोजन,
त्रिभुवनगता वंची, मांडी पलायन तो जन. २१

पापी मुक्तिपुरीस सोडुनि पळे, लंघी तसा क्षिप्र भू,
मागें धांवति पापनाशक रथीं बैसोनि साक्षी प्रभू;
धाकानें शतयोजनें पळविला लावीचना चाल या[3],
गेला श्रीमिथिळासमीप हय तो त्या दुर्जनाचा लया. २२

गेल्या ही शतयोजनें अभयदस्थानस्थिती नाढळे,
एक स्वव्यसनीं सहाय हय जो होता, सखा तो गळे;
*पायांनीं च तथापि नीच चरणत्राणें[4] हि टाकी, पळे,
जेथें लाभ विनाश जंतुस पडे, जाणें न तें हो! टळे. २३

होय जेंवि शतचाप[5] पदाती[6], तेंवि सर्वसुखमूर्ति तदा ती,
गांठिला मृग चि तो मृगशक्रें[7] तोडिलें शिर सुदारुणचक्रें. २४

ठावें सर्व, तरी निजाग्रजनिला[8] वंचावयाला हरी
वस्त्रीं शोध करी तदीय मणिचा, कीं तो करी, हा हरी;
ऐसा भाव धरी करु प्रबळ हा न क्रोध दासावरी[9],
गेली गोष्टि खरी परंतु सदयस्वामी स्वयें सांवरी. २५

रथाजवळि ये, म्हणे हरि बळा[10] बळांभोधिला,
'वृथा शतधनुक्षय, स्वमणि तो नसे शोधिला.'
स्ववंचन न कां कळे सकळयोगिवंद्यास तें?
भजत्प्रियकृदीश्वरानुमत[11] सोसि, हें भासतें. २६

---

१. पुढें आलेलें. २. प्रणतानां कल्याणरूपं गुरुपदं न वित्रस्तेन वंदितम्—**पंत.** शरणागतास कल्याणप्रद अशा गुरुचरणांस [हि] भीतीमुळें त्यानें नमस्कार केला नाहीं. ३. वाजीला—**पंत.** ४. पायतण, जोडे. ५. शतधनु. ६. पादचारी. ७. सिंहानें. ८. आपला वडिल बंधु बळराम त्याला. ९. अक्रूरावरि—**पंत.** १०. रामास. ११. भक्तांचें प्रिय करणाऱ्या ईश्वराचें इष्ट. * पायांनीं.

स्वभक्त जरि ही चुके, तदघ[1] मेरुसीं ही तुके,[2]
तऱ्ही सदय ठाउके, गुण न सिंधु घर्मीं[3] सुके;
जऱ्ही न उतरे ढुके,[4] इतर भक्त भद्रा मुके,
म्हणोनि हरिपादुके स्तवित साधु जाले मुके. २७

मनांत समजे बळ स्वजनपक्षपातक्षमा[5]
रमापतिस 'जा' म्हणे 'निजपुरीस, वृष्ण्युत्तमा!
प्रमाणं[6] वदतोसी, दे शतधनू मणी यत्करीं
करीं त्वरित शोध तूं, न धरिं दंड त्या ही नरीं.' २८

भक्तीं जाणुनि पक्षपात हरिचा आनंद वाटे बळा,
कीं हा जेंवि तसा न माय पुरवी कुक्ष्युद्भवाचा[7] ळळा;
त्या प्रेमें निजशुद्धभक्त जनक श्रीराम तो आठवी,
'मीं जातों मिथिलेंत,' 'जा' हरि असें सांगोनियां पाठवी. २९

आलें कैवल्य[8] गेहा, निरवधि हृदयीं हर्ष जाला विदेहा,
रंकाची स्वःपदेहा[9] पुरलि, गुरुपदीं पुष्पसें ठेवि देहा;
होता त्या सन्निवासीं बहु दिवस जसा भृंग पद्मीं सुवासीं,
द्रव्येशासीं[10] शिवासीं सहवसति जसी, कीं सतीसीं धवासीं. ३०

विदेहांचा[11] राजा जनक सुकृती होय विगद,[12]
प्रभूच्या शिष्यत्वें कुरुकुळपती होय सगद;[13]
जसा ज्याचा काम स्वरगम[14] तसा त्यास फळतो,
कृपा त्या दोघां ही वरि करि कृपासिंधु बळ तो. ३१

येवूनि द्वारकेला यदुरमण म्हणे, 'सत्यभामे! प्रयत्न
स्वांगें केला हि, मेला शतधनु हि, परि प्राप्त जालें न रत्न.

---

१. त्याचें पाप. २. तुलना पावे. ३. [क्रोधरूप] उन्हाळ्यांत. ४. ईश्वरकृत संकेतास, कसास किंवा वागण्याच्या तऱ्हेस. ५. अक्रूराचा पक्षपात व [त्यावरील] क्षमा. ६. [तुझें बोलणें] प्रमाण. ७. पोटच्या मुलाचा. ८. मोक्ष. ९. स्वर्गपदाची इच्छा. १०. कुबेराशीं. ११. विदेहदेशाचा. १२. भवरोगरहित—**पंत**. १३. गदायुद्धनिपुण. १४. कल्पवृक्ष.

आलों मीं मात्र मागें, सुदति! विदित हें तूज व्हाया, न आर्यें[1]
त्वत्संकोचें चि आला, करिल चि उरलें तो प्रभु क्षिप्र[2] कार्य.' ३२
वंचूनि[3] ही न चित्तातें दुखवी, सुखवी प्रिया,
सत्राजिताची भगवान् बरवी करवि क्रिया. ३३
शतधनुवधवार्ता ऐकतां तो पळाला
कुमतिद[4] कृतवर्मा, धैर्य कैंचें खळाला?
प्रियहरिगुणरत्न क्षिप्र देवापगेला[5]
त्यजुनि सकळ सत्वश्रद्ध[6] अक्रूर गेला. ३४
दैवें[7] भागवताला त्या भेटली अमृतप्रर्पा[8]
ब्रह्मयाची ही पुरी[9] होय जीस पाहोनि संत्रपा[10]. ३५
ज्याचा आकल्प[11] आशीविष[12], भजक हरिब्रह्मशक्राग्निपाशी[13],
निर्मी पाळी हि नाशी सहज भुवन जो सच्चिदानंदराशी,
काळव्याळा[14] हि शासी, फुकट चि अणिमाद्या[15] जयाच्या स्वदासी,
ऐसा जेथें मिरासी[16], निरखि असि महापुण्य अक्रूर काशी. ३६
जेथें मोक्ष पिके समर्घ[17] चि सदा, सर्वत्र अल्पें विके,
काकांचे हि [18]निके विलास म्हणति ज्ञाते, सुरांचे [19]फिके,
शक्राला घटिकेमध्यें चि भय दे जो रंक तेथें टिके,
तीर्थक्षेत्र शिके जिचा गुण बरा, त्या पावला काशिके. ३७
साध्वी[20] ईश स्वचित्तीं समजति, नमिती, पूजिती जो वरीती[20],
मातेचा[21] तात सिंधु प्रथित चि जलधी जी वरी नोवरी ती;

---

१. ज्येष्ठ बंधु बळराम. २. लवकर. ३. फसऊन सुद्धां. ४. दुष्ट मसलत देणारा. ५. भागीरथीला. ६. सात्विक श्रद्धा ज्याची. ७. भार्ग्यें–**पंत.** ८. मोक्षाची पोंवई. ९. सत्यलोक. १०. सलज्ज. ११. भूषण. १२. सर्प (शेष). १३. पाशधारी वरुण. १४. दुष्ट गज किंवा सर्प. १५. अणिमादि सिद्धि. १६. वतनदार. १७. विपुल. १८. उत्तम. १९. उणें. २०. पतिव्रता ज्याला वरितात त्यास ईश्वर समजतात, त्याची पूजा करितात, नमस्कारितात. २१. गंगाया माता लक्ष्मीः–**पंत.** गंगेची आई लक्ष्मी तिचा बाप समुद्र त्यानें गंगेला म्ह० आपल्या नातीला वरिली.

शुद्धा कैसी? परंतु त्रिजगदघ हरी चित्र हें, पुण्यसंगा
जीच्या[1] सोडी च ना श्रीपतिपददुहिता[2] शंभुकांता हि गंगा. ३८
आराधी आशुतोषा[3] जगदघशमना भूतपा[4] दानयज्ञ-
स्वाध्यायाहीं,[5] विधिज्ञ प्रणति करि सदा तज्ञपादा[6] नयज्ञ,
तत्कीर्तीनें प्रियाळी[7] म्हणउनि कथिलें वृत्त हें द्वारकेला,
स्त्री कैसें गुह्य रक्षी? प्रकट मग तिणें मंत्र तो फार केला. ३९
नामें 'दानपती' जयास म्हणती अक्रूर तो, सद्गती-
क्षेत्रीं[8] जो वसती करी शुभमती, कीं यज्ञयज्ञीं[9] प्रती,
स्वर्णाच्या चि अतिप्रशस्त सुकृती वेदी रची हें यती
ज्ञाते सप्रकृती[10] असें चि वदती त्या[11] रत्न दे श्रीपती. ४०
हें ऐके सत्यभामा, निजहृदयिं म्हणे, 'वंचका! सत्यनामा,[12]
कृष्णा! तूं धन्य, रामा गुरुसि ठकविसी, तेथ[13] हे काय भामा?
वामा![14] प्रेमा, रिकामा, वरिवरि च करूं जाणसी संधिसामा,
रे धूर्तांच्या ललामा! तुज अधिक असा क्रूर काका न मामा.' ४१
बोले राम, "कृतांत प्रचुर उधळितो सर्वदा हेम; नाहीं
अक्रूरें वित्त नेलें, न पुसत पळतां मानिलें हें मनांहीं;
लोकांला कोण वारी, विधिगति न कळे, ताप दे वाद, हानी
भामाप्रेमा न हो, कीं मणिद चि गणिलें वासुदेवा दहानीं. ४२
संसारांत असे, असें तरि दिसे अक्रूर काका नसे,
अर्थें हानि कळे, पळे, उबगले[15] ते साधु लोभी कसे?
मीं येथें नव्हतों, 'हरि प्रियतमाहृत्सांत्वनव्यग्र,' जें
लोकांचें म्हणणें मृषा परि उगें स्यां सोसिजे अग्रजें." ४३

---

१. ज्या काशीच्या. २. विष्णुपादोद्भवा. ३. शिवाला. ४. जीवपालका. ५. दान, यज्ञ आणि वेदाध्ययन यांहीं [आराधी]. ६. गुरुपादा—निर्णय०. ७. प्रियसखी. ८. उत्तम गति [देणाऱ्या काशी-] क्षेत्रीं. ९. प्रत्येक यज्ञांत—निर्णय०. १०. प्रजांसहित—**पंत.** ११. त्या अक्रूराला. १२. [कृष्ण हें] खरें नांव ज्याचें असा. १३. [मी] स्त्री. १४. अरे वक्रा!—**पंत.** १५. कंटाळले.

कोणी 'अक्रूर लोभी' म्हणति न कळतां तत्व अत्यंत खोल,
ज्ञात्यांला ईश्वराचें चरित सुखवि हें ऐकतां येति डोल;
प्रेमानें सत्यभामाप्रियकर बळ हि स्वानुजा लावि बोल,
स्पष्ट ज्ञानी मणिचें करिति च हरिच्या सद्यशाचें न मोल. ४४

अंतर्यामी[1] म्हणे, "हें कुतुक करुं बरें, साधुची[2] ज्यांत थोरी,
चोरी भक्तास माझ्या तारि सुरधुनि[3] सत्कीर्तिहूनीं हि गोरी,
मातें प्रार्थूत हे कीं, 'कुशळगुण भला पूज्य तो[4] आणवा, हूं!'
तेव्हां आम्हीं म्हणों स्वप्रिय न पळविला कां असी आण वाहूं? ४५

स्वर्मी ही स्वाश्रितातें निजमुख न कदा ज्यांतुनीं एक दावी,
इच्छा त्यां त्यां अरिष्टांप्रति कुतुकसुधासिंधुची[5] एकदा वी;
आनर्तांत प्रज्यांच्या बहुविध वसती ताप चित्तीं शरीरीं,
सद्वृक्षांच्या वसंतें नवल चि रचिलें या चि राष्ट्रीं करीरीं[6]. ४६

जे ज्ञाते वृद्ध ते ते प्रभुसि म्हणति कीं, 'राष्ट्र हें त्या वरिष्ठें
अक्रूरें टाकिलेंसे म्हणुनि बहुविधें येथ आलीं अरिष्टें;
ज्या ज्या देशासि सोडी दिनकर वरिती त्या तमोघूकरक्षो-
भूतव्रात[7] प्रसिद्ध त्वरित हरि तया आणि हा लोक रक्षो. ४७

अक्रूरा हीं अरिष्टें सकळ चळचळां कांपती, जेंवि साप
स्वापद्धेतु[8] द्विजेंद्रा, हरिस गज, गुरूपासकास त्रिताप;
बा पद्माक्षा! बळाला हरि![9] तुज हि गळद्धैर्यघर्मांबुचाप-[10]
क्ष्मापच्छद्मासुरांचें अमित कटक, कीं रामनामास पाप. ४८

---

१. मनांत. २. साधु अक्रूराची. ३. गंगा. ४. अक्रूर. ५. कौतुकामृतसागर जो कृष्ण त्याची. ६. हें राष्ट्र हा च करीरवृक्ष, त्याचे ठायीं नवल चि रचिलें. (वसंतऋतु सर्व वृक्षांस पल्लव देतो; पण करीरास कांहीं च देत नाहीं. तद्वत् या राष्ट्रास मात्र अरिष्टें प्राप्त झालीं)–निर्णय०. ७. अंधकार, दिवाभीत, राक्षस व पिशाच यांचा समूह. ८. आपल्या विपत्तीला कारण. ९. हे कमलनयना हरि! १०. गळालें आहे धैर्य, घर्मांबु आणि चाप ज्यांचें असे कपटानें राजे झालेले दैत्य त्यांचें कटक. (येथें अनुप्रासासाठीं 'क्ष्माप' पद मागें घेतलें आहे असें दिसतें).

वर्षेना काशिदेशीं घन बहुदिन ते, दे अनावृष्टिजन्या
  पीडा, याहूनि ताप प्रबळ जवळिल्या दुःख देशा न अन्या;
दे काशीश श्वफल्का विनउनि जधिं तो गांदिनीनाम कन्या,
  वर्षे तेव्हां चि तेथें सुरपति, असि हे या जगीं कीर्ति धन्या. ४९
देता जाला रोमपाद स्वशांता पुत्री जैसी ऋष्यशृंगा प्रशांता;
  काशीश श्रीगांदिनीनाम कन्या, तैसी तैशा दे श्वफल्का हि धन्या. ५०
हा अक्रूर श्वफल्का समुचितसुहृदानंद संतान[1], दीपा-
  पासूनी दीप, किंवा अमृतकर[2] जगत्तापहंता नदीपा[3].
हा! गेली दूर दृष्टि त्यजुनि तुज विभो! हे चुकी फार मोटी,
  जैसा तूं शौरिपुत्र प्रथितगुण, वृथा काय दृष्टांत कोटी?' ५१
ऐसें ऐकुनि आप्तभाषित तदा तें सर्व शोकागद[4]
  स्वामी भक्तसहाय कृष्ण भगवान् वैकुंठ तो कागद[5]
प्रेषी आणवि जाणवि स्वभजका आलिंगितां राहणें,
  दूर क्लेश चि साहणें, निरखणें, मोदामृतीं नाहणें. ५२
    कवळी बाहुयुग्मानें सन्मानें, मोद देव दे,
    जवळी च सभेमध्यें बैसवूनि असें वदे. ५३
"काका[6]! राकापती[2] तूं तृषितनिजसुहृद्वृंदचक्षुश्चकोरां[7],
  बापा! तापापहंता[8] घन अनघगुणा[9]! हर्ष या देसि मोरां;
काशी राशी सुखाची खरि न विसरतां अन्यथा[10] पोष्यवर्गा,
  साची प्राचीन मैत्री म्हणउनि च तुम्हां सोडवेना चि भर्गा. ५४
साधो! जेथें वसाल स्वसुकृतसचिव[11]क्लृप्तसाहित्य सर्व,
  प्रह्व[12] द्रव्येश[13]मुख्य त्रिदशपति[14] जया तो स्मशानीं न शर्व;
आम्हांला मात्र युष्मद्विरह तपन हा तापद, स्वैर वांचो[15],

---

१. पुत्र. २. चंद्र. ३. समुद्राला. ४. शोकरूप रोगाचें औषध. ५. पत्र. ६. अक्रूरा! ७. तृषाकुळ अशा स्वकीय मित्रांच्या नेत्रद्वयचकोरांस. ८. तापनिवारका! ९. सत्वगुणशालि! १०. नाहीं पेक्षां. ११. स्वतःचें पुण्य हें च सचिव. १२. नम्र. १३. कुबेर. १४. इंद्र. १५. खुशाल नांदा.

'जातों येतों' म्हणे ही विधु तरि न तगे धीर त्या कैरवांची[1]. ५५
सत्क्षेत्रीं पूजिला तो स्वसुकृतकुसुमीं श्रीमहेश, क्रतूतें,
ऐकों केलें असें कीं, सदिगधिप[2] जया आठवी शक्र तूतें,
हेमाचें सर्व काहीं बहु जन म्हणती वेदिकापात्रयूप-
स्तंभ[3], स्वर्णासि नाहीं मिति, अति कुतुकें वर्णिती हें चि भूप. ५६
क्षेत्रीं पात्रीं विधीनें करिति तुज असे सुज्ञ वित्तव्ययातें,
ज्ञाते जे ते चि एवंविधगुण म्हणती सर्वथा भव्य यातें;
या कर्मीं[4] जो सहाय प्रियसख मणि[5] तो भेटवा ज्यासि पात्र,
स्वच्छाचारा! यदूंत प्रथित समगुण स्पष्ट तूं एक मात्र. ५७
जाणों पूर्वीं च आम्हीं मणि शतधनुनें ठेविला तूजपासीं,
आहे हस्तीं च कीं तूं न इतर जरि ही तात होतां प्रवासीं;
मामाला[6] पुत्र नाहीं म्हणउनि धन तें होय दौहित्रदाय[7],
प्रेक्षूं तूं मात्र पात्र, प्रकट धरिल त्या दुर्धरा अन्य काय? ५८
आम्हीं रामादि बंधु स्वजन मणिस त्या पाहुनि त्यक्तभेद
प्रेमें नांदों, सुवस्तु स्वसमुचित पदीं अर्पितां दे न खेद;"
ऐसें ऐकोनि होतें जवळि च सुपटीं[8] वेष्टिलें रत्न सोडी,
अक्रूर प्राप्तचिंतामणिहरिपद[9], त्या काय हे फार जोडी[10]? ५९
आम्हां दासांसि पाहो म्हणुनि जपतपोयज्ञ इत्यादि यत्नीं
ब्रह्मादि, श्री असी ते पदभजन करी नित्य होऊनि पत्नी;
हें कोठें? काय त्याला सहज मिळविला मोक्ष ज्याच्या सपत्नीं?
प्रेमें ठेवी वदान्य प्रभुवर हरि तो रत्न तें भक्तरत्नीं. ६०
दयामृतघन श्रीमान् कृष्ण लक्ष्मीपती हरी
करी भक्तमयूरांतें सुखी, हृत्ताप संहरी. ६१

---

१. चंद्रविकासी कमलांचा. २. दिक्पालांसह इंद्र. ३. यज्ञस्तंभ. ४. व्ययकर्मीं. ५. सहाय देणारा प्रिय मित्र (मणि). [ कारण, तो रोज सुवर्ण प्रसवणारा असे ]. ६. सत्राजिताला. ७. नातवाच्या वाट्याचें. ८. उत्तम वस्त्रांत. ९. चिंतामणिरूप हरिपद मिळालें आहे असा. १०. लाभ.

# अध्याय अठ्ठावन्नावा.

इंद्रप्रस्थासि गेला अमृतघन हरी एकदा, यासमोर
प्रेमें आले पृथेचे सुत सकळ हि ते, हर्षले दास मोर;
आलिंगी अर्जुनातें, यम[1] नमिति पदें, धर्मभीमांसि वंदी,
शिष्टाचारप्रवीण प्रभु म्हणुनि यशें वर्णिती वेद बंदी. १
गृहासि आला भेटाया चंद्र हा, ते चकोर कीं,
वसंत हा, ते माकंद[2], स्पष्ट रोमांचकोरकीं[3]. २
कृष्णा[4] कृष्णास वंदी प्रथम सुसमयीं धावुनीं, दीन वोढा
भेटे निःशंक गंगेप्रति हि, तसि च त्या माउलीला नवोढा[5];
पूजी आधीं दृगब्जीं चरण मग शिरःपाणिपद्मीं वधू ती,
साधूंची अश्रुनीरें तदनु[6] धव[7] तिचे पादराजीव[8] धूती. ३
म्हणे, 'मातें वंदा, त्वरित अघवृंदा[9] हरिन मीं,'
स्वयें तो विश्वाचा गुरुवर पृथेला हरि नमी;
स्वमातेला तैसा सुखकर परिष्वंग[10] हि वर
त्रिलोकींचा[11] दे, ये जनकभगिनीला[12] गहिंवर. ४
पुसे कुशळ जेधवां प्रभु, तया पृथा ते म्हणे,
'अगा! प्रणतवत्सळा! सकळवृष्णिचूडामणे!
तयीं च कुशळी असे, जन सनाथ हा निश्चयें,
कृपा करुनि धाडिला जइं मदीय बंधु[13] स्वयें.' ५
युधिष्ठिर म्हणे, 'अहो! सकळचिंतितप्रापण[14]
क्षणांत[14], न कळे कधीं सुकृत जोडिलें आपण[15];
यदंघ्रिकमळेक्षणा[16] करुनि योग ही कष्टती,

१. नकुल व सहदेव. २. आम्रवृक्ष. ३. रोमांचरूप कळ्यानीं. ४. द्रौपदी. ५. नूतन वधू (द्रौपदी). ६. तदनंतर. ७. पति (पांडव). ८. चरणकमल. ९. पापसमूहाला. १०. आलिंगन. ११. त्रिजगत्पति. १२. कुंतीला. १३. अक्रूर–**पंत.** १४. प्राप्ति क्षणांत झाली–**पंत.** १५. मया–**पंत.** १६. यस्य तव भगवतः पादकमलविलोकनार्थम्–**पंत.** जो तूं परमेश्वर त्या तुझ्या चरणकमलविलोकनाकरितां.

दिसे विषयलालसां[1] परमसिद्धि विस्पष्ट ती[2]. ६

राहे वार्षिकें[3] च्यार मास भगवान् तेथें चि, अत्यादरा
भक्तांच्या वश होय, जो हरि हरी नामें असत्या[4] दरा,
दोघे कृष्ण रथीं बसोनि मृगयाकामें वना एकदा
गेले, पर्व[5] म्हणोनि मेध्यमृग[6] जे त्यां मारिती ते तदा. ७

भृत्यांहातुनि धाडिले मृग पुरा, त्यांच्या[7] निरोधा वन-
क्षोणीमंडल हिंडले, बहु तिहीं केलें वनीं धावन;
लागे फार तृषा तया यदुवरा गांडीवचापा, वन[8]
ब्रध्नाच्या[9] तनयातटीं उतरुनीं ते[10] प्राशिती पावन. ८

कृष्णातटीं दिव्य कन्या कृष्णाश्रीकांत[10] पाहती,
कृष्णाज्ञेनें पुसे जो त्या कृष्णीं[11] वृत्त वदे सती. ९

'कालिंदी नाम माझें रचुनि रवि पिता गेह दे या चि तोया-
मध्यें उग्रा तपा हा जन करुनि सदा विष्णुतें याचितो यीं[12];
देवा! दे दास्य ऐसें विनविन नयनां चातकां तोयदा त्या
केव्हां वाटेल नेणों, अभिलषित कधीं ठावुकें होय दात्या.' १०

ऐसें ऐकोनि तीचें अभिलपित म्हणे आदरें जिष्णु, 'लागे
आम्हांला न प्रयास, स्थिर पळभरि हो, आणितों विष्णुला गे!'
नेला श्रीकृष्ण तेथें, दिनकर अरुणें, पद्मिनी ते वरा या
पाहे, लाहे सुखातें, हरि बसवि रथीं ने पुरातें वराया. ११

त्रिलोकीचा कर्ता भजकवश तो धर्मवचना-
सवें शक्रप्रस्थीं स्वजनपरितोपार्थ रचना
स्वयें वर्षाकाळीं वसत असतां, तेथ बरवी
सुरांच्या शिल्पीतें कथुनि सकळाधीश करवी. १२

---

१. आम्हांसि--**पंत**. याचें विशेषण 'विषयलालसा'. २. कृष्णचरणदर्शन रूप. ३. पावसाळ्याचे. ४. संसाररूपा--**पंत**. ५. योग्य समय. ६. मारण्यास अवश्य असे क्रूर हिंस्र पशु. ७. मृगांच्या. ८. जल--**पंत**. ९. सूर्यपुत्री यमुना तिच्या तीरीं. १०. पार्थाच्युतौ--**पंत**. ११. अर्जुनास--**पंत**. १२. जनास--**पंत**.

मागे रोगार्तवह्नि द्विजतनु अतिथी औषधा खांडवा तें
  द्याया संसारवैद्य क्षम[1], परि यश हें दे सख्या पांडवातें;
केल्या विध्वस्त शक्राद्यमरघनघटा[2] उद्भटा कांडवातें[3],
  त्या काळीं नारदादि प्रभुजन करिती उत्सवें तांडवातें. १३
अदेवांचा[4] शिल्पी भयविकळ संहारसमया-
  मध्यें आला कृष्णा शरण अनुकंपारसमया[5];
खळां दाव[6] प्रह्वां[7] परि अमृतकासारसम[8], या
  नता तया झाला वरद मधुपा सारसें मयां[9]. १४
पार्थाला वह्नि तेव्हां धवल हय, रथ श्रेष्ठ, गांडीव चाप,
  स्वापन्नाशप्रमोदें कवच हि धरिल्या जें न व्हावा चि ताप,
कीं शस्त्रास्त्रीं अभेद्य, क्षय चि न कधिं ही ज्यांत बाणांस भाते,
  ऐसें दे; जींत मोहे कुरुपति मय दे निर्मुनींयां सभा ते. १५
धर्माच्या चित्तवृत्तिप्रति न दुखवितां युक्तिनें घे निरोपा,
  तो पाय क्षमापतीचे नमि, विनवि, म्हणे, 'शीघ्र येतों, न कोपा.'
गोपाळांची हि भिड प्रभु धरि, न कसी बंधुची या उमोपां[10]?
  ओपां[11] योगाग्निमध्यें तनु हि परि न हा भक्तिवांचूनि सोपा. १६
कालिंदी नवरी तिला निजपुरीं ने, सन्मुहूर्तीं वरी,
  साधी फार बरी वधू, मग हरी तो पांचवी तीवरी,
गर्भीं जीस धरी स्वतातभगिनी राजाधिदेवी, हरी,
  तीचे पुत्र[12] अरी न देति हि, परी ती मित्रविंदा हरी. १७
वैदर्भी प्रभुला जसी अनुसरे, तैसी च ही पांचवी,
  लागे बाळपणीं च माधवयशःपीयूष पीतां चवी;
जी दुर्योधनबुद्धिवारवनिता ती सोदरां[13] लांचेवी[14],

---

१. समर्थ-पंत. २. इंद्रादिदेवरूप मेघसमूह. ३. बाणपक्षवायूनें--पंत. ४. असुरांचा. ५. दयारसपूर्ण कृष्णाला. ६, अग्नी-[सारखा प्रखर]. ७. शरणागतांस. ८. कमळ. ९. मयासुरास. १०. फार. ११. अर्पण करा किंवा वाळवून शुद्ध करा. १२. विंद आणि अनुविंद. १३. [तिच्या] भावांस (विंदानुविंदांस). १४. फितवी.

रुक्मी एक चि, दोन हे, पारि हरी दोघींस ही वांचवी. १८

जे दोघे हि अवंतिकापुरपती विंदानुविंद 'स्वसा
देवूं ना' म्हणती 'हरीस,' सुजना जो इष्ट सर्वस्वसा,
तो होय प्रभु हि स्वयंवर तिचा ऐकोनि लोल[1], क्षिती-
नाथांदेखत ने, न वारिति च कीं ते योग्य तो लक्षिती. १९

राजा नग्नजिदाख्य कोसलपती, त्याच्या गृहा आपण
ज्ञानिध्येयपदाब्ज जाय, परिसे कीं कौतुकाचा पण,
प्रेमें पूजुनि पाय, राय विनवी, 'म्यां काय कीजे? मनीं
नेणें तृप्तिस कामधेनु कवण्या पावेल कीं जेमनीं[2].' २०

म्हणे सत्या अत्यादृतमति, 'मला हा वर वरें[3],
स्वताताच्या गोष्टि प्रियसखि! बऱ्या या वरवरें[4];
पदीं कन्यारत्नार्पण न करि मध्यें करकरें[5]
स्तुतीची, हा [6]अंबे! त्वरित धरु मोदाकर[7] कर.' २१

हें जाणे सर्वसाक्षी, नरपतिस म्हणे, "'क्षत्रिया याचना तें
निंद्य' ज्ञाते च ऐसें वदति, [8]तरि तुम्हां मागतों, साच नातें
व्हावें, प्रेमा असावा म्हणउनि दुहिता द्या, दुजें तोषलेशा
नाहीं, आम्हीं न देवूं किमपि पारि अहो! शुल्कें[9] तों, कोशलेशा!" २२

बोले भूप, "दुजा वर त्वदुपम स्वर्गादिकीं नाढळे,
इच्छा तूज नसे, परंतु न पदापासूनि पद्मा[10] ढळे;
अस्मद्भाग्य जगत्त्रयीं अतुळ हें कीं मागसी आपण,
स्वामी! शुल्क भवद्या बहु पारि प्रत्यूह[11] कीं हा पण. २३

वर परमसमर्थ प्राप्त हो कन्यकेला,
पुरुषबळपरीक्षेकारणें यत्न केला;
पण वृषभ दमावे दुःसह[12]स्पर्श सप्त

---

१. सतृष्ण–पंत. २. भोजनीं–पंत. ३. योग्य–पंत. ४. बाह्यात्कारीं. ५. किरकिर, त्रास. ६. भगवति–पंत. ७. भगवान्–पंत. ८. तदपि–पंत. ९. कन्येचें मोल. १०. लक्ष्मी. ११. विघ्न. १२. ज्याना दुसऱ्याचा स्पर्श सहन होत नाहीं असे.

प्रखर असति जैसे कीं अयःपिंडे[1] तप्त. २४

जे होते 'बळवंत आपण असों' ऐशा मदें दाटले,
आले राजकुमार फार, वृष हे नाहीं तयां आटले;
शृंगाग्रीं सुकुमारदेह कवळूं जातां बळें फाटले,
गेले भग्नमनोरथ, स्वभुज त्यां ओझें वृथा वाटले. २५

चाणूरांतकरा! अरिष्टदमना! कंसांतका! आपण
श्रीकांता! मधुसूदना! सफळ हा माझा करावा पण;
कन्येला नवरा अभीष्ट नवराजीवाक्ष[2]! तूं, सांवरा
आधीं अंबर[3], आवरा वृष, मग स्त्रीरत्न हें, या वरा." २६

प्रतापातें जाणे, 'दमन वृषभांचें' पारि 'करा,'
म्हणे राजा, तेव्हां भुवनपति बांधे परिकरा[4];
स्वयें जाला सप्ताकृति[5] अजित गोसप्तक[6] बळी
धरी जैसा शुद्धक्रिय नर रवे तप्त कवळी. २७

कौतुकें किति अगाध वदावीं? लाविती सहज माधव दावीं;
ओढिती पृथुक[7] काष्टमयांस, व्यक्त तेंवि विगतश्रम यांस. २८

रूपमात्र धरिलें परि बैल, प्राकृतांसम न, ते कुलशैल[8],
हृत्तमःक्षयकरेश्वरहस्तस्पर्शकामहृतचित्त[9] समस्त. २९

ज्याच्या नामें चि जन्म श्रुत धन कुळ हें सर्व ही धन्य, केला
जामाता देव भूपें शुभतमसमयीं अर्पुनीं कन्यकेला.
हस्त्यश्वस्यंदनादि प्रचुर वसु[10] दिलें, पात्र दुष्प्राप, हाता
ज्ञाता कां आवरील द्रविणसफळता जो प्रदानीं[11] पहाता? ३०

भूपें धेनु दहा सहस्र दिधल्या, दासी सहस्रत्रय,

---

१. लोहगोल. २. प्रफुल्ल कमलाप्रमाणें नेत्र ज्याचे अशा! ३. वस्त्र. ४. कमर. ५. सात प्रकारची आकृति ज्याची असा. ६. सात बैल. ७. मुलें. ८. कुलपर्वत. (हे महेंद्रादि सात आहेत). ९. हृदयांतील अज्ञानाचा क्षय करणारा जो ईश्वर त्याच्या हस्तस्पर्शाची इच्छा तिनें हरिलें चित्त ज्यांचें असे मस्त बैल [झाले]. १०. द्रव्य. ११. दानानें.

स्वर्णालंकृत नागे[1] तत्रिगुण[2], यद्दानीं[3] कधीं न क्षय.
नागांहूनि शतांग[4] ते शतगुण श्रीशा दिले, त्याहुनी
वाजी दास हि त्यांहुनी शतगुण, स्वश्रेय हें पाहुनीं. ३१
सखीकि तेथुनि निघे जयिं चक्रपाणी,
नेत्रांसि आणि बहु कोशलशक्र पाणी;
स्नेहें रडे, जन्हि निजान्वय[5] धन्य केला,
हें जाणती निरवितां जन कन्यकेला. ३२
मुखांतें झांकूनीं हसति बहु नाकौकस[6] पँटें,
वृषानीं ही श्वासें उडविलिं लघू जीं कसपटें[7][8];
पुढें झाले ते कीं न करुनि विलंबा हिरतणें[9]
'वधू दावा, देवूं' म्हणति 'न निघों बाहिर तणें.' ३३
म्हणे सख्या श्रीहरिला धनंजय, 'प्रभो! मला सत्य करीं धनंजय[11];
आहेस पाठीवर, दास मीं रणा करीन यासीं, वरदा! समीरणा!' ३४
कृष्णोक्तासह शीघ्र सज्ज करुनीं गांडीव घे अर्जुन,
त्रासें जे धरिती मुखीं तृण जन क्लीबां तयां वर्जुन,
बाणानीं करि भग्न मग्न रुधिरीं नागाधिरूढां[12] सैंळी[13],
रुद्राचे परि हा समीर गंज[14] ते जाणों तरू ढांसळी. ३५
स्वशत्रुस्त्रींच्या जे नुरविति न सिंदूर निटिलीं,
शरानीं पार्थाच्या अहितकटकें दूर पिटिलीं;
कसा साहे वेग प्रबळपवनाचा घनघटा[15]?
घटा हस्तींची ही धरिल हरिच्या ही मनगटा. ३६
नामें चि जो मोक्ष हि दे, वसावा कानीं जयाचा गुण, देव सावा
विवाह ऐसा करि अन्य, गेहा ये, बोलती स्त्री, 'सखि! धन्य गे! हा.' ३७

---

१. हत्ती. २. दासींहून तिप्पट. ३. ज्या गजांच्या दानोदकीं. ४. रथ. ५ आपला वंश. ६. देव. ७. वस्त्रानें. ८. तृण. ९. ह्या शब्दाचा अन्वयार्थ काय? १०. नवताची धक काळी हि. ११. अग्नि. १२. गजाधिरूढांस. १३. ओळी १४. वायुर्वा गजो वा–पंत. १५. मेघसमूह.

शौरीची श्रुतकीर्तिनाम भगिनी भद्रा तिची दारिका[1]
लीला बालपणीं हि गाय हरिच्या प्रेमें जसी सारिका[2];
हे संतर्दनमुख्य आवडि तिची बंधु स्वयें जाणती,
देति श्रीपतिला चि कीं बहुमता, त्यां जीवनप्राण ती. १८
मद्राधीशसुता जिच्या गुणमणी पोटासि आले, खनी
श्रीची, यच्छुभलक्षणीं लव लिहे न ब्रह्मजालेखनी[3]
राजे ऐकुनि तत्स्वयंवरमहा एकत्र जाले पणीं
जिंकी कृष्ण चि लक्ष्मणा, नृपजना लज्जा चि ज्या लेपणीं[4]. १९
जैसा कीं द्रुपद स्वकीय तनया पार्थासि द्याया रची
रौरायंत्र[5], तयापरीस पण हा भारी असे फार चि;
जेथें अर्जुन ही न शक्त, इतरां तें कर्म कैसें घडे?
माळा कृष्णगळां स्वयंवरवधूहस्तांबुजींची पडे. ४०
वैदर्भी मग ऋक्षराजतनया श्रीसत्यभामा सती,
कालिंदी वरुनी हरि प्रभु वरि श्रीमित्रविंदेप्रती,
सत्या नाग्नजिती सुनिर्मळमती भद्रा, सुधी लक्ष्मणा,
प्रेमें सेविति अष्ट पट्टमहिषी या नित्य नारायणा. ४१

---

# अध्याय एकुणसाठावा.

भौम[6] प्राग्ज्योतिषाचा[7] पति नरक बळें तुच्छ शक्रा करूनि,
स्वर्स्त्रीचे भूषवाया श्रवण अदितिचीं कुंडलें ने हरूनी;
वर्षे पीयूषबिंदू म्हणउनि वरुणच्छत्र नेलें बळानें,
क्रीडे जेथें हरी तो मणिगिरि हरि हें कर्म केलें खळानें. १
ज्ञानी नारद पारिजातकुसुम स्वर्गाहुनी आणुनीं,
दे सत्कल्पतरुप्रति, प्रभु हि तद्भाव स्वयें जाणुनीं,
प्रीतें दे, कळतां रुसे प्रियतमा भामा महाकोपना,

१. कन्या. २. मैना. ३. सरस्वतीची लेखणी. ४. आच्छादनीं, झांकून टाकण्यास. ५. रारायंत्र म्हणजे काय? ६. भूमीचा पुत्र नरकासुर. ७. देशविशेष.

यत्नें हा वरद प्रियंवद करी तन्मानसंगोपना. २

भामेच्या सदनिं प्रभूसि कळवी हे ताप[1] नाना शची-
भर्ता कीं हरिच्या पदाविण दुज्या यत्नें जना नाश[2] चि,
हें आणी मनिं पारिजात दयितेसाटीं असे आणणें,
देवांचा सहजें चि कंटक पथीं भौमाख्य ही खाणणें. ३

'जा' इंद्रास म्हणे मुकुंद, 'करितों त्या दुर्जना भस्म रे!'
ऐसें सांगुनि त्यास, पक्षिपतिला[3] श्रीपद्मनाभ स्मरे;
तों आला गरुड क्षणांत, अजित स्कंधीं तयाच्या चढे,
अंकीं स्त्री[4] रुचिनें तिच्या चि चपळा[5] अद्यापि तापे, कढे. ४

पावे जाउनि लोकनाथ अजित प्राग्ज्योतिषाख्या पुरा,
तत्प्राकार[6] गदादिशस्त्रनिवहें तत्काळ केले चुरा;
दावी ही बहु विक्रम प्रभु परि च्छेदि स्वचक्रें मुरा[7],
भामाभीतिकरा वधी खरतरा तेणें[8] चि भौमासुरा. ५

चक्रें त्या वृष्णिशक्रें खळनरकशिर च्छेदितां पुष्पवृष्टी
केली हर्षें सुरांहीं, निरुपम पडलें तें महायुद्ध दृष्टी.
देवस्वं[9] स्वीयपुत्राहृत सकळ पदीं आणुनीं ठेवि भूमी
प्रार्थी कीं, 'आत्मपौत्राप्रति[10] अभय तुम्हां मागत्यें हें विभू! मीं.' ६

भौमाचा भगदत्त पुत्र, अभय श्रीकृष्ण दे, त्या पुरीं
राज्य प्राज्य हि, जाय हा यदुपती भूनंदनांतःपुरीं[11].
ज्या सिद्धासुरदेवभूपतनया संरोधिल्या त्या खळें,
सोडी व्द्यष्टसहस्रसैकशत[12] ही त्या तो प्रभू दोर्बळें[13]. ७

कन्या चित्तें वरीती शुभगुणमणि जे त्यांचिया आकरा या,
तो सांगे काय आंगें जलधर तृषितां चातकां आ कराया?

---

१. [ नरकासुरापासून झालेले ] ताप. २. [ मूर्तिमंत ] नाश च. ३. गरुडाला. ४. कृष्णांकीं भामा—**पंत.** ५. वीज. ६. त्याचे तट. ७. मुरनामक दैत्यास. ८. त्या चक्रानें. ९. देवांचें धन. १०. आपला नातु जो भौमाचा पुत्र त्यातें. ११. नरकासुराचे अन्तःपुरांत. १२. सोळा सहस्र एकशें एक. १३. बाहुबलानें.

त्यां स्त्री एकें चि हृष्टा म्हणुनि कुमुदिनी पद्मिनी देव राका-
नाथ ब्रध्न प्रियश्री सुकवि न उपमा आणिखा दे वेराका. ८
स्नपनवसनभूषायोग्य सत्कार केला,
बसउनि नेरयानीं धाडिल्या द्वारकेला;
गजहयरथरत्नें कांचनें हि प्रभूतें
उरउनि बहु धाडी तच्छुभार्थं प्रभू तें. ९
तेथूनि पक्षिपतिवाहन हा सदारें
स्वर्गासि जाय यदुनायक अत्युदार;
तीं कुंडलें नमुनियां जनिदादितीतें
दे, जाणवी तनुजता जगदादि तीतें. १०
नमीं सुरांची हरिला सभा, जिला अभीति दे, देवंवरें सभाजिलों.
समर्पिती जिष्णुसि पाय ते, जया उपेक्षितां कोठिल काय तेज या? ११
भौमें जी भीति चिंता दिधलि बहु, जिणें सर्वथा नाश, चीपें
ग्रीवेची काढिली, कीं उपकृति कसि ती आठवीना शचीप?
इंद्राणी सत्यभामेप्रति हृदयिं धरी कीं नसे भेद जावा,
दोघी पूजी सुदूरागमनजनित जो तो म्हणे खेद जावा. १२
येतां तेथूनि मार्गे प्रभुहरि हरि त्या पारिजाता नगा, ती
वार्ता ऐकोनि, इंद्राजवळि सुर मुखें कीर्ति गातां न गाती;
आला युद्धा अशुद्धाचरण शतमख क्रूर तो कोपला चि.
दावी चंद्रोपलाची प्रथम मग कुधी रीति अर्कोपलाची. १३

---

१. त्या स्त्रिया एका [कृष्ण] मूर्तीनें च संतुष्ट म्हणून कुमुदिनी (चंद्रविकासिनी) [व] पद्मिनी (सूर्यविकासिनी) होत [आणि] देव (कृष्ण) चंद्र [व] ब्रध्न (सूर्य) [होय]; कवि आणखी दुसरी क्षुद्र उपमा देत नाहीं. २. पालख्यांत. ३. पुष्कळ. ४. त्या स्त्रियांच्या हितार्थ. ५. सत्यभामेसह. ६. जन्मदात्या अदितीतें. ७. जगताचा आदिपुरुष. ८. इंद्रानें. ९. पूजिला. १०. दगडाची चीप. ११. इंद्राची बायको. १२. पारिजातनामक वृक्षा. १३. स्वातिक्रम समजोनि—**पंत.** १४. चंद्रकांतमण्याची. १५. सूर्यकांताची.

पायीं ही लोळतां ही सतत सुरतरू लेश चिंता न वारी,
 ती सर्वेष्टप्रदाता हरि हरि सहज प्रार्थितां दानवारी;
वृक्षा शीक्षा कराया निजगुरुवर ने, भद्र तें हें न मानी,
 कार्यासाटींच भक्ति स्वराधिप खळ हा दूर पाहे न मानी. १४
हो सद्विद्य कुलीन मानव सुर ज्ञानी तऱ्ही लोभला,
 प्राय: प्राज्ञ म्हणोनि मद्य म्हणति द्रव्य त्यजी तो भला.
स्वर्गीं इंद्रपदीं यदीयचरणांभोजाश्रयें शोभला,
 तो हा शक्र पहा! अहा! शिव! शिव! स्वामींवरि क्षोभला. १५
सर्वेष्टप्रद आपण प्रभु असें, चित्तांत चिंतामणी
 हा काय द्रुम मूढमान्य! कळवि स्पष्ट प्रतापें धणी.
स्त्रीचा आग्रह यास्तव प्रिय तिचें व्हाया तिच्या आंगणीं
 लावावा, इतुकें चि इंद्र न मनी, ये प्राण घ्याया रणीं. १६
सुरवरा हरिभक्तिपरा जय प्रथम, अर्थपरा हि पराजय,
 न उमजे विषयेच्छु वराक वी भुवन त्या, वरि दास्य वरा कवी. १७
युद्धीं जिंकुनि जिष्णुला, निजपुरीं श्रीसत्यभामामतें
 उद्यानीं तरु लाविला सुरभि तो तीचें करी धाम तें.
फांके द्वारवतीपुरीं परिमळ, श्रीकृष्णजीचें जगीं
 जैसें सद्यश, आवडी पारि जसी येथें न तैसी नगीं. १८
कन्या व्यष्टसहस्रसैकशत तत्संख्यस्वरूपें धरी,
 माता तात नवीन चि प्रतिगृहीं स्वाप्त स्वयोगें करी;
लग्नप्रेमजनोत्सवालयवरीं नाहीं भिदा, तो वरी
 श्रीकांत प्रभु जीस जीस म्हणती ती ती नवी नोवरी. १९

---

१. अभिमानी. २. असो. ३. ज्याच्या चरणकमलाश्रयानें. ४. कृष्ण. ५. नीच (इंद्र). ६. [जो] दास्य वरी तो वरा (बरा) कवी. ७. सुगंधी. ८. कृष्णवर्णात. ९. आपल्या मायेनें. १०. लग्न, प्रेम, जन, उत्सव, आलय (घर) व वर यांमध्यें.

# अध्याय साठावा.

पर्यंकीं आपुल्या स्वप्रियतम असतां एकदा त्यास देवी
वैदर्भी चामरातें धरुनि लसदुरोहार[1] ढाळूनि सेवी;
'मीं धन्या वल्लभा कीं मजजवळि वसे नित्य' ऐसें चि मानी.
साक्षी तत्काळ जाणें करि कुतुकनिधि श्रीश तद्गर्वहानी. १

म्हणे विभु, 'नृपात्मजे! गुणवती असी तूं बरी,
नसें उचित मीं पती, गति मतिभ्रमें[2] ही खरी;
सुरूपअनुरूप तूं सुमुखि! भूप आतां तरी
वरीं; हित चुके जरी, कुशळ तें पुन्हां सांवरी[3].' २

स्वदोष बहु दाखवी, गुण धरांधवांचे वदे;
सतीस 'चुकलीस तूं' म्हणुनि ताप तो देव दे.
नवीन कटु शब्द ते सकळ काळजा लागती
सुतक्षशरसे, मनीं समजली निजत्याग ती. ३

जयीं ती श्रीमूर्ति श्रवणकटु अत्यंत वदली,
पडे जैसी वातें फळदळभराक्रांत कदली;
स्वयें मूर्छामग्ना उचलुनि सती सांत्वन करी,
जसें पंकोद्धारें[6] करुनि करिणीचें[7] वनकरी. ४

नेली शीघ्र चतुर्भुजें प्रियतमा आंगें पलंगावरी,
हस्तें तत्कचभारहारवसन स्वाधार[9] तो आवरी;
शोकाश्रूक्षित[10] गल्ललोचनकुचद्वंद्वें पुसी हा, बरी
स्वस्था होय, तसी दया चि करि, कीं झाली सती घाबरी. ५

दयाघनें जऱ्ही केला परिहास त्यजावया,
गर्वास हेतु तापा ही परि हा सत्य जावया. ६

वैदर्भीस म्हणे प्रियंवद, 'अहो! मच्छब्द जे हे तुतें

१. जिच्या वक्षःस्थळीं हार शोभतो अशी. २. बुद्धीला भ्रम पडल्यामुळें. ३. सांभाळून घेई. ४. भूपतींचे. ५. कृष्णमूर्ति. ६. चिखलांतून वर काढून. ७. हस्तिणीचें. ८. स्वतः. ९. स्वकीयांचा (भक्तांचा) आधार. १०. शोकाश्रूनें भिजलेकीं.

झाले तापकर प्रतप्तशरसे, मूर्छेस ही हेतु तें;
कांहीं ही मृदुमानसे ! तव मनें नाहीं च कीं साहिलें,
म्या केला परिहास हा सति ! कसी तूं कोपसी पाहिलें. ७
कसें वदसि, पाहसी, चल[1]कटाक्षमोक्षेक्षण
प्रिये ! भ्रुकुटिशोभि हें मुख तुझें पहावें क्षण,
कसें अधरपल्लवस्फुरण, लोचनीं शोणता[2],
गृही[3] जन तयास यापरिस लाभ तो कोणता? ८
विनोदरससागरीं रमति मीनसे दंपती,
अशा कलहसांत्वनीं दिवसयामिनी संपती;
म्हणोनि परिहास हा सहज आजि केला लसे[4]
तुझें न मुख, भीतिला न धरिं नायिके ! लालसे[5] !' ९
वैदर्भी त्यागभीति त्याजि, पति पहिले बोलिला जे स्वदोष
स्वांतीं होते चि त्यांचीं कथुनि समुचितें उत्तरें दे सुतोष[6].
ते[7] कृष्णें बोलवीलि प्रियगुण[8] मुरली गोड अत्यंत बोले,
श्रोत्यांचें वृंद वृंदावन हरि हि तयामाजि अद्यापि डोले. १०

# अध्याय एकसष्टावा.

जन्ही मिळालीं रमणीनदीशतें, त्यजी निजस्थैर्य न तो[8] नदीश तें.
रसार्पणें[10] उत्सवदातया चि त्या मिळोनि झाल्या पदमात्र[11] याचित्या. १
उदासीन स्वामी सदय वशता[12] दाखवि वरं[13]
प्रियांतें, हें त्याच्या समजति कृपेनें कविवर;
स्वयें मूर्ख स्त्रैण प्रभुस म्हणती, दृष्टि निवळे

१. [कोपानें] चंचल [झाले आहेत] कटाक्षक्षेप ज्यांतील असें नेत्र ज्याचे असें मुख. २. रक्तिमा. ३. संसारी जन. ४. शोभे–**पंत**. ५. सुंदरि ! ६. अत्यंत आनंद. ७. जिचे गुण [कृष्णास] प्रिय आहेत अशी ती रुक्मिणी ही च मुरली. ८. तो कृष्णरूपी समुद्र. ९. प्रसिद्ध–**पंत**. १०. रस=जल आणि शृंगारस त्याच्या अर्पणानें. ११. केवळ चरण-[सेवा]. १२. स्त्रीवशता. १३. वर मात्र–**पंत**.

न ज्यांची, त्यां रोग्यां दिसति दरदुग्धेंदु[1] पिवळे. २
स्त्रीतें एक सुतारत्न पुत्ररत्नें हि दे दहा,
वेद हो[2] सम हें सांगे तें दावी भेदखेदहो[3]. ३
प्रद्युम्न प्रभुचा कुमार पहिला जो मूर्त चेतोजनी[4],
त्या हृद्यासि वरि स्वयंवरवधू रुक्म्यात्मजा, तो जनीं
कोणा स्त्रीस न मोहिल स्वसुगुणें? आधीं च हा चारु[6] चि
श्रीकांतात्मजता हि कां न रुचती कन्येसि त्याच्या रुचि? ४
त्रिच्छाय क्षितिपव्रजेंदु करुनि प्रद्युम्नभानू निघे,
रुक्मी दुष्ट, परंतु लाभ भगिनीसंतोष मानूनि घे;
मागें [10]भोजकटीं विवाह करणें यालागिं ने यास, ती
अर्पी रुक्मवती स्वयें हि विधिनें तो भागिनेया सती. ५
नामें चारुमति श्रीमद्रुक्मिणीची सुता सती
प्राप्त झाली महाभाग्यें कृतवर्मसुतास ती. ६
स्वयें ही रुक्मिणीपौत्रा अनिरुद्धा सुलोचना
भगिनीप्रीतिकामें दे रुक्मी पौत्री हि रोचना. ७
स्त्रीपुत्रांसह रामकृष्ण ससुहृद्वर्ग स्वपौत्रासि ते
गेले भोजकटासि, घेउनि बळें[11], जे दुर्जनां त्रासिते;
झाला तेथ विवाहउत्सव जगीं आश्चर्य तो, टाकली
नाहीं रुक्मिखळें कुबुद्धि, रचिला दाटूनि मोटा कली. ८
जे रुक्मिप्रिय भूप त्यांत हि सखा कालिंग, त्यां[12] माकडा
पाजी दुर्मतिमद्य, दे खळ पिशाहार्ति स्वयें कांकडा;
'बंधो! शौरि अजिंक केवळ रणीं, कीं ठाउके हे तुला?
यांच्या जाणतसें पराभव करायाच्या स्वयें हेतुला. ९

---

१. शंख, दूध आणि चंद्र. २. परमेश्वर—**पंत.** ३. द्वैत-[भावनोत्पन्न] दुःखाचा नाशकर्ता. ४. मदन. ५. रुक्मवती. ६. चारुरेव—**पंत.** ७. लक्ष्मीपतीचें पुत्रत्व. ८. शोभा—**पंत.** ९. निस्तेज. १०. एतन्नामक नगर. ११. सैन्यें. १२. रुक्म्यार्ते—**पंत.**

अक्षज्ञत्व[1] नसे तऱ्हि व्यसन तें मोटें; असा सावळा[2]
हा वृष्णीश पराभवास कपटें देयील फांसा बळा[3],
या, घेऊं उगवूनि सर्व उसणें, मागील जें[4] आजि तें,
युद्धांतील भवद्विडंबन सदा अस्मन्मनीं डाजितें.' १०

व्हावा ईश्वरहस्तानें जाणों वध महाबळा
बाहे असा असाधूक्तें रुक्मी अधम हा बळा. ११

वृष्णिव्याघ्रपराभवेच्छु सजला रुक्मी महौतू[5], हली[6]
त्या द्यूतीं शत[7]दिक्शतायुत पण स्थापी सुकौतूहली[8],
जिंकी ते ग्लह[9] तों कालिंगनृपति, श्रुत्यंतसारा[10] सभा-
स्तारां[11]माजि हसे, तुरंगमपती माने कसा रासभा? १२

एकद्वित्रिग्लहांतें हरुनि बहु निजोत्कर्ष त्या रुक्मयानें
दावूनीं, लक्षसंख्य स्मय[12] करुनि पणीं लाविलें रुक्म[13] यानें;
जिंकी ईश ग्लहा तों, खळ 'अनृत' म्हणे, 'बोलतो राम हा ही,
जैसे ते जिंकिले म्यां,' तंव कुपित गमे देव[14] जैसा महाही[15]. १३

रुक्मी द्यूतांत बोले अनृत, 'अजित तो राम ज्या ज्या पणातें
जिंकी त्या जिंकिलें म्यां,' म्हणुनि खळजनीं मानवे आपणातें.
हांसे कालिंग, जाणे, प्रभु शुचिभजकावांचूनी[16] अन्य कोण
द्वेषी जिंकील? कोपें नयनयुग तदा होय अत्यंत शोण. १४

जाल्या रक्त चि नेत्रयुग्म विभुचें तें तापलें हेम ही,
पावे तत्तुलना न, भीति धरुनीं कांपे तदा हे मही;

---

१. फांसे [टाकण्याचें] चातुर्य. २. भाळा. ३. बळरामास. ४. तव पराभव—**पंत.** ५. मत्त मार्जार—**पंत.** ६. बळराम. ७. शंभर, सहस्र, दशसहस्र. ८. कौतुकी बळ:—**पंत.** ९. पण. १०. वेदान्तसारभूत (रामा). ११. सभासदांत—**पंत.** १२. आश्चर्य. १३. सुवर्ण. १४. बळराम. १५. मोठा सर्प. १६. शुद्ध भक्तां-वांचून दुसरा दुष्ट कोण जिंकील? (ईश्वराला सदाचारसंपन्न भक्तानें च जिकावें; अन्य दुष्ट कोण जिंकणार हा भाव).

मांडी आपण हा पण द्रविण[1] दिक्कोटि[2] ग्लहा 'या हि मीं
जेता' पाप म्हणे, विलंघिल चि जो त्याची न माया हिमीं[3]. १५

जो धर्में जिंकिला रामें सर्वांदेखत हा पण,
'जिंकिला म्यां' म्हणे रुक्मी अधर्में जित आपण. १६

जे तेथें निजपक्ष दुर्जन, म्हणे रुक्मी तयां, 'कां न या
सांगा हो! हळपाणिला[4] बुडवितां जाणोनियां कां नया[5]?'
तों तत्काळ चि गर्जली असि नभोवाणी 'न रुक्मी, पणा
जिंकी राम चि सत्य हें, खळ वृथा कां दावितो मीपणा?' १७

ऐसें सत्य चि बोलिली जर्‍हि नभोवाणी न मानी तिला,
काळग्रस्त खळ स्वयें मग वदे सोडूनियां नीतिला,
'अक्षज्ञ क्षितिनाथ, गोप चि तुम्हीं रानीं कवी रानटे[6],
क्रीडा अक्षशरीं[7] नृपांस उचिता, जिंकी न वीरा नटे[8].' १८

हंसातें हांशिले ही, तर्‍हि गुणयश तें नाशिलें काय काकीं?
त्यांचें अज्ञान तें हें विदित, परि रुचे कोप सन्नायका[9] कीं.
सद्धर्मत्राण पापक्षपण पण कसा व्यर्थ होय? क्षमेला
सोडी कारुण्यसिंधू जन म्हणुनि असा या[10] करें लक्ष मेला. १९

स्वाधिक्षेपें[11] सभेंत हांसति कुधी कालिंगभूपादि जे,
आणी राम मनीं तयांप्रति फळा कर्मानुरूपा दिजे.
घाली रुक्मिशिरावरी परिघ तो तत्काळ 'पापा! मर'
क्रोधें ईश म्हणे, घरीं[12] परि वरीना तत्कृपा पामर. २०

धरी कालिंगातें, खगपति जसा साप दशमीं[13]

---

१. द्रव्य. २. दहा कोटि. ३. शीतळ ही हिम लंघितां तें मारक होतें—**पंत.** ४. हलधराला. ५. नीतीला. ६. अरण्यपंडित. ७. फांसे आणि बाण यांहीं. ८. वीरवेषधरो नटः—**पंत.** ९. संतजनरक्षक बळरामास. १०. ईश्वरद्वेषी रुक्म्या-सारिखा या रामाच्या करें—**पंत.** ११. स्वनिंदा. १२. गृहीं भगवंत आला; परंतु मूढ तत्प्रसाद संपादीना—**पंत.** १३. दहाव्या.

पदीं तो, ध्याती यत्पद दलितदासापद शमी[1][2],
हंसे दावी जो कीं धरुनि हृदयीं उत्सव रदें[3]
स्वयें ताडी पाडी सकळ हृतसत्कुत्स[4] वरद. २१

लोळती बहुत भूपरि[5] घाया पावुनीं, विवर भूप रिघाया
पाहती, उदरिं[6] कांप 'रिघा या' भू म्हणेल कसि भी पारिघा या? २२

न दे जागा पोटीं विनविति जऱ्ही भूप महिला
असो जाया ठेवी पतिस उदरीं काय महिलां[7]?
कदा न स्पर्शाया पतित पतिला दे वपु सती;
क्षमा[8] हे साध्वी हे म्हणुनि इंस[9] भूदेव पुसती. २३

मानसीं हरि म्हणे, 'वध मातें मानला, उचित हा अधमातें,'
साध्वसाधु न वदे, परि साहे, रीति विश्वगुरुची परिसा हे. २४

'लोभक्रोधानृतांचें गृह बुध म्हणती द्यूत, ठावें चि आर्यां,
बाहे दाटूनि रुक्मी, खळवध पाहिला, जन्मलों या चि कार्या;
हें साधु स्वाग्रजाचें सुचरित म्हणतां, बंधुशोकार्त योषा,
खोटें केलें म्हणावें, तरि गुरु नुरवी, मौनें[10] सर्वा हि दोषां.' २५

वागवि प्रभु हि रुक्मिणीबळस्नेहभंगभय कृष्ण केबळें[11],
आवडी बहुत साधुरीतिची, कीं असे तसि च माधुरी तिची. २६

ऱ्याही रुक्मी, तयाचे प्रियसख नृप ही जे वऱ्हाडी, तदंगें[12]
लग्नांतीं खेळ होतां, सहज चि कुतुकें रंगिलीं साधुरंगें[13],

---

१. दूरीकृता भक्तानामापदा येन तत्पदं—**पंत**. २. शमवंत संत—**पंत**. ३. दांत. ४. हृता सतां निंदा येन—**पंत**. ५. धरोपरि—**पंत**. ६. उदरीं कंप भरला त्यांत कसी 'या रिघा' म्हणेल?—**पंत**. ७. पत्नीपोटीं जागा देवो; महिला (भोग्य स्त्री) देणार नाहीं. ८. पृथ्वी. ९. विष्णुपत्नि नमस्तुभ्यमिति प्रातःप्रणामादि सत्कारः—**पंत**. १०. मौन स्वीकारावें तर त्यापासून पुष्कळ च अनर्थ उत्पन्न होईल. ११. यमकाकारितां 'व' चा 'ब' केला आहे. १२. त्यांच्याशीं (?). १३. साधूंचीं सभास्थानें.

हेत करुनि बळें यादवेंद्रें अभंगें,
र्ती मग निजनगरा रोचनाख्या स्वसंगें. २७

---

## अध्याय बासष्टावा.

:प हरि ज्यापासीं, असा जो बळी
फिरे, जन्हि शिवे सर्वा, तन्ही सोवळी;
ाग्रज बळी बाणाख्य, दे शंभु ज्या
ज वज्रदलनप्रौढप्रतापा भुजा. १
्य सज्जन सुधी सत्यप्रतिज्ञ व्रती,
र सेविति सदा दासापरी ज्याप्रती;
ोणितपुरीं, जो तांडवीं ईश्वरा
तोषवी, 'निजपुरीं ये' या चि मागे वरा. २
र्यें सगण त्या भक्तालया ये क्षण,
योग दे न भजका वह्नींदुसूर्येक्षण;
रि भगवान्, दासासि झाला वश,
र्या, तदीय सुत जो विख्यात हें तद्यश. ३
नम्मी शिवपदा साक्षात् सुधेच्या सरा,
िंद्र, कामकॅंपिला जें ज्याचिया वासरा,
र चषकसा श्रीजानिचा सासरा,
खामरांस अथवा विश्वास या आसरा. ४
ब्या पदीं धरि सदा भावा अमंदा रजें

---

.. स्त्रीलिंगोऽपि—पंत. ३. स्वर्गाधिक अशा आपल्या शोणित-
आपल्या चरणकमलाचा वियोग. ५. अग्नि, चंद्र व सूर्य नेत्र
६. ज्या बळीला. ७. जें (पद) ज्याचिया वासरा (ज्याच्या
ा (कामधेनु च). ८. पेल्यासारखा. ९. लक्ष्मीपतीचा सासरा
—निर्णय०. ११. या पदाचीं रजें (धूळि).

यांचीं देति फळें, न देति वरदा ! संतान मंदार जें;
जेथें अक्षम शेष ही, गुण कसे आम्हीं वदावे ? दया-
सिंधो ! मौन वरी समर्थ हि परी गातां पदा वेद या. ५

हे शंभो ! हे दयासिंधो ! हे महादेव ! कासया
सहस्रभुज हा भार दिधला सेवकास या ? ६
असावा प्रतियोद्धा जो तुझियासारखा, जया
युद्धीं न मृत्युभी, बाहुसहस्रा फार खाज या. ७

धाके दिग्गजयूथ[2], दूर चि दडे, काळासि कंठी[3], रव
श्रोत्रीं ऐकुनि तें पळे चि, मजला मानूनि कंठीरव[4];
अद्रींचें[5] स्वभुजप्रहारसहनीं भावूनि गाढें कुळ
स्पर्शी लज्जित जाहलों पुरहरा! तें काय गा! ठेंकुळ?' ८

ऐसें निस्तुळवीर्य दुर्मद वदे दोर्दंडवीर्यव्यया[6]
इच्छी, दुर्लभभाग्यनाश चि गमे चित्तीं महाभव्य यां[7].
हांसे ऐकुनि मूढभाषण बहु श्रीशंकर क्षोभला,
त्या मत्तासि म्हणे, 'अभीष्ट तुज हें? बाणा! भला हो! भला[8]! ९

वत्सा! मत्सम वीर धीर समरीं, जो कीं न धाके तुला,
तो भेटेल, घडेल भंग तुझिया या जेधवां केतुला[9].
हें चि प्रेक्षितें ठींक, भाक तुजला देतों,' म्हणे, 'हा शयें[10]
स्वांगें पूर्ण न कां मनोरथ करूं जाणोनि दासाशय?' १०

ऐकोनि ऐसें बहु मूढ हर्षला, म्हणे, 'सुधेचा घन आजि वर्षला.'
जसें शिवाला भवसिंधुसेतुला पाहे सदा बाण, तसें चि केतुला. ११
तयाच्या कुळाची महारत्नभूषा असे कन्यका जे, तिचें नाम ऊषा,

१. कल्पवृक्षविशेष. २. दिग्गजांचा समूह. ३. घालवी. ४. सिंह. ५. पर्वत-समूह. ६. भुजदंडबलाचा नाश. ७. या बाणाला अलभ्य दैवनाश कल्याणप्रद वाटे. ८. काकुः—**पंत.** ( तुला हें आवडतें काय )? ९. ध्वजाला. १०. पहात रहा. ११. [माझा] हात.

घडे प्रागदृष्टश्रुतें[1] तीस योग दिला स्वप्नलब्धानिरुद्धें स्वभोग. १२

होती हो! तीर्थकीर्ति[2] प्रभुपदकमळा स्वर्धुनी[3] जेंवि, ऊषा
कन्या बाणासुराला, गुणमणिखनि तद्वंशसद्रत्नभूषा,
वर्णावें सद्गुणाची म्हणुनि किति तरी? कीं दहा वेळ लीला-
काळीं हि श्रीशिवांकावरि[4] हि उपजल्यापासुनी खेळलीला. १३

ऊषेला अनिरुद्ध दे रतिसुख स्वप्नांत आर्यावरें,[5]
भोगावी तसि भोगिली सुरुचिरें ती जेंवि भार्या वरें;[6]
जागी जों मग होय तोयजमुखी तों तो नसे, जे वरी
पाय प्रेमवती न ते दिसति त्या गेहीं न सेजेवरी. १४

'अयि! क्वासि क्वासि प्रियतम![7]' असें गद्गद वदे,
रडे, लाजे, ताप प्रबळ पतिविश्लेषदव[8] दे;
प्रभूतस्वेदाश्रुस्रापिततनु[9] ती, सेज भिजली,
उठे आंतर्स्वांतें[10] गडबडुनि आलींत[11] निजली. १५

मंत्री कुंभांड, त्याची कुशळमति सुता चित्रलेखा तदाली
झाली जागी, उरासीं धरुनि तिस पुसे, शुद्धि तेव्हां चि आली;
ऊषा स्वस्वप्नवृत्त प्रियतमविरहक्लेश सांगे सखीला,
लीलासौंदर्य वर्णी बहु निजपतिचें बाष्पकंठी सुशीला. १६

अश्रूंतें चित्रलेखा पुसुनि तिस म्हणे, 'नीरजाक्षि! प्रयास
स्वांगें भोगीन, सुभ्रू! व्यसन हरिन मीं, आणिन क्षिप्र यास.
त्रैलोक्यामाजि मात्र प्रियसखि! परि त्या चित्तचोरें[12] असावें,
पत्रीं लोकत्रयींचे पुरुष लिहिन, ते त्वां पहाया बसावें.' १७

लिहिले देवगंधर्वसिद्धचारणपन्नग,

---

१. पूर्वी न पाहिलेला व न ऐकिलेला आणि स्वप्नांत प्राप्त झालेल्या अशा अनिरुद्धें. २. पवित्र कीर्ति जिची अशी. ३. गंगा. ४. गौरीच्या मांडीवर. ५. गौरीच्या वरानें. ६. भर्त्यानें. ७. हे प्रियकरा! कुठें आहेस? ८. पतिवियोगाग्नि. ९. पुष्कळ घाम आणि अश्रु यानीं जिचें शरीर भिजलें आहे अशी. १०. अभिष्ट चित्तानें. ११. मैत्रिणींत. १२. मनोहरें (अनिरुद्धें).

दैत्यविद्याध्रयक्षादि, मनुष्य लिहिले मग. १८

ऐसें हें कुशळत्व अद्भुत कसें कुंभांडजा लाधली?

वाणी विघ्नप चित्रगुप्त इतरा नाहीं कळा साधली;

होती त्या चि पुरांत विश्वजननी गौरी सती, चाकर

क्षाळाया वरदास होय बहुधा पांयांस तीचा कर. १९

मनुष्यांचाठायीं सकळ हि तिनें वृष्णि पहिले,

पैटीं शौरी, त्याचे सुत बळ हरी ते हि लिहिले;

घनश्यामीं कृष्णीं कनकवसनीं चित्त जडलें,

त्रपेंत प्रद्युम्नानन निरखितां चित्त पडलें. २०

ऊषा स्वस्थ स्वचित्तीं, बहुत निरखुनि श्रीनिवासास, राहे,

लाजे, प्रद्युम्न पाहे, जयिं तयिं समजे आपुला सासरा हे.

स्वप्नप्राप्तानिरुद्धाप्रति मग लिहितां वोळखे, आणिला जे

मानी ती कां न हांसे? मुख फिरवि, करी कोप ही, आणि लाजे. २१

कृष्णाचा अनिरुद्ध पौत्र कळतां ती योगिनी धांवली,

शीघ्र द्वारवतीस अंबरपथें जावूनियां पावली;

होता तो तयिं सुप्त, गुप्त उचली पर्यंक चि, त्रासती

ज्याला दैत्य हि, घे करीं जसि सुखें निःशंक चित्रास ती. २२

रक्षी त्र्यक्ष जयासि शोणितपुरीं बाणासुराच्या घरीं,

शुद्धांतीं हि सखी सखींत निजली होती, तिच्या अंतरीं

जो स्वप्नांत शिरे, हरी मन, पळे सिंधूंत दुर्गीं दडे,

त्या चोरास हि चोरिलें चि मुलिनें, दुःसाध्य योगें घडे. २३

पर्यंकासह सत्वर प्रिय सखीगेहांत नेला, दिला,

---

१. विद्याधर. २. यांसि मात्र प्राप्त–पंत. ३. अन्वयार्थ—वरदास पायास क्षाळाया तिचा कर बहुधा चाकर होय. (गौरीप्रसादानें ही विद्या तिला प्राप्त झाली होती हें तात्पर्य). ४. पडद्यावर. ५. लज्जेंत. ६. आणिला च असें जी मानी. ७. आकाशमार्गें. ८. त्र्यंबक (शंकर). ९. अन्तःपुरांत. १०. कठिण स्थळीं, पाण्यांतील किल्ल्यांत.

मोटा मोद हि, साधिती सुहृद जो तो अर्थ संपादिला;
'खंडावा दशनीं नखीं, भुजगुणीं बांधोनियां; आलि[1]! या
तूं सोडूं चि नको,' म्हणे स्मितमुखी, 'चोरा केरा आलिया[2].' २४
इच्छाभोजन पान भक्ष्य शयन स्त्रग्गंध[3] वस्त्रें, उणा
नाहीं एक पदार्थ, कीं बहु दिसां आला सखा पाहुणा.
सांगावें नलगे चि, बाणतनया जाणे मनींच्या खुणा,
नेणे काळ[4], मुकुंदपौत्र भुलला प्राणप्रियेच्या गुणा. २५
करि वश अनिरुद्धस्वांत ती राजकन्या,
सकळ चरित जाणे चित्रलेखा, न अन्या;
पतिरतिसुखलाभें शोभला फार काय,
प्रकटि न परि झांके सौरभोद्गार[5] काय? २६
गृहा जे रक्षाया शुचि कुशळ होते भट[6], कळे
तयां हें; आकारें परहृदय सारें अटकळे;
न तें ठावें झालें, परि नृपतिकन्या यदुहितां[7]
वरी; ऐसें भासे, करि परम अन्याय दुहिता. २७
एकांतीं बद्धपाणी[8] भट कळविति तें वृत्त बाणासुरासी,
ग्राशी तो मोह पावे, सुविमळ कुळ कीं, होय वार्ता सुरासी[9].
[10]जीं झालीं अग्निकुंडें अभिनव कथितां फार अन्याय दूतीं
नेत्रें जातां पहाति प्रकट चि सदनमाजि कन्यायदू तीं. २८
श्रीकांतात्मज काम तत्तनुज हा जो वोतिला[11]सा रसें
[11]भूभृद्भिन्मणिकांतिच्या चि, नयनें तीं [12]स्वर्णदीसारसें,
वक्त्रीं कुंतलकुंडलस्मितसुधाशोभा[13], जऱ्ही रांगला,

१. हे सखि!—पंत. २. हातीं सांपडलेल्यास. ३. चंदन. ४. किती दिवस गेले हें. ५. सुगंधि द्रव्याचा घमघमाट. ६. योद्धे. ७. यादवाना हितकर (आवडता) अनिरुद्ध जो त्यांस. ८. हात जोडून. ९. मद्याप्रमाणें. १०. नेत्रें. ११. इंद्रनील-मण्याच्या कांतीच्या रसानें च ओतलेला असा. १२. गंगेतील कमळें. १३. कुरळ केश, कुंडलें आणि हास्यामृत यांची शोभा.

वक्षीं क्षीराधिच्या तऱ्ही विधु न त्या आस्यापुढें चांगला. २९
उत्कर्षासहन[1] स्वयें भुजंग जे, त्यांहीं रणीं बाहुनीं,
केला श्रीपण[2], तो गमे सुकुतुकें त्या जिंकिला बाहुनीं;
वर्ण श्यामळ, पीत वस्त्र कटिचें, तें कांति दावी जसी
स्वर्णाची बहु शोभवी सुरुचि ती त्या नीरदा[3] वीजसी. ३०
माळा पुष्पमयी विलाससमयीं वक्षस्थळीं लोळली,
कांतेच्या कुचकुंकुमें करुनियां आलिंगनीं घोळली;
या भाग्यें चि जन्हि प्रिया हि उतरे बाह्वंतरीं राहिली,
ती शीता, परि तापदा प्रकट त्या बाणासुरें पाहिली. ३१
ओष्ठीं तांबूलराग, स्मितसुभगमुखीं[4] नर्म[5], हस्तांत फांसे;
क्रीडासक्त प्रिया हि प्रियतमवचनें हर्ष पावोनि हांसे;
भोगस्वेदोदकाचा[6] सुरुचिर मिरवे बिंदुसंदोह भाळीं,
हें पाहे बाण, बाणासुरमुख हि यदुव्यांघ्र[7] तो त्या चि काळीं. ३२
'आला घेउनि शस्त्रपाणि[8] नृपती हा; तृप्ति[9] या ज्या रसें
तें दावूं श्वशुरासि कीं स्वहृदयीं जाणे मला जारसें;'
ऐसें तो अनिरुद्ध जाणुनि मनीं, प्राणप्रिया भी[10], तिला
सांगे, 'धैर्य धरीं, हरील दयिते! शुद्धक्रिया[11] भीतिला.' ३३
स्वकन्येचा ठायीं सदय परि झाला चि विटता[12].'
वृथा कल्पी शुद्धीं नृपति अनिरुद्धीं हि विटता[13];
धराया रायाचे भट झटत येतां चि जवळी
खळघ्नाचा[14] नातू परिघ अरिघातार्थ कवळी. ३४
मर्दी त्यांसि धरावयासि झटतां श्वानां जसा सूकर,

१. सर्प हे जात्या च [अन्याचा] उत्कर्ष सहन न करणारे. २. शोभा मिळविण्याचा पण. ३. मेघास. ४. मंदहास्यानें सुंदर दिसणाऱ्या तोंडीं. ५. विनोद, थट्टा. ६. भोगकाळच्या घर्मजलाचा बिंदुसमूह. ७. यदुश्रेष्ठ. ८. शस्त्रधारी सैनिक. ९. ज्या युद्धरसें या तृप्ति. १०. भय पावे. ११. निर्मलाचरण. १२. कंटाळता झाला. १३. जारता–पंत १४. कृष्णाचा–पंत.

क्षोभे नेणुनि सासरा, परि पुढें वर्णील सासू[1] कर;
तो यत्नांतरदुर्धर[2] स्वरिपु हें जाणोनियां बाण त्या
बांधी घालुनि नागपाश, [3]विधि भाव्यर्थीं जसा जाणत्या. ३५
तो नागपाशीं दृढ बद्ध केला, तातें कृतागस्क[4] धरूनि नेला;
उषा असी ऐकुनि दुष्ट वार्ता, रडे पडे कांतपराभवार्ता[5]. ३६

---

# अध्याय त्रेसष्टावा.

गेली हा अनिरुद्ध घेउनि, तयींपासूनि शोकाकुळा
झाली द्वारवती, नसे चि यदुच्या विश्लेष शोका कुळा;
गेले वार्षिक मास च्यार रडतां, आशा जनाला गती
कांहीं ही न कळे चि, भोग विषसे त्यांच्या मना लागती. १
पायांस ज्याच्या बहु लोक लागती, देवासुरीं वाढवि जो कलागती,
मुनींदु[6] ये, ताप तदा निवे, दिला प्रमोद, वृत्तांत मुखें निवेदिला. २
'आहे हो! अनिरुद्ध शोणितपुरीं, स्त्रीबाहुपाशीं घडे
आधीं बंधन, संप्रति स्वविधिनें तो नागपाशीं पडे;
नामें बाण सहस्रबाहु बळिचा ज्येष्ठात्मज श्रीहर
स्वांगें यत्पुरपाळ तन्निजसुतासंगें[7] बुडालें घर.' ३
ऐसें नारदवाक्य ऐकुनि उठे आधीं महात्मा हळी,
चक्री सात्यकि सांब सारण गद प्रद्युम्न मोटे बळी,
गेले सानुग शीघ्र सैनिक सर्वे अक्षौहिणी द्वादश,
क्रोधी रोधिति सर्व शोणितपुर, प्रख्यात ज्याचें यश. ४
उद्यानें पहिलीं गिळोनि सहसा सेनांबुधी तो पुर-
प्राकारग्रसन[8] क्षणीं च चघळी, अट्टाल[9] ही गोपुरें[10].

---

१. जामातुरनिरुद्धस्य सुताप्राणदः स्वीकारेण—**पंत.** २. अन्य यत्नांनीं धरण्यास कठिण. ३. दैव. ४. अपराधी. ५. पतिपराभवानें व्याकुळ झालेली. ६. मुनिश्रेष्ठ नारद. ७. त्या बाणाची कन्या उषा तिच्या संगानें. ८. शहराच्या तटाचा ग्रास. ९. शिरोगृह. १०. बहिर्द्वार, वेश. (येथें 'गोपर' असें लिहिलें गेलें आहे).

हें पाहोनि सकोप तो परचमूतुल्य स्वसेना रची,
बाण प्राण हरावया, यम तसा, ये, क्षोभला फार चि. ५
त्या काळीं पुररक्षणार्थ सुभट स्थापूनि आंगें वृषां[1]-
कप्यात्मा प्रमथांत्मजादिसह[2] ये युद्धास, कोपे मृषा[3];
साधूंची अतुळें यशोमृतरसें सारी हराया तृषा
लोटी कोटिकरींद्रकेसरिमदप्रध्वंसदक्षा[4] वृषा. ६
प्रभू हि स्वांतीं भी स्वयशउपहासा वरद या,
करी मूढा मत्ता निजचरणदासावर दया;
महाविद्यासंपद्बळमद न कोणासि चुकवी?
नें[5] शिक्षी रक्षी जो स्वरग[6] हि न त्या गाति सुकवी. ७
तो अत्यद्भुत लोमहर्षण[7] रण ब्रह्मादिकांला नवा,
तेव्हां अश्रुतदृष्टपूर्व न कसा अस्मद्विधा मानवा?
भांडे शंकर शौरिसीं न शिवले दोघे तमाच्या[8] लवा,
ऐसे शुद्धयशोमृताब्धि विभु ते, पायीं तयांच्या लवा. ८
त्या बाणासह सात्यकी करि रण, प्रद्युम्न बाहे गुहा[9],
योगी युद्धविलोकनार्थ सहसा सोडूनि आले गुहा.
कुंभांडाह्वय कूपकर्ण सचिव श्रीमद्बळें पाहिले,
हर्यक्षें[10] गजसे उभे धरुनियां धैर्यासि ते राहिले. ९
गांठी बाणसुतासि सांब समरीं, द्वंद्वें असीं शोभलीं,
शस्त्रास्त्रें विखरी[11] अरीवरि निजोत्कर्षार्थ जो तो भलीं;
देवाधीश चतुर्मुखादिक मुनी सिद्ध स्वयें धांवले,
गंधर्वोरगयक्षचारण रण प्रेक्षावया पावले. १०

---

१. शंकर. २. प्रमथादि गया आणि पुत्र कार्तिक स्वामी यांसह. ३. व्यर्थ. ४. कोटिशः हत्ती आणि सिंह यांचा उन्माद घालविण्यास समर्थ अशा नंदिकेश्वरास. ५. स्वरग हि न शिक्षी, न रक्षी त्या सुकवी न गाती. ६. कल्पद्रुमः—**पंत.** ७. अंगावर शहारे आणणारा. ८. तमोगुणाच्या, क्रोधाच्या. ९. कार्तिकेयास. १०. सिंहानें. ११. फेंकी.

भूत प्रेत पिशाच गुह्यक असे अत्युग्र रुद्रानुग
प्रोद्दामप्रमथादि त्यांसि सहसा शार्ङ्गच्युतोग्राशुग
मेघांतें पवमान[1], कीं रविकर ध्वांतांस[2] तेंवि क्षणें
युद्धीं भंगिति, भीति सत्य हरिच्या हस्ती च ते वीक्षणें[3]. ११
इच्छाभुक्तिद दुर्लभ, स्वसदनीं होते निजेले शर
क्षुत्तृष्णाकुळ, तों उदार सहजें ये अन्नपूर्णावर[4],
आणी बाहिर त्यां बळें उठउनी सर्वोपकारी कर
श्रोत्रें[5] शार्ङ्गगुणें[6] हि सत्य म्हणुनीं ते प्रेषिले सत्वर. १२
ते एकाहूनि एक क्षुधित सुतृषित व्याळसे सिद्ध काय?
क्रव्यासृक्प्राण[7] त्यांला पुरतिल, पळती सर्व ही विद्धकाय;
ज्यांची[8] त्यां शक्तिसंख्या न विदित गिळिती वाढणारास कोटि[9];
श्रीशाच्या आश्रितांची[10] अशि समरमखीं देखिली रीति खोटी. १३
शंभु ब्रह्मास्त्र सोडी हरिवरि, शमवी कृष्ण तेणें चि हो! तें,
वायव्याचा हराया बळमद विभुचें सिद्ध गिर्यस्त्र होतें;
अग्न्यस्त्रा तोयदास्त्र प्रकटि पशुपती आपुलें अस्त्र अंतीं,
त्याला नारायणास्त्र प्रभु हि, कुतुक तें देखिलें भाग्यवंतीं. १४
स्वप्रेमें जृंभणास्त्रें हृदयहरगुणें[11] संगरामाजि गौरी-
नाथातें मोहुनीयां, बळितनयबळा ने लयालागि शौरी;
रामानें हि प्रधान क्षितिवरि मुसळें पाडिले साधुमार-
क्रूरेषुव्याप्तबर्हीश्वर[12] म्हणुनि रणक्षोणि सोडी कुमार. १५
सेनेचा नाशभंग प्रकट चि दिसतां, कोपला बाण सोडी

---

१. वारा. २. अंधारास. ३. सिंहाच्या अवलोकनानें. ४. महादेव. ५. कर्णांनें. ६. धनुष्याच्या दोरीनें. (बाण धनुष्याच्या दोरीला लावून कानापर्यंत दोरी ओढून सोडितात याकडे येथें कवीचें लक्ष्य आहे). ७. मांस, रक्त व जीव. ८. ज्यांची शक्तिसंख्या विदित न [ ती ] कोटि त्यां वाढणारांस गिळती. ९. एकास कोटि गिळती–**पंत.** १०. आश्रित जे बाण त्यांची. ११. मनोहारक गुण ज्याचा अशा. १२. मदनाच्या ( प्रद्युम्नाच्या ) कठोर बाणानीं घेरलेला मयूरेश्वर ( कार्तिकेय ).

युद्धीं त्या सात्यकीतें, शर हि हरिशिरीं, भूधरीं वृष्टि थोडी.
हस्तानीं पांचशानीं धरि सुदृढ नवीं पांचशें सज्य चापें,
एकैकीं दोन दोन प्रखर शर, करी युद्ध घोर प्रतापें. १६
तीं चापें एकदा चि प्रभुवर विशिखव्रातें[1] सोडूनि खंडी,
सूताश्वांचे हि आयुर्जलघट[2] घटिकेमाजि सारे उलंडी[3];
वर्षे जैं बाणधाराधर[4] हरि, शिरली बाणदेहांत थंडी,
रक्षावें दोःसहस्रें[5] किति अमितशिरःपादहग्बाहु[6] दंडी? १७
रक्षाया प्राण घाली तनुजँनिस[7] रणीं पाठिसीं कोटरा[8] हे,
पुत्रस्नेहालकैकांबरयुगळ[9] धरी, तो उभा कोटें[10] राहे;
आली सोडूनि अर्धस्नपनविधि, गळे धांवतां वस्त्र वांटे[11],
कीं, वाराया प्रभू ही विधि करि उघडें तें सतीशस्त्र वाटे. १८
बाणाला जेधवां युद्धीं विश्वाचा राय नागवी,
सोडवाया मध्यें आली कोटरा माय नागवी. १९
जों तिर्यङ्मुख[12] होय युद्धसमयीं पुन्नाग[13] वीर क्षण,
स्वस्थानाप्रति ने सुतासि, करि हें ती नागवी रक्षण;
तों माहेश्वर दारुण ज्वर उठे त्याला हि शीतज्वर
व्यापी वैष्णव, तों त्रिमस्तकें[14] जगन्नाथासि जोडी कर. २०
जो माहेश्वर दारुण ज्वर, परी शीतज्वरें तापला,
प्रार्थी, त्या अभयप्रदप्रभु म्हणे, 'संवाद हा आपला
प्राणी आठविल क्षण स्वहृदयीं, त्याच्या न देहा पळ
स्पर्शी त्वत्करदृष्टिचित्त हि करो, सोडूनि गेहा पळ.' २१

---

१. बाणसमूह. २. आयुष्यरूप जलाचे घट. ३. उलथे करी. ४. बाणमेघ. ५. हजार बाहूनें. ६. असंख्य शिरें, पाद, नेत्र, बाहु ज्यास असा विष्णु. ७. पुत्रास. ८. बाणमातेचें नांव. ९. पुत्राच्या स्नेहामुळें मुक्तकेश व एक-वस्त्र या युग्मातें. १०. [कोटरारूपी] संरक्षण करणारी भिंत. ११. वाटेला. १२ बाजूला ज्यानें तोंड केलें असा. १३. पुरुषश्रेष्ठ. १४. ज्वर; याला तीन मस्तकें [व तीन पाय] होतीं.

पराभूतिक्रोधानळमुखकटाहांत कढला,
हठें युद्धोत्साहें नवदृढरथीं बाण चढला;
सशस्त्रें अत्युग्रें उचलुनि भुजांचीं दशशतें
पुन्हा दावी वीर्य प्रभुहरिपुढें मंद शश तें. २२

तो ज्या ज्या स्वभुजें गदेषुपरिघाद्यत्युग्र शस्त्रें अरी
सोडी शौरिवरी, हरी च हरिचें त्या त्या भुजाला अरी;
जाणों बाण वनस्पती, भुज हि त्या शाखा चि, यज्वा हरी,
छेदी चक्रकुठारपाणि समिधा त्या युद्धयज्ञीं करी; २३

पाळी बाणवनस्पतिप्रति सदा जो शंभुमाळी म्हणे
त्या युद्धक्रतुदीक्षिता हरिस, 'हे धर्मज्ञचूडामणे!
आंगें वाढविला दयामृतरसें सिंपोनियां तो कसा,
शाखा सर्व हि तोडितां सकरुणा! वांचेल हो! तो कसा? २४

दास दैत्यपतिचा पण तू तें जाणसी, विनवितों पण तूतें,
कीं रजोगुणज जंतुस हा या योग्य तूं हि नतमंतु सहाया. २५

मत्प्रसाद बहु यावर, दासप्राण मागत असें वरदास,
रक्षिसी तरि महाहित साच, स्कंद जेंवि मज, हा हि तसा च. २६

म्हणे, 'तूझें चक्र प्रकट भुवनीं, आपण अरी,
प्रिय श्रीकांता मीं, म्हणविल जनीं जो क्षण अरीं
न त्या साहे नामेंकरुनि हि परोत्कर्ष पळ, तें
तुम्हां माने, अंगीकृत म्हणुनि आम्हांस कळतें.' २७

महेश्वराची परिसोनि वाणी, स्वचक्र तो आवरि चक्रपाणी;

१. पराभवामुळें [ भडकलेला ] जो क्रोधाग्नि त्याचे मुखरूप कढईत. २. कृष्णरूप सिंहापुढें. ३. चक्र–**पंत.** ४. वृक्ष. ५. यज्ञकर्ता यजमान. ६. चक्ररूप कुऱ्हाड हातीं ज्याच्या असा. ७. शंकर हा च कोणी माळी. ८. युद्धयज्ञांतील दीक्षितास--कृष्णास. ९. धर्मपंडितशिरोमणे! १०. रजोगुणापासून झालेल्या प्राण्यास. ११. मंतु–**पंत.** ( अपराध ). १२. नतांचा अपराध. १३. मोठा शत्रु [ सुद्धां ].

बोले स्वयें ही बहुमानयुक्त श्रोत्यांसि पीयूष चि तें तदुक्त. २८

'शंभो ! विश्वगुरो ! तुम्हीं वदतसा जें कीं दयाशेवधी,[1]
आम्हीं तें चि करूं, प्रिय प्रभु तुझ्या कोण प्रियातें वधी ?
युष्मन्निश्चय मानला मज, न मीं मारीन दासां, बळी
याचा जन्मद हा हि साधु, तुमच्या सद्भक्तिची सांवळी.[2] २९

पूर्वीं च स्वकरें हिरण्यकशिपुप्राणांत केल्यावर,
प्रह्लादासि 'अवध्य अन्वय[3] तुझा ' ऐसा दिला म्यां वर;
दर्पाच्या शमनार्थ निष्ठुर तसा झालों भुजच्छेदना,
चित्तीं तापद दर्पसर्प[4] न बरा, [5]हे थोडकी वेदना? ३०

बाणीं बाहु सहस्र शत्रुशमना जे हे तुम्हीं स्थापिले,
अन्यायी मदशत्रुपोषक[6] चि ते याकारणें कापिले,
युष्मद्दत्तसुदर्शनें खळवधश्रद्धावशें राखिले
च्यार त्वद्भजनार्ह मद्भुज जसे शुद्धें यशें माखिले. ३१

मर्दे नाश हा भाव या बाणला हो ! तुझ्या पार्षदीं[7] मुख्यता बाण लाहो,
भवद्भक्त पावो न भी हा कदापि, न सिंहासि दिग्दंतिची[8] हाक दापी. ३२

ये, पावतां अभय, शीघ्र समीप दास, श्रीजानिच्या[9] बळितनूज नमी पदास;
वारी मुकुंदपदवंदन वेदना, तें सांगे, हरूनि हरिशंकरभेद, नातें. ३३

जामाता अनिरुद्ध सोडुनि सुखें सत्कारिला, पाहिला
प्रेमें पुत्रसमान, कांचनरथीं सस्त्रीक तो वाहिला;
आंगें भेटविला विभुप्रति दिलें अक्षौहिणी सैन्य, हा
बाणप्राणद दे महोत्सव असा सर्वांसि सद्दैन्यहा.[10] ३४

श्रीकंठास तदंघ्रिपद्ममधुपा[11] बाणास शौरी शतें
[12]कांडांचीं लघु ज्यासि दे सुख असें घेवूनि गौरीश तें.

---

१. दयानिधि. २. सावली. ३. वंश. ४. गर्वरूप सर्प. ५. भुजच्छेदजन्या—पंत. ६. गर्वरूप शत्रूला पोसणारे. ७. गणांमध्यें. ८. दिग्गजाची. ९. लक्ष्मीपतीच्या. १०. सज्जनांचें दैन्य दूर करणारा. ११. शंकराच्या चरणकमलास भ्रमराप्रमाणें असणारा जो बाण त्यास. १२. शेंकडों ब्रह्मांड.

आज्ञा देवुनियां पुरीप्रति निजध्येयासि त्या पाठवी,
ऐसें स्पष्ट दिसे, परंतु म्हणति ज्ञाते 'मनीं सांठवी.' ३५

# अध्याय चौसष्टावा.

प्रद्युम्नादिक एकदा उपवनीं क्रीडोनियां भागले,
तान्हेले यदुवीर नीर मग ते शोधावया लागले;
तों निर्जीवन[1] कूप त्यांत सरडा गुंतोनियां राहिला,
सुस्थूळाकृति तो अपूर्व चि तिहीं कौतूहळें पाहिला. १
प्रद्युम्नादिक ते कुमार सदय ख्यात स्वयें विक्रमी.
त्याच्या उद्धरणीं प्रयत्न करुनीं झाले समस्त श्रमी;
दीनोद्धारपटुप्रभूप्रति महाश्चर्यें तदा सांगती,
काढी वामकरें तया सहज, दे जो देव दासां गती. २
पतितोद्धरणीं झाले भग्नसंकल्प बाळक,
प्रार्थितां उद्धरी त्यातें लीळेनें विश्वपाळक. ३
तो दिव्याकृति विश्वपावनकरस्पर्शक्षणीं होय, जें
पीयूषें न दिजे, दिजे सहज त्या पद्मालयातोयजें[2],
त्याचें वृत्त पुसे समस्त, विभु संकल्पें चि जो नैकें[3] वी[4]
ब्रह्मांडें, हृदयस्थ, काय न कळे त्यातें? जना ऐकवी. ४
तो सांगे सर्व वृत्त प्रभुस निजमुखें जोडुनीं भूप हात,
"श्रीमत्पादांबुज्याचा नखमणिकिरणीं स्पर्शिली भू पहात,
तो मीं इक्ष्वाकुराजेश्वरसुत नृग जो स्पर्शतो काय[5] कानीं?
आधीं गातां वदान्योत्तमनृपतियशें[6] सज्जनीं गायकानीं. ५
आज्ञा सर्वेश्वराची म्हणुनि निजमुखें सांगतों वृत्त सर्व,
स्वामी! आम्हीं कुलीन प्रकट, न शिवला स्वप्नकाळीं हि गर्व;

---

१. जलरहित. २. लक्ष्मीचें कमलरूप वसतिस्थान (कृष्ण) यानें-निर्णय०. ३. अनेक. ४. प्रसवे, उत्पन्न करी. ५. ऐकून ठाऊक आहे काय? ६. उदार-श्रेष्ठ राजांचीं यशें.

तूं तों भूतात्मसाक्षी[1], तुज विदित नसे काय बा! यत्युपास्या[2]?
दास्याचा लाभ आहे निजगुणकथनामाजि ही या मदास्या[3]. ६
होतों पूर्वजरीतिनीतिवश[4] मीं साधुप्रिया! या च कीं
कीर्तिश्रीखनि! चित्त वित्त हरिलें माझें सदा याचकीं;
आधीं मन्मतिला जनस्मृति दयासंयुक्त यावि, प्रजा-[5]
शब्दें लागति गोड, सांगति कथा दासासि सद्विप्र ज्या. ७
सत्पात्रीं साधुकाळीं सविधि सविनयें सादरें[6] म्यां सदिष्टें.
गोदानें न्यायलब्धें[7] सकळशुभगुणें अर्पिलीं बा! सदिष्टें.[8]
तत्संख्या स्थूळमानें करुनि जितकिया केशवा! वृष्टिधारा
कीं भूनद्याब्धिमध्यें असतिल सिकता कीं नभामाजि तारा. ८
भूवस्त्राश्वेभ[9]शय्यातिळरजतगृहस्वर्णरत्नादिदानें,
इष्टापूर्तें[10] हि केलीं सकळ निजमनःशुद्धिचीं जीं निदानें;
या मार्गीं वर्ततां जें मजवरि पडलें संकट, श्रीधवा! तें
ऐकावें त्वां स्वनामस्मरणपरजनक्लेशपाथोदवातें[11]. ९
कोणा एका द्विजाची यदुपति! चुकली धेनु, मद्गोधनीं ती
आली, म्यां ब्राह्मणातें न कळत दिधली, राहिली शोधनीती[12];
नेतां भेटे पथांत प्रथमपति[13] तिचा ओळखे आपलीला,
'माझी माझी च' दोघे म्हणत म्हणत ते सिद्ध झाले कलीला. १०
म्हणे स्वामी, 'विप्रोत्तम दिससि, कां पाप करिसी?

---

१. प्राण्यांचें अन्तर्गत जाणणारा. २. यतीनीं उपास्य अशा. ३. माझ्या मुखास. ४. पूर्वजरीतिनीती—**पंत**. ५. प्रजेच्या मुखानें. ६. सभाग्यें—**पंत**. ७. नीतीनें मिळविलेलीं. ८. साधुप्रिय अशीं. ९. इभ=हत्ती. १०. क्रतुश्च यज्ञः कर्म च दानादि तदिष्टशब्दवाच्यम्। पुष्करिण्यः सभावापिदेवतायतनानि च। आरामश्च विशेषेण पूर्तं कर्मणि निर्दिशेत् इतिस्मृतिः॥—**पंत**. (यज्ञ व दानधर्म हा इष्ट शब्दाचा अर्थ; तळीं, सभामंडप, देवालयें उद्यानें वगैरेंना 'पूर्तकर्म' असें म्हणतात). ११. स्वनामस्मरण करणाऱ्या भक्तांच्या क्लेशरूप मेघास वायु अशा त्वां. १२. शोधरूप नीती. १३. पहिला मालक (ब्राह्मण).

कसा ब्रह्मस्वातें[1] निरयगतिलाभार्थ[2] वरिसी?'
प्रतिग्राही[3] बोले, 'निरय अनृतें सत्य, नृग या
धना दे, धर्मात्मा नृप पारि करी जो न मृगया.' ११
आले दोघे हि विप्रप्रवर मजकडे शीघ्र, घेऊनि गाय,
क्रोधें दुःप्रेक्ष्य त्यांचे रविपरिस मला भासले उग्र काय;
त्यांचे म्यां स्वासनास त्यजुनि निजशिरीं वंदिले तप्त पाय,
प्रार्थूनि क्ष्मासुरांतें[4] सविनय वदलों, 'या, बसा, कार्य काय?' १२
केला ज्या मुनिनें प्रतिग्रह म्हणे तो, 'त्वां दिली गाय, कीं,[5]
गावी कीर्ति तुझी पयोधिलहरिस्वच्छा[6] भली गायकीं.'
गोस्वामी हि मला म्हणे, 'बहु भला, हा धर्म कीं गौरव
ब्रह्मस्वापहरा नृगा! तुज चि दे? अन्यासि तों रौरव?' १३
जैं कोपले ब्राह्मण ते अधीत,[7] मीं भ्यालों, बुडाली च मुहूर्त धी तमीं;[8]
म्यां प्रार्थिलें कीं, 'घडला प्रमाद, या दासीं करा जि! प्रभुजि! क्षमा दया.
कृपा करा जी! यश होइल, क्षमी तुम्हीं पिता माय हि, धेनु लक्ष मीं
समर्पितों पाय धरून, कोप हा सुदुःसह, क्षोभ करूं नको, पहा.' १५
गोस्वामी द्विज आयके जइं असा हा मंद बोल, क्षती[9]
तेजाची समजे, म्हणे, 'मज नको अन्या असे लक्ष, ती
माझी गाय मला न देसि, तरि मीं जातों, नृगा! आपला
रक्षावा कुळधर्म' बोलुनि असें गेला चि संतापला. १६
प्रतिग्राही बोले, 'नमुनि मज लक्षा हि उपरी[10]
जऱ्ही देसी गायी अयुत दुसऱ्या ही बहु परी,
नको, राहो हे हि श्रुतिसुरभि[11] टाकूनि, पशुची[12]
स्पृहा केली, हें चि प्रथम घडलें कर्म अशुचि.'[13] १७

---

१. विप्रधनातें (धेनूतें). २. नरकप्राप्त्यर्थ. ३. दुसरा घेणारा. ४. विप्रांतें. ५. म्हणून. ६. समुद्राच्या लाटेसारखी निर्मळ. ७. वेदाभ्यासी. ८. दुःखांत. ९. नाश. १०. लक्षाहून अधिक. ११. वेदरूप कामधेनु. १२. सामान्य पशु गाय इची. १३. अपवित्र.

गेले दोघे हि धेनु त्यजुनि, मग तनुत्याग ही त्यां हि केला,
  याम्यानीं[1] दोषरंभीं धरुनि यमसभेलागिं हा दास नेला;
देवा! तेव्हां यमानें अभिमत[2] पुशिलें कीं, 'नृगा! सांग बापा!
  आधीं तूं भोगितोसि स्वसुकृत, अथवा भोगिसि स्वल्प पापा?' १८
'ठावें पुण्य उदंड, अल्प अघ, हें ताटीं जसा पापड;
  आधीं भोगिन मीं' म्हणें, यम म्हणे मातें 'रसापा[3]! पड.'
तों झालों कृकलास[4] दास गांतिला या पावलों ही नता[5],
  दात्या ब्राह्मणपूजका! स्मृति तुझी होती जन्हीं हीनता. १९
उदंड जन्हि जोडिलें सुकृत तें किती? दर्शन
  प्रभो! मज तुझें असें करसरोरुहस्पर्शन,
अहो! गिरिधरा! खरा सदय तूं हरा[6] सामरा,
  सुदुर्लभ, परात्परा! सुलभ या नरा पामरा. २०
प्रभो! तवपदांबुजीं मधुप जे सदा लोळते,
  जना निववित क्षणें सुखसुधाब्धिकल्लोळ[7] ते,
स्वनाम[8] कमळें, मुनि भ्रमर ज्यांत, नाशी, तळें
  तुझें यश चि, ताप, जें हरि रसें मना शीतळें. २१
प्रणाम तुजकारणें प्रणतवत्सळा! पावना!
  भवत्पदसरोरुहस्मृति असो जगद्भावना[9]!
पदाब्जयुगळीं तुझी सुरभि[10], मानसा वासरीं[11]
  नसो विरह, नीरजांसह जसा नसावा सरीं[12]." २२
आज्ञा घेउनि, वंदुनि प्रभुसि, तो स्वर्गासि गेला नृग,

---

१. यमदूतानीं. २. इष्ट. ३. भूपा नृगा—पंत. ४. सरडा. ५. नीच जन्माला. ६. देवांसह शंकराला. ७. आनंदरूप अमृतसागराच्या लाटा च. ८. स्वनाम कमळें [होत] ज्यांत मुनि [हे] भ्रमर [होत], [आणि] तुझें यश चि तळें [होय]. [तें यशोरूप तळें] ताप (दुःख) नाशी; जें (तळें) [आपल्या] शीतळें रसें (उदकानें) मना हरि (संतोषवी, रमवी). ९. विश्वनिर्मित्या! १०. कामधेनु. ११. चित्तरूप वासरास. १२. कमळ व सरोवर यांचा जसा कधीं हि वियोग नसावा तसा.

गंधर्वीं विभुकीर्तिगानसुरसीं[1] मोहूनि नेला मृग;
ब्रह्मस्वाग्निकणें[2] जळे कुळयशःकर्पूर,[3] हें विस्तरें
सांगे कृष्ण यदूंसि, कीं, न इतरें तीं संकटें दुस्तरें. २३

---

# अध्याय पासष्टावा.

राम द्वारवतीपुरीहुनि सुहृत्संदर्शनाकारणें
गेला सानुग गोकुळासि, घडलें तल्लोचना[4] पारणें;
आलें दिव्य अनंत वैभव पुन्हां, दारिद्र्य जाय, व्रज
स्वर्गा लाजवि, कीं जयांत पद दे सर्वप्रमोदव्रज.[5] १
योगी संसृतिसागरांत म्हणती ज्याच्या पदा सांगडी,[6]
भेटाया प्रभु ये स्वयें सदय तो त्या गोपदासां गडी,
त्या आलिंगिति बंधु धांवुनि, विभू तो तों सुधामेघ, ते
साचे भक्तमयूर चातक बळें झाले रथीं वेधते.[7] २
संतापघ्न वदान्यनाथ[8] वळला प्रेमाचिया जो पिकां,[9]
त्या कारुण्यघनासि भेटति तदा विद्युल्लता गोपिका;
वृद्धांला नमन स्वयें करि, समां[10] आलिंगिलें बाहुनीं,
यातें वंदिति जे कनिष्ठ गवळी ते श्रेष्ठ सर्वांहुनीं. ३
जेव्हां सप्रेम राम प्रणति करि, धरी पाय, त्या नंद नाचे
हर्षें भेटे, हृदब्जीं[11] अवयव भरि तो काय त्या नंदनाचे?
आलिंगी श्रीयशोदा दृढ निजहृदयीं आपलें तोक, थानीं
पान्हा ये, चित्त हिंसें[12] करि, निजविरहें तापलें,[13] तो कथानीं. ४

---

१. प्रभूच्या यशोगानाच्या उत्तम रसामध्यें. २. ब्रह्मस्वरूप अग्नीच्या कणानें. ३. कुळयशोरूप कापूर. ४. गोकुलवासी जनांच्या नेत्रांस. ५. सर्व आनंदाचा समूह. ६. जलप्रवाह तरून जाण्याचें लहानसें साधन. ७. चढते. ८. दानशूरनायक. ९. प्रेमाचें पिक [ उत्पन्न करण्याकरितां ]. १०. बरोबरीच्यांस. ११. हृदयकमलांत. १२. शांत, शीतल. १३. तापलेलें.

अंकीं घेउनि त्यासि तातजननी नेत्रांबुजीं आणिती
आनंदें बहु शीतळामळजळें, अत्यादरें न्हाणिती;
शीत स्वच्छ सुगंध सत्य नयनत्वग्घ्राण[1] तर्पू रसा
पीयूषा[2] हि अवार्य ताप हरि जो, तो केंवि कर्पूरसा? ५
अत्यंतप्रिय गोड शुभ्र भगवान् तो शर्करा मा[3]सिया,
गोपीगोपकुमार वेष्टिति रसप्राप्त्यर्थ रामासि या,
हा तों सत्य अनंत, अंत घडतो त्या सेवितां शर्करे,
राहे सेवकसेव्यभेद[4] हि, न तें येथें, खरा तर्क रे! ६
रामातें म्हणती तदाप्त कुशळप्रश्नादि झाल्यावरी,
"शत्रू मारुनि, जिंकुनी भुजबळप्रख्याति केली बरी;
सिंधूमाजि पु[5]री हि दिव्य रचिली, ज्ञातींस देतां सुखें,
आम्हांला हि वियोगतप्तहृदयां या इंदुकांतें[6] मुखें. ७
अस्मद्विस्मृति तों नसेल चि, परि स्वांतासि वाटे असें,
कीं गेले बहु अब्द[7], शब्द विधिर्लेला हा, विक्रमी हे असे
बाहू कां करिते वियोगदहनग्रस्तव्रजोपेक्षण?
श्रीशक्ती हि दया हि दीपरुचिसी ज्यां[10]ची न लोपे क्षण. ८
बापा! सांग खरें च एक चि, तुम्हां दोघांत कोणा किती
होते आठवत व्रजांतिल, भवत्कल्याण जे भाकिती?
वा[11]टे बा! तुझिया चि संप्रति यशोदा नंद या हे क्रमें
शब्द श्रोत्रपथीं शिरोनि विसरा विध्वंसिती विक्रमें. ९
कृष्णें 'येइन, भेटि देइन,' असी केली प्रतिज्ञा, तिचें

---

१. दृष्टि, त्वचा आणि नाक. २. अमृतास निवारण्यास अशक्य असा ताप दूर करणाऱ्यास कापूर कसें म्हणावें? ३. माझ्या. ४. हा सेवक आणि हा सेव्य असा भिन्नभाव. ५. द्वारका. ६. चंद्राप्रमाणें सुंदर अशा मुखानें. ७. वर्षे. ८. देवाका. ...गीनें गिळिलेल्या व्रजाची उपेक्षा. १०. ज्या बाहूंची. ११. बा! संप्रति ...र्थीं यशोदा नंद या क्रमें हे शब्द शिरोनि विक्रमें विसरा वाटे.

केलें ज्येष्ठपणें चि रक्षण तुवां जैसें निजज्ञातिचें,
तो[1] तूं एक चि बंधुलाभ उघडा, तोटा नसे हा, वेरीं[2]
नेत्रें[3] साधुनि गौर अर्थ जपती कृष्णार्थ ही हावरीं[3]." १०
गोपी रामविलोकनें बहु सुखी झाल्या, तथापि प्रिया
कृष्णातें पुसती, यदर्थ रुसती ज्यांच्या गृहादिक्रिया,
"आहे कीं कुशली ? हरि प्रथम या घोषामधें जो दधी,
अस्मच्चित्त मग प्रयाणसमयीं मूर्तप्रमोदोदधी[4]. ११
देतो कीं पुर[5]सुंदरीजनमनोदृग्वक्त्रपद्माकरा
हर्ष श्रीहरि[6]भानु ? योग्य चि तया तें होय पद्माकरा[7];
बंधूतें स्मरतो कधीं तरि ? पिता माता तरी आठवी ?
हें कैंचें ? स्मृति[8] ज्या निरोप तरि तो दूरस्थ ही पाठवी. १२
रामा ! येइल एकदा तरि हरी मातेसि देखावया ?
ऐसें काय म्हणेल 'साय नलगे, लोणीच दे खावया' ?
आल्या नातसुना हि, तें[9] वय न हें साचें, परी मावली
ते[10] चि प्रीति दया इची, न पहिली ती[11] विक्रिया पावली. १३
सेवा आठवि आमुची कधिं तरी गोष्टींत तो काय जी !?
ज्यांवांचूनि[12] न दे स्मरों गुरुजनांगाराक्रिया[12] काय जी[12];
ज्यासाठीं त्यजिलें सुदुस्त्यज हि जे, अम्हां अशांस त्यजी

---

१. तो कृष्ण. २. श्रेष्ठ अशीं नेत्रें. ३. हावरीं नेत्रें गौर अर्थ (शुभ्रपणा–पक्षीं–बळराम) साधुनि कृष्णार्थ (काळेपणा–पक्षीं–श्रीकृष्ण) ही जपती. कृष्ण केव्हां भेटेल ह्याची वाट पहात आहेत. ४. मूर्तिमंत आनंदसागर असा कृष्ण. ५. मथुरेंतील स्त्रीजनांचीं जीं मनें, नेत्र आणि मुखें हीं च कमळें त्यांच्या समुदायास. ६. श्रीहरिरूप सूर्य. ७. विष्णूला–कृष्णाला. ८. ज्याला स्मृति असते तो दूरस्थ असला तथापि निरोप तरी पाठवितो. ९. तें लोणी, दहीं मागून घेऊन खाण्याचें वय आतां नाहीं. १०. जी बालपणीं असते ती च. ११. ती पहिली (बालपणचीं) प्रीति-दया विकार पावली नाहीं. १२. जी काय अमारक्रिया (गृहकृत्यें) [ती] गुरुजना ज्यांवांचुनि (कृष्णावांचून) स्मरों न दे.

अत्याज्यें[1] त्यजिले म्हणोनि फळला तो दोष हा सत्य, जी! १४
श्रीमद्वक्त्रसुधाकरस्मितसुधाबिंदुसे[2] वर्ण न
द्राक्षामाक्षिकशर्करारस[3] तसा, त्यांचें वृथा वर्णन,
ऐसे[4] ते मृदु नर्मशर्मद[5], जयामध्यें असें बोलणें
कोणां स्त्रींस न आवडे, पढविलें जेणें पिकां डोलणें ? १५
व्याधींचें[6] गान जैसें त्वदवरजनिचे[7] गोड तैसे चि बोल,
स्त्री आम्हीं गोपिका ही वनवसति मृगी त्यांसि मानूं अमोल;
न क्रूर व्याध साधु प्रखरतरशरें काळिजाला चि भेदी,
घे प्राणोपायनातें[8] त्वरित सदय तो कीं असं दुःख नेदी. १६
आम्हीं रानट भूललों, उचित हें कीं ज्यांसि कांजी सुधा
दोन्हीं तुल्य चि, बोल लावित असों रामा! शठाला मुधा.
ज्या हंसी निवडावयासि चतुरा तत्काळ पाण्या दुधा
त्या घेताति कसें कृतघ्नवचन[9] श्रोत्रीं पुरस्त्री[10] बुधा ? १७
हांसेल प्रभु हा मनांत पुसतां हें काय गे! तो कथा
जाणे पुष्कळ चित्रवाक्पटु[11] करी दीप्त[12] स्मितें मन्मथा;
होतां दुःसह मानसांत सहसा दुर्वार मारव्यथा[13]
लज्जा भीति विवेक कोठिल न कां येतील अस्मत्पथा ? १८
आम्हांला सखि! तत्कथा बहु अशा काशास ? अन्या कथीं[14];
ज्या जाणें चि नसे किमर्थ पुसतां ग्रामाचिया त्या पथा ?
आम्हांवांचुनि काळ लोटत असे त्याचा जरी बापि हो!

---

१. सोडण्यास अशक्य असे माता पिता वगैरे. २. शोभायुक्त मुखचंद्रांतील हास्यरूप अमृताच्या बिंदूसारखे. ३. द्राक्ष, मध आणि साखर यांची गोडी. ४. असे ते वर्ण. ५. विनोदानें सुख देणारे. ६. व्याध आपल्या मधुर गाण्यानें श्वापदांस मोहित करितो याकडे येथें अनुसंधान आहे. ७. तुझ्या कनिष्ठ बंधूचें—कृष्णाचें. ८. प्राणरूप नजराण्यातें. ९. कृतघ्न अशा कृष्णाचें भाषण. १०. बुद्धिमती नागरिक स्त्रिया. ११. विनोदी भाषण करण्यांत कुशल. १२. प्रज्वलित. १३. मदन-पीडा. १४. कथन करा.

जातो त्याविण आमुचा हि तारि तो, खोळंबतो काय हो ?!" १९
कोणी वर्णिति आस्य हास्य पतिचें, कोणी मनःकल्पित-[1]
क्रीडानुग्रहकारि कर्णसुखद श्रीजानिचें जल्पित[2];
कोणी विश्वमनोहरेक्षणकळा[3], कोणी सुलीला गती,
कोणी वर्णित वर्णित[4] प्रियपरिष्वंगा[5] रडों लागती. २०
तयांतें[6] कृष्णाचे सुखकर निरोप प्रियतम
स्वयें सांगे राम, प्रभु कुमुदिनीचा प्रिय[7], तम
हरी, नाशी ताप द्युमणिकरतेजें[8] हिमरुची,
तसा स्त्रीसेना हा विनवि, घन भू[9] ती हि मरुची. २१
उरासीं लावूनीं धरुनि हि करानें हनु नय-[10]
प्रवीण स्त्रीनेत्रें पुसुनि करि नाना अनुनय[11];
प्रभु स्वात्मा ही तो म्हणुनि समजावी नतरति-[12]
प्रद स्वांगें नौका विपदुदधिला[13] कां न तरती ? २२
युवतिदृग्भ्रमरीमधु[14] माधव[15] व्रजसुखार्थ वसे, मधुमाधव[16]
क्रमि, करी करुणा स्वजनावरी, विधु चकोरिं करव्रज[17] नावरी. २३
वाहे मंदसुगंधशीत पवन श्रीसूर्यकन्यातटीं[18],
क्रीडे स्त्रीगणवेष्टित प्रभु वनीं मूर्च्छद्भपांशुच्छटीं[19],
केलें नृत्य लतांनटीप्रियतमीं[20] सानंद वृक्षीं नटीं

१. मनानें कल्पिलेल्या खेळामध्यें उपयोगीं पडणारें. २. भाषण. ३. सकळ जगताला मोहित करण्यासारखें पाहण्याची हतोटी. ४. वर्णन करीत करीत. ५. कृष्णालिंगनास. ६. गोपीजनांतें. ७. चंद्र. ८. सूर्याच्या किरणतेजानें. ९. मारवाड देशांतील निर्जल प्रदेश. १०. नीतिकुशल. ११. आर्जव. १२. भक्तजनांस सुख देणारा. १३. विपत्तीरूप समुद्राला. १४. तरुण स्त्रियांच्या दृष्टिरूप भ्रमरीस मधासारखा. १५. बळराम. १६. चैत्रवैशाख. १७. किरणसमूह. १८. यमुनातीरीं. १९. मूर्च्छत्+भप+अंशु+छटा=पसरले आहेत पुष्कळ चंद्रकिरण ज्यामध्यें अशा. २०. लतारूप नटीचे प्रियतम जे वृक्षरूप नट त्यानीं.

बंदी गायक भृंग वर्णिति यशें विश्रांत जीं गोमटीं. २४
सेवासादर दास देव वरुण प्रेषी सुरा सेवना,
ते देवी तरुकोटरांतुनि[1] निघे व्यापी सुवासें वना,
तीचा आणुनि गंध वायु कळवी कीं, 'हे जगद्भावना!
आहे सिद्ध सुधासखी स्वसमर्थी प्या वारुणी[2] पावना.' २५
गेला वृक्षासमीप त्रिजगदधिपती तो रतिप्राणपाजि-
श्रांतस्त्रीतें[3] स्वहस्तें दुरितहरयशोराशि[4] सेवूनि पाजी,
त्या रामाची सुकीर्ति श्रुतिनुत[5] शुचिता लाजवी सत्तपा जी,
तीतें[6] टाकूनि सेवि प्रभु म्हणुनि सुरासक्त जो तो चि पाजी. २६
लज्जा गेह कुटुंब धर्मरुचि भी देहस्मृती ही गळे,
आधीं हांसति बाळ कर्मठ भले होती तयां वेगळे;
तोंडीं शब्द विचित्र, अश्रु नयनीं, पुण्यर्धि[7] सारी ढळे,
कां पीती मदिरा चि मूर्ख? भगवत्कीर्ति प्रिया नाढळे! २७
देहातें विसरे, न मृत्यु हि गणी, हांसे हि, नाचे, रडे,
लज्जा जाय, तुरे चि रीति पहिली, अन्या चि आंगीं जडे,
हें पानव्यसनीं असे सुख, तऱ्ही तें कीर्तिपानीं[8] घडे,
पायीं विश्व पडे, पडे न नरकीं, कां मद्यपां नावडे? २८
कटवम्लक्षारतिक्तप्रमुखरस अशा त्या पदार्थांस माय
स्वेच्छेनें सेविती कीं तृणतिलखलि[9] हें जें रुचे तें हि गाय,
तद्वत्स स्तन्यपानें[10] जगति धरिति ही तुष्टिपुष्टीस काय,
श्रीशाच्या[11] सद्यशें ही भजकजन जगे, अन्यथा योग्य काय? २९

---

१. झाडांच्या ढोलींतून. २. सुरेला वरुणानें पाठविलें म्हणून 'वारुणी' हें नांव प्राप्त झालें. ३. रतिपति मदनाच्या युद्धानें श्रांत अशा स्त्रियांना. ४. पापहारक आहे यशःसमूह ज्याचा. ५. वेदस्तुत. ६. त्या शुचितेतें. ७. पुण्यसंपत्ति. ८. भगवत्कीर्तीचें पान केलें असतां. ९. गवत आणि पेंड. १०. दूध पिण्यानें. ११. मातेनें कांहीं खाल्लें तरी तिच्या दुधानें मुलें जगतात, तसें च ईश्वरानें कांहीं केलें तरी त्याच्या यशानें भक्तजन उद्धरतात हें तात्पर्य.

झाला तो मदविह्वलाक्ष भगवान् जाणों, न वासोहळा[1]
जाणे, भोगिति गोपिका हि विभुसीं, त्या तो नवा सोहळा;
कर्णीं एक चि कुंडल प्रभुचिया, माळा गळां, आननीं
स्वेदांभःकण[2], कामिनींसह फिरे जैसा करी काननीं. ३०
होती यद्ध्यानयोगोचित[3] अमित भवीं जोडिल्या सत्तपानें,
तो झाला वारुणीच्या, इतर नर तसा, स्त्रिगणीं मत्त पानें;
बोलावी तोयकेलीस्तव[4] बळ कळतां कामिनीकाम[5] दासी
कालिंदी ती नये, कीं स्वमनिं समजली मत्त त्यां कामदासी[6]. ३१
कालिंदीच्या मनीं कीं प्रभु परि भुलला वारुणीपानदत्त-
प्राज्यस्पष्टप्रमोहप्रदमदविवशस्वांत[7] हा राम मत्त,
या भावें बोल लंघी, समजलि न तदा तें महापाप, गेला
क्षोभा कारुण्यसिंधु प्रबळबळहळें ओढि त्या आपगेला. ३२
वस्त्राचें करिती करें, करि हळें तैसें चि आकर्षण,
क्रोधें भास्करकन्यकेप्रति[8] म्हणे लोकेश संकर्षण
'पापे! रामनिदेशलंघन[9][10] बरें? ज्या दंडिलें कालि[11] या
रामाच्या अनुजें, गुरुत्व[12] दिधलें त्वां सत्य त्या कालिया. ३३
परम दुःसह हा कुजनां गरज्वलनसा[13] शतधा तुज नागर
करिल तार्क्ष्य[14] चि, तूं खरि पापिणी[15] सुकुटिला मलिना खरि[16] सापिणी[17]'. ३४
धरुनि पाय म्हणे यमुनापगा, 'प्रभुवरा! घडलें मज पाप, गा!

---

१. वस्त्र आणि नांगर याना. २. घर्मोदकांचे बिंदु. ३. ज्याच्या ध्यानाला योग्य. ४. जलक्रीडेकरितां. ५. स्त्रियांचे मनोरथ. ६. इष्टफलद बळरामास. ७. वारुणीच्या पानानें दिला जो प्राज्य (अत्यंत) स्पष्ट [आणि] भ्रांतिप्रद मद त्याच्या अधीन अंतःकरण ज्याचें असा. ८. मूळ पाठ—**मेकैंळकन्यकेप्रति**. *नर्मदेप्रति. ९. बळराम. १०. रामाज्ञेचें उल्लंघन. ११. बहुकाळ न लोटला—**पंत**. १२. वडिलपण. १३. विषाग्नीसारखा. १४. गरुड. १५. मूळ पाठ—**सापिणी**. १६. मूळ पाठ—**वरि**. खरि—गाढवी. १७. मूळ पाठ—**पापिणी**.

मद्वनीं[1] भुवनीं इतर क्षण क्षम नसे, करिं जीवितरक्षण. ३५

गोपस्त्रीमणिमंडली[2] गुरुवरा! माझी प्रिया आलि, यां[3]
पायांतें भजते, महाहित खरें जन्मासि हें आलिया;
सेवेला चुकल्यें जडप्रकृति[4] मीं दासी तुझी शीक्षिता,
झाल्यें सावध, मुक्तिदा! नतपरित्राणक्रियादीक्षिता!' ३६

रामाच्या पदपुंडरीकयुगळीं सेवी रसा पट्पदी[5],
किंवा भक्तसमर्पिता सुतुलसीमाळा चि, कीं तो रदी[6]
लोळे तत्पदशृंखळा चि, अथवा ते देवहंसच्छंदि[7]-
च्छाया किंबहुना दिसे प्रभुपदीं रम्या चि कृष्णानदी. ३७

रक्षिली कीं धरी माथां आर्धीं पाय नदी नता;
सकृप प्रभुचा ठायीं साधी काय[9] न दीनता? ३८

कालिंदीसलिलीं शिरे स्वरमणी घेवूनि जैसा करी,
क्रीडा तो मंदमंथर[10]प्रियतमासंगें महात्मा करी;
जाणों माधव[11] हंस, त्या कुमुदिनी, साजे न हें, तारका
त्या, राकापति[12] राम, हे हि उपमा अल्पा जगत्तारका. ३९

येतां तीरासि नीलांबरयुगळ तया ईश्वरा विश्वपाळा
दे लक्ष्मी कर्णभूषा विनउनि पहिली हेमपाथोजमाळा[13],
स्वीकारी सर्व राम प्रभु, धारि दुसऱ्या जेधवां कुंडला जे
पार्श्वींचे पूर्णपर्वीं[14] कवि[15] गुरु विधु[16] ही देखतां तुंड लाजे. ४०

असे गोकुळामाजि त्या दोन मास, व्रजस्त्री करीति प्रभूसीं विलास;

---

१. माझे रक्षणीं. २. गोपांगनांतील उत्तम स्त्रीसमूह. ३. या तुमच्या (बळरामाच्या). ४. जलप्रकृति किंवा मूढ. ५. भ्रमरी. ६. दंती, हत्ती. ७. ब्रह्मदेवाच्या हंसपक्ष्याची सावली. ८. कालिंदीनदी. ९. किं न संपादयत्यपि तु सर्वमिष्टम्—**पंत.** (काय मिळऊन देत नाहीं? तर सर्व इष्ट मिळवून देते). १०. सुरापानाच्या मदानें मंद झालेल्या स्त्रियांसहवर्तमान—निर्णय०. ११. बळराम. १२. चंद्र. १३. सुवर्णकमळांची माळा. १४. पूर्णिमादिवशीं. १५. शुक्र १६. पार्श्वगतौ कविगुरू चन्द्रश्च—**पंत.** (दोन्ही बाजूंला शुक्र आणि गुरु असा चंद्र).

तान्हीं मानिती मानसीं एक रात्री भल्यां कीं न अर्धक्षणातें सुगात्री. ४१
असी वोढिली सूर्यकन्या हळानें बळानें जगन्नायकानें बळानें,
नदी वक्र तैसी च अद्यापि आहे, कथा सूचवी काय सर्वा जना हे? ४२
हळें वोढूनि कालिंदी आणिली च कुतूहळें
बळें, तैसी भक्तबुद्धि लावावी भजनीं बळें. ४३

---

## अध्याय सासष्टावा.

होता ज्या समयीं असा निजसुखें नंदव्रजीं राम हा,
कारूषाधिप[2] पौंड्रकाख्य नृप तैं दे वृष्णिवीरा महा;
आश्चर्य त्रिजगीं करी श्रवण जो कोण्ही असो तो तया
गंभीरास हि हांसवील चि भवक्लेशांत[3] ही तोतयाँ.  १
'तूं साक्षात् प्रभु वासुदेव धरणीभारास वारावया,
विश्वेशा! अवतार सार धरिला लोकांसि तारावया.'
ऐसी मूढ जन स्तुती करिति ती झाली सुरा माकडा,
मानी सौख्य खरें, दिसे मधु, न त्या मूर्खत्वधामा[4] कडा[5].  २
खाळा जेंवि नृपाळ बाळ करिती, तैसा चि तो कीं शता
मूर्खांमाजि सुमूर्ख आपुलि म्हणे सत्य त्रिलोकीशता[6];
केली दीर्घसटादिवेषरचना[7] ज्या ग्रामसिंहास तो
मत्तेभप्रभुकुंभभंगनिपुणा[8] पंचाननां हांसतो.  ३
ऐसा पौंड्रक मंद बालिशकृतप्रोत्साहनें मातला,
धाडी दूत बळें जगत्पतिकडे, तो द्वारके पातला;
सांगे मूढ निरोप, नेऊनि जसा दुर्गंध वारा सभा-

---

१. शक्तीनें. २. कारुषदेशचा राजा. ३. प्रभुपदेच्छुः प्रभुवेषग्राही—पंत. (प्रभुपदाची इच्छा करणारा कृष्णवेषधारी). ४. मूर्खपणाचें घर च अशा त्याला. ५. डोंगराचा कडा. ६. त्रैलोक्याधिपत्व. ७. [मानेवरील] लांब केशाची रचना. ८. मत्त गजेंद्रांचें गंडस्थल फोडण्यांत कुशल अशा सिंहाला.

स्थानस्थप्रमुला म्हणे बुधजनीं उच्चैःश्रवा[1] रासभा. ४

'कृष्णा! मीं वासुदेव प्रभु अवतरलों धर्मरक्षार्थ एक

स्वामी लोकत्रयाचा, मदितर न असे, त्वां धरावा विवेक;

मिथ्या मन्नामचिह्नें मिरविसि, न तुला योग्य तें सर्व, सोडीं,

ये कल्याणार्थ मातें शरण, जरि असे वांचणें हस्त जोडीं. ५

पूज्यातिक्रमदोषनिष्कृति[2] बरी ही एक आहे, नमीं

पायांतें, अपराध मागिल दयापाथोधि[3] साहेन मीं;

तूं मिथ्या मिरवूं नको, मदभिधाचिह्नें[4] तयां सोडुनीं,

ये मातें शरणीं[5] करासि, अथवा चापीं शरा जोडुनीं.' ६

ऐसें केवळ बाळकत्थन[6] महा आश्चर्य दे, हांसवे

न श्रोत्यां सनृपां, स्मितीं च बहु त्यां गांभीर्यगेहां सवे;

हांसाब्धींत[7] असें न यादवसभे झालें कधीं मज्जन,

स्वीकारी पळ या चि षड्विधरसा[8] निःशंक धीमज्जन[9].

जेव्हां ते परिहासकारणकथा तेथ प्रभूतीं[10] सरे,

त्रैलोक्याधिपति स्वयें मग म्हणे त्या भूपदूतास 'रे!

जा, त्या हें वद, वल्गना करिसि तूं, ज्यांहीं असे सोडणें

चिह्नें चक्रगदादिकें धरिसि तीं ज्यांहीं[11] तयां तोडणें. ८

जेणें या कत्थनातें करिसि वदन तें झांकुनीं गृध्रकंक-[12]

श्येनादिप्राज्यपक्षिच्छदपटलपटें दीर्घनिद्रां[13] विशंक

---

१. उच्चैःश्रवा रासभास म्हणणें तसें पौंड्काम वासुदेव म्हणणें—**पंत.** इंद्राचा घोडा. २. पूज्य भक्तीचें उल्लंघनरूप जो दोष त्याचा निरास. ३. दयासागर. ४. माझें नांव आणि चिह्नें. ५. मां शरणमेहीत्यर्थः—**पंत.** (मला शरण ये, हा भाव). ६. मूर्खांची बडबड. ७. हास्यरससागरांत. ८. हसित-विहसितादि षड्भेदभिन्नो हासरसः—**पंत.** (हसितविहसितादि सहा प्रकारचा हास्यरस). ९. बुद्धिमान् लोक. १०. विस्तृत अशी. ११. ज्या चक्रगदादि चिह्नांनी त्या बाहूंना तोडावयाचें तीं चिह्नें. १२. गिधाड, कंक, श्येन, इत्यादि पक्षी त्यांच्या पिच्छांचा समूह तें च वस्त्र त्यानें. १३. मरण.

रक्तार्द्रक्षोणिशय्येवरि करिसिल तूं, सैन्य हो तें हविष्य
क्रव्यादां युद्धयज्ञीं, निजनृपतिस हें सांग, दूता! भविष्य.' ९

दूतानें कथितां निरोप, पृतना अक्षौहिणी दोनि घे,
मोटें युद्ध करावया प्रभु निघे, हें ऐकतां तो निघे;
याचा काशिपती सखा स्वबळ घे अक्षौहिणी तीन, या
झाला युद्धसहाय; साधु समयीं कां पाठि देती नया? १०

श्रीमद्द्वारवतीगुहेंतुनि निघे श्रीमान् हरी एकटा
गांठी पौंड्रककाशिपादिनृपतिस्तंबेरमांच्या घटां,
पाहे कृत्रिमशार्ङ्गनंदकगदाचक्राब्जविद्युत्पटा
माळारत्नकिरीटकुंडलधरा तार्क्ष्यध्वजा त्या नटा. ११

एवं कृत्रिम तुल्यवेष नृपती तो पाहतां, भासला
सत्य स्वप्रतिबिंब, यास्तव जगन्नाथ स्वयें हांसला;
जैसें घेउनि भूपरूप रिझवी भूपा नट, श्रीधर-
स्वामीतें हि तसें चि हा रिझवितो, जाणों समश्रीधर. १२

श्रीकृष्णावरि शस्त्रवृष्टि बहुधा केली द्विषत्सैनिकीं,
देवानीं अजितेषुशक्तिकुतुकें संप्रेक्षिलीं तें निकीं;
केल्या चूर्ण, मुहूर्त ही न सरतां, अक्षौहिणी पांच त्या,
गेल्या रक्तनदींत, राशि गिरिशां कीं ये-हवीं सांचल्या. १३

सेनासंहार आधीं करुनि मग म्हणे तो जगन्नाथ सोंगा,

---

१. रक्तानें भिजलेल्या पृथ्वीरूप शय्येवर. २. हवनद्रव्य. ३. सेना. ४. कर्ता 'पौंड्रक.' ५. योग्य वेळीं साधुलोक नीतीचा त्याग करितील काय? ६. स्तंबेरमांच्या (हत्तींच्या) समूहाला. ७. कृत्रिम धनुष्य, नंदक नांवाचें खड्ग, गदा, चक्र, कमल, विजेसारखें झगझगीत पिवळें वस्त्र आहे ज्यास अशा. ८. वनमाळा, रत्नखचित मुकुट व कुंडल धारण करणाऱ्या. ९. गरुडध्वज अशा. १०. कृष्णाचें सोंग घेतलेल्या त्या नटास. ११. कृष्णातें. १२. [कृष्णासारखी] शोभा धरणारा. १३. कृष्णाच्या बाणाच्या शक्तीचीं कौतुकें. १४. पाहिलीं. १५. खरोखर. १६. मूळ पाठ–नेल्या. १७. पर्वताएवढ्या. १८. वेषधारी पौंड्रकाला.

'राया! दूतानें जें स्वमत कळविलें, त्यास आलों असों, गा!
सांभाळावीं स्वचिह्नें सकळ हि तुजला अर्पितों कां रिकामीं
ठेवावीं? तूं चि यांतें उचित असमि, हो! न त्यजूं सर्व कां मीं? १४
मूढा! तूं आपणातें म्हणसि म्हणविसी वासुदेवाभिधान,
त्यागीं तें, सैंहिकेया अमृत हि न जिरे, मंदभाग्या निधान;
सेनाब्धी लंघिला, रे! दशवदनहृतस्वाप्रियारत्न राम
स्वांगें रक्षी, तसा मीं वधुनि तुज रणीं सोडवीन स्वनाम. १५
भीतों युद्ध करावया, तरि तुला मीं जोडितों हात, रे!
जो सिंधूसि तरे सुखें भुजबळें तो कां न डोहा तरे?
मूढा! सावध सावध, स्वकर जों पाशा नसे घातला
काळें, स्यां हि सुदर्शना, स्मर हित, प्राणांत कीं पातला.' १६
केला धिक्कार शब्दीं, मग विरथ शरीं, मस्तकच्छेद चक्रें,
तें जाणों पर्वताचें शिखर उडविलें वज्र सोडूनि शक्रें;
काशीशाचें हि बाणीं शिर उडउनि तें तत्पुरीमाजि पाडी,
जाय श्रीद्वारकेला, निज रिपु यश ही दिव्यलोकासि धाडी. १७
पावे ज्या गतिला विरिंचिगुरुचा तो दुर्मती मत्सरी
लोकाधीशगती करूं न शकती त्या सद्गतीची सरी;
नीत्र ध्यान करी सदैव हरिचें, जें सर्वबंधा हरी.
तद्रूपा हि धरी अशास्तव अरी जो, तो हि झाला हरी. १८
साधेना पद, पुण्यराशि रचितां, जें कोटिसंवत्सरीं,
तें हस्तावरि ज्याचिया सदभिधावेषग्रहीं मत्सरीं,
त्याची कोण कवी कसी किति कधीं सत्कीर्ति वाखाणिल?
प्रांतप्राप्ति सुदूर, उंदिर कसा भूभृद्‌‌वा खाणिल? १९
मूर्धा काशिपुरींत काशिपतिचा बाणें जसा पाडिला

---

१. म्या कृष्णानें सर्व आयुधें कां त्यजूं नये? २. राहूला. ३. ब्रह्मदेवाचा बाप जो कृष्ण त्याचा. ४. बरोबरी. ५. कृष्णाचें नांव आणि वेष ग्रहण केल्यानें उत्पन्न झालेल्या वैरानें. ६. समीपदेशप्राप्ति. ७. गिरीन्द्रास, मोठ्या पर्वतास.

वातें पंकजकोश, दूत बहुधा सांगावया धाडिला,
पौरस्त्रीतनयास शोक करिती जाणोनि नाथक्षया,
संस्कारी विधिनें सुदक्षिणें[1] पितृप्रेतक्रियादक्ष यां[2]. २०

ऐसा निश्चय तो सुदक्षिण करी कीं, 'मीं पित्याच्या ऋणा
तातघ्नासि वधूनि वारिन' असें हस्तें न होतां घृणा[3].
बापाची तनुनिर्विशेष[4] चि असे जी पुत्रपिंडीं घृणा[5],
तीतें नाठवि जो, तयासि न बुधीं सत्कार, जो ही तृणा. २१

सोपाध्याय सुदक्षिण स्मरहरा विश्वेश्वरा भूतपा
आराधी; भजकासि दर्शन हि त्या दे, मान शंभू तपा.
'वत्सा! काय अभीष्ट? माग,' म्हणतां मागे सुतुष्टा वरा
साधूंच्या निजतातघातकवधोपायाख्य दुष्टा वरा. २२

ज्याच्या सार्थुमुमुक्षुसार्थ[6] चरणांभोजार्चना लागतो,
'इच्छा सांग' म्हणे वदान्य भगवान्, त्या वत्सला मागतो
तो दुर्धी[7], तदभिन्नकृष्णनिधनोपाय[8] स्वयें सांगणें;
देणें दुर्घट ईश्वरास हि पडे, मागे असें मागणें. २३

'ताताला उठवा' असें हि म्हणता, देवूनि तें, 'घे दुजें
वत्सा! इष्टवरायुतायुत[9] पुन्हां बा! मागणें हें तुजें
थोडें' जो म्हणणार आपण अशा देवा वदान्या पहा
मागे काय कसें! सुदक्षिणें पणीं[10] आणी उणें पाप हा. २४

बोले तो अष्टमूर्ति[11] ज्वलननयन, 'रे! चिंतिता पाव काजा,
साधील क्षिप्र मूर्त प्रमथसहित[12] त्या आर्जवीं पावकीं[13], जा;

---

१. काशीपतीचा पुत्र. २. पित्यातें—**पंत.** ३. लज्जा—**पंत.** ४. स्वशरीरतुल्य. ५. दया—**पंत.** ६. मुमुक्षुसाधूंचा समूह. ७. दुर्बुद्धि. ८. तद्रूप कृष्णाच्या मरणाचा उपाय. ९. इष्टवरांच्या आयुतांचें अयुत (अनंतवर असा अर्थ). १०. सरलत्वीं उदारत्वीं—**पंत.** ११. शंकर. (पंचमहाभूतें, सूर्यचंद्र व यज्ञकर्ता अशा शंकराच्या अष्टमूर्ति आहेत). १२. प्रमथादि गणांसहित. १३. अग्नीतें.

अब्रह्मण्यास[1] कृत्यानेळ[2] कवळि पळें, तो महाकोप योजीं
शक्यार्थी[3] तूं, मदुक्तिस्मृति सतत असो हे तुझ्या हृत्पयोजीं[4]? २५
कृष्णाच्या निधनार्थ उक्तविधिनें वैश्वानरा तो यजी,
अत्युग्राकृति पूरुष प्रकट त्या कुंडांतुनीं होय, जी!
हस्तीं उग्रतर त्रिशूळ, नयनें तुंडें हि अंगार वी,
वर्णावें बहु काय? लावि कर त्या तप्ता न अंगा रवी. २६
धांवे भूतचमूसह ज्वलन तो जाळावया द्वारका,
पावे पावक, पौर पाहुनि तया स्वप्राणसंहारका,
भीती सांगति, 'रक्ष रक्ष' म्हणती आपद्गतोद्धारका,
केलें हें श्रुत अक्षकेलिसमयीं[5] देवा जगत्तारका. २७
अक्षक्रीडा न मोडी व्यसनिजन तसा तींत[6] नाहीं च गोडी,
भीतास त्राण जोडी, प्रभुसि विदित कीं पावकीं शक्ति थोडी,
विप्रांच्या ज्यास कोंडि[7] प्रणति करुनियां टाकिती सर्व खोडी,
दुर्वासा हात जोडी 'शरण' म्हणुनि ज्या त्या स्वचक्रासि सोडी.[8] २८
ज्याला ज्वालाकरालानल[9] हि, विसरला योजिलें काज, ज्याला
श्रीमत्कृष्णोदयाद्री[10] अरिरविसें[11], पुसे कोण त्या काजव्याला?
त्या चक्राचि प्रभूच्या अमित कविजना वर्णवे काय भा[12]? जी
कोट्यर्कांहूनि उग्रा, दुरुनि हि शिवतां वह्निचा काय भाजी. २९
ज्वलच्चक्रज्वालापटपरिवृतें[13] होरपळती
बळें भूतांचीं[14] तीं जव करुनियां थोर पळती,

---

१. ब्राह्मणांच्या अहितकर्त्यास. २. राक्षसी अग्नि. ३. जेथें प्रयोग सफल होईल अशाचे ठायीं. ४. हृदयकमळांत. ५. द्यूत खेळत असतां. ६. अक्षक्रीडायां नास्त्येव रुचिस्तर्हि क्व यत आह भीतेति—**पंत.** (द्यूतामध्यें आवड नाहीं च तर कोठें आवड आहे?—उत्तर—भ्यालेल्या आप्तांचें रक्षण करण्यांत). ७. कोटि. ८. येथें अंबरीषाख्यान अनुसंधेय आहे. ९. ज्वालांनीं भयंकर असा अग्नि. १०. श्रीमत्कृष्णरूप उदयपर्वत. ११. शत्रुरूप सूर्यास. १२. कांति. १३. धगधगीत सुदर्शन चक्राच्या ज्वालारूप वस्त्रानें वेष्टित. १४. प्रमथादि गणांचीं.

दुवग्रस्तारण्य[1] त्यजुनि सकुळ व्याळ पळतो,
पळे तैसा, थारे न दहन असत्काळ[2] पळ तो. ३०
पळे मार्गे, चित्तीं धरुनि भय कोपा दहन, न
क्षण प्रेक्षी, वाटे करिल रथतत्पाद[3] हनन;
शिखी[4] तो दुर्वासा द्विज जटिल[5] बह्वाश[6] यजनीं[7]
फळे[8] भीतोपास्य[9], स्ववशं न यदीयाशय[10] जनीं. ३१
लागे पाठीस चक्र प्रखरतर, पळे धाक घेवूनि कृत्या[11],
तार्क्ष्यत्रस्ता भुजंगी विषखनि पळती उग्रजाति प्रकृत्या[12];
कैंचें उग्रत्व आतां? अरिहरि[13] हरिणी, घे परित्रास गा! ती.
श्रीकृष्णा! विघ्नविघ्ना म्हणुनि कवि तुझ्या सच्चरित्रास गाती. ३२
चक्रानें भंग केला म्हणउनि खवळे फार, दूरूनि लक्षी,
धांवे वेगें कपोताप्रति झडपि बळें ज्यापरि श्येनपक्षी,
व्याघ्री जैसी क्षुधार्ता अशन न मिळतां आत्मतोकास भक्षी;
कृत्या सर्त्विक्स्वभक्ता[14] गिळि, भगवद्‌री जो तया कोण रक्षी? ३३
आधीं ईश्वरवाक्यलंघन करी, सन्नाशवांछा धरी,
सत्क्षेत्रीं अभिचारकर्म[15] हि वरी, कोपे[16] विचारावरी[16],
दे थोरास बळें भरीस कुमती, होय प्रभूचा अरी,
त्याला योग्य चि ती खरी गति, सहायांला हि झाली बरी. ३४
द्विजसहित तो कृत्याग्नीनें सुदक्षिण टोळसा
सहज गिळिला, राहे त्याचें न भस्म न कोळसा.
दुरित चि तया ग्रासी, होति स्वमित्र रिपू रुषा[17]-

---

१. दुष्ट हत्ती किंवा सर्प. २. दुर्जनांचा काळ. ३. रथपादश्चक्रमित्यर्थः-पंत. ४. अग्नि. ५. जटायुक्त [पक्षीं] ज्वालामय. ६. बहुभक्षक. ७. यज्ञीं. ८. फळला. ९. भयग्रस्तांचा उपास्य देव. १०. ज्यांचा [दुष्ट] मनोभाव स्वाधीन असतो. (पूर्ण होईल च अशी खात्री नसते, हा भाव). ११. कृत्यानळ. १२. स्वभावतः. १३. चक्र हा च सिंह. १४. ऋत्विजांसहवर्तमान स्वभक्तसुदक्षिणाला. १५. हिंसा कर्म. १६. विचार सोडून देई, हा भाव. १७. कोपाविष्ट.

कुळ, कुमतिसि जो व्यर्थ द्वेषी जगद्धितपुरुषा. ३५

अमितरिपूभूपांचे नेले लया असु दर्शनें,
खवळुनि दिलें तें त्या वाराणसीस सुदर्शनें;
प्रळयगति न स्वप्नीं पाहे प्रिया स्वपुरी, तिला,
कळवि बहुधा चक्रव्याजप्रभु[1] क्षयरीतिला. ३६

विनिवारुनि विघ्न, वृष्णिशक्रप्रभुपार्श्वस्थितिसक्त[2] होय चक्र;
धरि केवळ तेथ सौम्यरूपा, भजती जेंवि कुलीन वीर भूपा. ३७

## अध्याय सदसष्टावा.

भौमाचा[3] स्वसखा कपि द्विविद, जो सुग्रीवमंत्री बळी,
मैंदाचा निजबंधु, तो सखिवधक्रोधें[4] जगास च्छळी,
घालावि प्रभुसीं च गांठि म्हणुनीं दाटूनि काढी कळी
पाहे रैवतपर्वतीं सुहृदरिभ्राता[5] महात्मा हळी. १

आधीं दूरुनि ऐकिलें सुललितश्रीरामगीतामृत,
स्वर्गीं ही न तसें, उणें अमृत, कीं झाले चि पीतां मृत.
आला वानरता त्यजूनि, वरिता जाला बरी एणता[7],
कां घेतां हरिता[8] प्रभू? न धरिता त्यक्ता जऱ्ही[9] नेणता[10]. २

होता गात स्त्रियांत प्रभु करुनि सुरापान जैसा सुराप,
क्रीडासक्त स्वभक्तस्वरगम[11] भगवान् योगियां जो दुराप;

१. चक्राचे रूपानें आलेला शंकर. २. यादवश्रेष्ठ श्रीकृष्णाच्या पार्श्वभागीं सक्त. ३. नरकासुराचा. ४. नरकासुर–**पंत.** ५. कळ. ६. मित्राच्या शत्रूचा भाऊ बळराम. ७. हरिणत्वं, हरिणः किल गीतमनुसरति निःशंकं–**पंत.** (त्या वानरानें वानरत्व ( चपलपणा ) टाकून देऊन हरिणत्व पतकरिलें. हरिण गानलुब्ध असतात हे सर्व जगप्रसिद्ध आहे ). ८. सिंहत्वं–**पंत.** ९. वानरता–**पंत.** १०. मूर्खः–**पंत.** त्या मूर्ख वानरानें पुन्हां जर वानरतेचा स्वीकार केला नसता तर प्रभु बळरामानें सिंहत्वाचा स्वीकार कां केला असता? ११. कल्पतरु–**पंत.**

जैसा कीं हस्तिनीसीं कनकनगवनीं[1] वासवाचा करीनें[2]
क्रीडे, पाहोनि त्यातें द्विविद मनिं म्हणे, ‘ नाश याचा करीन.’ ३
नाचे शाखिशिरीं[3], उडे, किलकिलाशब्दें तया रैवता
तो शाखामृग[4] गाजवी, खळ न भी रामा जगद्दैवता.
त्यातें पाहुनि रौहिणेयरमणी[5] हास्यप्रिया हांसती,
हालापानमदाकुल[6] प्रियतमा संकोचती कां सती? ४
जों जों हांसति त्या सती, कपि करी तों तों न चेष्टा उणी,
जैसें सुज्ञसभाप्रसाद[7] दिसतां, दावी गुणातें गुणी,
भ्रूभंग द्विज[8] दाखवी, किचकिचे, नाचे जसा भांड[9], [10]ही
चेष्टा स्वल्प विभू हि देखत करी सर्वांकडे गांड ही. ५
भ्यावें जया प्रभुसि निर्जरसत्तमानीं दावी तया गुद कपी मदमत्त मानी;
संसारसिंधुतरणें तारि कां न नौका हे आश्रिता? करि निजाहित काननौका[11].
पाहोनि चेष्टा बहु राम कोपला, हाणी कपिप्राणविनाशको पला[12],
प्रभूत्तमक्षिप्त[13] खडा हि तो पवी[14], त्यातें चुकावूनि बळास कोपवी. ७
चुकउनि सहजें चि श्रीबळास्तोपळाला[15],
कपि हरुनि सुरेचा कुंभ ही तो पळाला;
त्रिभुवनपति जो कीं वंद्य जीवां, कुल्यांतें
द्विविद कुमति त्यातें दाखवी[16] वांकुल्यांतें. ८
फोडूनि मद्यघट दाखवि खर्परा मीं ऐसा असा कळवि मर्कट दर्प रामीं,
जात्या कपी अयुतनागबळ[17] प्रभूतें[18] केलीं रणें, गणिल काय बळप्रभू तें? ९

---

१. मेरु-**पंत**. २. गजेंद्र—ऐरावत. ३. वृक्षस्कंधावर. ४. वानर. ५. बळरामाच्या स्त्रिया. ६. हाला=मद्य. ७. प्रसाद=प्रसन्नता. ८. दांत. ९. विदूषक, भाट. १०. भ्रूभंगादि चेष्टा-**पंत**. ११. अरण्यवासी—रानटी. १२. पाषाण-**पंत**. १३. बळरामानें फेंकलेला. १४. वज्र-**पंत**. १५. रामानें फेंकलेल्या खड्याला. १६. देहलीदीपवदुभयत्र संबध्यते-**पंत**. “दाखवी” हें पद देवडीवर लाविलेल्या दिव्याप्रमाणें दोन्हींकडे (कुल्यांतें व वांकुल्यांतें या पदांकडे) संबंध ठेवतें. १७ दहा हजार हत्तींचें बळ ज्यास. १८. बहुसंख्य-**पंत**.

आर्धीं फोडुनि वारुणीघट, पट स्त्रींच्या[1] बळाचे हरी,
  वृक्षीं नेउनियां बसे खळ, जसे गोपाबळांचे हरी[2];
नामें[3] तुल्य असोत, रूप गुण ते कोठें? मनःकामद
  श्रीशाची सरि ये कसी? सुवसनें फाडी; धरी कां मद? १०

धृष्टत्वें कपि तो अतिक्रम करी, भीना मनीं, नाकरी
  वेडेचार, म्हणोनि राम सहसा त्या ज्ञानहीनाकरी
स्वीकारूनि सुनंद[4]लांगल करीं, चित्तीं हि कोप, प्लवा[5]
  खाया व्याळ तसा, उठे परिहराया स्वप्रजोपप्लवा[6]. ११

तो हि उपडुनि घे कपि शालीं[7], मृत्युचा न तिळ धाक पिशाला;
  ताडितां बळ शिरावरि साहे; साधुची सहनता परिसा हे. १२

सोसूनि प्रथम प्रहार, मुसळें रामें शिरीं हाणिलें,
  आघातें निबिड क्षणार्ध तम तन्नेत्रांगणीं[8] आणिलें;
तन्मूर्धक्षतजें[9] रणोत्सवमुखीं त्या मर्कटा न्हाणिलें,
  ग्रीष्मांतीं गिरिगैरिकीं[10]शिखर तें वज्रें जणों खाणिलें. १३

उडे रक्त व्योमीं कपिशिरिं पडे जें मुसळ तें,
  जळप्रक्षेपानें क्वथितघृत[11] जैसें उसळतें;
अशा ही पीडेतें न गणुनि बळाढ्यें मग मगें[12]
  तदन्यें[13] आघात प्रभुवरि हि केला गगनगें[14]. १४

मंदरा धरि विभू मुसळा या, शत्रुसिंधुसि बळें घुसळाया,
  तद्यशोमृतरसार्थ कराया, तृप्त भक्त करि सार्थक राया!. १५

---

१. स्त्रीकटकाचे–**पंत**. २. श्रीकृष्ण. ३. हरिरिति कपेरपि नाम–**पंत**. ("हरि" हें वानराचें हि नांव होतें). ४. सुनंदनामक नांगर. ५. दुर्दर–**पंत**. बेडकास. ६. उपप्लव=उपद्रव. ७. शालवृक्षाला. ८. नेत्रप्रदेशीं. ९. त्याच्या मस्तकांतून निघालेल्या रक्तानें. १०. पर्वताचें मेरुमय शिखर. ११. कढविलेलें तूप. १२. वृक्षानें. १३. पूर्वगृहीतान्येन प्रथमस्य प्रभुशिरःपाते एव चूर्णीभूतत्वात्–**पंत**. (पूर्वीच्या वृक्षाहून अन्य वृक्षानें, कारण पहिला वृक्ष बळरामाच्या मस्तकावर पडतां क्षणीं च चूर्ण झाला होता). १४. आकाशचारी वानरानें.

त्या ही नगा मुसळ तें [1]शतकोटि खंडी,
फोडील मेरुस हि जो शतकोटिखंडी,
'रे! वानरा! तरुचि काय कथा रणा रे!?
यासीं न लक्ष सुरनायक थारणारे'. १६

घेता झाला तथापि द्विविद पुनरपि स्थूलशा पादपाला,
त्याचा काढूनि टाकी सकळ हि सहसा तो [2]महानाद पाला,
धांवे हाणावयाला, तंव बळ मुसळें, जेंवि नागा [3]शिखंडी,
स्पर्शापूर्वीं च पूर्वद्रुमसम समरीं [4]दुर्जनागासि खंडी. १७

ऐसा राहे वनीं न द्रुमवर समरीं आणिलें ज्या न [5]कीशें,
[6]पौलस्त्यें प्रेरिलें तें निजबळ मथिलें कीं बळें जानकीशें;
एवं केले चि चूर्ण प्रभुवरमुसळें टाकि जे तो [7]पलाशी,
जाणों अद्रि [8]प्रतिश्रुन्मिष करुनि म्हणे, 'कां कपे! कोपलाशी?' १८
गेले वेचुनि त्या वनांत पडला तोटा [9]अगा, राशिला
तेजाच्या मतिकीर्तिनीतिकरुणाश्रींच्या अगारा शिला
हाणी, भंग करावया क्षितिधरीं[10] तो मेघ वर्षो [11]पळ
स्थायी, पुष्कळ ही न [12]भूभृद्दहिता होतील [13]वर्षोपळ. १९
नामो[14]च्चारें चि खंडि स्वभजकसुकृती सिद्धिला अंत राया!
होतो त्या जेंवि उग्रप्रबळनिजविधिप्रेरिता अंतराया;
[15]कीशक्षिप्ताश्मवर्ष प्रभुवर मुसळें तेंवि भंगी क्षणांत,

---

१. वज्र. २. मोठा शब्द करणारा. ३. मयूर. ४. दुष्टस्य प्रहरणीभूतं तरुं-**पंत.** (दुष्टानें शस्त्र म्हणून घेतलला वृक्ष). ५. वानरानें. ६. रावणानें. ७. वृक्ष. (पलाशी=पानें ज्यास आहेत तो). ८. प्रतिध्वनीचें मिष. ९. वृक्षा. १०. बळदेवे भूधरे भगवति-**पंत.** (बळरामरूप पर्वतावर). ११. क्षणभर. १२. पर्वतांचा नाश करणाऱ्या. १३. गारा. १४. राया! [जेणें] सिद्धिला अंत होतो त्या उग्रप्रबळनिजविधिप्रेरिता अंतराया स्वभजकसुकृती नामोच्चारें चि जेंवि खंडी [तेंवि]. १५. वानर-**पंत.** वानरानें केलेला दगडांचा वर्षाव.

क्रीडे[1], न क्रोध, ज्या त्या अरुणरुचि अनुक्रोशसंगीक्षणांत. २०
कोंदे पाषाणचूर्णी गगन बहु रणीं, उत्सवीं त्या बुक्यानीं[2],
क्रोधें तो कीश तालप्रभुभुज[3] विभुचें वक्ष ताडी बुक्यानीं;
तेव्हां टाकूनि रामें हळ मुसळ बळें अंगुळींच्या[4] चि जत्रु-
स्थानीं[5] पीडूनि लीलेकरुन चि वधिला सत्प्रजादेशशत्रु. २१
यद्देहीं अयुतद्विपेश्वरबळ[6] क्रीडे असा तो हि तें
साहेना पळ जत्रुपीडन, वमे नासाननीं लोहितें[7];
वज्रच्छिन्ननगेंद्रशृंगसम[8] जें प्रेतत्व पावे गळे,
झाले कंपित रैवतक्षितितरु श्रीवृष्णिपा वेगळे[9]. २२
आले होते विमानीं बसुनि सुरमुनीसिद्ध गंधर्व, युद्ध-
क्रीडा पाहोनि झाले मुदित, जय तिहीं वर्णिला तो विशुद्ध;
पुष्पांची वृष्टि केलि प्रभुवरि, नमिलें दुष्टसंहारदक्षा,
आज्ञा घेवूनि जातां स्वपति विनविला, 'विश्व ऐसें चि रक्षा.' २३
रामाहूनी हि रामस्वभुजविजय तो विक्रमी सत्य लोकीं,
रामें न स्यंदनीं ही तंव पद विजयें ठेविलें सत्यलोकीं.
बैसे आधीं दिगंतीं विजय, मग रथीं देव विश्रांति पावे,
पूर्वी विश्वीं जयश्री, बळ तदनु[10] पुरीं[11], पाय त्याचे जपावे. २४

---

१. क्रीडामेव कृतवान्न युद्धं, युद्धोत्साहहेतुः क्रोधोऽपि न, तर्हि भगवन्नेत्रयोरक्तिमा कुत इत्यत उक्तं जात्येति । कृपासंगिनोर्नेत्रयोर्याऽरुणरुचिः साहजिकेति–**पंत**. (बळरामानें सहज लीला केली, युद्ध केलें नाहीं. तसें च युद्धांतील उत्साहजनक क्रोध हि त्यास आला नाहीं; मग त्याचे डोळे लाल कां ? तर ते जातीचे तसे च होते. नेहमीं दृष्टि दयापूर्ण असल्यानें तिचे ठिकाणीं लाली ही साहजिक च होती). २. पटवासकः–**पंत**. बुक्का. ३. तालवृक्षासारखे मोठे भुज ज्याचे असा. ४. बोटांच्या. ५. गळसरीचे हाडीं. (जत्रु=गळ्याजवळचें हाड). ६. दहा हजार गजेंद्रांचें बळ. ७. रक्त. ८. वज्रानें तोडलेल्या पर्वतशृंगाप्रमाणें. ९. बळ एव न च कंपे–**पंत**. (बळराम मात्र कांपला नाहीं). १०. तदनंतर–**पंत**. ११. द्वारकापुरांत.

# अध्याय अडसष्टावा.

संपन्ना शुभलक्षणीं बहु बरी जी लक्ष्मणा[1] विश्रुता
ती सांबें हारिली स्वयंवरगता दुर्योधनाची सुता;
साधूंच्या विधिच्या मनास रुचलें, तें कौरवां नावडे,
यक्षांसीं निधिसाधिल्यासह[2] जसा अत्यंत दावा पडे. १

ते दुर्बुद्धि सुयोधनादि म्हणती, 'कन्या अकामा[3] हरी,
बांधा अर्भक दुर्विनीत धरुनीं, ही रीति नाहीं बरी;
लावावा न धरावया उशिर त्या धृष्टा मुनीचा पळ,
व्रीडा हे तनुजा सकीर्ति हारिली विस्तारुनीं चापळ[4]. २

ऋक्षीच्या[5] शावकाला वरिल कसि नरव्याघ्रकन्या[6]? बळानें
नेली आम्हांसमक्ष, त्यजुनि भय, कुळायोग्य केलें खळानें;
बांधावा तो धरूनि त्वरित निजसुता सोडवावी लहानी.
दुष्टाचारीं[7] क्षमा ती निजविमळयशीं स्पष्ट दावील हानी. ३

ते वृष्णी करितील काय धरितां सांबा कुमारा? मही
आम्हीं त्यांसि दिली कृपा करुनियां, राजे असें नाम ही;
हा त्यांचा चि महापराध; शिशुला शिक्षा न केली न या
रीतीनें शिव[8] कीं कुरूत्तमसुता भंगूनि नेली नया. ४

येतील स्वसुतार्थ धांवुनि तऱ्ही वृष्णि स्वयें सर्व ही
वार्ता ऐकुंनि[9] यां करीं धरुनियां शस्त्रें, मनीं गर्व ही,
प्राणायामनिरुद्ध[10] इंद्रियगण क्षीणत्व पावे तसें
त्यां होईल, न साधिली अविनतें स्रोतःकृपा वेतसें[11].' ५

ऐसें योजुनियां सुयोधन उठे, तन्मित्र[12] आधीं सजे

---

१. दुर्योधनाच्या मुलीचें नांव. २. निधि नेणाऱ्याबरोबर. ३. [वराची] इच्छा न करणारी ४. धाष्टर्य. ५. अस्वली जांबवतीच्या पोराला. ६. नरेंद्राची मुलगी=राजकन्या. ७. दुर्जनाचे ठिकाणीं. ८. कल्याण. ९. ऐकुनिया (?). १०. प्राणायामानें रोधलेला. ११. प्रवाहाची कृपा न साधिली तर वेतसाचें जसें होईल तसें त्या वृष्णींस होईल. १२. दुर्योधनाचा मित्र राधेय कर्ण.

राधानंदन, यज्ञकेतु तिसरा, दोघे महेष्वास[1] जे
नामें भूरि[2] शैल[3], स्वयें कुरुवर श्रीभीष्म धांवे, कसा
सर्वज्ञ व्यसनीं उपेक्षिल निजध्येयात्मजा[4] लोकसा[5]? ६
गेले सहा[6] वीर हस्ती हरि[7]शिशुवरि ते, तद्रथांगोत्थ[8] दूर
ध्वान श्रोत्रीं शिरे, तैं मुरडुनि निरखी त्यांसि तो सांब शूर,
आले युद्धार्थ ऐसें समजुनि करिता जाहला सज्ज चापा,
ठाके मार्गीं कराया प्रकटतर अचिंत्यार्भक[9] स्वप्रतापा. ७
हरि[10] त्वरित धांवती, तदपि हाकिती सारथी,
'अरे! शिशु! उभा उभा' म्हणत पावले सहा[6] रथी,
शरप्रकर[11] वर्षती, घन जळें जसीं पर्वतीं;
विलोकिति कुतूहळें समुनि देव गंधर्व तीं. ८
तो कुमार यदुवंशमंडन स्वाशुगीं[12] करि अरीपुखंडन[13],
दाखवी अतुळ हस्तलाघव क्रव्यभुग्बळग[14] जेंवि राघव. ९
वेदांती नास्तिकानीं, हरिशिशु अथवा वेष्टिला दिग्द्विपानीं,
कीं सेनानी[15] रणांत स्वरधिपरिपुनीं[16] वेष्टिला निष्कृपानीं,
उद्दाम स्वप्रताप प्रकट करि, धरि त्रास कां? सांब लावी
त्यांला[17] लज्जामल, ज्या धनुसि, वरि शर क्रोध, युद्धा बलावी. १०
वर्णावें करलाघव प्रभुचिया त्या सूनुचें काय कीं?
कर्णाद्यस्त[18]समस्तबाणनिकर च्छेदूनियां सायकीं

---

१. महाधनुर्धर. २. बाल्हीकात्मज सोमदत्ताचा पुत्र भूरिश्रवा. ३. दुर्योधनाचा बंधु. ४. निजदैवत श्रीकृष्णाचा पुत्र सांब त्याला. ५. परक्यासारखा. ६. सहा. ७. सिंहाच्या छाव्यावर—कृष्णात्मजावर. ८. त्याच्या रथाच्या चाकांचा ध्वनि. ९. अचिंत्य जो कृष्ण त्याचा पुत्र. १०. घोडे. ११. बाणसमूह. १२. आपल्या बाणानीं. १३. शत्रूंच्या बाणांचें खंडन. १४. राक्षसांच्या सैन्यांत स्थित असा. १५. कार्तिकस्वामी. १६. इंद्रशत्रुराक्षसानीं. १७. त्या कर्णादिक सहा योद्ध्यांस लज्जारूप मल (डाग) लावी व धनुष्यास दोरी लावी. १८. कर्णादिकानीं फेंकलेला सर्व बाणांचा समूह.

विंधी सर्व तुरंग सारथि रथी अर्धक्षणीं, पारणीं
दृष्टींचीं पुरवी बहु प्रकटुनीं बाहुप्रतापा रणीं. ११
तेज दुःसह चि सिंहशावकीं, दाहशक्ति जसि अल्पपावकीं,
[1]ते मनीं म्हणति, 'कृष्णसा पहा, काळ बाळ, तन्हि कृष्णसाप हा.' १२
'[2]वेषें ही आपणाला यदुपतिसुत हा धर्मयुद्धीं न आटे'
वाटे दुर्योधनाला, बहुत चि कठिन, क्रोध चित्तांत दाटे;
वाटेला सज्जनांच्या त्यजुनि करि असें ज्या मळें कीर्ति [3]कांटे
फाटे धूर्तां हि जेणें कुळकुशळ [4]धरी रुग्ण होवूनि [4]खाटे. १३
चौघानीं त्वरित चहूंकडूनि यत्नें सांबाचीं मग वधिलीं तुरंगरत्नें;
सूताचा वध करि एक, एक चाप च्छेदी, तैं सुरमुनि पावले चि ताप. १४
एवं ते कर्ण दुर्योधन खळ समरीं धर्म[5]सद्योधरीती,
त्यागूनि, प्राज्ययत्नें विरथ मनु[6]वशें व्याळसा तो धरीती,
देवर्षि द्वारकेंत प्रभुसि कथि, म्हणे, 'हंस फांसां बकांहीं
काकांहीं बद्ध केला, न सुनय गणिला कौरवीं सांब कांहीं.' १५
आज्ञापी उग्रसेन प्रभु कुरुपतिच्या शासना यादवांतें,
आज्ञावात क्षणांत प्रबळतर करी दुःसहां या [7]दवांतें;
रक्षाया कुर्वरण्य [8]क्ष्मिवर करुणामेघ राम प्रभू त-
च्छांत्यर्थ [9]क्षिप्रें वर्षे स्वजन[10]कुशळकृत्सामनीर प्रभूत. १६
साधु ब्राह्मण वृद्ध मान्य यदुच्या वंशांत जे शोधक
न्यायाचारसुनिष्ठचित्त समयीं सद्बुद्धिचे बोधक,
त्यांहीं [11]वेष्टित राम कांचनरथीं बैसोनियां तो निघे,
लज्जाभार शिरीं ग्रहावृत शशी [12]तत्कांति पाहोनि घे. १७

१. भीष्मकर्णादिक. २. [शस्त्र-] वृष्टीनें. ३. काटून जाई, लिप्त होई. ४. कुळकुशळ बाजेस धरी=कुरुकुळाचें कुशल क्षयिष्णु झालें. ५. चांगली धर्मयुद्धाची रीति. ६. मंत्रवश—पंत. ७. वणव्यांला. ८. क्षमाशील जनांत श्रेष्ठ. ९. लवकर. १०. स्वजनांचें कल्याण करणारें सामरूप जल. ११. ग्रहांनीं वेष्टित जसा चंद्र तसा द्विजांनीं वेष्टित बलराम. १२. रामाची कांति.

पावे सत्वर नागसाह्वयपुरा[1], दूरूनि पाहे, रची
नीतीतें, उतरोनियां उपवनीं तो राम बाहेर चि,
जाणाया नृपभाव, उद्धव पुढें सांगावया पाठवी,
चित्तीं पुत्रपराभवास हि सुहृद्भावास ही आठवी. १८

वंदी उद्धव वृद्धभूमिपतिस द्रोणास भीष्मा कृपा,
भेटे सादर बाह्लिकास विदुरा, त्या ही नृपा निष्कृपा;
सांगे त्यांप्रति तो बळागमन, तें ऐकोनि ते[2], 'तूं जनां[3]
देहीं[4] पूर्णतिथिप्रदोष' म्हणती सारूनियां पूजना. १९

'आला राम कुशळस्थळीहुनि' असें सांगे तयां तो यदा
भीष्मादिप्रियभक्तचातकशिखी[5] त्या भेटती तोयदा.
पूजी शिष्य[6] सुयोधन, प्रभु करी तत्पूजनस्वीकृती,
बोले तें स्वजनीं सुधा त्यजुनि जें पीती मनस्वी कृती. २०

'ऐका हो! सर्व आधीं स्थिरमति, मग तें आचरा क्षिप्र, भूमी-
नाथांचा नाथ आज्ञा करि असि सकळां उग्रसेनप्रभू, मीं
आलों सांगावया कीं सुहृदहित न हो, हें मनीं वागवावें,
आप्तीं आप्तांस, लावि व्यसन न कर जों, तों बळें जागवावें. २१

आधीं सांब कुमार धार्मिक, तया एका अनेकीं बळें
धर्मत्याग करूनि जिंकुनि तुम्हीं केलें निबद्ध छळें[7];
हें वृत्त क्षणदुःसह प्रभुमना, आम्हीं तऱ्ही साहिलें,
कीं ऐक्य स्वजनीं असो स्थिर, भवद्वृद्धांकडे पाहिलें.' २२

बोले ईश्वर आपणा उचित जें बोलावया तें चि, ते
भक्त प्राशिति, हंस मानससरीं मुक्ताफळें वेंचिते.

---

१. हस्तिनापुरास. २. भीष्मादिक. ३. आम्हां जनांस. ४. देहवान् राका· प्रदोषस्त्वं यथा तमनुअमृतकरदर्शनं तथा त्वामनुरामदर्शनं-**पंत.** ( मूर्तिमंत पूर्णिमेचा सायंकाळ तूं, ज्याप्रमाणें त्या सायंकाळानंतर चंद्रदर्शन तसें तुझ्या पाठीमागून बळरामाचें दर्शन). ५. मोर. ६. बळराम हा भीम व दुर्योधन ह्यांचा गदागुरु होय. ७. कपटानें.

काकीं नित्य अमेध्य[1]सेवन किजे आम्रद्रुमाच्या पिकीं[2]
   घ्यावें शर्म[3] हि मंजु[4] बोलुनि जना द्यावें वसंतीं [5]पिकीं. २३
जे कीं झांकुनि नेत्र तुंड पडती पक्षी मृताचेपरी,
   त्यांला बोल नसे चि, निष्ठुर विधी हा घात त्यांचा करी;
वर्षे चंद्र सुधा, चकोरकुळ हीं पी, वायसांचे[6] अरी
   त्या राकारजनींत जागृत हि, त्यां[7] काकास्रवांछा[8] खरी. २४
यद्वाक्यश्रवणीं धृतादरजना सत्यादिकीं गौरव-
   प्राप्ति स्पष्ट तया अनादरिति हो! दुर्बुद्धि ते कौरव;
सांबोपद्रववारणार्थ बहुधा पंचाक्षरी[9] तो पती
   सिद्धांचा पढला सुमंत्र, म्हणुनी ते भूत कीं कोपती. २५
अंधाचे सुत बोलति प्रभुपुढें ते मंद ऐसें, 'अहा!
   काळाची सुदुरत्यया गति खरी, आश्चर्य वाटे महा,
पादत्राण हि कीं शिरीं सुमुकुटस्थानीं पहातें चढो!
   वांछी विप्रसभेंत बैसुनि पदीं शुद्ध श्रुतीतें पढो! २६
आम्हीं वाढविलें, नृपासन दिलें, कीं सोयरे हे पृथा-
   काकीचे निजबंधु; जाय अमृत व्याळांसि देतां वृथा.
केले आत्मसमान, मान दिधला शय्यासनीं, भोजनीं,
   ते आम्हांसि निलाजरे यदु पहा आज्ञापिती हो! जनीं! २७
शुभ्रच्छत्र सुचामर व्यजन[10] हीं चिह्नें किरीटादिकें
   या वृष्णींस पुरे नसे, करुनियां आतां उपेक्षा, नि कें,
आम्हांला चि विलंघिति, स्वसमते जे आणिले सोयरे,
   कर्णा! सर्प सुधासुतर्पित डसे जें तें खरें होय रे! २८
कर्ण द्रोण पितामहार्जुन इहीं नाहीं दिलें, तें बळें

---

१. अपवित्रपदार्थभक्षण. २. पुष्पफलोद्गमीं पिकांत. ३. सुख. ४. मधुर. ५. कोकिलानीं. ६. घुबडपक्षी. ७. त्या घुबडांस. ८. कावळ्याचें रक्त पिण्याची वांछा. ९. मंत्रवेत्त्यांचा पुढारी. १०. पंखा.

कैसें सेविल शक्र ही पडति यद्गात्रें[1] भयें[2] वेंबळें[3]?
तो मेष द्विरदांतकाननगतग्रासग्रहाची[4] स्पृहा
सांगा केंवि धरी? धरी तरि न कां पावे यमाच्या गृहा?' २९
वंश ख्यात, धराधिपत्य हि, शत भ्राते वरश्रीमदें[5]
मेद्यें या खळ माजले, न नमितां त्या ईश्वराचीं पदें,
ऐसें फार अवाच्य बोलुनि गृहा गेले उठोनि, प्रभु
क्षोभे, कांपति तेधवां बहु भयक्रोधें हि सद्विप्रभू[6]. ३०
जात्या कर्पूरदुग्धप्रभ[7] पारि परमक्रोधसंतप्त शोण-
च्छाय[8] श्रीमूर्ति झाली, स्वजन हि भय घे, वक्त्र पाहेल कोण?
हांसे कोपांत उच्चैः प्रभु, नवल करी क्रोधबाधार्त, 'राष्ट्र
ग्रासाया वह्नि आला' सुर म्हणति 'कसे वांचती धार्तराष्ट्र?' ३१
हांसे राम, म्हणे, "अनेकविध जे विद्याकुळश्रीबळ-
ज्ञात्यादि श्रमहेतु दुर्मद, इहीं उन्मत्त होती खळ;
दंडावांचुनि शांतिला न धरिती, ऐकोनि बोला, कुडें.
तें यत्नांतर, मातले पशु वशा येती अहो! लांकुडें[10]. ३२
झाले होते चि सज्ज प्रबळ यदु युवे, कृष्ण ही, नाश शांचा[11]
ऐशांचा जो कराया, निपुण हरि[12] जसा शक्तिहीनां शशांचा;
त्यांतें वारूनि यत्नें कलिदवशमना[13] धांवलों अब्दसा[14] मीं;
तें केलें धार्तराष्ट्रीं विफळ सकळ ही, आणिला शब्द[15] सामीं. ३३
ज्यांचीं आकल्प[16] देती निरयगति फळें या प्रकारें हि खोटीं
ज्ञाताज्ञातें हि दैवें जरि घडति अघें मेरुहूनीं हि मोटीं,

१. ज्या इंद्राचीं गात्रें. २. [कौरवांच्या] भयानें. ३. लुली? ४. सिंहाच्या मुखांत गेलेला ग्रास घेण्याची. ५. श्रेष्ठ जो संपत्तीचा मद तद्रूप मद्यानें. ६. साधु, ब्राह्मण आणि पृथ्वी. ७. कापूर आणि दूध यांसारखा. ८. रक्तवर्ण छाया जिची अशी. ९. निरर्थक. १०. दांडक्यानें. ११. शर्मशातसुखानि च इत्यमरः—**पंत.** (सुखांचा). १२. सिंह. १३. कलिरूप दावाग्नि तस्य शमनार्थ—**पंत.** १४. मेघासारखा. १५. दोष. १६. प्रळयकाळपावेतों.

साहों तें हि 'क्षमस्व' स्वरिपु जरि म्हणे, कां सुहृन्मंतु[1] पोटीं
　घालूंनां? त्यां हि आम्हां तृणसम गणिलें निंदिलें आजि थोंटीं.　३४
वधिति परि हृत्पद्मीं ऐसे न सायक लागती,
　प्रखरवचनें हीं यां इष्टा[3] चि काय कलागती?
करिति कुमति प्राणत्राल्याचिया अवमानना,
　न निरखिति यासाटीं ज्ञाते कधीं अवमाननना[4].　३५
जो भोजांधकवृष्णिनायक, सदा ज्याची शिरीं वाहती
　आज्ञा सादर लोकपाळ, न कधीं मानाकडे पाहती,
तो नोहे प्रभु उग्रसेन? करुनि स्नेहानुकंपा दिलें
　आम्हां हें पद कौरवीं! यश बरें लोकांत संपादिलें!　३६
स्वर्भूषा[5] शतमन्युपुण्यफळ[6] जी साक्षात् सुधर्मा सभा[7]
　जेणें आक्रमिली, जसी दिनकरें पूर्णामृतांशुप्रभा[8],
ज्याच्या स्वस्तरुपारिजात हि वसे कांतानिवासाजिरीं[9],
　त्याला योग्य नव्हे नृपासन म्हणे, हीं बोलणीं साजिरीं!　३७
जींचे ब्रह्मादि दास, त्रिभुवननमिता, संपदाहेतु देवी
　पद्मा पद्मालया[10] हि त्यजुनि सतत यत्पादपद्मासि सेवी,
तो ही कीं छत्रशंखव्यजनमुकुट जीं भूपचिह्नें अशांतें
　नोहे योग्य, त्रिलोकी तरि मिरवितसे भूषणीं यद्यशांतें.　३८
ज्याचा पादसरोजरेणु[11] मुकुटीं देवांचिया उल्लसे[12],
　तीर्थोपासक शुद्ध जे मुनि, मनीं त्यांच्या चि जो कीं बसे,
आम्हीं श्रीविधिशंभु सेवित असों, ज्याच्या कळेच्या[13] कळा[13],
　तो ही देव नृपासनोचित नव्हे! लज्जा चि नाहीं खळा!　३९
होतें कीं मन उद्धवा! परिसिलें हें बोलणें, कौरवीं

---

१. मित्रांचा अपराध. २. नीचानीं. ३. या खळांसि-**पंत.** ४. नीचाननासि-**पंत.** ५. स्वर्गास भूषण अशी. ६. इंद्राच्या पुण्याईचें प्रत्यक्ष फळ च. ७. देवसभा. ८. पूर्णचंद्राची कांति. ९. सत्यभामेच्या घराच्या अंगणांत. १०. कमळरूप स्वस्थानातें. ११. चरणकमलधूलि. १२. शोभे. १३. अंशाचा अंश.

वृष्णींला निजभूमिखंड दिधलें, [1]हे योग्य या गौरवीं?
पादत्राण यदु, स्वयें शिर कुरु, श्रीमंत दाते, [2]कवे!
आम्हां दुर्जनशासनव्रतधरां ऐसें कसें ऐकवे?'' ४०
क्रोधावेशें उठे तो, [3]क्षणविधृतलयार्काग्निशीलांग [4]लांसी
पादस्पर्शें महीस, प्रभु बळ कवळी दुर्धरा [5]लांगलासी;
तेणें तें दुर्जनाचें नगर चि सगळें उंचलीलें खणोनीं,
घालावें पालथें त्या [6]निकटगतटिनीकुक्षिमध्यें म्हणोनि. ४१
नौकासी च पुरी तिला बुडविता जैसा असावा तसा
गंगामग्न करावया बळ बळी क्षोभे असा वातसा;
ऐसें पाहुनि 'रक्ष रक्ष' म्हणति त्राणेच्छु ते कौरव,
स्वामीचीं नमिती पदें, चुकविती जीं चिंतितां रौरव. ४२
करी दया त्या शरणागतांवरी, स्वलांगल क्रोध हि राम आवरी;
नमस्कृतीचें बळ केव्हडें पहा, निवे [7]लयार्काग्न्यतुळप्रताप हा. ४३
दासीदासरथाश्ववारणसुता सांबोचितोपायन
त्यात्या अर्पुनियां, सुयोधन नमी सोडी हि तो पाय न;
रामें ही दिधलें नतासि अभय स्वीकारुनीं सर्व तें,
वांचावें चि कसें [8]पदाशनिपुढें पापाचिया पर्वतें? ४४
घेऊनि गेला स्वपुत्र स्नुषा, राग टाकूनि, तो देहधारी [9]तुषारांग
पावे निजद्वारकेला, कथी सर्व वृत्त क्षया ज्यांत नेला [10]असद्दर्प. ४५

---

१. यादव–**पंत.** २. हे पंडिता उद्धवा!–**पंत.** ३. क्षणभर धरला आहे प्रलयाग्नीचा स्वभाव ज्याच्या अंगानें असा. ४. भार्जा. ५. नांगरासी. ६. जवळ च वाहणाऱ्या यमुनानदीच्या डोहांत. ७. प्रळयकाळच्या सूर्याग्नीसारखा अतुळ प्रतापी. ८. भगवतः पदतळचिह्नीभूतं वज्रं–**पंत.** (ईश्वराच्या तळपायावरील रेषात्मक वज्र). ९. हिमगिरिः तत्तुल्यःस्थैर्यभूभृद्गुरुत्वदेवताश्रयत्वामलत्वादिधर्मैः–**पंत** (हिमालय, त्याच्यासारखी स्थिरता, पर्वतांमध्यें [पक्षीं] राजांमध्यें श्रेष्ठता, देवतांचें राहण्याचें ठिकाण व निर्मळपणा वगैरे धर्मांनीं). १०. दुष्टांचा गर्व.

# अध्याय एकोणसत्तरावा.

ज्या भौमें नरकासुरें हरुनियां भूपादिकन्या खळें
  नेल्या ष्यष्टसहस्र[1] तो वधुनियां श्रीयादवेंद्रें बळें;
त्या स्त्री आणुनियां पुरासि, वरिल्या एका मुहूर्तीं करें
  नानारूपधरें जगत्त्रयकरें[2] लीलाकरें श्रीकरें. १
ऐसें ऐकुनि नारद प्रभुसि त्या देखावया ये, पुरी
  पाहे लेश[3] हि जीपुढें सुरपुरीश्रीची न राहे उरी;
जीमध्यें नवलक्ष रत्नकनकप्रासाद[4], जी योजनें
  बारा, जो सुखभोग दुर्लभ सुरां तो सेविजेतो जनें. २
सारा असारा निवडूनि चोकस द्विजांत[5] जे निर्मळ मानसौकस[6],
  ते सांगती, 'काळ सुखें सरो, वरा पुरी न हंस त्यजिती सरोवरां.'[7] ३
वृंदें श्रीद्वारकेच्या रमति उपवनीं त्या सरंभाप्सरांचीं,
  तीरें हंसावतंसें[8] विलसति अमृतैकोपलंभाप्सरांचीं[9];
गातां सप्रेम आम्रीं हरिचरितमया गद्यपद्या पिकानीं,
  गंधर्वश्रेष्ठ, 'गाणें' म्हणति 'परिशिलें हें न अद्यापि कानीं.' ४
उद्यानीं हित सत्य गोड वदती जे ते स्थळीं सारिका,
  वर्णाया हरिचीं यशें चि विधिचीं झाली तशी दारिका[10],
कानीं आयिकतां चि मूढ विषयी दुर्बुद्धि टाकी, रते
  सन्मार्गीं, उपदेशिती उपवनीं ऐसें सदा कीर[11] ते. ५
नांदे वल्लभ[12]पुत्रपौत्रसहित श्री रूपिणी[13] आपण,

---

१. १६ हजार. २. त्रैलोक्य निर्माण करणाऱ्या. ३. अवशेष. ४. मंदिरें. ५. पक्ष्यांत. ६. मानससरोवरवासी. ७. श्रेष्ठ हि नगरी न त्यजिती, [ पण ] सरोवरा त्यजिती. ८. हंसभूषित. ९. अमृतस्योपलंभका आपो जलानि अमृताधिक मधुराणि अमृतेच्छारहितैरपि सद्भिः सेव्यानि येषु सरस्सु—**पंत.** (अमृताचें निंदक पाणी म्ह० अमृतापेक्षां हि मधुर असें पाणी, ज्याना अमृताची हि इच्छा नाहीं अशा संतजनानीं सेवन करण्यासारखें ज्यांमध्यें आहे अशा सरोवरांत). १०. कन्या (सरस्वती). ११. पोपट. १२. प्रियकर कृष्ण, पुत्र व नातु यांसह. १३. साक्षात् लक्ष्मी स्वतः.

द्रव्याधीशसमृद्धिला मिरविती, तेथें न कां आपण?
जो तो सादर हस्त जोडुनि म्हणे ‘ मन्मंदिरा या च कीं ’
आर्धीं दुर्लभ भेटतां विधिबळें मोव्या मिळ्या याचकीं. ६
लावण्य त्रिदशीं किती? तदधिकश्री पौर विद्या कळा
सर्वां सर्व हि जाणती, प्रभुपदीं त्या अर्पिती सत्फळा,
तें वैकुंठ चि, नाममात्र दुसरें स्वीकारिलें द्वारका,
ऐसें आवडलें, जसें तदधिपा वृष्णित्व सत्तारका. ७
कांता अष्टसहस्र साष्टशत ज्या लोकेश्वराच्या, नवीं
त्यांचीं कांचनरत्ननिर्मित गृहें, तैसीं सुरीं दानवीं
नाहीं आयकिलीं हि, निर्जरनदीस्रोतें जया जानवीं
प्रासादांसह तो हि मेरु न तुळे, हें मानिलें मानवीं. ८
विप्र श्रीमत्तमहरिगृहप्रांगणीं, जेंवि सोमें
व्योम त्यागी, हळु चि उतरे तों, भजे ज्यासि सोमें;
तो मर्त्येशापरि मुनिस या पाहतां सेज सोडी,
जोडी हस्त, प्रणतिविषयीं दाखवी फार गोडी. ९
प्रार्थूनि श्रीमुकुंद त्रिदशमुनिस त्या बैसवी स्वासनीं च,
श्रेष्ठत्वस्थान तो चि द्विजवर, बहुधा देव तो दास नीच;
प्रक्षाळी पाय त्याचे, उदक धरि शिरीं रुक्मिणीच्या हिता तें
अर्पी, ब्रह्मण्यदेवें कुशळ शिकविलें स्वर्धुनीच्या हि ताते. १०
प्रेमें पूजुनि, हस्त जोडुनि, म्हणे, ‘ आम्हांस हीं पावलें
दावाया अजि! विश्वतारक! तुम्हां स्वामी! बरें फावलें;
जाला धन्य कृतार्थ वंश यदुचा, केली दया, वासरीं
जोडा नांहिं च, भेटली बहुदिसां हे गाय या वासरा. ११

---

१. हाट–**पंत.** ( बाजार ). २. देवांपेक्षां अधिक शोभा ज्यांस असे. ३. साधूंचें रक्षण करणाऱ्या द्वारकाधिप कृष्णास. ४. एकशें आठ. ५. देवनदीचे प्रवाह च ज्याना यज्ञोपवीतें. ६. चंद्र. ७. शिव–**पंत.** ८. राजाप्रमाणें. ९. ब्राह्मण-हितचिंतक व गंगेचा पिता अशा कृष्णें. १०. दिवसाला.

तुम्हीं कल्पद्रुम स्वामी, पूर्ण हा आमचा करा
मनोरथ, स्वयें सांगा स्वसेवा काम चाकरा.' १२
म्हणे देवर्षी, 'तूं स्वजनसख जागा[1] खळदमीं,
असें जाणें, ध्यातों तव पद सुविद्याफळद मीं;
जगत्पाळा! देवा! विधिहरगुरो! पूजन मना
न दे आश्चर्या, कीं शिकविसि करूं तूज नमना. १३
वीणागानरुची, नसे जपतपीं निष्ठा, सदा मोकळी
वाणी सूचक[2] हि भ्रमे जनिं वनीं, लावी बळें जो कळी,
ऐसा ही परि गौरवार्ह जन हा यद्दासभावें, न हो
त्वत्पादांबुजविस्मृति क्षण, सुखा अन्यें न पावेन, हो!. १४
द्यावें हें चि विभो! अभीष्टवरदा! देवा! तुझीं पावलें
चित्तीं नित्य असोत, सर्व म्हणजे या याचका पावलें.
प्रेमें गायिन युष्मदद्भुतयशें, नाचेन युष्मज्जनीं,
पावो निर्वृति[3] याद[4] यादवपते! पाथोधिच्या[5] मज्जनीं[6].' १५
ऐसें प्रार्थुनि माधवासि, मुनि तो तेथूनि अन्यालया
गेला, कौतुक तेथ हि स्वभजका दावी जगत्पाल या.
खेळे उद्धवकामिनीसह विभू ढाळूनियां अक्ष[7], तें
पाहे नारद ज्याचिया मनिं मुखीं याचीं यशें अक्षतें. १६
अक्ष त्यागुनि पाहतां चि विनयप्रत्युद्गमें[8] वंदनें
ब्रह्मण्यें नवदर्शनोत्सववशें श्रीदेवकीनंदनें
पाद्याद्यर्चन आदरें करुनियां, जोडूनियां अंजली,
'स्वामी! काय निदेश यास?' म्हणतां देवर्षिधी रंजली. १७
पावे विस्मय विप्र, तेथुनि उठे, पाहे गृहीं तो तिज्या,
तेथें खेळवितो मुलें, प्रियतमाकर्णीं[9] सुधा होति ज्या

१. दुष्टशासनीं जागृत. २. चहाडखोर. ३. सुख. ४. जलचर प्राणी. ५. समुद्राच्या. ६. स्नानामध्यें. ७. फांसे. ८. विनयानें सामोरा जाऊन. ९. प्रियेच्या कानीं.

त्या गोष्टी वदतो, सतोष हंसतो, वाखाणितो तन्मती,
  ज्यांच्या सुश्रवणीं सुखें निरुपमें लक्षावधी जन्मती. १८

कोठें त्या मुनिसत्तमें निरखिला उद्युक्त तो मज्जना,
  कोठें [1]पंचमखादिंत प्रभु दिसे, कोठें द्विजां सज्जनां
भावें तर्पितसे सुधाधिकरसें अन्नें प्रसन्नें मनें,
  कोठें तृप्तिस दाखवी उरलिया अन्नाचिया [2]जेमनें. १९

संध्योपासन मौन मंत्रजप या कर्मीं च कोठें असी
  मोटी आवडि दाखवि प्रभु, करीं कोठें धरूनीं [3]असी
[4]सच्चर्मा हि [5]कृपाणमार्गगतिचा अभ्यास दावी रसा
  वीराख्या मिरवी [6]रवींदुकुळजस्वामी, नवा नीरसा. २०

कोठें भूषित वाजिवारणरथारूढ स्वमित्रांस हा
  घेऊनि प्रभु वासुदेव मिरवे [7]आपन्नवित्रासहा;
पर्यंकीं निजला असे हरि, तया [8]बंदी कवि प्रायशः
  [9]स्वर्गींसे स्तविती क्षणें, निववि तें त्या साधुविप्रा यश. २१

मंत्रीसज्जनउद्धवादि सुमती नीतिज्ञ, जे तारणीं
  लोकांच्या पटु, [10]मंत्रें त्यांसह करी तो शत्रुजेता रणीं;
कोठें दाखवि नीरकेलिरस तो घेऊनि योपा हरी,
  चित्ताला मुनिच्या मुकुंद कळिच्या सर्वा हि दोपा हरी. २२

हांसावें सेंद्रवित्ताधिपतिस वारितां एक गोदान [11]दीनें,
  [12]दानोदौघें धरावी बहुत निजमनीं लाज गोदानदीनें,

---

१. ब्रह्मयज्ञादि पांच यज्ञाचे ठिकाणीं आसक्त. २. जेवणानें. ३. तलवार. ४. चांगली ढाल. ५. पट्टा फिरविण्याच्या पद्धतीचा. ६. सूर्यचंद्रवंशोद्भव राजांचा स्वामी ( कृष्ण ). ७. दुःखितदुःखनिवारक. ८ भाट, स्तुतिपाठक. ९. देवांसारखे. १०. मसलत. ११. गोप्रदान घेणाऱ्या दीन मनुष्यानें. १२. दान देताना हातावर घातलेल्या पाण्याच्या ओघाला पाहून गोदावरी नदीनें हि मनांत पुष्कळ लाज धरावी.

ऐसें कोठें उदार द्विजपरिवृत तो कौतुक श्रीश यातें
दावी, यत्पादपद्में[1] करिति सुभगताभाजन श्रीशयातें. २३
कोठें ऐके पुराणें निजचरितसुधाभाजनें सेतिहासें,
कोठें स्त्रीसीं विनोद प्रभु करि, हरुनि स्वांत जे नेति हासें,
कोठें सद्धर्म, कोठें यदुकुळमणि तो अर्थ, कोठें हि काम
प्रेमानें सेवि, कोठें प्रकृतिपरमहोध्यान[2] दावी निकाम. २४
कोठें तो करि देवदेवगुरुच्या भावें पदाराधना,
ज्ञाते यच्चरणीं समर्पिति गृहक्षेत्रात्मदाराधना[3],
कोणांसीं करि विग्रहासि[4], कवणासीं संधिलों[5] भाव हा
कोठें दाखवि, सन्मुनी निरखि त्या लीला सुलाभावहा. २५
कोठें श्रीरामकृष्ण प्रभुवर सदयस्वांत ते भावु[6], कास[7]
प्रेमानें आपुली ज्या धरिलि सुभजकीं, त्यांचिया भावुकास[8]
होते चिंतीत, कीं जे भजति जन तयां ताप दासां गड्यांतें
बाधों द्यावा न, आले शरण भव तराया पदां सांगड्यांतें. २६
कोठें अत्युत्सवानें करि यदुपति तो पुत्रपुत्रीविवाहां,
दे हर्षे जांवयांतें मणिकनकरथस्तोमसद्धस्तिवाहां[9][10];
कन्या जाति स्वगेहाप्रति पतिसह, तैं वृष्णिभूशक्र पाणी
आणी नेत्रांस, कोठें बहु धरुनि तयां पोटिशीं चक्रपाणी ! २७
इष्टापूर्तीं[11] च कोठें यदुपति मुनिनें देखिला, यादवांहीं
कोठें युक्त प्रभू तो करि वनिं मृगया बैसुनीं साधुवाहीं
व्हावा भाव प्रजांचा बिदित म्हणुनियां गुप्त कोठें फिरे हा
लीला दावूनि ऐशा पुरवि वरद त्या चिंतकाची चिरेहीं[12]. २८

---

१. ज्याचीं चरणकमलें श्रीशयातें ( लक्ष्मीच्या हस्तास ) [ संवाहनाच्या योगें ] सुभगताभाजन ( सौभाग्यपात्रता ) आणतात. २. प्रकृतीहून श्रेष्ठ जें ब्रह्म-तेज त्याचें ध्यान. ३. घर, शेतवाडी, स्त्री आणि धन. ४. युद्धास. ५. मैत्रीस. ६. बंधु. ७. आश्रय. ८. कल्याणास. ९. स्तोम=समूह. १०. वाह=घोडे. ११. यज्ञ-यागादिकीं [ रत ]. १२. चिरकालीन इच्छा.

ऐसें पाहोनि वंदी मुनि विभुसि म्हणे 'योगमायाविलास
स्वामी! हे देखिले म्यां, स्वविभव सदया! या नता दाविलास;
झालों तूझ्या प्रसादें सफळजनु मनुष्यांत देवासुरांत,
स्वर्धेनूच्या हि एवंविध सुख न कधीं भेटि दे वासुरांत. २९
आहे तूझ्या प्रसादेंकरुनि निरत हा सर्वदा दास नामीं,
यासाटीं पावला न श्रम, हरि! करितों कीं पदोपासना मीं;
जें ऐसें योगमायाविलसित भुलवी योगियांतें हि, राया!
भासे बा! सेवकांच्या सुमतिस न शके सर्वथा तें हिराया. ३०
आज्ञा दे मजला भवच्छुचियशःपीयूषमग्नें [1]सितें
[1]शीतें मीं भुवनें विलोकिन, लया तापत्रया नेसि तें
तूझें गायिन सच्चरित्र, अमृता या सेवितां दौंदिलें
झालीं होतिल सन्मनें, निजपदीं त्वां ज्यांसि नांदों दिलें.' ३१
हांसोनि प्रभु त्या मुनिप्रति म्हणे, 'पुत्रा! गृहस्था श्रम
स्पर्शेना बहु सेवितां सुखद हा सर्वां गृहस्थाश्रम;
या धर्मा अनुमोदितों हि कथितों कीं मीं च वेदा वितों,
आंगें यापरि आचरोनि हि जना ऐसें कवे! दावितों. ३२
मन्नामें मच्चरित्रें मदुदितनिगमां मत्पदां जे भजा ते
स्पर्शा स्वप्नीं तुम्हीं ही न विरसविषयां कीं विटंबोनि जाते,
त्यांतें वत्सा! कसें हें [3]स्वजनवश निजस्वांत ओपीन, माया-
स्वामी मीं स्वस्थ हो हे तुज पदयुगुळीं नित्य सोपी नमाया." ३३
ऐसा सत्कारिला हो! मुनिवर, जनकें ज्यापरी तोक, लीला
दावूनि श्रीमुकुंदें, हरि हरिमहिमा वर्णितां तो कलीला.
गेला देवर्षि गात प्रभुयश सुकविस्वांतसर्वस्व, साहे
स्वर्वल्लीसीं सुधेसीं पळभरि न तुळा कीर्ति गंगास्वसा हे. ३४

---

१. तुमच्या शुभ्र यशोमृतांत बुडून शुभ्र व शीतळ झालेलीं अशीं. २. पुष्ट.
३. स्वभक्ताधीन.

# अध्याय सत्तरावा.

सद्वृत्तद्युति[1]दारहार धरुनि प्रेमें असावे गळा
 रात्री सोडुनि होय हो ! विभु उषःकाळीं तयां वेगळा.
आत्मध्यान करी करीशगतिद[2] श्रीकांत कांताकृती[3]
 ज्याच्या चिंतिति चित्तचोरचरणा हृत्पातकांता[4] कृती. १
विध्युक्तस्नानसंध्याजपशिवचरणब्रह्मगोपूजनातें
 संपादी आह्निक श्रीयदुकुळपतिचें पुण्य ओपू जनातें;
गोदानें बद्ध[5] बद्ध प्रतिसदनिं सदा दे, धरी शुद्ध वास[6]-
 स्रग्भूषा, सात्यकीस स्वरथिं बसुनि घे सत्प्रिया उद्धवास. २
ऐसें एका चि काळीं यदुतिलक निघे सर्वगेहामधूनि
 प्रस्थानीं स्यंदनस्थ प्रियद निरखिला आदरानें वधूनीं;
व्याजें[7] मागें विलोकि स्मितमुख, ललनाचित्त चोरूनि ने त्या
 जाया लीलाकटाक्षें शकति वश करूं सुंदरी[9] ही न नेत्या[8]. ३
मूर्ती सोळा सहस्र त्रिभुवनपतिच्या पावती एकता तें
 त्याचें त्या मात्र ठावें, कुतुक कळविलें हें शुकाच्या चि तातें.
बैसे जावूनि सर्वेश्वर वरद धणी तो सुधर्मासभेंत
 श्रीशीली वृष्णिवीरव्रज सकळ तदा लोंपती तत्प्रभेंत. ४
गाती सुस्वर गीतरीतिनिपुण श्रीशा असे, नाचती
 आनंदें नटनर्तकीगण, कळा नाकीं असेना च ती;
वाद्यें वाजविती अभिज्ञ विविधें श्रीच्या[10] महासारसीं[11]

---

१. चांगलें वर्तन व कांति ज्याची असा स्त्रियारूप हार. २. गजेंद्रमोक्षदायक. ३. रमणीय आकृति ज्याची असा. ४. हृदयस्थ पातकांच्या नाशास. ५. चतुर्दशानां लक्षाणां सप्ताधिक शतां शकः । बद्धं चतुरशीत्यग्र सहस्राणि त्रयोदश ॥ १ ॥—**पंत.** चौदा लक्ष, तेरा हजार, सातशें चौऱ्यायशीं ह्या संख्येला 'बद्ध' म्हणतात. ६. वस्त्रें, माळा आणि भूषणें. ७. मिषानें. ८. त्या नायक कृष्णास. ९. लावण्यवती स्त्रिया. १०. तेजस्वी. ११. मोठ्या कमळाला.

देवा अर्पिति तेथ नर्मसचिव[1] स्वप्रेमहासा[2] रसा. ५

ज्ञाते ब्राह्मण शास्त्रयोनि[3] जवळी श्रुत्यर्थ वाखाणिती,
तीं वाक्यें श्रवणोद्यताखिलमनोमोहाद्रिला[4] खाणिती.
कोणी सिंधुरवींदुवंशजमहीशांचीं[5] यशें वानिती
त्यांतें सच्चरितामृतांबुधिविभुश्रोत्रें[6] सुधा मानिती. ६

तेथें एक अदृष्टपूर्व[7] पुरुष द्वास्थें पुढें आणुनि
श्रीकृष्णासि निवेदिला; अभिमत स्वस्वामिचें जाणुनी,
सांगे आगमनप्रयोजन, पद प्रार्थूनि, तो दूत, "मीं
आलों मागधरुद्ध[8] भूप बुडती ते दीनबंधू ! तमीं[9]. ७

राजे दिग्विजयीं रणीं लवविती चापा, न जे मस्तका,
तेथें जोडिति कीर्तिकामुक[10] शरा न क्ष्मापती हस्तका;
मानी वीस सहस्र आठ शत ते जिंकूनि युद्धीं बळें
दुर्गीं सर्व हि कोंडिले मगधभूपाळें महोग्रें खळें. ८

ऐसें प्रार्थिति दीनबंधुचरणा ! ते हे सुभद्र[11] क्षण,
स्वांतीं चिंतिति जे प्रपन्न[12] करिसी तूं मात्र तद्रक्षण;
पूर्वीं वांचाविला गज, व्रज हि या पूर्णावतारीं, न हो
तृष्णा दासजन श्रमी, म्हणसि हि 'प्रह्वासि[13] तारीन, हो!' ९

विद्याश्रीदोर्बळांनीं[14] मद बहु चढला, जाहलों अंध नीच,
व्यामोहें तूज देवा ! विसरुनि पडलों या अशा बंधनीं च,
आम्हां अस्मद्विधी[15] दे उचितफळ, न दे हा जरासंध कारा[16],

---

१. विनोदी लोक. २. स्वानंदजनक हास्यरूप रसाला. ३. शास्त्रांचें मूळ असा. ४. श्रवणतत्पर जे अखिल लोक त्यांच्या मनोमोहरूप पर्वताला. ५. समुद्रांत राहणारे राजे, रविवंशांतील व चंद्रवंशांतील राजे त्यांची. ६. सच्चरितांचा समुद्र जो कृष्ण त्याचे कान. ७. पूर्वीं न पाहिलेला. ८. जरासंधानें कोंडलेले. ९. दुःखसमुद्रांत. १०. कीर्तीची इच्छा करणारे. ११. सुभग (भूप). १२. शरणागत. १३. नम्रासि. १४. बाहुबळांनीं. १५. आमचें च दुर्दैव. १६. तुरुंग.

कूपाला दोष कैंचा तुघडुनि नयनें पाडितां अंधकारा? १०
रक्षाया दीनबंधो! प्रणतजनविपन्नाशका! पाव साचा,
त्या भूपां चातकांला बहुत भरवसा या पदा पावसाचा;
मातें संप्रेषिलें कीं त्रिजगदभयदा! दान हें माग धात्या
विश्वाच्या, यादवेंद्रा! द्रव किमपि नसे निर्दया मागधा त्या." ११
ऐसें दूत वदे, अशांत उतरे तेथें वशी नारद
तापध्वांतविनाशदक्ष, हसती ज्यांचे शशीना रद;
तो पुण्योदयलभ्य सभ्यसहितें सत्कारिला सन्नतें,
सद्भाग्यद्वय बैसलें सुखद जें अन्योन्य आसन्न तें. १२
देवर्षीस म्हणे मुकुंद, 'तुमच्या या दुर्लभीं आगमीं
जालों सान्वय आज भाजन सुखा, लोकीं महाभाग मीं;
आज्ञा काय असे अशेषकुशलज्ञानाचिया अर्णवा!?
सेवा सांगुनि वृष्णिवैभव विभो! विश्वाननीं वर्णवा. १३
ब्रह्मांडीं तुमची गति द्विजपते! सर्वत्र अव्याहता,
तूं लोकां सकळां हि पाहसि, तसा न ब्रध्न ही पाहता;
अस्मन्मानसिं लोकवृत्त अवघें युष्मत्प्रसादें ठसे,
आधार त्रिजगन्मनोरथफळा स्वामी! असा देंठ से. १४
सांगा पांडववृत्त; काय करिती? आहेत कीं ते सुखें?
व्हावें तत्कुशळ प्रभो! अमृत या कर्णांसि युष्मन्मुखें;
जाणा सर्व तुम्हीं, परंतु कथितों बाधे तृषा न क्षुधा,
सर्वज्ञा! विबुधा! बुधा स्वजनसद्वार्ता चि आम्हां सुधा.' १५
देवर्षि प्रभुला म्हणे, 'यदुपते! या बोलण्याच्या रसें
मोहे मानस, हा न सन्नत भुले, हें जाणतो फारसें,

१. तुझे चरणरूप पावसाचा. २. विश्वनिर्माणकर्त्याला. ३. इंद्रियनिग्रही. ४. चंद्रसूर्यांस. ५. सभासदांसह. ६. साधुवंदित कृष्णानें. ७. संतांचीं मूर्तिमत दोन भाग्यें च असे नारद व कृष्ण. ८. जवळजवळ. ९. कुलासहित. १०. सर्व कशल आणि ज्ञान यांचा समुद्र च अशा हे नारदा! ११. सूर्य.

देवा! पांडववृत्त जें पुससि तें सांगावया आज गा!
आलों, आयिक, सांगतों कुशळ मीं आनंदवाया जगा. १६
धर्मे पाठविलें मला तुजकडे आमंत्रणाकारणें,
नेत्रांचें पुरवीं, स्वपादकमळें दावूनियां, पारणें;
न्याया सिद्धिस राजसूयमख ये, हें प्रार्थिलेंसे तुला
लोकेशास भजन्मनोरथमहापाथोधिच्या[1] सेतुला. १७
स्वराजसूयें पदतीर्थजा[2] या इच्छी मनीं पांडव तो यजाया,
सद्भक्तकामाप्रति पूरवा हो! यशोमृतांभोनिधिपूर[3] वाहो. १८
येतील द्विज देव भूपति, मखीं हे पाय शोभा जना
दावूनि प्रभु! नाशितील चि जगत्तापा यशोभाजना!
ऋत्विग्दृष्टि निवेल, तृप्त करितां दुग्धें असाधूरगा[4];
तो चावे चि जसा द्विजातिनयना झोंबे असा धूर[5] गा!' १९
ऐसें कार्यद्वयाचें श्रवण करुनियां वृष्णि कोणी, ' न यज्ञा
जावें,' ' जावें हि,'; कोणी म्हणति, विभु पुसे उद्धवा हें नयज्ञा.
नीतिज्ञांमाजि भक्तप्रवर कुशळ तो सर्वलोकीं अशाला
सभ्यांमध्यें विचार प्रभु वदवितसे वाढवाया यशाला. २०

---

# अध्याय एकाहत्तरावा.

देवर्षीच्या मतांत प्रथम यदुवरें यज्ञकार्यास जावें,
सभ्यस्वांतीं प्रपन्नक्षितिपसमवनीं[6] कीर्ति आधीं सजावें;
कार्ये दोन्हीं हि दासामरतरुसि मतें तें कळे उद्धवास,
प्रार्थी तो प्राज्ञ ऐसें सदभिमत, जया मानवे श्रीनिवास. १
' आधीं संतोषवावा मुनिवरवचनें धर्म देवा! सर्वांतें

---

१. भक्तांच्या मनोरथरूप महासागराच्या. २. चरणकमलातें. ३. यशः-सुधासागराचा पूर. ४. दुर्जनरूप सर्पाला. ५. [ यज्ञकुंडांतील ] धूर. ६. शरणागत राजांच्या रक्षणीं. ७. मान्य अर्शी. ८. यज्ञातें.

न्याया सिद्धीस, मारीं मग मगधपती, शर्म दे वासवातें;
जिंकावे सर्व राजे तरि च मख घडे, जों जरासंध नाहीं
मेला, तों न प्रपन्नक्षितिपति सुटती, जे श्रमी बंधनांहीं. २
ज्याच्या अक्षौहिणींचें शत भय वसवी निर्जरांच्या[1] अनीकीं,
आंगीं नागायुतांचें[2] बळ मगधपती वीर मोटा जनीं कीं,
विप्रांचा दास, दाता अभिमत सकळा वस्तुचा, सत्यसंध,
न्यायें पावेल कैसा पारिभव समरीं तो जरापूर्वसंध? ३
घ्यावा ब्राह्मणवेष भीम हि, गृहा जावें, मुकुंदा! तया
मागावें मग दानरूप समर द्वंद्वाख्य[3] त्या दातया,
सान्निध्यें तुझिया वृकोदर जया पावेल, अन्यायशा
युक्ती भासति या, परंतु न कधीं देतील अन्या यशा. ४
बाळांतें खेळवीतां नरवरवनिता गाति तूझ्या यशातें,
त्या गोपी शंखचूडप्रमथन[4] अवन स्वीय देवा जशा तें,
हस्तीचें जानकीचें यदुकुळपतिचें[5] संकटीं मुक्तिदान,
ज्ञानी आम्हीं हि गातों तव चरित जसें सद्गतीचें निदान. ५
बह्वर्थप्रद होइल क्रतु, तुझ्यां मूर्तीं महाविप्र ज्यां[6]
वेदाज्ञेकरुनि प्रवर्तक, सुखी देखोनि व्हावि प्रजा,
अत्याश्चर्य मनीं शतक्रतुस ही वाटेल बा! पक्ष या
धर्माचा धरितोसि, तीर्थपद तूं नेसील पाप क्षया.' ६
ऐसें ऐकुनि नारदादि म्हणति, 'प्राज्ञा! भला हो! भला,
बापा! हा नयराजहंस[7] तुझिया सन्मानसीं[8] शोभला,
साधो! उद्धव! तूं यथार्थ चि, जगीं विद्वत्सभा मंडिता
झाली या तव शुद्धवृत्तगुणवाङ्मुक्ताफळीं,[9] पंडिता!' ७

---

१. देवांच्या समुदायांत. २. अयुत नागांचें ( हत्तींचें ). ३. द्वंद्व नांवाचें ( कुस्ती ). ४. कृष्णविजय अध्याय ३४ पहा. ५. वसुदेवाचें. ६. मोठमोठे ब्राह्मण ह्या तुझ्या च मूर्ति. ७. नीतिरूप राजहंस. ८. उत्तम अंतःकरणीं [ पक्षीं ] मानससरोवरीं. ९. शुद्ध वर्तन, सद्गुण आणि वाणी हीं च मुक्ताफळें, त्यानीं.

त्या भक्ताच्या विचारें त्रिभुवनपति तो देव वर्ते, जयाचें
 जाणों तें बीज वह्नि श्वसनसख तसें सत्सुहृत्तेज याचें,
अंबातातोग्रसेनाग्रज[1]गुरुसमनुज्ञात सापत्यजाया-
 सेनासीं सिद्ध होय प्रभु तदवनतां हि त्रिताप त्यजाया. ८
आज्ञा दे नारदातें, मग अजित म्हणे भूपदूतास, 'जा, गा!
 राजाला सांग ऐसें अभयवचन कीं, जाहला सिंह जागा;
बाळांच्या धर्षणातें कारि, बहु न गणी जो मदानें निजागा[2],
 नागा त्या होय कोठें यमवसतिविना प्राप्त विश्रांत जागा' ९
गेला दूत गिरिव्रजासि[3], हरि ही भेटे नृपा तो यदा,
 जालें पांडवचातकां सुख, पहातां त्या कृपातोयदा;
प्राणप्राप्ति सुखार्थि इंद्रियगणा, कीं गाय दे वासरा,
 आले पल्वल[4]दीनमीन [5]विधिनें ते काय देवा सरा? १०
सामोरा विप्रपौरानुजसह नृप ये, जेंवि मेघा शिखंडी,
 वंदी धर्मास भीमास हि हारि, नमितां जो महाघासि खंडी,
भेटे मित्रास[6], मानी सुरमणि[7] हि यशस्वी मणीसानु[8] ज्याला[9]
 ये[10]च्छौचांभोग्रलाभ प्रभुपद नकुळा दे धणी[11] सानुज्याला. ११
आलिंगूनि प्रमोद स्वभजकहृदया दे जसा देव वेल
 स्वर्गींचे जे अभीष्टप्रद परि न कधीं त्यां तसा देववेल;
तो साक्षात्तारकांचा पति अमृतकर स्पर्शला चंद्र कांतें[12]
 श्रीचा[12] वीत[13]त्रिताप द्रवति बहु जन स्वच्छ ते चंद्रकांत. १२
इंद्रप्रस्थप्रवेशीं हरिवरि करिती कन्यका वृष्टि लाजीं[14],
 जालीं पादांबुजें तीं सुलभ, असुलभें स्वर्वधूदृष्टिला जीं;

१. गुरु गर्गाचार्य ह्यांस विचारून. २. आपल्या अपराधाला. ३. जरासंधाच्या नगरास. ४. डबक्यांतील दीन मासे. ५. सुदैवानें. ६. अर्जुनास. ७. इंद्र. ८. मेरुपर्वत. ९. ज्या कृष्णाला. १०. ज्या पदांचें शौचांभ भागिरथीतोय तो च मुख्य लाभ सर्वांस असें (प्रभुपद). ११. सुखसमृद्धि. १२. रमाकांत श्रीकृष्ण. १३. गेला आहे त्रिविध ताप ज्यांचा. १४. लाह्यांनीं.

स्त्रीभृंगी लुब्ध झाल्या रसनिधिभगवद्वक्त्रपाथोजपानीं,[1]
यज्ञानीं सत्तपानीं बहुभव[2] बहुधा प्रार्थिला तो जपानीं. १३

जीं दुष्प्रापा पहातां लवति बहुदयापूर्णमेघा, तपा तीं
विघ्नें,[3] तैसा वधूंचा करिति च सहसा तो गमे घात पातीं;[3]
ऐशांच्या निर्मित्यातें अकरुण विधितें, पाळका ही निमीतें[4]
देती शाप स्त्रिया जें तळतळुनि म्हणें योग्य मध्यस्थ[5] मीं तें. १४

पौरस्त्री म्हणती, 'अहो! सुकृत या कृष्णांगनांचें गणी
कोण प्राज्ञ हि? याहुनीं सुरवधूभाग्यें बहू ठेंगणीं;
जाली श्री च अनेकमूर्ति पतिला सेवावया काय कीं
रूपें आणि गुणें तशा चि परम प्रेमा हि मानायकीं.'[6] १५

गेहीं जावूनि वंदी सविनय चरणा, तों पृथेनें हि भाचा
प्रेमें आलिंगिला हो! सुरपतिपति[7] तो पाठिराखा इभाचा;[8]
नेत्रांभोबिंदुवृंदेंकरुनि[9] भिजविलें ब्रह्म, हें चित्र पाहे
न प्रेमावासदासप्रणतिपर,[10] न त्या भक्ति दे चि त्रपा हे. १६

'गृहा आला आत्मा प्रियगुरु जगन्नायक, वळीं[11]
मुली हो! या, याचे हृदयकमळीं पाय कवळा;'
असें सांगे सासू न, परि नमिति स्वर्द्रुपदें[12] ज्या
पहातां माहेरा विसरति सुभद्रा द्रुपदजा. १७

कुंती कृष्णेसि[13] सांगे, 'सति! नृपतनये! ठावुकें तूज नातें,
बंधूचे दार[14] हे, कीं कमळमुखि! करीं यांचिया पूजनातें;

---

१. रसाचें स्थान असें जें भगवन्मुखकमल त्याच्या पानाविषयीं. २. अनेक जन्म ३. डोळ्याच्या पापण्या. ४. पात्यांची रक्षक जी निमिदेवता, तीतें. ५. मध्यस्थ असा मी कवि असें म्हणतों. ६. रमानायकीं. ७. इंद्राचा हि स्वामी. ८. गजेंद्राचा. ९. प्रेमाश्रूंच्या बिंदुसमूहानें. १०. प्रेमाचें स्थान जो भक्त त्यास प्रणति करण्याविषयीं तत्पर. ११. इकडे या. १२. कल्पतरुरूप कृष्णपद. १३. द्रौपदीस. १४. रुक्मिणीप्रमुख स्त्रिया.

मूर्ता[1] सिद्धी च लोकत्रयपतिहरिच्या भेटल्या, कीं न द्यायीं
 निर्भाग्या भेटि योग्यां, यदु[2]पतिकरुणांभोधिपत्नी नद्या या. १८
कृष्णा कृष्णांगनांतें सुरुचिरवसनीं रत्नहारीं नगानीं
 पूजी, भू जीस वानी विबुध[3]जनिं जिच्या सद्गुणा मान गानीं;
जैसी कीं कल्पवल्ली अमित अभिमत स्वाश्रितां वस्तु दे वी,
 तैसी च श्रीहरीचि प्रियगुणभगिनी द्रौपदी सत्य देवी. १९
राहे धर्मासमीप स्वजनसह हरी, नित्य याचे नवे चि
 प्रेमें सत्कार राजा करि, विभवें[4] सुधी कां सुपात्रीं न वेंची?
जो आत्मा निर्निमित्त प्रियसुहृद गमे भेटला नव्यसा चि,
 क्रीडे नैकप्रकारें वनिं भवनिं सखा घेउनी सव्यसाची[5]. २०

---

## अध्याय बाहात्तरावा.

बैसे राजा सभेंत स्वजनसह, निजाराध्य[6]पादा सहाया
 कृष्णा लोकैकनाथा भजद[7]मरनगा वृष्णिपा दास हा या
प्रार्थी कीं, 'राजसूयक्रतु करुनि तुझ्या म्यां यजाव्या विभूती,
 वांछावल्ली करावी सफळ तव पदें सद्रसंतें विभू! ती.' १
'तरों चि, न बुडों' म्हणे 'मन गणी च ना भी, तरी[8]
 तुझें पद चि या मनोरथमहार्णवाभीतरी,
त्वदंघ्रि पुरवि स्पृहा, पारि रुचे न मंदा रती
 धरी जरि हरी! बरी पुरवि काय मंदार[9] ती?
जगीं म्हणविती किती सुंजड[10] आपणा कामद,
 प्रसिद्ध महिमा तुझा तरि न सोडिती कां मद?

---

१. भेटि द्याया योग्या न अशा निर्भाग्या (अभाग्याला) मूर्ता सिद्धी च भेटल्या. २. कृष्णरूप करुणासमुद्राच्या स्त्रिया अतएव ह्या नद्या. ३. पंडितजनांत किंवा देवलोकांत. ४. ज्ञाता सत्पात्रीं द्रव्य कां खर्चिणार नाहीं? ५. अर्जुन. ६. भक्तांस आराध्य आहेत चरण ज्याचे अशा. ७. भक्तकल्पवृक्षाला. ८. नौका. ९. कल्पलता. १०. चिंतामणि, कल्पतरु इत्यादि.

जऱ्ही धवळ शीत ही धारिल काय कापूर ती
सुधांशुरुचि[1]? मूर्खता भुवननायका! पूरती. ३
पाहो सर्व जग त्वदंघ्रियुगळीभक्तिप्रभावा सवीं[2],
लज्जा कौतुक हर्ष वाढउ भवत्पादप्रभा वासवीं,
वाटे हें तुज कीं श्रमावहगुणा अन्या कथा मद्यशी[3],
टाकू कर्णमुखीं पिवू जन सुखें शुद्धामृता मद्यशा.' ४
ऐसें ऐकोनि बोले वरदगुरु, 'अहो! हे महाराज धर्मा!
आरंभा राजसूयक्रतु, उचित तुला, सत्य तूं पुण्यकर्मा;
हे भ्राते भीमसेनार्जुन बळजळधी विक्रमी मीं हि माद्री-
पुत्र त्वद्भक्त आणूं उचलुनि कथितां कांचनाद्री हिमाद्री. ५
बधेना मीं कोणास हि न जरि दुर्भाव शमला,
अशा ही त्वां केलें सहजगतलोभा[4] वश मला;
विना शस्त्रोद्योगें अजित भुवनीं तो वळविला,
प्रताप ज्ञात्यांला नृपमुकुटरत्ना! कळविला. ६
आज्ञाशस्त्रास लंघी, प्रबळ नृप न दे जो करा, आज यागा
होय प्रत्यूह[5] ऐसा मज तंव न दिसे या जगीं, राजया! गा!
धाडावे दिग्जयार्थ त्वरित सबळ हा भीम, हा सव्यसाची;
हे माद्रीपुत्रयात्रा[6] हारिल रिपुयशोजीवनद्रव्य साची. ७
नृपा! दावू नानाविधदुरितनाश क्रतु जगा,
स्वयें वर्णू तृप्त प्रमुदितमना शक्र तुज गा!
यश क्षीरेंदूरगदरसुधागौर[7], वजनीं
उणा होवू गौरीजनक हि, घडो गौरव जनीं. ८
श्रीकृष्णशब्द वरदायक ते धवांची[8]
कृष्णेचिया सुखविती मति तेथवां चि;

१. चंद्राची कांति. २. यशीं. ३. मदिरेसारख्या. ४. ज्याचा लोभ साहजिक गेला आहे अशा मला. ५. विघ्न. ६. नकुळ व सहदेव यांची शत्रूवरील स्वारी. ७. क्षीरसमुद्र, चंद्र, शेष, शंख व अमृत ह्यांप्रमाणें गौरवर्ण ज्याचा असें. ८. पांडवांची.

मूर्ता सिद्धी च लोकत्रयपतिहरिच्या भेटल्या, कीं न द्यायां
निर्भाग्या भेटि योग्यां[1], यदुपति[2]करुणांभोधिपत्नी नद्या या. १८
कृष्णा कृष्णांगनांतें सुरुचिरवसनीं रत्नहारीं नगानीं
पूजी, भू जीस वानी विबुध[3]जनिं जिच्या सद्गुणा मान गानीं;
जैसी कीं कल्पवल्ली अमित अभिमत स्वाश्रितां वस्तु दे वी,
तैसी च श्रीहरीचि प्रियगुणभगिनी द्रौपदी सत्य देवी. १९
राहे धर्मासमीप स्वजनसह हरी, नित्य याचे नवे चि
प्रेमें सत्कार राजा करि, विभवें[4] सुधी कां सुपात्रीं न वेंची ?
जो आत्मा निर्निमित्त प्रियसुहृद गमे भेटला नव्यसा चि,
क्रीडे नैकप्रकारें वनिं भवनिं सखा घेउनी सव्यसाची[5]. २०

## अध्याय बाहात्तरावा.

बैसे राजा सभेंत स्वजनसह, निजाराध्य[6]पादा सहाया
कृष्णा लोकैकनाथा भजद[7]मरनगा वृष्णिपा दास हा या
प्रार्थी कीं, 'राजसूयक्रतु करुनि तुझ्या म्यां यजाव्या विभूती,
वांछावल्ली करावी सफळ तव पदें सद्रसंतें विभू! ती.' १
'तरों चि, न बुडों' म्हणे 'मन गणी च ना भी, तरी[8]
तुझें पद चि या मनोरथमहार्णवाभीतरी,
त्वदंघ्रि पुरवि स्पृहा, पारि रुचे न मंदा रती
धरी जरि हरी! बरी पुरवि काय मंदार[10] ती? २
जगीं म्हणविती किती सुं[11]जड आपणा कामद,
प्रसिद्ध महिमा तुझा तरि न सोडिती कां मद ?

---

१. भेटि द्याया योग्या न अशा निर्भाग्या (अभाग्याला) मूर्ता सिद्धी च भेटल्या. २. कृष्णरूप करुणासमुद्राच्या स्त्रिया अतएव ह्या नद्या. ३. पंडितजनांत किंवा देवलोकांत. ४. ज्ञाता सत्पात्रीं द्रव्य कां खर्चिणार नाहीं? ५. अर्जुन. ६. भक्तांस आराध्य आहेत चरण ज्याचे अशा. ७. भक्तकल्पवृक्षाला. ८. नौका. ९. कल्पलता. १०. चिंतामणि, कल्पतरु इत्यादि.

जऱ्ही धवळ शीत ही धारिल काय कापूर ती
सुधांशुरुचि[1] ? मूर्खता भुवननायका! पूरती. ३

पाहो सर्व जग त्वदंघ्रियुगळीभक्तिप्रभावा सवीं[2],
लज्जा कौतुक हर्ष वाढउ भवत्पादप्रभा वासवीं,
वाटे हें तुज कीं श्रमावहगुणा अन्या कथा मद्यशा[3],
टाकू कर्णमुखीं पिवू जन सुखें शुद्धामृता मद्यशा.' ४

ऐसें ऐकोनि बोले वरदगुरु, 'अहो! हे महाराज धर्मा!
आरंभा राजसूयक्रतु, उचित तुला, सत्य तूं पुण्यकर्मा;
हे भ्राते भीमसेनार्जुन बळजळधी विक्रमी मीं हि माद्री-
पुत्र त्वद्भक्त आणूं उचलुनि कथितां कांचनाद्री हिमाद्री. ५

बधेना मीं कोणास हि न जरि दुर्भाव शमला,
अशा ही त्वां केलें सहजगतलोभा[4] वश मला;
विना शस्त्रोद्योगें अजित भुवनीं तो वळविला,
प्रताप ज्ञात्यांला नृपमुकुटरत्ना! कळविला. ६

आज्ञाशस्त्रास लंघी, प्रबळ नृप न दे जो करा, आज यागा
होय प्रत्यूह[5] ऐसा मज तंव न दिसे या जगीं, राजया! गा!
धाडावे दिग्जयार्थ त्वरित सबळ हा भीम, हा सव्यसाची;
हे माद्रीपुत्रयात्रा[6] हारिल रिपुयशोजीवनद्रव्य साची. ७

नृपा! दावू नानाविधदुरितनाश क्रतु जगा,
स्वयें वर्णू तृप्त प्रमुदितमना शक्र तुज गा!
यश क्षीरेशेंदूरगदरसुधागौर[7], वजनीं
उणा होवू गौरीजनक हि, घडो गौरव जनीं. ८

श्रीकृष्णशब्द वरदायक ते धवांची[8]
कृष्णेचिया सुखविती मति तेथवां चि;

---

१. चंद्राची कांति. २. यज्ञीं. ३. मदिरेसारख्या. ४. ज्याचा लोभ साहजिक गेला आहे अशा मला. ५. विघ्न. ६. नकुळ व सहदेव यांची शत्रूवरील स्वारी. ७. क्षीरसमुद्र, चंद्र, शेष, शंख व अमृत ह्यांप्रमाणें गौरवर्ण ज्याचा असें. ८. पांडवांची.

देवूनियां मग बरोबरि भीमसेना
 पूर्वेसि पाठवि युधिष्ठिर भीमसेना. ९
यच्छस्त्रदावाग्निमुखांत अर्जुन द्विपनृपांचें बळ होय अर्जुन,
 त्या उत्तरे पाठवि सज्जना महीपती जयाचें जय सज्ज नाम ही. १०
संगरीं अपटु ज्यासह देव, श्रीशपादनत तो सहदेव,
 घेउनी सुमति भूमिधवाची जाय जीस अभिधान अवाची. ११
नृपाज्ञेनें झाला नमुनि हरिला सज्ज नकुल
 प्रतापें ज्याच्या भी खळबळ सुखी सज्जनकुळ.
प्रतीचीला गेला, तयिं च विधुचें मंडळ मळे,
 चमूधूलिस्तोमें अहिपतिशिरीं भू डळमळे. १२
श्रीमत्पांडव च्यार मूर्त विभुचे दोर्दंड चि त्रासते
 झाले दुर्जन भूप मानिति सुधी जे या न चित्रासें, ते
आले जिंकुनि दिक्चतुष्टय तिहीं जें वित्त संपादिलें,
 तें धर्मा यश हि त्रिलोकपतिला त्या सानुकंपा दिलें. १३
राजा मागध एक मात्र उरला जिंकावयाचा, ‘ कसें
 कीजे ? ’ धर्म म्हणे ‘ भ्रमे मन महाचिंताबळें चाकसें.’
त्यातें सांगुनि आपणा सिकविली जी उद्धवें सार धी,
 जाला सिद्ध रिपुक्षया मृगवधा जाणों हरी पारधी. १४
संगें घेवूनि भीमार्जुन अजित निघे सर्व ते विप्रवेश,
 क्षिप्र स्वारातिगेहीं करिति, करिवनीं सिंह तेंवि, प्रवेश;
ब्रह्मण्या मागधातें ठकविति धरुनि ब्राह्मणाच्या चि सोंगा,

---

१. तृण. २. आज्ञा, सल्ला. ३. दक्षिण. ४. कवीनें या उत्तरार्धावरील पाठांतर मूळांत क्रमानें च पुढीलप्रमाणें लिहिलें आहे:—

**प्रतीचीला गेला तयिं अहिशिरीं भू डळमळे,**
**चमूधूलिस्तोमें सलिलतनुचें मंडळ मळे.**

५. आश्चर्यास. ६. उत्कृष्ट.

'अर्थी[1] आम्हीं द्विजाती[2]' म्हणति "तुजकडे आज आलों असों, गा!
आलों त्वत्सदनासि दूर अतिथी, कांहीं असे मागणें,
तें 'देतों' म्हणसील तूं तरि वदों, आधीं वृथा सांगणें;
जे कीं याचककामपूरक कृती ज्ञाते उदार क्षिति-
स्वर्लोकादि यशोमृतें धवळिती, ते त्या[3] सदा रक्षिती. १६
जैसें असाधूंसि अकार्य नाहीं, किंवा तितिक्षूंस असह्य कांहीं,
न अन्य त्यां ज्यां समदृष्टि मान्या, अदेय तैसें चि नसे वदान्या. १७
जालें सत्कुळजन्म, भाग्य हि बरें आलें, कळों लागलें,
कीं ऐसीं फळलें सुदुर्लभफळें सत्पुण्य जें मागलें,
ठावें अध्रुव[4] देह गेह न तऱ्ही जो सद्यशा सांचवी,
साधू ही म्हणती 'अशा क्षितिभरा[5] कां पांचवी[6] वांचवी?' १८
विश्वामित्रास राज्य प्रथम चि दिधलें, जोडिती ज्यासि यत्नें,
दे वित्त स्वस्थचित्त प्रभुवर विकुनि स्वप्रियापुत्ररत्नें;
जाला चंडालदास क्षितिपतितिलक श्रीहरिश्चंद्र, सारे
गाती अद्यापि त्याचें यश कवि, धवळी विश्व जो चंद्रसा रे!. १९
अठ्ठेचाळीस गेले दिवस, मग मिळे यत्कुटुंबा अँबन्न[7],
प्राप्तातिथ्यर्थ तें ही सकळ हि सरतां, जो नव्हे अप्रसन्न;
कां येना आपणातें जगदसुख असी ही करी खंति, देव-
स्तुत्य ब्रह्मालया तो सनिजजन सुखें पावला रंतिदेव[8]. २०
भक्षूं संग्रह जाहल्यावरि अशा आशात्रशें[9] वांचले,
धान्याचे कण यत्कुटुंब मिळवी षण्मास जों सांचले,
कांहीं धान्य पुरेलसें सिजविलें तों भोजना उद्दल-
प्राप्तार्थीप्रति[10] देउनीं विधिपुरीं[11] नांदे सुखें मुद्गल[12]. २१

---

१. याचक. २. 'द्विजाति' हा शब्द ब्राह्मणांचा व क्षत्रियांचा वाचक आहे. ३. त्या वाचनास. ४. अस्थिर. ५. पृथ्वीला भारभूत. ६. पांचव्या दिवशीं पूजली जाणारी देवी. ७. पाणी आणि अन्न. ८. राजविशेष. ९. आशाबंधनानें. १०. वर मान करून येणाऱ्या अतिथींना. ११. ब्रह्मनगरीं. १२. एक ब्राह्मण.

पाठीस श्येन लागे, म्हणुनि शरण ये, दावि बाधा कपोत,
त्राणार्थी अंक जैसा वरि निजगुरुचा पावला धाक पोत;
त्या श्येनास स्वमांस क्षितिपतिपति दे, दे न भीता खगा तो,
स्वर्गी गेला महात्मा शिबि, अतुळयशा ज्याचिया शक्र गातो. २२

ज्याचा सज्जनविश्वविश्रुतगुण प्रह्लाद आजा बळी
श्रीमद्भागवतांत निर्मळयशा जो साधु राजा बळी,
अर्पी ब्राह्मणवेषधारिहरिला सर्वस्व जें नाशतें,
जोडी वस्तु असें अशा पळ हि जें श्रीच्या मिळेना शतें. २३

हे धर्मज्ञ कुलीन विश्रुत हरिश्चंद्रादि दाते चि ते
जाले, राज्य शरीर अध्रुव असें जाणोनियां, वेचिते.
राया! अद्भुत ऐक याहुनि वदान्याचा वतंसा! सखा
साजे स्वर्द्रुम ज्या न कीं खग[3] म्हणे व्याधास 'घे मांस, खा'. २४

अप्राप्तामिष वृष्टिपीडित बहु क्षुत्क्षाम[4] रात्रौ नगा-
खालें व्याध पडे, घडे निरखितां ज्या पक्षियां मौन गा!
तें सस्त्रीक कपोत त्या अतिथिला आणी शिखी सेकवी,
'इच्छा काय?' असें पुसे, पुसति सत्पात्रास जैसे कवी. २५

बोले व्याध, 'बुभुक्षु मीं, अशन द्या कांहींतरी, रक्षण
प्राणांचें कठिन, क्षुधा बहु, न हें वांचे शरीर क्षण.'
ऐसें ऐकुनियां म्हणे खग, 'घडो आतिथ्य हें सांग न'
त्यागी सत्व तदर्थ त्या चि दहनीं हर्षे शिरे सांगन. २६

झाला स्त्रीसह दिव्यदेह सहसा बैसे विमानीं मग,
स्वर्गाला सुरगीतसत्वगुण तो तत्काळ गेला खग,
व्याध प्राप्तविरक्ति दावदहनीं होमी तनु, व्योमग[6]-
व्रातें सत्कृत पावला सुरपुरा आधीं महत्सौभग[7]. २७

---

विष्णचें द्वारपालत्व. २. भूषणभूता राया! ३. कोणी कपोतपक्षी म्हणे 'मांस घे, खा.' ४. क्षुधेनें कृश. ५. झाडाखालीं. ६. ७. महाभाग्यशाली.

नित्यानित्यविवेकनिष्ठित असे जे भव्य त्या साधुनीं
  केला वंश विभूषित स्वजननें सत्कीर्तिला साधुनीं;
तूं दाता कुळशीलसद्गुणनिधी साधीं यशा, दाविना
  जो जन्मोनि विचित्र भार चि [1]धरे तो साधु[2]वादाविना." २८

गंभीरस्वर भव्यमूर्ति भुज हि ज्याघा[3]तलेखाधर,
  प्रेक्षूनि स्वमनीं म्हणे नृप, 'न हे भूं[4]देव, हे क्ष्मावर,
आले ब्राह्मणवेष घेउनि घरा, होवूनियां मागते,
  द्यावा देह हि, अर्थिकामद जगीं या जे महाभाग ते. २९

पूर्वी वामन विप्र होउनि मही मागे त्रिपाद, च्छळी,
  ऐश्वर्यासि हरी हरी जऱ्हि तऱ्ही सत्कीर्ति पावे बळी;
वारी का[5]व्य गुरु, स्वयें हि समजे दाक्षा[6]यणीभूपधी,
  जाली जी द्विजकामितार्पणपरा ती न च्यवे भूपधी. ३०

वांचावें क्षत्रियानें तरि सकळगुरु ब्राह्मणाच्या च काजें,
  राज्यप्राणादि द्यावें, त्वरित अभिमत क्ष्मासुरा याचका जें,
काळ क्रूर, क्षण श्री, न वश, मग जगीं कां कवी नाश[7]शीला
  दारा[8]गारा शरीरा उबगुं[9]नि सुयशें झांकवीना शशीला? ३१

ऐसें न क्षत्रियत्वीं, तरि अ[10]वनिभरीं जीवितीं काम कोणें[11]?
  ज्ञातींला माय दावी न वदन, वसवि व्रीडिता धाम[12]कोण;
ब्रह्मण्यख्यातवंशोद्भव धव महिचा मीं, नव्हे रंक, जा[13]तें,
  विप्रांघ्रिस्पर्शवांछा म्हणति जरि दिल्हें या शिरःपंकजातें.' ३२

ऐसें चित्तांत आणी [13]यदिषुशिखिमुखीं जाहले तूळ [14]लक्ष .

---

१. पृथ्वीला. २. बरेपणा मिळविल्यावांचून. ३. धनुष्याच्या दोरीचे घट्टे ज्यांवर पडले असे (भुज). ४. ब्राह्मण. ५. शुक्र. ६. अदितीचा पुत्र जो वामन त्याचें कपट. ७. नाशवंत. ८. घरादाराला. ९. कंटाळून. १०. अवनीला भार अशा जीविताचे ठिकाणीं कसली इच्छा? ११. घराचा कोपरा. १२. ज्या मला. १३. याच्या बाणरूप अग्नीच्या मुखांत. १४. लक्षावधि.

द्वेषिक्षोणीपती, तो मग मगधमहीनायक स्थूललक्ष
बोले, सप्रेम डोले, 'अभिलषित तुम्हीं विप्र हो! ध्या, शिराया
संदेहीं कोण हेतु? प्रिय जन्हि तन्हि मीं सिद्ध द्याया शिरा या.' ३३
तेव्हां श्रीकृष्ण बोले, 'मगधनृपमणे! तूं वदान्यांत धन्य,
ज्ञात्या! राजन्य आम्हीं, तुजसह चि करूं वांछितों द्वंद्वजन्य,
मागों आलों न विप्र क्षुधित तुजकडे येथ दूरूनि अन्न,
प्राज्ञा! मागीतलें दे, जरि हृदय तुझें कामदानीं प्रसन्न. ३४
हा धर्मानुज भीम अर्जुन हि हा रामानुजन्मा अरी,
तूझा कृष्ण हि मीं, नृपा! तुजपुढें यावी खरी वैखरी.'
हांसे ऐकुनि भूप पुष्कळ, म्हणे ऐसें मनीं, "मंद हो!
देतों युद्ध यथेष्ट, चित्त तुमचें येणें चि सानंद हो. ३५
तो कीं तूं जलधीस हि शरण जो गेला, पुर त्यागुनी
ठाकेना चि उभा, 'उभा' हि म्हणतां मत्सैनिकीं, मागुनीं.
भांडों भीतिवशा अशा तुजसवें मीं काय हा? अर्जुन
स्पष्ट न्यून वयें बळें हि मजसीं श्लाघो यशें अर्जुनें. ३६
आहे मत्तुल्य नागायुतबळ जरि न द्वंद्वयुद्धांत भी मीं
यासीं भांडेन, देवी जसि खळमहिषीं, मद्गदा होउ भीमीं;
रे! पार्था! धर्म तातप्रियकर करितो कीर्तिदा राजसूया,
जासी आमंत्रणातें गुरुपितृपतिच्या, अग्रजीं कीं असूया? ३७
वृकोदरा! सत्वर सज्ज हो, गदा तुला दिली हे परलोकभोगदा;
यमालयाचा पथ चाल दावितों, सर्वे हि देवूनि यशासि पावितों."३८
त्यातें भीम म्हणे, 'युधिष्ठिरयशें आमंत्रिले लोकप,
स्वर्गीं ठेउनि कोण येइल हरी! तैसें न पुत्रीं तप,
तूं जातां सुरवर्य येतिल मखा, या धर्मकार्यास जें
साहित्य त्वदधीन हें बळ असे तेथें चि आर्या! सजें.' ३९

१. शत्रुरूप राजे. २. महामनस्क. ३. बाहुयुद्ध. ४. बळरामाचा कनिष्ठ बंधु. ५. वाणी. ६. धुरा. ७. संपादून. ८. बाप आणि यम यांच्या. ९. वडील बंधूविषयीं.

गिरिव्रजपुरांतुनि त्वरित ते निघाले गदीं,
करेणुविषयीं[1] परस्पर वधेच्छु जैसे रदी;
न मृत्युभय भाविलें दृढमनें जयश्रीरतें,
विलोकिति सुर स्वयें करिति युद्ध जें वीर तें. ४०

भंग क्रुद्धद्विपांच्या प्रथम चि समरीं होय जैसा रदांचा,
तैसा वीराधिपांच्या निजविजयरणीं नाश जाला गदांचा;
जाणों त्या अर्कशाखा[2] मगधकुरुकुळोत्तंस ते मत्त दंती,
केलें दोर्युद्ध त्यांहीं त्रिणवदिन[3] खरें, हे नव्हे किंवदंती[4]. ४१

त्या भीमा मागधांचें अहितयशउडुस्वामिचे[5] राहु दंड,
श्राद्धेशाचे[6] चि साचे परमदद्लनीं दक्ष ते बाहुदंड.
त्या अन्योन्यप्रणांसीं त्रिणवदिवस हा काय आयास? दिष्टें[7]
त्रातें एकास, एका पविकवच असे पांडवा या सदिष्टें[8]. ४२

पहाती तें युद्ध प्रभु हि नरनारायण, दिवे[9]
नटांच्या त्या रंगीं गमति, जनधी दृष्टि हि निवे;
प्रहारांचा उग्र ध्वनि दिगिभकर्णांप्रति शिवे,
म्हणे शंभु, 'प्रेक्षीं अजभजैकदोर्विक्रम[10] शिवे!' ४३

विलोकितां युद्ध अनादि साचें, भासे महावैर जना दिसाचें;
रात्रौ न तो मानसखेद राहे, न पावती लेश सखे दरीं[11] हे. ४४

दोघे भिक्षाबळाहीं सम समरसवीं[12] दीक्षित ख्यात हार[13]
स्पर्शेना त्यांत एकास हि सहित सखे से करीती विहार;
मोटें आश्चर्य मानी जग, जगतिवरी रीति हे तों नवी चि;
क्षीरोदाच्या हि त्यांच्या भुजभुजगयशा[14] देति सन्मान वीची.[15] ४५

---

१. हत्तिणींविषयीं. २. रुईच्या ढाळ्या. ३. सत्तावीस दिवस. ४. लोकवार्ता, बाजारगप्प. ५. शत्रूंच्या यशोरूप चंद्राचे. ६. यमाचे. ७. [ केवळ ] दैव. ८. साधुप्रिय कृष्ण. ९. [जणु] दिवे च. १०. कृष्णभक्तांचा भुजपराक्रम. ११. भयातें. १२. युद्धयज्ञीं. १३. माघार. १४. सर्पाप्रमाणें असणाऱ्या भुजांच्या यशाला. १५. लाटा.

सांगे भीम प्रभूस, ‘ प्रमथन न घडे मागधाचें, असाध्या
वाटे मातें जयश्री, तरि हरि! नय[1] तूं सिद्धिकारी असा ध्या[2];
आम्हांला मुख्य तूझें पदबळ, भुवनीं ज्यां न सीमा तुळे या,
शत्रूसीं, दासलज्जा धरिसि न हृदयीं तूं कसी मातुळेया[3] !? ’ ४६
आणी चित्तीं जरेनें घटिततनु असें तो वधोपाय काया
जो द्वैधीभाव देवा अवघड वदतां पांडवा आयकाया,
शाखा घेऊनि हस्तीं जयिं निजवदना भीम पाहे चिरी ती.
कीं माराया नियुद्धीं अचुक चि सबळा या नृपा हे चि रीती. ४७
सत्तावीस दिन श्रमास समरीं जे पावले ते जया
पावावे निजभक्तबाहु, म्हणुनीं दे आपुलें तेज या;
तेणें भीम असीमधीमदमरश्रीमन्नुता[4] हा यशा
साधी, ज्यासि पिवोनि रुद्धनृपतिस्त्री जाहल्या हाय्यशा[5].  ४८
वेगें भीमसमीरणें उलथिला शत्रुद्रुम, क्षोणितें
तेव्हां कांपवि तो वमोनि भिजवि क्षीरें तशा शोणितें;
जाले प्राणखग स्वकाश्रयनगत्यागाकुळ[6] व्याळसा
जो हृत्कोटरशायि[7] जीव हि निघे सोडूनियां आळसा. ४९
एका पायास पायीं दडपुनि, धरिला दूसरा पाय हातीं,
ओढी, फाडी, समानें करि तनुशकलें, वेणुचीं[8] काय हा तीं ?
त्या काळीं तत्प्रजा त्या म्हणति, ‘ वधि जरासंधराजास हाय !
क्रूरात्मा भीम काळ प्रकट, न नर, कीं दैव नाहीं सहाय. ’ ५०
श्रीकृष्णें विजयें हि शत्रुविजयी आलिंगिला भीम ही,
पूजा, योग्य चि मारिला खळ, जया उच्छृंखळा भी मही;
पावे सद्गति सत्वसागर जरासंधाख्य तो काय न ?
ब्रह्मण्यासि सुधार्मिकासि कसुनी दे सर्वलोकायन[9]. ५१

---

१. युक्ति. २. शोधून काढ. ३. मामेभावा ! ४. निःसीम बुद्धिमंत, देव आणि श्रीमान् यांनीं स्तुत. ५. दुःखरहित. ६. स्वतःच्या आश्रयभूत वृक्षाच्या त्यागानें व्याकुल. ७. हृदयरूप ढोलींत राहणारा. ८. वेळूचीं. ९. त्रैलोक्याधिपति श्रीकृष्ण.

तत्कुमार सचिवांसह देवा ये भयें शरण, त्या सहदेवा
  राज्य दे वरद सद्य पित्याचें, जिंकिलें सकळ यद्यपि त्याचें. ५२
आज्ञेनें सोडवी ते निजपदकमळासक्तधी भूप कारा-
  वासापासूनि, दीनावरि करि हरि तो यापरी सूपकारा;
संसारक्लेश नासे, स्मृतिसमयिं घडे नाश पापा, यमाचे
  दूत त्रासासि घेती, म्हणुनि सुमति ते जोडिती पाय मांचे[1]. ५३

---

# अध्याय त्र्याहात्तरावा.

देवें वीससहस्र आठशत ही जे सोडिले राय ते
  सर्वेष्टप्रदपाद पाहति उभे तारावया आयते,
राहों देति न पापताप विनती कीं मातृता तातता
  ज्यांची केवळ बंधुता हि महिमा कां अन्यथा मातता[2]? १
श्रीमन्मूर्तिविलोकनीं नृप मनीं बाहेर ही हर्षले,
  जाणों त्या नतचातकांवरि सुधामेघौघ ते वर्षले;
जन्में लक्ष सदंघ्रिपंकजरजांमध्यें सदा घोळले,
  त्या पुण्यें चि मुकुंदपादकरुणापाथोद ते ओळले. २
भूप ते म्हणति, 'प्रपन्नविपन्नगैकपविस्तुते[3]!
  सद्गते! जगतांपते! यदुदेव! देव! नमोऽस्तु[4] ते;
दास राखिसि तूं चि, अन्य नसे सुखप्रद आसरा,
  वासरा जसि गाय, हा जन दीन मीन चि बा! झरा. ३
दीनरक्षणदीक्षिता! भवबंधनास हि तोडुनीं
  सोडवीं जन हा, पहा, पद वंदितों कर जोडुनीं;
दास्य दे, नलगे पुन्हां नरकास्य, राज्यपद क्षया
  [5]ने, विवेक न सेवि वेचुनि पुण्य जो हितदक्ष या. ४

---

१. पलंग; झोंप घेण्याचें सुखासन. २. माजता, वाढता. ३. शरणागताच्या संकटरूप पर्वतास वज्ररूप स्तुति ज्याची. ४. तुला. ५. अन्वयः—जो हितदक्ष पुण्य वेचुनि या न सेवि त्यास विवेक न.

राज्यैश्वर्यमदें न काळ गणिला, न स्वप्रजारक्षण
स्वार्थीं दृष्टि, जसी च सेउनि करी चिंता न जार[1] क्षण.
स्पर्धा नित्य परस्पर, स्मरहरध्येया तुझ्या या पदा
आम्हीं न स्मरलों पळ, प्रभुवरा! झाली भली आपदा. ५
जेणें या न भवाख्यपंककुहरीं[2] हे रेवती[3], दे वरा,
ऐशा, दीनजनावनैकचतुरा! हे रेवतीदेवरा[4]!
नामें नित्य तुझीं असोत वदनीं, ज्या मुक्तिसोपानता[5]
साजे, पाय मनीं वसोत, भजतां या मोक्ष सोपा नता.' ६
राज्यांला दीनबंधु प्रभु यदुप म्हणे, 'बोलिलां सत्य, जावें
गेहा, देहादिकीं जें जननमरणद प्रेम, त्यास त्यजावें;
गावें भावें मला चि, श्रुतिविहितकुळाचारधर्मप्रजांतें
पाळा, गाळा निषिद्धें, म्हणतिल 'न किजे' तत्त्वविद्विप्र[6] जांतें[7]. ७
दैवें जें सुखदुःख होइल तया भोगूनि सारा, खणा
नामें कामजटा; कृषीवळ निजक्षेत्रा तसा राखणा
मीं आहें चि, भिऊं नका, मग मज ब्रह्मासि पावा, रितें
जावूं द्या न वय क्षण, स्मरण जें योगांघ्रिपा[8] वारि तें. ८
ऐसें दे अभय प्रभू, चुकविती ज्याचीं यशें रौरवा,
राज्यांच्या करवी गिरिव्रजवरा[9] आज्ञापुनीं गौरवा;
स्वस्थानाप्रति पाठवी, बसउनी स्वर्णांचिया स्यंदनीं;
दीनीं देव करी दया तसि, जसी मातापिता नंदनीं. ९
दीनत्राणार्थ धर्मोन्नतिस[10] हि सुखवाया प्रजे[11] हेति घेते
शक्रप्रस्थासि गेले, तदुपरि विजयी वीर जे हे तिघे ते

---

१. जार केवळ विषयैक दृष्टि होऊन जारिणीचा उपभोग मात्र घेतो; पण तिच्याविषयीं मनांतून क्षणभर हि काळजी वाहत नाहीं, त्याप्रमाणें. २. संसार-नामक चिखलाच्या खांचेंत. ३. रूपती. ४. बळरामा! ५. मोक्षाचा पायरीपणा. ६. तत्त्वज्ञ विप्र. ७. विषयवासना—निर्णय०. ८. योगरूप वृक्षाला. ९. जरासंधपुत्रा. १०. धर्मोन्नति व्हावी यासाठीं. ११. शस्त्र. * ज्यांतें (?)

दुष्टांतें लाजवीति प्रकट चि सुहृदां दोर्विलासा[1] दरांतें[2]
हर्षानें वाजवूनी कळविति विजयाकर्णनीं सादरांतें. १०
धर्माचीं कृष्णभीमार्जुन नमिति पदें, तो महाराज यांतें
दे आशीर्वाद, भेटे, मग कळवि विभु प्राप्त जाल्या जयांतें;
ऐकाया आप्तसाधुव्रज मिळवि महात्मा जसा क्षिप्र भावां[3]
आठां ही सात्विका तो नृप मिळउनि पी विश्वसाक्षिप्रभावां. ११

## अध्याय चौऱ्याहत्तरावा.

धर्मे श्रीपतिला म्हणे, 'यदुमणे! आज्ञा तुझी माळसी
माथां वाहति सर्व देव मुनि ही, जे लौकिकीं आळसी;
हा लाभ प्रभुजी! भवादिभजकां भव्यप्रदा त्या तुला
आम्हीं दास करूं निदेश शतशः श्रीच्या हि जीवातुला[4]. १
हा अन्याय चि केवळ प्रभुवरा! होतो अनुज्ञापित्या
या दासासि सदा सदाशिवविधिध्येया जगाच्या पित्या
बा! आहे, परि धर्मशर्म पितरा बाळांचिया पालनीं,
सर्वस्वार्थसमर्पणीं[5] अभिमतें संतर्पणीं[6] लालनीं. २
श्रीकृष्णें अनुमोदन 'क्रतु करीं' ऐसें दिलें, त्यावरी
धौम्यव्यासवसिष्ठ जैमिनि अशां तो ऋत्विजांला वरी;
विप्रक्षत्रियवैश्यशूद्र हि नृपें त्या आणिले बाहुनी,
कीं व्हावे कृतकृत्य यज्ञपतिला श्रीजानिला पाहुनीं. ३
भीष्म द्रोण कृप स्वतात ससुतामात्याप्तवर्ग स्त्रिया
त्यांच्या आणवि तो युधिष्ठिर करी सर्वांचिया हि प्रिया;
गंधर्वामरशक्रशंकरशतानंदादि यज्ञक्रिया
पाहोनीं म्हणती भले, 'बहु भला बा! क्षत्रियश्रोत्रिया[7]!' ४

---

१. निजभुजपराक्रमातें. २. शंखातें. ३. कंपरोमांचस्वेदादि अष्ट सात्विक भावांला. ४. जीवनोपाय. ५. येथें चुकीनें 'सर्वस्आर्थसमर्पणीं' असें लिहिलें गेलें आहे. ६. इष्ट वस्तु देऊन तृप्ति केल्यानें. ७. क्षत्रिय असून दीक्षिता!

व्यासादि द्विजराज याजक, करी साहित्य लक्ष्मीपती,
कर्ता धर्म नृपोत्तम, द्रुपदजा पत्नी तयाची सती;
विश्वख्यात सदस्य नारदमुख ज्ञानी, स्तवावा सव
श्रेष्ठत्वें किति? आदरी बहु सदिक्पाळ स्तवा वासव. ५
निर्विघ्नक्रतुसिद्धिकाम पुरला, केली मुनीनीं कृपा,
पूजायासि सदस्ययाजकजना उत्साह मोटा नृपा;
कोणाचें पारि पूजन प्रथम, कीं पूज्यत्व सर्वांकडे?
अग्रार्चाविषयीं न निश्चय घडे राजा विचारीं पडे. ६
त्या काळीं सहदेव सत्प्रिय वदे, 'मूळ द्रुमाचें जळें
सिंपावें, तरि तृप्त होति सकळें पुष्पें फळें ही दळें;
देवब्राह्मणवेदयज्ञतनु हा विश्वांतरात्मा हरी
पूजावा पहिला चि, यांत घडत्ये त्रैलोक्यपूजा बरी.' ७
धौम्यव्यासवसिष्ठनारदभरद्वाजादि सद्विप्र ती
वाणी ऐकुनि 'साधु! साधु!' म्हणती त्या धर्मबंधुप्रती;
भीष्म ग्रीष्मविरामवारिदघटागर्जें[1] शिखीसा सदा-[2]
मध्यें फार निवे, म्हणे, 'स्मृति असो हे[3] श्रीनिवासा! सदा.' ८
धर्मानें कनकासनीं बसविला, ज्यांच्या शिरोनीं रजीं
जालें तीर्थें, जळ स्वयें शिव सदा वाहे शिरोनीरजीं;
तीं लक्ष्मीशपदांबुजें मुनिधर्नें प्रक्षाळिलीं पावनें,
माथां जें धरिलीं महेशपदवी देती महीपा वनें. ९
ज्याचें सद्यश नाशितें शतजनूरूढा कळंका, रितें
राहों दे न तिळ, स्थळ, स्वविभवें विश्वा अळंकारितें,
त्या श्रीच्या त्रिजगन्मनोहरमहाभाग्यास भूषागणीं
भावें भूषवि भक्त भूप, जनता ज्या मूर्तपूषा गणी. १०

---

१. ग्रीष्माची समाप्ति करणारा मेघसमुदाय त्याच्या गर्जनेनें. २. सभेमध्यें. ३. ही सहदेववाणी. ४. तीर्थजळें शंकराची पदवी. ५. शंभर जन्मांत वाढलेल्या. ६. अळंकारसमुदायानें. ७. मूर्तिमंत सूर्य.

रमालंकारातें[1] सुकृतसदळंकारनिकरें[2]
 महात्मा तो धर्म क्षितिपति अळंकारुनि करें
शकेना चि प्रेमप्रसरजळरुद्धेक्षणयुग[3]
 स्वयें देखाया श्रीमुख निरखितां जें क्षण युग. ११
जन विलोकुनि भूपसभाजिता, यदुवरा निजभक्तसभाजिता[4]
 'जय नमो' म्हणती बहु हर्षती, त्रिदश सत्कुसुमोत्कर[5] वर्षती. १२
भुवनगुरुच्या एवं विद्वन्मताग्रसभाजनीं[6]
 पढत असतां स्तोत्र प्रेमें समग्रसभाजनीं
खळ खवळला चैद्य[7] क्रोधें करि प्रभुगर्हणा,
 मुनिवरनृपांमध्यें सोसे न यास सदर्हणा[8].
'काळाचें बळ थोर, ईश[9], म्हणती तें सत्य हो! अत्यया[10]
 याच्या कोण करील? शक्ति अतुळा आली च मत्प्रत्यया;
कीं हे ऐकुनि बाळभाषण[11] वश ज्ञाते हि झाले, पहा
 कीर्तीच्या वदनासि लाविति मषी[12] वाटूनियां लेप हा. १४
पूज्य ब्राह्मण हे अतिक्रमुनियां, गोपाळ पूजावया
 सांगे बाळ, कळंक शंतनुसुता! हा आज तूज्या वया;
पात्रापात्रविचार कां विसरलां? ज्याला सदा चावळा[13],
 केला योग्य कसा सुरोचितपुरोडाशास हा कावळा? १५
शिष्टाचार स्वधर्म स्वपरहित सदा चालवावे दहानीं,
 हे विप्र द्रव्यलोभी प्रकट चि करिती सत्क्रियावेदहानी;
छत्रा सिंहासनातें उचित न यदुचा वंश, याला ययाती
 शापी, शापोक्ति अव्याहतगति गुरुची, भीतसे काय या ती?' १६

---

१. कृष्णातें. २. पुण्य हे च उत्तम अलंकार त्यांचा समूह आहे ज्याचे ठायीं अशा (करें). ३. प्रेमाश्रूनीं ज्याचे डोळे भरले आहेत असा. ४. स्वभक्तसमुदायानें जिंकलेला. ५. उत्कर=समूह. ६. विद्वानाना मान्य अशा अग्रपूजेचे ठायीं. ७. शिशुपाळ. ८. साधुपूजन. ९. समर्थ. १०. नाशा. ११. मूर्खांचें भाषण. १२. शाई, काजळ. १३. शब्दार्थ?

नाशी यन्नामधेयस्मृति हि भवगदा, जो यशस्वी सुवैद्य,
श्रीमान् कारुण्यसिंधु प्रभु वरद असा त्यासि नष्टायु चैद्य
निंदी, तें काय बोलों? बुधजनहृदयें भेदिलीं काय? कानीं
आधीं वेगें शिरोनि प्रबळतरमहादुष्टवाक्सायकानीं.[1] १७
साधूंचीं सांठवीति प्रकट पृथुगुणें[2] मंतुच्यां[3] कोटि पोटें,
हें जाणे विश्व, यांचें सहनपटुपण ख्यात विश्वांत मोटें;
सोसे स्वाराध्यनिंदा, न परि निमिष ही पाप तें फार खोटें,
ज्ञाते गेले कितेक श्रुतियुगवदनामाजि[4] घालूनि बोटें. १८
निंदी विश्वगुरूसि तत्परजना जो, बोल त्याचे कुडे
ऐके जो नरकांत निंदक जसा तैसा चि तो ही बुडे;
वारावा खळ शीघ्र तेथ सबळें, कीं दुर्बळें तेथुनीं
जावें, यास्तव घालिति श्रुतिपुटीं बोटें चि मोटे मुनी. १९
बोलेना देव कांहीं, जरि हि बडबडे फार तो चैद्य पापी,
व्यापी कोप द्विजांची मति सहजमहाशांतिशाला तथापि,
निंदावात्याप्रसंगें[5] अगुरु[6] चि चळती, न त्यजी स्थैर्य मेरू.
सिंह क्रोधें न गर्जे, जवळि हि करिती यद्यपि ध्वान[7] फेरू[8]. २०
भीमादि प्रभुभक्त वीरवर त्या दुष्टावरी कोपले,
कृष्णास्याचिकडे विलोकित तदा आज्ञेच्छु ते थोपले;
दापी त्यांप्रति खड्गचर्मधर तो पापी, म्हणे, 'टोळसे
भासा, बाळिश हो! प्रतापदहनीं कां होतसां कोळसे?' २१
चित्तीं देव म्हणे, 'करील कदन क्रोधांध हा योध न
न्यायप्राप्त उपेक्षण क्षण हि न प्राज्ञेष्ट आयोधन[9];
माझा पार्षद[10] मत्सम स्मृति नसे शापें लया गेलि, हा

१. अत्यंत तीव्र आणि महादुष्ट अशा वाग्बाणानीं. २. मोठेपणानें युक्त अशा पोटें). ३. अपराधाच्या. ४. कर्णयुग्म आणि मुख यांमध्यें. ५. निंदारूप वावटळीच्या प्रसंगानें. ६. क्षुद्र. ७. आक्रोश. ८. कोल्ही. ९. युद्ध. १०. सेवक. कार्णी विष्णुद्वारपाळ जयविजय यांची शापकथा अनुसंधेय आहे).

उग्र ग्रासिल शत्रुला खगपती जैसा महालेलिहा[1].　　२२

मातें पावोत जन्मत्रय अनुभवुनीं ब्रह्मशापावसानें,
तापाग्निग्रस्तभक्तद्रुमस्मृति हरिजे ग्यां अशा पावसानें.'

ऐसें योजूनि वारी हारि आरिवारि त्या सिद्ध झाले कृपाणी[2]
शूली[3] प्राशी[4] गदी जे मुसलशरधनुःशक्तिकुंतोग्रपाणी[5].　　२३

वृष्णींचा शक्र चक्र त्वरित मग, नगच्छेदना जेंवि पाक-
द्वेषी[6] वज्र, स्वकर्मद्रुमफळततिचा[7] भोगवी जें विपाक,
सोडी, तोडी क्षणांत, क्षितिवरि सहसा लोळवी चैद्यमस्ता[8],
हस्ता जोडूनि वंदी, स्तवि सदभयदा त्या सभा ती समस्ता.　　२४

चैद्याच्या तनुपासुनि प्रकट जें जालें निज ज्योति तें
उल्केच्यापरि[9] तत्क्षणांत दशदिग्वक्त्रें करि द्योतितें[10],
गंगा जेंवि शिरे पयोधिजठरीं, कृष्णीं प्रवेशे, वधी
न द्वेषें, असि पार्षदीं बहु दया दावी दयाशेवधी[11].　　२५

त्रासानें शिशुपाळसेवकबळें सारीं पळालीं पिलीं
वीशात्तासुवहिचीं[12], न ठाकति जन्हि क्ष्वेडें[13] सदा लिंपिलीं;
दानार्द्रद्विपयूथनायकशिरोमुक्ताफळीं[14] आवडी
सिंहाची, परि सर्व भीति जन्हि त्या शिंप्या न तो सावडी.[15]　　२६

देवर्षि व्यास इत्यादिक मुनि भगवद्भक्त जे ते चि लीला-
ध्वस्तारातिप्रभूच्या[16] समजति कृतिला त्या मखीं दाविलीला;
आश्चर्य प्राकृतांतें बहुत चि गमलें, तेज कैसें निघालें?
कैसें कृष्णीं, समुद्रोदरीं हिमरुचिचें[17] बिंब, तैसें रिघालें?　　२७

---

१. मोठा सर्प. २. खड्गधारी. ३. शूलधारी. ४. प्राशनामक शस्त्र धरणारे. ५. मुसळ, बाण, धनुष्य, शक्ति, भाला वगैरेनीं भयंकर हात ज्यांचे. ६. इंद्र. ७. स्वकर्मरूप वृक्षांच्या फलसमुदायाचा. ८. चैद्याचें मस्तक. ९. ज्वालेच्या. १०. प्रकाशतें. ११. दयेचा सांठा. १२. गरुडग्रस्तप्राणसर्पांची—**पंत**. १३. विषानें. १४. मत्त गजनाथाच्या मस्तकांतील मोत्याविषयीं. १५. श्वापदें. १६. सहज रीतीनें ज्यानें सर्व शत्रु मारिलेत अशा प्रभूच्या. १७. चंद्राचें.

पूजुनीं सकळ विप्र, दक्षिणा देउनी, नृप करि प्रदक्षिणा,
हस्त जोडुनि म्हणे, 'निवारिलें पाप, पांडुकुळ सर्व तारिलें.' २८
मखप्रवर पावला अवभृथांत सिद्धीस हा,
सहाय भुवनत्रयप्रभु रमापती कंसहा;
सहानुजनृपस्तुति त्रिजगदाननीं यास्तव,
स्तव श्रितसुरद्रुचा परि मुरारिचा वास्तव. २९
विप्रक्षत्रियवैश्यशूद्र सकळ प्रेमें नृपें अर्चिले,
यज्ञापादित वित्तराशि पहिले ते कोश ही खर्चिले,
गेले सर्व निरोप घेउनि निजस्थाना, तिहीं गायिला
शौरी, यत्पदपद्मरेणु पढवी देवांचिया गायिला. ३०
सुखी झाले सर्व, स्वमनिं म्हणति, 'स्वस्तरु सेवा,
स्वयें मानी दुर्योधन चि करि अत्यंत रुसवा.
सदुत्कर्षा साहे, न पळ खळधी दोषकलिला
वृथा वांछी पापी धरुनि हृदयीं रोष कलिला. ३१

---

## अध्याय पंचाहत्तरावा.

'कां दुर्योधन मात्र पात्र सुमखीं झाला विषादास? तें
सांगा हो! शुकदेव! सेवकमना आश्चर्य हें भासतें.'
ऐसा प्रश्न करी परीक्षित, तया लागे कथा सांगणें
तीं वाक्यें स्फटिकांगणें विमळ; क्यां बोलें न कां रागणें? १
पावावा राजसूय क्रतु नरपतिचा सिद्धिला हा निकामें
प्रेमा चित्तांत, घेती म्हणुनि सुमति ते बंधु वांटूनि काम;
जाला पाकाधिकारी निजगुरुवचनें भीम काळोपपन्नें
अन्नें सन्नेत्ररम्यें करवि बहु सुधेहूनि शुद्ध प्रसन्नें. २

---

...त. २. यज्ञार्थ संपादिलेलें. ३. यज्ञाला. ४. दोषदूषित.
६. अत्यंत. ७. [त्या] प्रसंगाला उचित अशीं.

नृपें केला दुर्योधन धनपती भाउ चि तया
मखीं वित्ताध्यक्षापरिस वरि शोभा उचित या;
जनाच्या सन्मानीं कुशळ सहदेव क्रतुवरीं
करी तैसें नाहीं पटुपण वसंतीं ऋतुवरीं. ३
दे पूतत्व यदंघ्रिपद्मधुनिची[1] तीर्थव्रजा चाकरी
तो आंगें अधिकार विप्रचरणप्रक्षालनाचा करी;
श्रीवक्षोजयुगाहुनीं[2] मुनिपदस्पर्श स्वयें तो भलें,
जाणों दे सुख पाणियुग्म विभुचें याकारणें लोभलें. ४
पांचाली करि परिवेषणाधिकारा,[3] वाराणस्याधिपतिची[4] च काय दारा?
आराध्या सुरलतिकांचियां[5] हि वारा, त्या राज्ञीप्रति सुरभि स्तवी उदारा.
कर्णासि दे नरपती अधिकार दानीं,
तो व्यासकौशिकपराशरनारदानीं
वाखाणिला नृप, रुचे न तया च कांहीं
मागीतल्याविण अभीप्सित यांचकांहीं. ६
'ज्याची वार्ता' भल्यांचे म्हणति 'अमृतसी सर्वदा प्यावि' कर्णं
क्षत्ता[6] तो, आणिखी ही कुरुपसुतशतीं जो महात्मा विकर्ण,
ऐसे कित्येक धर्मप्रियकर सुमती धर्मकृत्यास दाते
ज्ञाते यज्ञप्रसंगीं जपति नृपसखे ज्ञाति बंधू सदा ते. ७
जाला यज्ञ समाप्त साप्त नृप तो गंगेंत संगें हरी
घेवूनि, प्रचुरोत्सवें अवभृथस्नान प्रमोदें करी;
तीर्थें सर्व हि तेथ एकवटलीं पापर्धिचीं घातकें
पाप्यांचीं लय पावलीं च करितां स्नानें महापातकें. ८
वाद्यें वाजति, नर्तकीगण तइं अत्युत्सवें नाचती,
बंदी मागध सूत वर्णिति यशें, श्री वर्णवेना च ती;

१. ज्याच्या चरणकमलापासून उत्पन्न झालेल्या नदीची–गंगेची. २. लक्ष्मीच्या स्तनांपेक्षा. ३. वाढण्याचें काम. ४. अन्नपूर्णा. ५. कल्पवल्लींच्या समुदायास आराधन करण्यास योग्य. ६. विदुर.

त्या काळीं सुर पुष्पवृष्टि करिती, गंधर्व गाती रसें,
शक्राचें पुर शोभलें चि न कधीं देवापगातीरसें. ९

आनंदें कुरुवृष्णिभूपवनिता गंगेंत गंगावनें
तेथें मातुळपुत्रदेवरजना त्या सिंपिती पावनें;
दे उन्मोद विनोद तो, दमविती जैं पुंसमूहा, रिघे
त्यांत श्रीपति ही सहाय, तरि ती न स्त्रीचमू हारि घे. १०

पहातां तें होति स्मरशरवशस्वांत मळधी,
सैर क्षोभे पूरें, परि तदयुतें ही न जळधी;
रतीशाचीं साचीं धगधगित अस्त्रें न रमणी,
न झांकी नेत्रांतें निरखुनि तयां तो नरमणी. ११

जाला यज्ञ समाप्त, विप्र नृपति ज्ञाति प्रजा तर्पुनीं
धर्में बोळविले, अळंकृति मणी यानांबरें अर्पुनीं;
राहे सानुज तो सुयोधन नृप भ्रात्याचिया संनिधि
प्रेमें राहविला सदार भगवान् लक्ष्मीपती संनिधि. १२

पाहे तो धृतराष्ट्रसूनु भगवद्दासाचिया संपदे,
जों जों तों अतिमात्र त्यास रविभा घूका तसी कंप दे;
मोटे ही नरदेव सेवक तसे आज्ञा शिरीं वाहती,
नानावस्तुकर प्रवेशरहित द्वारीं उभे राहती. १३

जी संपत्ति अजातशत्रुसदनीं तीला न सीमा, नवीं
नानावस्तु विलोकिलीं न कधिं हीं स्वर्गीं तसीं मानवीं;
देवब्राह्मणसाधुवृंद हि मखामध्यें चमत्कारलें,
ऐसें सज्जनभाग्य गोड, परि त्या जालें खळा कारलें. १४

ज्या सत्संपत्सुधेनें निकर निववि‌ले निस्पृहां तापसांचे,
नेत्रीं चित्तीं शरीरीं खळ कुरुपतिच्या त्या महाताप सांचे;

---

१. भागीरथीचीं जलें. २. पुरुषसमुदायास. ३. माघार. ४. सरोवर. ५. पुरांच्या अयुतानें सुद्धां. ६. उत्तम निधान (ठेवा) अथवा सज्जनांचा ठेवा. ७. हा नामधातु आहे.

श्रीरामाच्या कथेनें विबुधबुधसभा भद्र [1]भावि प्रभूत,
स्वांतीं भावूनि हानि श्रवण न करिती, तापत्ति क्षिप्र भूत. १५
सम्राट् पांडव एकदा निजसभेमध्यें बसे, जी सभा
दिव्या कांचनरत्नराशि रविची सन्मान दे जीस भा,
ही एका चि पतीस जन्मुनि जगीं दे भोग धर्मास, ती
सेवी [2]वज्रभृदुग्रसेननहुषां कैसी [3]सुधर्मा सती? १६
सुधर्मेचा ठायीं सहसुरगुरूपेंद्र बळहा
तसा बैसे धर्म क्षितिपतिसभेंत प्रबळ हा;
तयापासीं भीमार्जुन यदुप माद्रेय सुमती,
जयांच्या बाहूंतें अनि[4]र्श वश जाली वसुमती. १७
शोभा यांची मनोज्ञा यदुकुळपतिच्या पांडवांच्या वधूनीं
प्रेमें बैसोनि तेथें निरखित असतां [5]सैद्रवाक्षांमधूनीं,
तों आला धार्तराष्ट्र प्रकुपित करित द्वास्थधिक्कार भारी,
धर्मोत्कर्षें जळे तो खळ कलि, कळिचा कीं सखा कारभारी. १८
चाले जों [6]मणिपट्टकुट्टिमशुभक्षोणिप्रदेशावरी
मानूनि स्थळ तें जळभ्रमभरें वस्त्रांत तो सांवरी;
हें होतां चि पुढें जळ स्थळ दिसे, राजा पडे सत्वर,
व्रीडेमाजि हि होय तोय हि शिखी, मोही सभार्चत्वर. १९
हांसे भीम सभेंत मांडळिकभूपाळादि [8]जे [9]ते जन
स्त्री ही हांसति, माधव स्मित करी ज्याचें समुत्तेजन;
तो धर्मास हि नावरे रस, जसा सेतूस पूर क्षणीं,
पेरी [10]बीज मुकुंद भार हरिता जो सिद्ध भूरक्षणीं. २०
मानी भूप सुयोधन स्वहृदयीं मानी महाहानिला,

---

१. मानी. २. इन्द्र, उग्रसेन व नहुष इत्यादिकांस. ३. देवसभा. ४. नित्य. ५. चांगल्या खिडक्यांतून. ६. रत्नखचित फरशीनें सुंदर दिसणाऱ्या पृथ्वीतलावर. ७. वस्त्राचे पदर. ८. सभांगण. ९. मूळ पाठ–**होते**. १०. [कलहाचें] बीज.

स्त्रीनीं ही अपमानिला, नरवरीं जो नित्य सन्मानिला;
लाजे राजसभेपुढें बहु कुढे[1] ती दुर्दशा नूतना[2]
तन्मानासि गिळी, गतायुशिशुला[3] भक्षी जसी पूतना. २१
फिरे मार्गे रागें, न पुसत पुरा जाय, पहिला
मनीं दावा ठावा, परि दुखविलें त्या चि अहिला;
महामानी मानी मरण उपहासाहुनि हित,
प्रजा मोटें खोटें म्हणति मुनि जे ते चि विहित. २२
बसे खिन्न अजातशत्रु चि सुहृत्प्रेमक्षया शोचित,
स्वांतीं कृष्ण हंसे, रचूनि कलह क्ष्माभारनाशोचित;
नाचे नारद भव्य नव्य यश जें तत्सद्रसा गावया,
जाय श्रीशिववासवर्स्वजनकां[4] तें भद्र[5] सांगावया. २३

---

# अध्याय शाहात्तरावा.

चैद्याचा मित्र शाल्व प्रथितबळयशा रुक्मिणीच्या विवाहीं
लीळेनें मागधादिक्षितिपसहित जो जिंकिला यादवांहीं,
तो दुर्धी 'सर्ववृष्णिक्षय करिन करें मीं' अशा या पणातें
बोले 'ओले चि पृष्ठव्रण,[6]' पण नुमजे दुर्बळा आपणातें. १
व्हावा शंभु प्रसन्न त्वारित, म्हणुनि तो न स्वराज्यादि लक्षी,
अक्षीणस्थैर्यधैर्य प्रखर तप करी, धूळिची मुष्टि भक्षी,
रक्षी पूर्णाब्द[7] ऐसा कृतनियम, जपे आशुतोषास,[8] खोटा
पोटामध्यें, वरी च प्रकट धरि तपस्वींद्रवेषा चखोटा.[9] २
प्रसाद न करि प्रभु त्वारित कीं खळें वाग्यतें[10]

१. खेद करी. २. हें क्रमलिखित पाठांतर सरस आहे. मूळ पाठ—**कीं दुर्दशा नूतना; प्राशी तोष यशासि त्या हि शिशुला ती राक्षसी पूतना.** ३. आयुष्य संपलेल्या मुलाला. ४. ब्रह्मदेव वगैरे यांस. ५. शुभवार्ता. ६. पाठीची [illegible]. ७. एक पूर्ण वर्ष. ८. शंकरास. ९. चांगल्या. १०. मितभाषी अशा.

तपें अनशनें कसें निरखिजेल सद्भाग्य तें?
तऱ्ही चरण दाविले वरदराज भालेक्षणें,[1]
जयांसि अवलोकितां मुनि कृतार्थ झाले क्षणें. ३
जेव्हां भेटोनि विश्वेश्वर वरद म्हणे, 'वांछिता माग, राया!'
मागे स्वाभीष्ट शाल्वक्षितिपति कुमती तो दयासागरा या.
'दे देवा! यान ऐसें असुरसुरनरां राक्षसां तें, डसावी
येची[2] व्याळी[2] अभेद्य प्रबळ परम जें यादवां भेडसावी.' ४
आज्ञापूनि मयास यान करवी जें देव तें कामग,
ध्वांतागार[3] चि लोहनिर्मित, न त्या उत्साह दे कां मग?
बैसे शाल्व तयांत सैन्य हि भरी, श्रीद्वारकेला करी
ध्वस्ता, पुष्करिणीस जेंवि सकुळ ग्रीष्मांत गेला करी. ५
काळें 'सौभ' विमान लोहमय, तो राहू मृगांका[4] पुरा
आला काय गिळावयासि अथवा तो वह्नि त्या कापुरा?
उद्यानें विमथूनि ती बहुबळोदग्रा चमू ढांसळी,
प्राकारांस हि शाल्व दावुनि महामाया विमूढां छळी[6]. ६
शिळा धूळि व्याळाशनि विटपि[7] वर्षोपळ घन
क्षणामध्यें वर्षे, अपरिमित जैसें जळ घन;
क्षय प्रासादांचा करि खळ, पडे गाढ तम ही,
पुरी कांपे, जेंवि त्रिपुर असतां वाढत मही. ७
भ्याले पौर समस्त, त्यासि अभय प्रद्युम्न दे तातसा,
लोकीं एक चि तारकार्दितसुरां[10] क्रौंचारि[11] देता तसा;

---

१. भालनेत्र शंकरानें. २. ज्या विमानाची भीतिरूप सर्पीण. ३. केवळ अंधकाराचें घर च असें. ४. चंद्ररूपी द्वारकापुरास. ५. तटास. ६. छळी. ७. वृक्ष. ८. गारा. ९. दाट. १०. तारकासुरानें पीडित अशा देवाना. ११. कार्तिकस्वामी. (क्रौंच हा पर्वत असून, त्याचा भेद करण्याविषयीं पूर्वीं परशुराम आणि कार्तिक यांच्यामध्यें चढाओढ लागली होती. त्या वेळीं कार्तिकस्वामीनें त्याचा भेद केला म्हणून यांस क्रौंचाद्रि, क्रौंचविदारण, क्रौंचसूदन अशीं नांवें आहेत).

जाला सिद्ध सयादव प्रभुसुत व्याळावरि [1]व्याळहा
कीं हस्तीवरि सिंह, कीं खवळला दुष्टांतकृत् काळ हा. ८

न धरि लेश मनीं परवा रणीं, [2]शरनखीं [3]हरि तो [4]परवारणीं,
करि पळांत महाभयद क्षतें, म्हणति युद्ध भलें जयदक्ष तें. ९

प्रद्युम्नाच्या पहातां असुरसुरनरीं निस्तुळा [5]सौभगातें,
झाली लोला जयश्री वरुनि हि विटली त्या खळा [6]सौभगातें;
सेना सेनी शरार्ता धरि भय, न सुचे तेधवां चेर्ल काय,
स्वामी ज्याचा न ठाके मृगरिपुसमरीं यूथ वांचेल काय? १०

मायामेघघटा पळांत उडवी प्रद्युम्न तो वात कीं,
मायाध्वांतरवी च नाम हरिचें तें त्या महापातकीं;
व्योमीं दृश्य अदृश्य सौभ न टिके याच्यासमोर क्षण,
स्तोत्रानर्ह जऱ्ही तऱ्ही करि असा जो [10]भाव तो रक्षण. ११

व्योमीं सौभ अदृश्य केवळ, गळे ज्याज्यांतुनीं लोहित
प्रद्युम्नास नभप्रदेश गमला युद्धांत तो तो हित;
बाणांतें तिकडे चि सोडुनि करि द्विट्सैन्यघात क्षणीं,
[11]तक्षा जेंवि कुठार घालि, शर त्या यानाचिया [12]तक्षणीं. १२

शाल्वाचा पृतनापती हरिसुतें आधीं रणीं पाडिला,
तेणें सावध होउनीं निजगदाघातें उरीं ताडिला;
जाला केवळ मूर्छित क्षततनु प्रद्युम्न, तद्रक्षणें
जोडी दारुकपुत्र सूत यश कीं होईल भद्र क्षणें. १३

पळविला रथ तो बहु सत्वर, त्यजुनि दुस्त्यज तें रणचत्वर,
समयिं होय नयस्मृतिद [13]क्षतांकुळधवावनिं हे करि दक्षता. १४

---

१. गरुड. २. बाणरूप नखानें. ३. सिंह. ४. शत्रुरूप हत्तींवर. ५. सौभाग्याला. ६. सौभवर्ती शाल्वातें. ७. सपतिका—पंत. ८. वस्त्र. ९. शरीर. १०. दृश्यादृश्यपणाचा. ११. सुतार. १२. तासण्याविषयीं. १३. जखमी झालेल्या ...लकाच्या रक्षणाविषयीं.

होता विमूर्छित मुहूर्त मग प्रभूतें
यत्नें उठे, न निरखी समर प्रभू तें;
सूतोक्त वृत्त परिसोनि म्हणे, "पळावें,
हें योग्य काय, कुळ ज्याकरितां मळावें? १५
अहा! रे दुर्बुद्धे! समर करितां कां पळविलें
मज? स्वक्लीबत्व प्रकट चि रणीं या कळविलें.
कसें दावावें हें वदन बळकृष्णांस कळतां
असें? लज्जा मोटी, यश मलिन केलें सकळ तां[1]. १६
भ्रातृस्त्री पुसतील सुस्मितमुखी मातें, 'अहो! धीर! हो!
भावोजी! समरांगणांत घडलें सांगा[2] कसें वीर हो!?'
तेव्हां उत्तर कोण कोणें[3] धरुनि क्लीबा! बसावें चि तां
केलें हें, मणिमाजि विंगळ करा आला कसा वेंचितां!" १७
बोले दारुकपुत्र जोडुनि करद्वंद्वा, "न मीं कातर,
स्वामी! स्वानुचरा म्हणाल, 'रथ हा त्वां काढिला कां तर?'
रक्षावा पतिनें रणीं पडतसे कष्टांत जैं सारथी!
सूतें ही व्यसनीं स्वधर्म हृदयीं आणोनि तैसा रथी. १८
शत्रुक्षिप्त[4] गदा विमूर्छित करी स्वामीस हें वक्ष तें
जें अस्मद्धृदयांतरीं हि रचितें लक्ष क्षतें स्वक्षतें;
यासाठीं रथ काढिला, पुनरपि त्वद्दास या स्यंदना
आज्ञा होइल तेथ नेयिल, पहा तें, चक्रभूनंदना[5]!" १९

---

## अध्याय सत्त्याहत्तरावा.

सूतातें जगदीशनंदन म्हणे, 'तो शाल्वसेनापती
तेथें ने रथ, दाखवीं मज गदा जी दे असा ताप ती.'

---

१. त्वां. २. मूळ पाठ—तेव्हां. ३. कोपरा. ४. शत्रूनें फेकलेली. ५. कृष्णपुत्रास.

आज्ञा घेउनि दारुकात्मज हय प्रेरी जवें, आगळे
   जे चित्ताहुनि, भानुवाजिमद ज्यां पाहूनि सारा गळे. १
तो कामें अवलोकिला निजबळीं जैसा मृगीं लांडगा,
   किंवा भाग्यमदें करी बडबड ज्ञामिव्रजीं दांडगा;
कीं त्या हंसगणीं शिरोनि मिरवि प्रागल्भ्य काकोळसा,
   कीं धिक्कारितसे मलीमसगुणें कस्तूरिका कोळसा. २
त्या शाल्वध्वजिनीधवाजवळि तो कार्ष्णि क्षणें पावला,
   मारायास जसा मृगेंद्र गहनीं दानांधदंतावला;
अश्व स्यंदन सूत मर्दुनि करी बाणें शिरःकर्तन,
   व्योमीं निर्जरनर्तकी निरखिती त्याचें नवें नर्तन. ३
ते शत्रुद्विप सांबसात्यकिगदप्रद्युम्नपंचाननीं
   केले फार परासु, दावदहनीं शाखी जसे काननीं;
जालें उल्बण सप्तविंशति अहोरात्रें महायुद्ध तें,
   तावत्काल बरा च धीर धरिला शाल्वें हि अत्युद्धतें. ४
आला देव अशांत घेउनि पृथापुत्राभ्यनुज्ञा पुरा,
   तों पाहे भववैद्य तो निजजना शाल्वाख्यरोगातुरा;
होतां ठाउक दुष्ट दुर्विलसित, क्षिप्र स्वकीयावना
   झाला सिद्ध, समिद्ध पावक गिळाया शत्रुरूपा वना. ५
कोपें केशव दारुकाप्रति म्हणे, 'हूं! हाक वाहांस ? तो
   पाहों शाल्व खळ, स्वकीयविभवें जो यादवां हांसतो.
शीघ्र स्यंदन चालवीं, यदुपुरप्रध्वंस सोसे कसा?
   केला ज्या अधमें पराभव, विपाग्नीनें चि जो सेकसा.' ६
शाल्वासीं गांठि घाली हरि तंव, अहितप्रेरिता शक्ति आली,

१. मनापेक्षां [ हि वेगामध्यें ] अधिक. २. सूर्याच्या घोड्याचा [ वेगाविषयींचा ] गर्व. ३. द्रोण काकस्तु काकोरुः इत्यमरः डोमकावळा—पंत. ४. काळेपणानें. ५. ध्वजिनि=सेना. ६. उन्मत्त हत्तीला. ७. वृक्ष. ८. भयंकर. ९. प्रज्वलित. १०. सिंचन करण्यासारखा.

व्यालीची काय आली वि[1]भुविशिखतती तीस पीतां न धाली.
श्रीम[2]त्कृष्णाशुगालिक्षतरिपुरुधिरें ती रणक्षोणि न्हाली;
सौभाची शौर्यशालिप्रभुशरनिकरें चाल[3]नी [4]व्यक्त झाली.   ७
शाल्वानें कृष्णबाहु प्रखरतरशरें विंधिला स[5]व्य, थानें
श्रीचीं जेणें त्यजावीं, परि न धनु तन्हि त्यागिलें स[6]व्यथानें;
हस्तापासूनि चापच्युति निरखिति जे तत्स्वधैर्यच्युतीतें
पावे, कीं पाहिलें हो! नव चि पद पराभूतिचें अच्युतीं तें.   ८
गर्जोनि प्रभुला म्हणे कुमति तो, 'रे! यादवा! पाहिलें
आम्हां देखत मि[7]त्रदार हरिले, तें एकदा साहिलें;
माझा चैद्य सखा सभेंत वधिला दुष्टा! सुहृद्घातका!
आलों मीं फळ द्यावया तुज असें जें योग्य या पातका.'   ९
म्हणे हरि, 'विमूढ तूं, [8]किति वृथा चि हे[8] वल्गना?
जना असासि ठाउका, करि उगा चि आयोधनीं.
मनांत समजें खळा! पवन जिंकवेना घना,
स्वनाश न कळे कसा खि[10]चवटूनि काळानना?   १०
आधीं दाविति शूर पौरुष रणीं, मूढा! न ते बोलती,
तच्चापध्वनिला चि ऐकुनि सुखें देवादि ही डोलती;
वाग्व्यापार न या स्थळीं उचित, दो[11]र्व्यापार चि प्रस्तुत.'
श्रीमत्कृष्ण असें वदे रिपुसवें गीर्वाणविप्र[12]स्तुत.   ११
सोडी कौमोदकीतें यदुरमण, तदाघातनिर्भिन्नजत्रू
जाला व्योमांत सौभासकट सकटक क्षिप्र तो गुप्त शत्रु.
तों तेथें एक आला पुरुष, मग जगन्नाथपादीं पडोनीं

---

१. कृष्णाच्या बाणांची पंक्ति. २. श्रीकृष्णाच्या बाणसमुदायानें जखमी झालेल्या शत्रूच्या रक्तानें. ३. चाळण. ४. मूळ पाठ—**क्षिप्र**. ५. डावा. ६. व्यथित भुजानें. ७. शिशुपालाची होऊं घातलेली बायको रुक्मिणी. ८. मूळ पाठ—**करिसि कां वृथा**. ९. युद्धाला. १०. खाजवून, चिडवून. ११. भुजपराक्रम. १२. देव व ब्राह्मण यानीं स्तविलेला.

सांगे, 'त्वन्मातृवार्ताहर[1] अनुगें[2] असें ' मंद आधीं रडोनीं. १२

'हे देवा! देवकीनें तुज निजवदनें दुःख सांगीतलें, कीं
शाल्वें बांधोनि नेला तव जनक, तुम्हीं रक्षिलें काय लेंकीं?
जैसा नेतो पशुघ्न स्वपशुस घडली त्वत्पित्या ते चि रीती,
हा! हा! पुत्रा! परंतु द्रवति कधितरी जे पशूतें चिरीती? १३

तूं विक्रमी पुत्र तथापि त्याची, झाली असी अंत्यकथा[3] पित्याची,
टाकी मला निष्कृप हा! वयाचें झालें, पुढें काय पहावयाचें?' १४

ऐसें ऐकुनियां मुनी च म्हणती, ' तो होय शोकाकुळ
ध्यातो या कवि जो, कधीं हि निरखी त्याचें न शोका कुळ. '
'हा! हा!' देव म्हणे, कसा गवसला माझा यमा तात, मीं
पुत्र व्यर्थ चि, काढवे न बुडती कीं गाय माता तमीं[5]. १५

माझा अग्रज राम तो निजपुरी रक्षावया राहिला,
ज्याचा भंग सुरासुरासुकर, न स्वप्नांत ही पाहिला.
तो दुर्गीं असतां असह्य असतां, शाल्वें पिता बांधिला,
कोल्यानें हरि रांधिला[6] विधिबळें, भ्याला शिखी[7] गांधिला[8]. १६

मायामानुषदेह दे हारिमनीं शोकाग्नितें ठाव कीं;
शाल्वाचीं नसती खरीं च मतिला तीं दुर्मतें ठावकीं;
चिंता दाखवि तातवत्सल निजीं चिंतातमाचा रवी,
मध्याह्नीं मिरवी अलीकतटिनी[9] जैसी धरा[10] मारवी. १७

तों शाल्वें आणिला तो हरिजनक जसा काय होता तसा च,
प्रेक्षूनि व्याकुळात्मा यदुपति हि म्हणे, 'हा! अहो! तात साच.'
नेत्रीं अस्रापगा[11] या सकरुणविभुच्या ये, मना आंत माया
जाया हृत्ताप, गाया यश, करि विचकी ज्यापुढें दांत माया. १८

---

१. तुझ्या आईचें वर्तमान आणणारा. २. दूत. ३. शेवटली गोष्ट. [४.] कण्हाला. ५. दुःखामध्यें. ६. शिजविला. ७. अग्नि. ८. मधुमक्षिकासदृश [?]षेष अत्युग्रजाति—पंत. ९. मृगजळाची नदी. १०. मारवाडांतील
अश्रूंची नदी.

श्रीकृष्णासि म्हणे असें कुमति तो,' रे! बालिशा! बाप हा,
कैंची भेटि पुढें? पुसोनि नयनें जन्मप्रदाला पहा;
मीं तों मस्तक खंडितों चि, जरि तूं उत्तीर्ण होसील हो
त्राणीं सिद्ध; सुपुत्र, शक्ति असतां हें कोण सोसील हो!?' १९
मायावी खळ ऐकवी, मतिस दे जी मोह वाणी असी,
क्रोधें शौरिशिरोधरेवरि[1] बळें तत्काळ हाणी असी[2];
तों तें मस्तकपद्म भूवरि पडे साप्तेक्षणाब्बिंदु[3], 'हा!'
स्वर्गीं ही म्हणती, 'च्युतिप्रति अकस्मात् पावला इंदु हा.' २०
सौभीं शौरिशिरासि घेउनि शिरे तो शाल्व, शोकीं हरी,
स्वामी नम्रजनात्ममोहमहिमा नामें चि जो कीं हरी;
झाला सावध साधुसेव्यपद जों पाहे, न ठाके शव,
ही माया धरि काय शत्रुदमनीं हा ही हठा केशव? २१
माया दावुनि मोहिला अरि बरा, नाहीं च हा सावध,
भ्रांतस्वांत[4] असे, अशांत चि म्हणे, 'याचा करावा वध.'
वर्षे शाल्व सहस्रशस्त्रनिकरें गोत्रीं[5] च पावूससा,
वृष्णिव्याघ्रवधेच्छु चेदिपतिचा तो मित्र भावू[6] ससा. २२
गौरीश त्रिपुरावरि, प्रभु तसा शौरी शरीं वर्षला,
शत्रुक्षिप्तसमस्तशस्त्रदलनीं वृत्रारि ही हर्षला;
सोडि श्रीजगदाश्रय स्वरगै[7] दासेड्य[8] स्वयें तो गदा,
ती सौभीं महिषीं जसी भगवती झाली असद्रोगदा[9]. २३
सौभ पर्वत गदा अशनी च ध्वंसतां स्वपुर भीवश[10] नीच
होय, यान पडलें चि नदीपीं[11] भा खळीं न जसि कीं दिनदीपीं. २४
गेले सर्व सहाय सोडुनि, दिली सौभें समुद्रीं बुडी,
शस्त्रव्रातविभुप्रतापदहनामध्यें चि टाकी उडी;

---

१. वसुदेवाच्या मानेवर. २. खड्ग. ३. आप्तांच्या नेत्रोदकबिंदूसह. ४. भ्रमिष्टचित्त. ५. पर्वतीं. ६. मानो. ७. कल्पवृक्ष. ८. भक्तस्तुत्य. ९. दुष्टाना रोग उत्पन्न करणारी. १०. भयभीत. ११. समुद्रांत.

दुःखें वर्म[1] गळे, शिरोमणि पळे, तद्बुद्धि तैसी कुडी;
राहे शाल्वकरीं गदा, प्रभुगदे संकोचली बापुडी! २५

धांवे शाल्व गदा गदाग्रजशिरीं[2] घालावया, राहुला
वेडावी, अथवा उभारुनि निजा अत्युन्नता बाहुला,
हांसे एक समुच्चतालगिरिला कीं दंडपाणीस हा
बोले दुर्मद, 'मत्प्रहार समरीं रे शार्ङ्गपाणी! सहा' २६

गदा[3]विषाग्निज्वाळोग्रशाल्ववल्मीकबाहु ही
कृष्ण[4]भल्लपतत्रीशें खंडितां, कांपली मही. २७

शाल्वाची प्रखरसुदर्शनें शिरोधि[5] च्छेदी, तच्चरणसरोरुहीं शिरो धी,
कीं ज्याचा सुगतिस पावतो विरोधी तल्लीला[6]मृततटिनीधवीं विरो धी. २८

देवांच्या दुंदुभींचे कळविति सकळां या जयास ध्वनी, न
ब्रह्मांडीं हिंडतां ही अलस धरिति कीं प्रौढ ते अध्वनीन[7],
दिग्दंतिश्रोत्रशूर्पोत्थितनवपवन स्पर्शतां, मज्जनातें[8]
स्वर्गंगा[9]सिंधुमध्यें करुनि निरखिती सूर्यगोसज्जनांतें[10]. २९

---

# अध्याय अठ्याहत्तरावा.

जे कीं पौंड्रकशाल्वचैद्य वधिले तन्मित्र कारूषक
क्रोधी दुर्जन दंतवक्त्र परम प्रख्यात सद्दूषक;
तो आला परलोकंग[11]प्रियसखस्वांतप्रियाकारणें
सर्वोद्योग करूनि यादवकुलोत्तंसास या मारणें. १

---

१. कवच. २. कृष्णाच्या मस्तकावर. ("गद" नांवाचा एक कृष्णाचा कनिष्ठ बंधु होता). ३. गदारूप विषाग्निज्वालेनें उग्र जो शाल्वरूप वारुळांतील बाहुरूप सर्प. ४. कृष्णाचा बाण हा च गरुड त्यानें. ५. मान. ६. त्याच्या लीलामृतसमुद्रांत. ७. पर्गस्थ. ८. दिग्गजांच्या कर्णरूप सुपांपासून उत्पन्न झालेला वारा स्पर्शिला
त्रतेसाठीं]. १०. सूर्य, गाय आणि सज्जन यांतें. ११. पर-
त्ताराधनेकरितां.

जातां शाल्ववधोत्तर स्वनगरा मार्गीं च ये आडवा,
देवर्ष्यादि[1] रणीं सणीं क्षुधित जे त्यांला गमे पाडवा,
धांवे सन्मुनिशापमूढमति तो विष्णुप्रतीहार[2] हो !
केला निश्चय हा चि कीं, ‘ विजय हो कीं संप्रती हार[3] हो.’ २
राहु ग्रासावयाला निजगगनपथीं भास्करा जेंवि रोधी,
तेंवि त्यागूनि चित्तांतुनि मरणभय श्रीकरातें विरोधी;
लंघावी या पिशाचें कसि सुमुनिमहाभूतिच्या[4] तायिताची[5]
शक्ती ? दीपीं पतंगासम कुमति पडे धांवुनीं आयिता चि. ३
रथावरुनि टाकिलि प्रभुवरें उडी वारणा[6],
नगाग्रगमृगाधिपें[7] जसि विलोकितां वारणा.
उठे धरुनि दारितस्वरिपुदुर्गवप्राशनी[8]
गिरीवारि हरी च, कीं घटज[9] अर्णवप्राशनीं. ४
तेव्हां तो दंतवक्त्र प्रभुपतिस म्हणे, ‘कामनासिद्धि माजी
झाली च, प्राण तुझे हरिन जरि नयें ठाकसी आजिमाजी[10],
रे! बंधुघ्ना! अमित्रा! स्थिरतनुमति तूं हो, सहा या गदेतें,
या देवीच्या प्रसादें अविकळ फळ घे, जें महायाग दे तें.’ ५
ऐसें बोलुनि घातलि प्रभुशिरिं दुष्टें गदा आयसी[11]
माळा वारणमस्तकीं तसि पडे; तच्छक्ति ते कायसी ?
हाणी त्या अरिच्या उरावरि तदा कौमोदकी लात कीं
क्षोभेना कसि ती सती निजपतिप्राणांचिया घातकीं ? ६
इंद्राक्षिप्ताशनीनें उपळतळ[12] फुटे, तें वमे वारिपूर[13],
स्पर्शीं कौमोदकीच्या तसि च निजगती दावि देवा रिपूर[14];

१. देव ऋषि आदिकरून. २. विष्णूचा द्वारपाळ. ३. पराभव. ४. महर्षीनें तयार केलेल्या भस्माच्या. ५. [मंत्रून गळ्यांत बांधावयाच्या] पेटीची. ६. निवारणार्थ. ७. पर्वतशिखरस्थ सिंहानें. ८. विदारण केले निजशत्रुरूप किल्ल्याचे तट जिनें अशी अशनी (वज्र). ९. अगस्त्य. १०. युद्धामध्यें. ११. लोहमयी. १२. खडक. १३. पाण्याचा लोंढा. १४. शत्रूचें उरस्थळ.

भूपृष्ठीं बाहुपादांसह विखरुनियां भूपणें केश, वातें
शाखी तैसा पडे तो, स्तविति सुरमुनी तेधवां केशवातें. ७
तई सूक्ष्म ज्योति प्रभुदलितदेहांतुनि निघे,
रिघे कृष्णीं, झाले सुगतिस असे भाजन तिघे[1].
अघाला[2] दे मोक्ष प्रथम कमळानायक वनीं,
जनीं न ज्ञात[3] श्रीशुकगुरुचिया काय कवनीं? ८
त्याचा बंधु विदूरथाख्य विभुच्या चक्रें मुखीं वैरिला;
देतो मुक्ति च संगरीं, न विजयश्री, देव हा वैरिला;
अंतीं संहरिला विदूरथ रणीं, आधीं कुधी पूतना,
केल्या या भवसागरांत सुकथा नौका सदा नूतना. ९
गंधर्वामरसिद्धगीतविजय श्रीकृष्ण गेला पुरा,
ज्याचें सद्यश लाजवी हिमकरा गंगाजळा कापुरा;
कन्या पूजिति सुप्रवेशसमयीं त्या लाजदध्यक्षतीं[5]
जीं तन्मंगळगायनें परिसति स्वःसंसदध्यक्ष तीं[6]. १०
जेव्हां कौरवपांडवांत कलह क्षोणीमुळें लागला,
आप्तांचा गण धार्तराष्ट्रमतिला संबोधितां भागला,
होतां युद्धविनिश्चय प्रभु बळ स्वीयक्षया संप्रति
प्रेक्षावें न, असें विचारुनि[7] निघे सत्तीर्थयात्रेप्रति. ११
आधीं जाय प्रभासीं, मग सविधि करि स्नानदानादि राम,
श्रीमान् कल्पद्रुमांचा गुरुवर पुरवि क्षेत्रवासीष्टकाम;
हिंडे सब्रह्मवृंद प्रभु बळ सदय स्वांघ्रिपद्मप्रतापें
तीर्थांचीं संहराया चिरंतरविधृतें[8] पापिसंसर्गपापें. १२
सरस्वती सूर्यसुता सुरापगा तीर्थे फिरे, यद्यश शुद्धि दे जगा;
गेला मग श्रीबळ नैमिषाप्रती, जेथें करीती मुनि सत्र सुव्रती. १३

---

१. शिशुपाल, शाल्व व दंतवक्त्र. २. अघासुराला. ३. मूळ पाठ--**ख्यात**. ४. पातका. ५. लाह्या, दहीं आणि अक्षता ह्यानीं. ६. देवसभेचे अध्यक्ष, श्रेष्ठ देव. ७. विचार करून. ८. पुष्कळ दिवसांची चिकटलेली.

जाले व्यास सुरद्रु कामकपिला चिंतामणी सत्रपे,[1]
श्रीरामास विलोकितां बहु सुखी होती मुनी सत्रपे.[2]
भाग्यें भेटति, भावशुद्धि असतां, काळें जया आयतें,
आलें मूर्त अनंतपुण्यफळ तें भेटावया आयतें.[3] १४

लोकीं आपण पूज्य हें विसरले प्रत्युद्गमें[4] वंदनें
साधू पूजिति, मोहिली मुनिमति श्रीरोहिणीनंदनें;
ते भूदेव चकोर चंद्र भगवान् दावि प्रतापा पदा
पीतां पाहति न क्षणांत चि जगीं ही विप्र तापापदा.[5] १५

होता ब्रह्मसभेंत सूत बसला, नाहीं उभा राहिला,
रामें तो सकळां मुनींपरिस ही उच्चासनीं पाहिला;
कोपे, देव म्हणे, ' मला न गणितां विप्रांत मुख्यासना
कां सेवि ? प्रतिलोमज[6] प्रभुमतें तों योग्य हा शासना. १६

व्यासें यास पुराणमात्र कथिलें, ज्या धर्मशास्त्रस्मृती
त्या ही सांगितल्या चि, शिष्य म्हणुनि ज्ञानप्रदें याप्रती;
सारा ही इतिहास हा समजला, गेलें वृथा सर्व तें,
सिंधवंतीं हि बुडोनि शुष्क असिजे पोटीं शिळापर्वतें. १७

विद्वत्संन्यासिवेषा नट धरि परि त्या दाविना शांति तोंडा,
हा ! व्यासा ! हा ! किमर्थ श्रम करुनि तुम्हीं कांडिला व्यर्थ कोंडा ?
वाणि ! त्वद्दोष नाहीं, सुरसरिदुदरीं अंतरीं शुष्क धोंडा
व्हावा लोकीं न दुष्टाभयद बळ दया क्षांति हो ! कानकोंडा.[7] १८

ऐसे धर्मध्वजी[8] जे असति खळ जगीं, ते खरे पापिराजे,
त्यांचें रामावतार[9] प्रशमन करुनि स्वप्रतापें विराजे,
मारावें दांभिकांतें म्हणुनि यदुकुळीं जन्मलों, कां पणातें

१. सलज्ज. २. यज्ञकर्ते. ३. दीर्घ—पंत. ४. सामोरें जाण्यानें. ५. ताप आणि आपदा. ६. हीन जातीपासून उत्तम जातीच्या स्त्रीस झालेला. ७. लाजिरवाणा. ८. धर्माची ध्वजा फडकविणारे दांभिक. ९. बळरामाचा (माझा) अवतार.

सोडूनि ब्राह्मणांत स्वयश मळउनी लाजवूं आपणातें ?' १९

साधूंचा परिपालक प्रभु, परि क्षुब्धा मना नावरी;
कैसें भावि टळेल? तत्करकुंश[1] क्रूरत्व सूतावरी
दावी, केवळ होय! हो यम, हरि स्पर्शक्षणीं प्राण[2] ते,
'ईशक्षोभ करी तृणासि अशनी,' हें बोलती जाणते. २०

हाहाकारासि आधीं करुनि म्हणति त्या ईश्वरा विप्र, 'सूतें
आम्हां अस्मन्निदेशें परम शुचियशें युष्मदंघ्रिप्रसूतें
रामा ! पाजूनि शर्मे अनवरत दिल्हीं या जनास प्रभूतें,
जाणों आम्हीं च बा ! तें सुख विदित न हा जेंवि दास प्रभूतें. २१

केला ब्रह्मासनातें समुचित, दिधलें यास आयुष्य वक्ता
पावावा न श्रमातें म्हणुनि वर दिल्हा अक्रमाख्य[3] स्वभक्ता;
आनंदें पीत होतों भवदमृतकथा ज्या पुराणप्रतीता[4]
केलें जें ईश्वरें तें शुभ चि; कुशळधी शोचिती कां अतीता[5]? २२

दिलें होतें यातें गुरुपण पुराणप्रवचनीं,
न यावें मिथ्यात्व त्रिभुवनगुरो! विप्रवचनीं;
तुला कैंचें पाप? स्मृतिगत यदंघ्री हि कालिला
दमी, शोधी ज्याचें रज सुरधुनीच्या हि सलिला. २३

परि प्रायश्चित्त श्रुतिपथ[6]परित्राणजनितें
करावें त्वां रामा! कुशळ सकळां जाण जनिं तें,
तुला आम्हीं काय प्रभु! गुरुवराला शिकवणें?
प्रकाशावा तेजें दिनकर महोराशि[7] कवणें?' २४

त्यातें राम म्हणे, 'जगद्गुरु तुम्हीं, विप्र श्रुतींचे निधी,
प्रायश्चित्त करीन सांग, मजला सांगा तयाचा विधी;
हा युष्मत्प्रिय लोमहर्षण उठो सुप्तोत्थिताचे परी,

---

१ त्या बळरामाच्या हातांतील दर्भ. २. ते तत्प्राण–**पंत**. ३. अक्रम या-श्रमरहित. ४. पुराणांत वर्णिलेला. ५. गतगोष्टीला. ६. वेद-त्रया–**पंत**. ७. तेजोराशि.

आज्ञा द्या मज, हो भवद्यश भवत्पुण्यें चि सर्वोपरी.' २५

तेव्हां प्रार्थूनि सर्व द्विजवर म्हणती लोकराया बळास,
'स्वामी! कांहीं च नाहीं अघटित तुझिया योगमायाबळास,
तूझ्या अस्त्रास वीर्यास हि न अनृतता देवदेवा! शिवावी,
काळा अस्मद्वरा ही तव पद करु हें, यत्सुसेवा शिवा वी.' २६

म्हणे तेधवां नाथ लोकत्रयाचा, 'पुराणप्रवक्ता असो पुत्र याचा,
पित्याहूनि उग्रश्रवा हो विशिष्ट, प्रहर्षोत वाग्वैभवें सर्व शिष्ट. २७

युष्मत्सेवा घडावी मज, मुनिवर हो! काम सांगा कराया,
साधीन क्षिप्र मीं जो सफळ न करवे सामरा नाकराया;
प्रायश्चित्तप्रकार श्रुतिनिपुण तुम्हीं मुख्य आम्हां कथा जी![1]
संपादूं ब्राह्मणाज्ञा त्रिजगदभिमता रक्षिल्ये सत्पथा जी.' २८

रामाला म्हणती मुनीश्वर, 'अगा! बा! तीर्थपादा नवा
त्राता तूं नससी जगत्रयपते! एका महा दानवा
भीतों सर्व हि विप्र इल्वलसुता पर्वीं सदा बल्वला[2]
शोषावें अतुळप्रतापतपना! त्वां त्या खळा पैल्वला[3]. २९

येतो दुर्जन सैन्य घेउनि सदा पर्वीं[4] मखक्षोणितें[5]
देवा! दूषितसे समूत्रपललें[6] पूयास्थिविट्शोणितें,
शापावा तरि पुण्यहानिसहनीं बा! मानस त्रासतें,
अस्मत्सेवन हें चि, विघ्न झगटो रामा! न सत्रास तें. ३०

मग भारतवर्षांतें त्वां करावि प्रदक्षिणा.
द्याव्या ज्या ज्या मागतील क्षेत्रींचे विप्र दक्षिणा. ३१

जाऊनियां करावीं त्वां सत्तीर्थांप्रति मज्जनें,
कृच्छ्रादि[7] आचरावें जें कथिलें मतिमर्जनें[8]. ३२

---

१. कोमलामंत्रण—**पंत**. २. इल्वलतनय बल्वलनामक एक घोर राक्षस. ३. बल्क्यास. ४. प्रतिपर्वीं, यज्ञसमयीं. ५. यज्ञभूमीतें. ६. मूत्रासह मांसानें. ७. कृच्छ्र—चांद्रायणादि प्रायश्चित्तें. ८. बुद्धिमान जनानीं.

एकवर्षव्रताचारें हें पातक सरो वरा
  घे देवा! भूमिदेवांच्या साधुहंससरोवरा!' ३३

---

# अध्याय एकोणऐंशिवा.

सत्रीं पर्वप्रतीक्षा करित चि बसला विप्रकार्यां सुपर्व-
  स्वामी तो राम, तों तें द्विजविजयकर प्राप्त झालें सुपर्व;
आधीं वायु प्रचंड द्रुम उमळि, नभीं कोंदला पांसु[2], काळी
  वात्या आली अमार्गें दशमुखभगिनी काय हो! ती सुकांळी[3]. १
आला कराया बहु पाप सांचा[4] निष्कारण द्वेषण तापसांचा,
  दावि स्वमायाविभवा सवांचा द्वेष्टा सुरांचा हि सवासवांचा. २
तो बीभत्स सकाय[5] काय नरक व्योमीं उभा राहुनीं
  गर्जे, भीषणवक्त्र वासुनि, जया भ्यावें शतां राहुनीं;
वर्षे मूत्र पुरीष[6] पूय मदिरा कीं पाउस, त्रातया
  साधूंच्या जगदीश्वरास हि न भी, दूषी सुसत्रा तया. ३
तेव्हां आठवि कामपाळ[7] मुसळा सच्छत्रुकाळा[8] हळा,
  ज्यांचा धाक यमार्यमाग्निभुजगां[9] वज्रास हाळाहळा
सत्रध्वंसकरें दिसों चि न दिलीं कोपांत देवा परें
  जाणों[10] तीं पहिलीं च येउनि करीं होतीं च सेवापरें. ४
चित्तीं देव म्हणे, 'भल्यांस भय दे जो तो च नाडो, हळा!
  प्रेक्षाया तव विक्रमा बहु असे सल्लोचना[11] डोहळा;
रे! वज्रादिवरायुधव्रजपराचार्या[12]! सुनंदा[12]! दरा[13]

---

१. देवाधिपति. २. धूळि. ३. रंडा. (ही एक शिवी आहे). ४. सांचा=संचय. ५. मूर्तिमंत. ६. विष्ठा. ७. बळराम. ८. साधूंच्या शत्रूंचा काळ अशा नांगरास. ९. अर्यमा=सूर्य. १०. शस्त्रें. ११. '**सदृष्टिला**' इति वरं। स्त्रीष्वेव दोहदर्शनात्–**पंत.** '**मदनदृष्टिला**' हें च पाठान्तर चांगलें; कारण डोहाळे स्त्रियांचे च ठिकाणीं १२. वज्रादि श्रेष्ठ अशा आयुधसमुदायाचा आचार्य अशा सुनंदनामक

' सुरवीं, खळक्षयकरा! सत्प्रीत्यमंदादरा!' ५
'रथांच्या सुप्रिया मोहोळानें
ब्ळ बळानें ताडिला तो हळानें;
अरि रामें कौतुकें पाडिला हो!.
|सळानें मस्तकीं ताडिला हो!. ६
|पानें गगनग नग तो ताडिला, जैंवि पक्ष-
स्माध्र गर्जे बहुत चि वधितां वृष्णिराजें विपक्ष;
तरी हि श्रम, परि भगवान् हा न लावि प्रयास,
'नि तेव्हां म्हणति, 'अभयदा! बा! भला' विप्र यास. ७
श केल्यावरि सुर हरिला पूजिती तेंवि रामा
त्री मुनी त्या सदभयदपदा बल्वलाच्या विरामा
जमालासितवसनमणिस्वर्णभूषादिकांहीं,
शोभार्युतांशासह तुळति न इंदग्निपूषादि कांहीं. ८
आज्ञेला, गेला, रक्षूनि विप्रयागाला,
कौशिकीला सरयूला, तेथुनि प्रयागाला. ९
'तीला सेउनि ही गंडकी विपाशेला
इाउनि पुरवी प्रभु पितरांच्या गयेंत आशेला. १०
ायां तारी यत्कीर्ति स्थिरजंगमा
देव सेवाया गंगासागरसंगमा. ११
होता भगवान् भृगुनंदन
ाकारणें रामें केलें साष्टांगवंदन. १२
कल्पशाखी मोदामृतपयोनिधी

---

' प्रीतीविषयीं अमंद ( पुष्कळ ) आहे आदर ज्यास अशा.
२ ह्या च मधुमक्षिका त्यांच्या. ३. मधमाशांच्या पोळ्यानें. ४. पंख
। असा पर्वत. ५. यज्ञ करणारे. ६. नाशका. ७. म्लान न
ळा, शुभ्र वस्त्र आणि सुवर्णभूषणें इत्यादिकांहीं. ८. शोभेच्या
८. ९. चंद्र, अग्नि व सूर्य आदिकरून.

गोदावरीस जावूनि गोदानें दे यथाविधी. १३

शंपाचलायु[1] न वृथा संपावें म्हणुनी कृती

संपादिती यद्गुणा तो पंपा पावे जगत्पती. १४

मंद ही पावती भाग्यच्छंद[3] यत्पदवंदनें

स्कंद तो नमिला विद्याकंद श्रीयदुनंदनें. १५

कैलास ही भवाब्धीचा ऐलीकडे[4] त्यजिना, हरा

कैलासाधिक जो त्या[5] श्रीशैला जोडी प्रभू करा. १६

पावनांघ्रि[6] भला, गावें सुधाकंद[7]घटामळा

ज्यास तो चपळालभ्य पावला वेंकटाचळा. १७

कावेरीस हि तो शौरी पावे, रीति जिची बरी,

करितां स्नान गंगादिसारितांचीं फळें वरी. १८

श्रीरंगाख्य हरिक्षेत्र नेत्रभृंगाब्ज देखिलें,

भक्तकल्पद्रुमारामें रामें वैकुंठ लेखिलें. १९

केतु[9] रामजयाचा जो हेतु पातकिशुद्धिला

दे तुलारहितानंद सेतु माधवबुद्धिला. २०

प्रलयाग्नि द्विपेंद्रासीं[10] भलया[11] जो सुचंदन

मलया जाय भगवान् बल यादवनंदन. २१

ज्याला[12] कुंभ तरी जो[13] कीं प्याला पाथोधिला तपें,

त्याला राम नमी, व्हावें ज्याला ज्योत्स्ना चि आतपें. २२

जो कर्णीं सेविला तो चि गोकर्णीं शंभु पाहिला,

---

१. विजेसारखें चंचल आयुष्य. २. येथें 'वावें' असें चुकीनें लिहिलें गेलें आहे. ३. भाग्यकामना. ४. अलीकडे. ५. श्रीशैलमल्लिकार्जुनास. ६. पवित्र चरण ज्याचे. ७. जलद--पंत. अमृतोदकाचा शुद्ध घट असा. ८. मूळांत हा श्लोक लिहिण्यापूर्वीं च कवीनें 'गूढचतुर्थपाद' म्हणून लिहून तो अक्षरांकानीं दर्शित केला आहे. ९. ध्वज. १०. शत्रुरूप तृणांस. ११. भल्यास--पंत. १२. येथपासून पुढें ८२ व्या अध्यायांतील ७ व्या गीतींतील पहिल्या पादापर्यंतच्या पंतलिखित पत्रांचे अभावीं (९५-१०७) परलिखित पत्रें आहेत. म्हणून चातुर्मास्यांच्या प्रतींची तेवढ्या-पुरती संशोधनाला मदत घेतली आहे. १३. अगस्त्य.

चित्तासह बळें त्या सद्वित्ताला[1] बेल वाहिला. २३

आर्या द्वैपायनें[2] शंभुभार्या ही पूजिली बळें,
पापी न बुडवी जी त्या तापिचीं सेविलीं जळें. २४

सेवावा सर्व तीर्थांनीं, ठेवावा मनिं सज्जनीं,
देवा वाटे त्या हि तोष रेवावारिनिमज्जनीं[3]. २५

कर्म दासां न बांधों दे, शर्म दावी अपार जें,
स्वर्मदा[4] नुरवी, झाली नर्मदा शुद्ध त्या रजें. २६

प्रभाव ज्याचा निःसीम, प्रभा शुभ्र हिमाहुनी,
प्रभानुगुरु[5] तो हर्षे प्रभासाप्रति पाहुनी. २७

तीर्थें क्षेत्रें स्वशिष्य त्रिजगदघगदक्लेशनाशैककामें[6]
होते संस्थापिले जे सकरुणहृदयें साधु पूर्वीं च रामें,
स्वाँविद्यारोगवैद्यें[7] निजचरणरजोरूपिणी दिव्य मात्रा
त्यांतें द्याया चि केली स्वसखमुनि सर्वें घेउनी तीर्थयात्रा. २८

तेथें कौरवपांडवाहवसवीं[8] झाले पशु क्ष्मेमाधव[9],
क्षेत्रक्षोणिसुरोक्त[10] वृत्त परिसे येतां चि तो माधव;
कृष्णें भूभर युक्तिनें उतरिला, जाणे मनीं, हें मतें
केलें आपुलिया चि कीं बहु बरें लोकत्रयक्षेम तें. २९

म्हातारा अंध आप्त क्षितिपति न बुडो पुत्रशोकांत, गावें
अस्मत्कारुण्य लोकीं, हृतविषअहिचें गोत्र[11] हो! कीं[12] तगावें?
मारावें हा चि चित्तीं न मदनुजनिच्या भाव ठाको, परानें
केलें काय? स्वयें ही मृदु म्हणुनि नये भू खणों कोपरानें. ३०

---

१. साधुजनांच्या द्रव्याला—शंकराला. २. मूकांबिका, दुर्गा. ३. नर्मदाजलामध्यें स्नान करण्यानें. ४. स्वर्गाच्या गर्वास. ५. प्रभानु=कृष्णसत्यभामापुत्र+गुरु=वडिल माणूस. ६. त्रैलोक्याचे पापरोग व क्लेश यांच्या नाशाची च इच्छा ज्याला अशा रामानें. ७. स्वतःची माया हा च रोग त्याच्यानें. ८. कौरवपांडवांच्या युद्धयज्ञांत. ९. पृथ्वीपति राजे. १०. प्रभासक्षेत्रांतील ब्राह्मणानीं सांगितलेलें. ११. कुळ. १२. असेना कां—पं. प्र.

या भावें प्रभु जाय तेथुनि कुरुक्षेत्रासि वारावया
अंधातें सुतशोकदुस्तरमहासिंधूंत तारावया,
जातां सानुज धर्म कृष्ण नमिती, बोलेल हा काय कीं,
ऐसा धाक पडे तयांस, गुरुता ऐसी च सन्नायकीं. ३१

रामें भीम सुयोधन स्वविजयीं बद्धाश ते पाहिले,
युद्धश्रद्ध गदी रेंदी जयकरेण्वर्थी उभे राहिले.
रंगीं नाचति साध्वसें त्यजुनियां, जाणों नट क्रीडित
प्रेक्षूनि स्वमनांत होति दिगिभ स्वर्मल्ल हि व्रीडित. ३२

त्यांतें राम म्हणे, 'ऐका हे राजा! हे वृकोदरा!
हो दैरा न पदा घातें, भूसि देवूं नको दरा. ३३

ऐका हो! हित सांगतों, रण पुरे, ठेवा गदा, या, बसा,
भेटा, ओळखिलें न काय मजला? तो स्नेह गेला कसा?
खोटा आग्रह हा ग्रहँ, श्रम चि दे, रे! वीर हो! तामसा
झालां कां वश ज्या तमांत न दिसे हा राम ही रामसा? ३४

दोघांचें बळ तुल्य ठाउक मला आहे, न कां? गा! पहा
तूं प्राणाधिक एक भीम, दुसरा शिक्षाधिक क्ष्माप हा;
राहो निष्फळ युद्ध उद्धतपणें बोला न, द्या कान, या,
ऐकावें सुहृदुक्त युक्त बुध हो! उल्लंघितां कां नया?' ३५

रामाची करुणावती त्रिभुवनीं मान्या सती भारती,
भीमक्षोणिपतिश्रुतिप्रति मिळों शंके मनीं फार ती;
जाणें प्रार्थिलियाविणें परगृहीं कोपप्रसंगीं, करि-
स्त्री पंकांत, जसी तटीं न उदकीं तो भाव अंगीकरी. ३६

म्हणे मनीं राम, 'सुके न भावि धीप्रदीपिकेची उरवी न भा विधी,

---

१. हत्ती. २. जयरूप हस्तिणींला वरण्याकरितां. ३. भय. ४. स्वर्गाचे मल्ल. ५. गर्त, खळगा. ६. भया. ७. [अनिष्टोत्पादक] ग्रह. ८. वाणी. ९. भीमदुर्योधनांच्या कानाप्रत. १०. बुद्धिरूप दिवटीची.

अनावरीं विच्युतसायकोपमीं जनीं करूं निष्फळ साय कोप मीं ? ' ३७
मर्मोद्घाटनमद्य पुष्कळ बळें अन्योन्य जे पाजिती,
ज्यांच्या नित्य हृदंतरीं दुरुदितें मागील ही डाजिती,
दुर्द्यूताद्यपकार फार चि सदा दावाग्निसे भाजिती,
ते वीर त्यजितील कां असुपणें आरंभिली आजि ती ? ३८
नाहीं आदरिलें हितोक्त विभुचें त्या दुर्जनें कौरवें,
भीमें ही सुजनें तदेकशरणें कार्याचिया गौरवें;
जाया द्वारावतीस राम उठतां हांसे, म्हणे, ' बोध कां
आलों यांस करावया न पुसतां आम्हीं अशां शोधकां ? ' ३९
तो तेथूनि श्रीबळ द्वारकेला आधीं, पश्चान्नैमिषाला हि गेला,
तेथें यज्ञ श्रेष्ठ तद्दक्षिणेला, योगिध्येयांघ्रीश्वरें बोध केला. ४०
विप्र रामपदतोयज, मान त्यागुनी, नमिति तो यजमान;
धन्य दे सहज जें बळ हातें, दे न यज्ञशतकीं बळहा तें. ४१
सुसव वासव वानि असा करी, मुनिजना निजनायक उद्धरी,
यश मला शमलापह तें रुचे, ठकवितें कवितें न दुजें सुचे. ४२

---

# अध्याय ऐंशीवा.

श्रीदामा विप्र सखा होता हो ! तापपापकाळाचा
पदलीन दीन मीन क्षीरधिचा विश्ववृष्णिपाळाचा. १
ब्रह्मज्ञ ब्राह्मण तो साधु गृहस्थाश्रमी समीचीन
श्री न प्रेक्षी परि जो भी न स्वांतीं धरी, नसे दीन. २
वर्ते दैवोपनतें, मन तें वश इंद्रियें सदैव नतें

---

१. [ धनुष्यापासून ] सुटलेल्या बाणाप्रमाणें आवरण्यास कठीण अशा लोकांचे ठिकाणीं. २. ' काय ' असा उद्दिष्ट पाठ असावा काय ? ३. प्राणांच्या पणानें. ४. ताप आणि पाप यांचा काळ ( नाशक ) [ कृष्णाचा ]. ५. [ सर्व ] जग आणि यादव यांचें रक्षण करणाऱ्या कृष्णरूप समुद्राचा. ६. चांगला. ७. संपदा. ८. यदृच्छेंकरून प्राप्त होईल त्यानें.

न मितें अनाढ्य[1], अमितें[2] आत्मधनें जो कुबेर सन्नमितें[2]. ३

निष्ठा भगवद्ध्यानीं, हा निस्पृह विप्रसत्तम ज्ञानी

मानी लाभ न हानी, ग्लानि नसे शांतिसुरभिच्या थांनीं[3]. ४

पत्नीस क्षुच्छमनक्षम न स्वर्मी कदन्न ही, गमनीं

श्रम नीटा ही मार्गी, आच्छादन मूर्तिला जिच्या धर्मनी[4]. ५

शुष्करसा[5] जासि सरिता, तैसी गतकामकोप विप्रतनू,

दुष्कर साध्वी करि तप, तत्तनु न स्वार्थ[6] लोपवि प्रतनू[7]. ६

दंडें[8] उदंड चि साहे जैसें तद्वपु तसें चि तद्वसन,

व्यसन श्रीशध्यानीं, न स्फुरवि क्लेश तें सदभ्यंसन[9]. ७

हतरुचि वसनें मलिनें, कालिनें अस्पष्ट[10] साधुलोक, मळें

कीं जेंवि मुकुरबिंबें[11], कीं शैवाळें हि झांकिलीं कमळें. ८

साध्वी करि धृतिरक्षण, न क्षण ही भावि[12] ताप तो कांचे[13]

परि सुगुणें हि शिला[13] ही; साहील किती सुताप तोकांचे ? ९

भयकंपिततनु साध्वी बहुतां दिवसीं च रीति दावि नवी;

भावि[14] न वीरांस हि भी; पतिच्या अतिचारुमति[15] पदा विनवी. १०

'अयि! विद्वन्मुकुटमणे! स्वामी! तुमचा सखा रमावर कीं,

नरकीं न पडे पापी यन्नामें, सदय तो नतांबर कीं! ११

अजि! त्या ब्रह्मण्यातें[16] करुणावरुणालया[17] शरण्यातें[18]

त्यजति सरा न जसे बक, सेवकमृग कल्पतर्वरण्यातें. १२

त्याच्या तुम्हीं च गातां प्रेमें नेमें सदा चारित्रास,

---

१. दरिद्री. २. ब्रह्मविचार हेंच धन ज्यांचें अशा असंख्य साधूंनीं नमिलेला जो कुबेर [ कृष्ण ]. ३. स्तनीं. ४. नाड्या, शिरा. ५. शुष्कजला नदी. ६. आपला कृशपणा. ७. थोडा [ सुद्धां ]. ८. दुःख [ पक्षीं ] शिवण. ९. ब्रह्मविद्येचा अभ्यास. १०. लुप्त, आच्छादित. ११. आरशांतील बिंबें. १२. मानी. १३. परि शिला हि सुगुणें हि ( दोर चांगला असला तरी त्यानें ) कांचे. १४. जें होणार तें. १५. सुमति. १६. ब्राह्मणांविषयीं दयाळु अशातें. १७. करुणासागरा. १८. शरणागताचें रक्षण करणाऱ्यातें.

कीं त्रास हरि भवाचा, भेटा जी ! एकदां स्वमित्रास. १३
डोळेभरि अवलोका लोकाधारा तया महाभागा,
आगारा श्रीच्या मीं स्वामी ! म्हणत्यें पहावया भागा[1]. १४
दीनकुटुंबप्राणत्राण द्रव्याविणें कसें होय ?
तो यक्षपेश[2] [3]चित्तें वित्तें[3] देईल, घन जसें तोय. १५
त्यासम तो चि उदार, स्वात्मार्पण ही हरी करी, राजे
या जे भूवरि दाते ते हि उणे अर्पिते शरीरा जे. १६
भजकां कामित जो दे, तो देव द्वारकापुरीं आहे;
लोक सकाम अकाम हि महितगुणा त्याचिया पदा पाहे. १७
जो मेघ कूपपल्वलवापीकासारशतमहासरिता
भरि तारका तयांचा[4] कां राहे चातकाख्य दास रिता ?' १८
दीनाचा बंधु प्रभु विश्वात्मा त्यां मुखें[5] असें बोधी,
'तो धीरमणि पहावा' भावाची दर्शनोत्सुका हो धी. १९
विप्र म्हणे, "बहु बरवें, भेटेल सखा महेंद्रनीलाभ[6];
स्वीला भव्य[7] चि सुचलें; याहुनि दुसरा नसे जनीं लाभ. २०
काय उपायन आहे ? आणी द्याया सख्यास कल्याणी !
'पाणी रिक्त नसावा' स्मृतिकाराची असी असे वाणी[8]. २१
आपुलिया यदुवीरा दीरा द्यायास काय देतीस ?
नेती सप्रेम सखे भेटि सख्यांला," असें वदे तीस. २२
वळतां वचना विप्र, क्षिप्र प्रहसितमुखी म्हणे, 'हो ! हे
पोहे' विप्रांपासीं याची, या चि क्षणीं श्रमी नोहे. २३
अंशुकखंडीं[9] यत्नें रत्नेंसे बांधुनीं दिले पतिला,
अतिलाभ चि तो केवळ, दे बळ उत्साह साधुच्या मतिला. २४

१. कष्टी व्हा. २. कुबेराधिपति. ३. चित्तें उदार सभाग्य पं. प्र. ४. तया तारकाचा. ५. त्या स्त्रीच्या मुखानें. ६. इंद्रनीलमण्याप्रमाणें कांति ज्याची असा (श्रीकृष्ण). ७. कल्याण. ८. "रिक्तपाणिर्न पश्येत राजानं देवतां गुरुम् ।" हें तें वचन होय. ९. वस्त्राच्या तुकड्यांत, फडक्यांत.

येतां चि मनांत निघे, होती शुभ द्वारकापथीं शकुन,
न कुनक्षत्रादि[1] तयीं, जारि निघतां कृष्ण ये मुखीं ठकुन. २५
प्रकटावे जे सात्त्विक भाव मुकुंदाचिया पारिष्वंगीं
अंगीं मुनिच्या दिसती, कीय पथिक ते हि लुब्ध सत्संगीं? २६
विप्र म्हणे, 'वपु वाहन वाक् विद्या वैर नसे चि न सुचेल.
होइल भेटि कसी जरि तो हा हें[6] त्या सख्यास न सुचेल? २७
तो साक्षात् श्रीजानी, ज्या निर्जितखळबळा बळावरजा
वरजातिकुळज गाति, ध्याति पदींच्या नृदेवदेव रजा. २८
सर्वज्ञ सखा माझा, विश्वात्मा कां न वोळखेल मला?
अमलातुलगुण तो कां तोकां उबगेल? न क्षण श्रमला.' २९
ऐसें चिंतित चिंतकचिंतामणितें मुनि क्रमी वाटे,
दाटे श्रीरंग मनीं, गमनीं बाहेर चि श्रमी वाटे. ३०
भगवच्चरणध्यानें हा नेला साधु न चुकतां नीट,
धीट जसा श्रीसदनीं, सदनिष्ठज्ञा न ज्यांत ये वीट. ३१
तेव्हां होता अमळा कमळाशयनीं मुकुंद तीसहित,
महितप्रताप जो हरि, मोहें रिपू नित्य त्यास, तीस हितें. ३२
सदनांगणांत दूरुनि पाहुनि सन्मित्र बंधुला सहसा,
सहसात्विकभाव प्रभु धांवे तो होय मूर्त सन्महंसा. ३३
राहे हर्षीं न मना नमनाचें भान बंधु पाहूनि,

---

१. दुष्ट नक्षत्र वगैरे. २. मन हरि स्मरे–**पं. प्र.** ३. ते सात्विक भाव हि सत्संगीं लुब्ध [ होत्साते ] मार्गस्थ झाले काय? ४. उत्तम–**पं. प्र.** ५. सुवस्त्र–**पं. प्र.** ६. तो लहानपणाचा मित्र हा हें. ७. लक्ष्मीपति. ८. जेथें देव नित्य वसतो–**पं. प्र.**(?). ९. त्यास (श्रीकृष्णास) नित्य मोह रिपु [ आहे; आणि ] तीस (त्या कमलेला) हित (मित्र) असा आहे. (कृष्ण हा रुक्मिणीमंदिरांत होता तरी विषयलंपट नव्हता; कारण तो मोहाचा नित्य वैरी होय. मोह हा लक्ष्मीचा मात्र मित्र होय; कारण ती मोहाला उत्पन्न करते ). १०. परमोत्सवसम–**पं. प्र.**

बाहूनि प्रेमानें मानें आलिंगिला चि बाहूनीं. ३४
दोघांचें ही भरि तें' आलिंगन हृत्प्रमोदकारि गळे,
प्रेमें[2] दोघांच्या ही नेत्रांतूनि प्रभूत वारि गळे. ३५
बैसविला तो बंधु त्रिजगत्तातें मग स्वपल्यंकीं,
आधीं च भक्त[3]वत्सल स्वकृ[4]पासत्कामकल्पवल्यंकीं. ३६
तोयें तो तीर्थांचा गुरु सेवकपा[5]पयवसदव धूतां
बंधुपदांतें, दुर्लभ यच्छ्रीपदधूळिलव सद[6]वधूतां. ३७
यत्पदरजःपवित्रा देवें[7]धुनी जगदशुद्धितें वारी,
धरि माथां तो पावन जनसंग्रहनिष्ठबुद्धि तें [8]वारी. ३८
सुर आपणास पूजिति तैसें पूजी सुदामदेवातें,
ढाळुनि सुव्यजनाला त्या सुख शै[9]ब्या निकाम दे वातें. ३९
'स्वपतिसख द्विज' ऐसें जाणति नातें पुराण न वधू तें,
विस्मित होउनि म्हणती, 'या केलें काय पुण्य अ[10]वधूतें? ४०
त्यजुनि श्रीस पलंगीं, धावुनि आलिंगिला अध[11]र्मे भिक्षु,
छि[12]! क्षु[13]जीर्ण मलिन वरि, परि हरि करि लोभ, हा [14]मे इक्षु. ४१
प्रेमें आलिंगावे जैसे धावूनि रामभावोजी
तो जीवप्राणप्रियभाव प्रभु या हि भिक्षुकीं योजी. ४२
ऐसा केवळ दीन, श्री न स्वल्प हि, दिसे कुरूप महा,
पूजियला सद्[15]गतिनें [15]पतिनें तारि कोण कीं गुरूपम हा?' ४३
त्या सच्[16]चूडारत्नीं पत्नी हरिच्या सुविस्मिता होती,

---

१. मूळ पाठ—**दोघांचे ही होतां**. २. मूळ पाठ—**दाटति**. ३. येथें दप्तरांतील प्रतींत चुकीनें 'भक्तवत्स' असें लिहिलें गेलें आहे. ४. आपली कृपा ही च सत्कामकल्पवल्ली तिच्या मांडीवर. ५. भक्ताचें पाप हें च तृण त्यातें जाळणारा अग्नि च असा कृष्ण. ६. योगिवरांस हि—**पं. प्र.** ७. भागीरथी. ८. पाणी. ९. रुक्मिणी. १०. विरक्तानें. ११. दरिद्री. १२. कंटाळा—**पं. प्र.** १३. क्षुधेनें कृश असा. १४. मलिन हि आवडतो—**पं. प्र.** १५. सज्जनांची गति जो आपला पति कृष्ण त्यानें. १६. साधुश्रेष्ठाविषयीं.

तों तीर्थपद श्रवणप्रवणश्रवणांत वाक्सुधा ओती. ४४
'श्रीगुरुचरणानुज्ञा झाली आम्हां तुम्हां सह चि आर्या!
केली कीं अनुरूपा कार्यगृहस्थाश्रमार्थ मग भार्या? ४५
पहिलें चि तुझें नाहीं मन संसारीं, सदा उदासीन;
मीन समुद्र त्यागुनि होइल कां पल्वलोदकीं दीन? ४६
चित्त तुझें कामाहीं नाहीं हरिलें, विरक्तिचें सदन,
पद न स्थितिचें जैसें जळबिंदूच्या सरोरुहच्छदन. ४७
पूर्वीपासूनि धनीं निर्धनीं प्रेम न तुझें तपोनिलया!
जाणसि कीं तें काविला चवि लाउनि नेतसे जपोनि लया. ४८
हें मज आहे ठावें हृदय तुझें शुद्ध जें दुधापरिस
परि सत्वनिधे! कांहीं वदतों मीं मित्र तें बुधा! परिस. ४९
कामास नसति वश, परि टाकाया विषयवासना धीर,
क्षीरस्वच्छमती हीं कर्में करिती निसर्गगंभीर. ५०
जैसीं कर्में करितों मीं ठेउनि लोकसंग्रहीं दृष्टी,
सृष्टिस्थितिसंहार हि जीवार्थ चि, सागरीं वृथा वृष्टी. ५१
श्रीमद्गुरुवरसदनीं होतों, करितोसि कीं गुरुस्मरण?
चरणप्रसाद ज्याचा अद्भुतरवि करि गुहातमोहरण. ५२
कीरापरि पढवीलें, बाळा जसि माय पाजिति क्षीरा,
धीरा! गुरुपदनौकाश्रित तो पावे भवाब्धिपरतीरा. ५३
गुरु आद्य पिता, दुसरा विद्याप्रद मत्समान गुरु लोकीं,
शोकीं तारक तिसरा, तो मीं चि ज्ञानदानपटु जो कीं. ५४
गुरु कर्णधार, त्याची सुदृढा तत्वोपदेशवाक् सुतरी
धरुनि भवांबुधि तरले बहु बुध, तत्कीर्ति ही जना उतरी; ५५

---

१. ऐकण्याविषयीं उत्सुक अशा कानांत. २. करण्यास योग्य असा जो गृहस्थाश्रम त्यासाठीं. ३. कमलपत्र. ४. निधन=वंश—निर्णय०. ५. तें (धन) काविला चवि लाउनि जपोनि लया नेतसे [हें] जाणसि कीं (तुला माहीत आहे कीं धनानें मनुष्याचा नाश होतो). ६. न सूर्य तसा—**पं. प्र.** ७. नावाडी. ८. नौका—**पं. प्र.**

वर्णाश्रमधर्मांहीं नाहीं मज होत फार परितोष,
जो षट्पद[1] गुरुच्या पदपद्मीं दे तो चि तोष गतदोष. ५६
स्मरतें कीं तें जें श्रीगुरुदारांहीं च इंधनानयना
पाठविलें विपिनाला? माझ्या दिसतें तपोधना! नयना. ५७
तें रज, ती वृष्टि तसी, त्या करका[2], तें तमिस्र[3], तो पवन,
लोप वनस्थळमार्गज्ञानाचा, काय तें सकोप वन? ५८
हिंडों धरुनि परस्पर कर, खरकर[4] तिळ हि न कारि अनुकंपा,
शंपा[5] दे भय; तम[6] ही, न मही पंथ[7], पावल्या स्वतनु कंपा. ५९
भार शिरीं, अंधसम भ्रमत चि होतों तमांत, मग सूर[8]
दूर ध्वांत कराया ये, चित्तांतील तम हि गुरुशूर. ६०
पाहे आम्हां आर्तच्छात्रांतें[9] करुनि बहु वनीं शोध,
तो धर्मज्ञ दयार्णव गुरु वर दे, ज्यांत आत्महितबोध. ६१
आलिंगुनि आम्हांतें, माथां हुंगूनि, तो वदे साधू,
माधुर्य[10] तें म्हणे, 'रे उपमेच्छो! अमृतकरमळा[11] जा धू.' ६२
श्रीगुरु म्हणे, 'अहो! हे पुत्रक हो! अस्मदर्थ या गहनीं
दहनीं मृगशावकसे श्रमलां दुःसहमहाविपत्सहनीं. ६३
प्राण्यास प्रिय परम स्ववपु, तुम्हीं तें हि मानिलें तुच्छ,
सुच्छत्र काष्ठभार[12] हि सुरसुमनांचे चि भाविले गुच्छ. ६४
तुमचें मन गुरुभजनीं निपट चि लंपट, तुम्हीं च गुरु लुटिला,
उठिला अंतःकरणादर्श, भला लाभ हा नसे कुटिला. ६५
धर्माद्यखिलपुमर्थप्राप्तीचें मुख्य मूळ हें देह,
स्नेह त्यागुनि[13] गुरुच्या पदपद्मीं अर्पिलें असंदेह. ६६

---

१. भ्रमर. २. गारा. ३. गाढ अंधार. ४. रवि मावळला–**पं. प्र.** ५. वीज. ६. भय दे–**पं. प्र.** ७. वाट न सुचे–**पं. प्र.** ८. सूर्य. ९. दुःखी विद्यार्थ्यांना. १०. निर्मळ मधुरवर (मधुरतर?) वाक्य–**पं. प्र.** ११. चंद्रकलंकाला. (चंद्र निष्कलंक केला तर तो उपमेस योग्य होईल). १२. काष्ठभार छत्र चि मानिला–**पं. प्र.** १३. मूळ पाठ–**न धरितां.**

हा चि प्रत्युपकार प्रेमें करिती असा चि सच्छात्र,
पात्र ज्ञाना होती, ते चि गुरु, द्वैत धरि मृषा गात्रें[1]. ६७
मीं सुप्रसन्न झालों द्विजवर हो! जीं तुम्हां दिलीं छंदें[2]
तीं अप्रणष्ट सारें इहपरलोकीं स्फुरोत हृच्छंदें[3]. ६८
कर्मीं वसा, नसो परमर्मीं लोचन, असा दयाधर्मीं,
नर्मीं[4] हि मृषोक्ति न यो, शर्मीं[5] नांदा, शिरा क्षमावर्मीं[6]. ६९
मजहूनि त्रिजगांत प्रख्यात यशें असाल, कविराजे
गातिल, कां मत्करुणार्श्रीचें लोकीं न बालक विराजे? ७०
मीं बहु न प्रकट जगीं, व्हाल तुम्हीं सर्ववंद्य, न ख्यात
तात क्षीरधि, पारि हरचूडारूढ[7] प्रसिद्ध तज्जात.' ७१
ऐसा श्रीमद्गुरुनें केला आम्हांवरि प्रसाद, बुधा!
तन्मधुरता न जननीस्तन्यास न कामधेनुच्या हि दुधा. ७२
गुरुगृहनिवासवृत्तें तुज हि सकळ विदित असति, अनुरक्ता!
वक्ता किति वर्णिल बा! पारि वरिते शुद्ध शांति गुरुभक्ता. ७३
विप्र म्हणे, 'गा! बापा! या पायानीं समागमें देवा!
जे वागविले सेवक, त्यां आम्हां सुरलता चि गुरुसेवा. ७४
तूं त्रिजगद्गुरु, तूझा कल्याणाधार वेदमय[8] कार्य,
जनसंग्रहाविना तुज गुरुच्या सेवेंत अभ्युदय काय?' ७५

---

# अध्याय एक्यायशीवा.

त्या शुद्धसत्वतनुला भेटे गुरुबंधु ज्यांत तो वार[9]
फार प्रियकर, जैसा हंसाला मानसाख्य कासार. १
झाल्या प्रथम कथा, मग चित्तज्ञ प्रभु म्हणे, 'धरादेवा!
दे, वाट पाहिली बहु, काय मला आणिला असे मेवा[10]? २

---

१. शरीर. २. वेद. ३. भवन्मनोभिलाषें–**पं. प्र.** ४. थट्टेच्या भाषणीं. ५. सुखामध्यें. ६. क्षमाकवच धरा–**पं. प्र.** ७. शिवमस्तकारूढ (चंद्र). ८. छंदोमय देह. ९. दिवस. १०. बालवत्प्रेम्णा वदति–**पं. प्र.**

भक्तीं स्वल्प हि दिधलें तें प्रेमें होय मज सख्या! कोटी,
मोटी प्रीति तयाची, गोष्टी तुजसीं वदों नये खोटी. ३

दिधलें बहु हि अभक्तीं, तऱ्हि तें माझ्या न होय परितोषा,
दोषाभिज्ञा न रुचे अत्यनुकूला[1] हि जारिणी योषा[2]. ४

जळ दळ फळ पुष्प हि जो देतो मज भक्तिनें चि जें त्याचें
साचें प्रेमार्पित तें सेवितसें मीं विशुद्धचित्ताचें.' ५

ऐसें वदे, परि द्विज पृथुक[3]प्रसृति प्रभूसि अर्पीना,
सर्पी[4] नाहिं बहु म्हणुनि भक्ति प्राघुर्णशिखीस[5] तर्पीना. ६

बोल कसा लावावा? लक्ष्मीपतिच्या करीं कसे तो हे
पोहे देइल? लज्जाभक्तिविसंवाद[6] म्हणुनि ही मोहे. ७

लज्जाभरनम्रशिरा प्रभुपासीं होय तो कविप्रवर,
नवरम्यनीरजानन[7] चिंति, न पाहे सशंक[8] विप्र वर. ८

चित्तीं देव म्हणे, 'हा पूर्वीं मोक्षेच्छु मत्सखा भजला
भजला न श्रीकामें, साध्वीचें प्रिय करावया सजला. ९

आला बंधु मजकडे याचा इतका चि यत्न हा लक्ष;
त्र्यक्ष[9] प्रसन्न जाला उपमन्युस, यास मीं हि सत्पक्ष[10]. १०

मीं विश्वसुहृत् सत्य चि, परि हा चि सखा भला मला साजे,
लाजे याच्या[11] प्रेमा राम हि तद्वैभवीं[12] जसे राजे. ११

---

१. मनोनुकूलता दाविते ही–पं. प्र. २. स्त्री. ३. पसाभर पोहे. ४. बहु काय करावें?–पं. प्र. तूप. ५. अतिथिरूप अग्नीला. ६. भक्ति म्हणे 'द्यावें', लज्जा म्हणे 'न द्यावें'–पं. प्र. ७. सरस आणि सुंदर अशा कमलासारखें [कृष्णाचें] मुख. ८. द्रव्यलालसेनें. ९. शंकर. १०. साधुपक्षपाती. ११. यथैतस्य मयि प्रेम न तथा बलस्यापीति–पं. प्र. ज्याप्रमाणें ह्याचें माझ्यावर प्रेम तसें बळरामाचें हि नाहीं. १२. यथा बलभाग्याभिलाषिणोन्ये राजानस्तत् व्याप्तुं नालमेवं मम यस्य मुनेः प्रेमभाग्यमित्यर्थः–पं. प्र. ज्याप्रमाणें बळरामाच्या भाग्याचा अभिलाष करणारे दुसरे राजे तें मिळविण्यास समर्थ झाले नाहींत [त्याप्रमाणें] तपस्वी अशा माझें प्रेमभाग्य [हि दुर्लभ आहे].

मज[1] विप्र विप्रपत्नी बहुमान्या रामरेवतीसम ही,
मीं न म्हणें कीं, ' वंदी या सखया कामदेव तीस मही. १२

श्रीचा हि पावतो कीं भाग्या मणिसानुकंपदा[3] दास,
मग काय न देइन मीं ? तीचा[4] धणि सानुकंप दादास.' १३

आणुनि चित्तीं ऐसें शोधि श्रीकर करद्वयें चिंद्या,
त्या सत्वश्रीभूषा[5] प्राकृत निंदोत, न स्वयें निंद्या. १४

तों जीर्णमलिनवस्त्रीं सांपडली श्रीकरासि[6] गांठोडी,
जोडि द्रव्याची जसि चुकली कृपणास, हे तुळा थोडी. १५

' हें काय सख्या ! ?' ऐसें बोले, डोले, हळू च मग सोडी,
'गोडी याची मज बहु, [7]भेटि उदारा ! तुला गमे थोडी. १६

निर्मळ पुष्कळ केवळ अमृतरसाचे नवे रवे, पोहे
नोहेत स्वल्प, सख्या ! मज विश्वात्म्या हि फार साधो ! हे. १७

झालों मीं तृप्त सख्या ! हे पोहे पाहतां चि, कां आणा
प्राणांच्या[8] लटिक्या बा ! वाहेन, तुम्हां बरें मनीं आणा. १८

श्रीवदनीं लौकरि भारि हारि[9] हरि ! [10]हरि ! [11]सतुष पृथुककणमुष्टी,
तुष्टि प्रेमें भाजि व्रजपशुपांची[12] हि सेविली उष्टी.' १९

---

१. मज (?) विप्रेन्यत्र रामरेवतीतोऽपि सदारोऽयं पूज्यः यस्मादयं रामवंद्यः । किं चानंतेन शिरोधृता क्ष्मापि सुदामभार्यातो न्यूना कुतः भुक्ता भूरियंतु महासतीति विप्रदारमहित्वं–पं. प्र. (बळराम आणि रेवती यांपेक्षां हि स्त्रीसह हा सुदाम पूज्य; कारण हा रामवंद्य आहे. शिवाय, शेषानें (शेषावतार बळरामानें) मस्तकावर धरलेली पृथ्वी ही सुदामपत्नीपेक्षां कमी च मानली पाहिजे. कारण, पृथ्वीचा [अनेक राजांनीं] भोग घेतलेला आहे आणि ही महासाध्वी म्हणून च ब्राह्मणस्त्रीचें श्रेष्ठत्व. २. मूळ पाठ–आर्य. ३. मेर्वाश्रितानां मेरौधर्मः–पं. प्र. ४. श्रियः–पं. प्र. लक्ष्मीचा. ५. सात्विक संपत्तीला भूषणभूत अशा (चिंध्या). ६. भाग्येन–पं. प्र. (सुदैवानें). ७. नजराणा. ८. शपथा. ९. स्वच्छपथः कष्टं–पं. प्र. १०. परमाश्चर्यें, आनंदे च–पंत. ११. कोंड्यासह. १२. गवळ्यांची.

मुष्टि भरी दुसरी जों भक्षाया देव भक्तवर्यास[1]
श्री कर धरी, म्हणे, 'हा राहो पहिला चि मुष्टि पर्यास[2]. २०
लोकद्वयीं हि एक चि बहु सर्वसमृद्धिकारणें मुष्टि,
जें भक्तभाग्य पाहुनि होइल वरदर्षभा[3]! तुम्हां तुष्टी. २१
मुष्टि दुजी सेविसि, तरि तुज काय असे अदेय वरदासी?
विरहीं धरुनि असूतें[4] कंठीं कंठील कोठवर दासी?' २२
या भावें धरि वरकरसरसिज[6] निजशयंयुगें[7] सरोजाक्षी[8],
त्या क्षीराब्धिज्याहृदया समजे तीचा चि पति जगत्साक्षी. २३
ब्राह्मण त्या रात्रींत प्रभुनें, मणिकनकमंडिता पाटीं
बैसविला सन्मानें, जेवविला कांचनाचिया ताटीं. २४
स्वकरें साक्षाल्लक्ष्मी या भावोजीस आग्रहें वाढी,
काढी प्रभु गुरुगोष्टी, मुखकर्णयुगा हि तृप्ति दे गाढी. २५
दे स्वकरें करुनि विडा निबिडानंद प्रभु प्रभूतनया[9],
तनयापरिस स्वजनीं भजनीं लालस, न रीति नूतन या. २६
मागति मुनि पादरजा सादर ज्या प्रभुसि तो सदार गडी
निजउनि निजशयनावरि, शयें[10] नावरि, बंधुच्या पदा रगडी. २७
मानी[11] मुनि वैकुंठाविण हरिजन भूमिवरि असेना कीं,
प्रभुपदपद्मस्पर्शप्राप्तामितपुण्य हा असे नाकीं. २८
प्रातःकाळीं च हरि प्रियसखविप्रोत्तमांघ्रिला लागे,
'बा! गेहा जरि जातां, तरि मज विसरों नको' असें मागे. २९
'अन्योन्य प्रेम खरें, याच्या पोटांत लाभ कोटि, कवे!

१. भक्तश्रेष्ठांचा आप्त असा. २. पुरेसा. ३. वरदवरा! ४. प्राणांतें. ५. इयमहं दासे दत्ता सती—पं. प्र. [लक्ष्मी म्हणते] ही मीं दासाला दिली असतां ६. पतीचें करकमल. ७. आपल्या दोन हातांनीं. ८. कमलाक्षी. ९. सदाचार-संपन्नाला (विप्राला). १०. हात. ११. अन्वयार्थ—मुनि (नारद) हरिजन (हरिभक्त) वैकुंठाविण भूमिवर असेना कीं, मानी (वैकुंठाशिवाय केवळ पृथ्वीवर जरि हरिभक्त असला तरी नारद त्यास मान देतो).

मज तुज विरहलव नसे, भस्मीं मीनासि काय हो ! टिकवे? ३०
सर्वस्व तुम्हीं माझें, मीं तुमचें, हें नको चि बोलाया,
डोलाया पुनरपि द्या दर्शन मज साधुसंगलोला या.' ३१
धरुनि कर स्वकरानें गेला पावावयासि दूरवर,
ब्रह्मण्यदेव सेवकजनचिंतितकामदानशूरवर. ३२
आलिंगुनि वंदुनियां मुरडे मार्गे सखेद यदुराय,
पाय न वाहति, जाली वत्सवियुक्ता चि काय ती गाय? ३३
चालोनि द्वित्रि पद प्रभु माघारा फिरोनियां पाहे,
राहे उभा क्षणक्षण, धीर तऱ्ही नीर लोचनीं वाहे. ३४
मुदित व्रीडितचित्त द्विज निजसदनाचिया धरी वाटे,
दाटे कंठ, स्वगत हि पारि अंतरला सखा हरी वाटे. ३५
मुदित द्विज या भावें कीं गुरुपदवी दिली सुसन्मानें,
जो नाहीं च मिळाला पुत्रा विधिला हि अग्रजन्मानें. ३६
विप्र मनांत म्हणे, "ऱ्यां प्रभुची ब्रह्मण्यता असीमा जी
ती पाहिली, सपर्या केली जगदीश्वरें असी माजी. ३७
परिचय बाळपणींचा, त्यांत असा नीच मीं दरिद्र, बला
आत्माग्रजापरीस हि मानुनि गुरु आस तो हरि द्रवला. ३८
कोठें दरिद्र हा मीं! कोठें लक्ष्मीनिवास तो स्वामी!
आलिंगिलें भुजांहीं प्रेमें वक्षस्थळीं रमाधामीं. ३९
बंधु म्हणावें या मज नीचा सर्वोत्तमें रमानाथें!
हे चरण प्रक्षाळुनि घ्यावीं माथां हि काय तीं पाथें! ४०
श्रीच्या पर्यंकीं हा बैसविला दास रामसा, यासीं
वदला प्रेमें, ज्याचें यावें वदनास नाम सायासीं. ४१
लोकीं न पाविजेलें जन्मुनियां काय या सुभव्य जनें?

१. भक्तजनानीं इच्छिलेला पदार्थ देण्याविषयीं मोठा शूर. २. पाऊल पुढें पडत नाहीं. ३. लज्जितांतःकरण. ४. आपल्या हृदयांत आहे. ५. वडीलपणानें. ६. पूजा. ७. जलें. ८. कष्टस्थितींत. ९. या जनें—पं. प्र.

स्वकरें चि [1]वीजिलें मज महिषीनें प्रभुचिया शुभव्यजनें. ४२
यत्पदरजोर्थि योगी वसविति गिरिवि[2]वरगहनपर्णकुटी,
तो दे मज शीतळ [3]वरमलयजरसशीतपाणि देव उटी. ४३
किंबहुना [4]प्रथमरचितसत्कृतियश या चि एकलें नेलें,
सुरगुरुनें किंकरपदसंवाहन आपुल्या करें केलें. ४४
देवत्व मला देउनि आपण घे श्रीनिवास दासत्व,
जिह्वाश्रुति हो! त्याचें गाउनि ऐकुनि निवा सदा [5]सत्व. ४५
[6]सहसिद्धिपुमर्थांचा हेतु प्रभुपादुकार्चन स्पष्ट,
[7]नष्टप्रज्ञ चि ऐसें सत्य न मानूनि भोगिती कष्ट. ४६
निजपदपूजक हा जन भाजन दुर्लभवरप्रसादास,
केला स्वल्पा ही कां धनदानास न कुविप्रसा दास? ४७
वंदावे पूजावे पाय चुरावे [8]दयालयस्वांतें
शांतें अधनास धन स्वल्प हि द्यावें न कां रमाकांतें? ४८
[9]मोहुनि ही करि बद्ध न, सद्धन तत्पद चि, भाग्य लक्ष्मीचें,
[10]ज्यास न वेंच, नवें च [11]प्राभव दे, नुरवि [12]लौल्य पक्ष्मींचें. ४९
कां न दिलें धन मज, तो देणार, परंतु विसरला काय?
राय ज्ञानिजनाचा विसरेना सत्य [13]चित्कृपाकाय. ५०
देत चि होता, धन, परि भ्याला प्रबळा मदीय [14]दिष्टांस,

---

१. वारा घातला. २. गुहेमधील व अरण्यांतील झोपडी. ३. उत्तम चंदनरसानें शीतळ हस्त ज्याचा. ४. पहिल्यानें केलेल्या सत्काराचें यश. ५. धैर्य. ६. अष्टसिद्धींसह चतुर्विध पुरुषार्थांचा. ७. नष्टबुद्धि असे जन. ८. दयेचें घर असें ज्याचें चित्त त्या श्रीकृष्णानें. ९. अन्वयार्थ—तत्पद चि (त्या कृष्णाचे चरण) मोहुनि ही (मोह उत्पन्न करून हि) बद्ध न करि, सद्धन (साधूंना धनासारखें वाटणारें) लक्ष्मीचें भाग्य, ज्यास वेंच न (ज्याला कधीं खर्च नाहीं) नवें च प्राभव (प्रभुत्वविलास) दे, पक्ष्मींचें लौल्य (चापल्य, गर्व) नुरवि. १०. भाग्यास—**पं. प्र.** ११. प्रभुत्वविलास—**पं. प्र.** १२. लौल्य गर्वश्चापल्यं च—**पं. प्र.** १३. ज्ञानकरुणादेह. १४. दैवास.

शिष्टास श्राव्य न हें आर्गी[1] राग हि न त्या सैदिष्टास. ५१
हां! हां! कळलें कळलें, केली करुणा सख्या रमारंगें,
संगें कळे भल्यांच्या, झालीं रोमांचितें पहा अंगें. ५२
'हा जन्माचा निर्धन, पावुनि मोहक धनास माजेल,
विसरेल आपणास हि मग सुजनीं न प्रसाद साजेल,' ५३
हें चि तुझें मत म्हणुन चि, भरलें विद्वत्सभेंत कोटिगुणें[3]
अधिक भवद्यश, सुरतरुचिंतामणिसुरभियश तैसें चि उणें. ५४
ने वित्तमद श्वभ्रा[4], तापवि पारि निर्धना पदा[5] दंभ्रा
बा! करुणेच्या अभ्रा! श्रीदासी संपदा करी बभ्रा[6]. ५५
'गांठि न पडली प्रभुची' म्हणतां साध्वी कशास कोपेल?
सोपे लक्ष उपाय प्रैतारणीं[7], परि न हर्ष[8] लोपेल. ५६
'येणार तुज पहाया सहृदार उदार तो चि मांकांत'
हें म्हणतों पारि अनृतें कोणाचा ही न लागला प्रांत. ५७
निष्कृपकृपणपणाचा लावील कळंक लोकपाळास,
छी! हें सती करीना, ती ठेविल बोल तो कपाळास. ५८
तो[9] चि तिच्या ही चित्तीं; म्यां कां चिंता करूनि भागावें?
लज्जा सोडुनि सादर त्या शैंतमखनीळसन्निभा[10] गावें." ५९
ऐसें चिंतित चिंतित, सेवित हरिनामशर्कराकवळ,
श्रीद्वारकापुरीहुनि आला मुनि आपुल्या घराजवळ. ६०
द्वारवतीभगिनी च प्रभुनें दिधली सख्यास नांदाया,
प्रभु दीनबंधु, भूसुर हा दीन, न होय पात्र कां दायाँ[11]? ६१
ती क्षारसागरीं, ही आनंदसुधार्णवीं, तिचा कर्ता
नामें चि विश्वकर्मा, ईचा साचा स्वयें जगद्धर्ता. ६२
त्या दीनवत्सळाची करुणा, झाली पुरी बरी मोटी,

---

१. अपराधीं—**पं. प्र.** २. सतां इष्टः तस्य—**पं. प्र.** ३. कोटिगुणें—**पं. प्र.** ४. अधः—**पं. प्र.** ५. थोडी. **पं. प्र.** ६. दासीरतस्य दुर्दशा भवति—**पं. प्र.** ७. वंचनीं. ८. लक्ष्मी. ९. प्रभु—**पं. प्र.** १०. इंद्रनीलसदृशा—**पं. प्र.** ११. बंधूच्या वाट्यास.

होय प्रसाद तो चि प्रासाद, जयांत कौतुकें कोटी. ६३
हरिनें हरिविभवाहुनि दिधला तो विभव सेवका सार
त्या उपवनास नंदन लज्जित, सरसीस देवकासार[1]. ६४
ज्याचा संकल्प चि हें अद्भुत ऐसें अतर्क्य विश्व रची,
अत्यद्भुत पुर तें कां नोहे शिल्पी जयासि ईश्वर ची ? ६५
स्वजनसुरद्रुम भगवान् प्रियसखहंसा करावया क्रीडा
नीडों[2] रची, तयातें पाहूनि धरी चतुर्मुख व्रीडा. ६६
निधि सिद्धि दास दासी राबति आंगें घरोघरीं, सद्में
पद्में तीं लक्ष्मीचीं मुनिभाग्यसरोवरीं गृहच्छद्में[3]. ६७
जों मुनि दृष्टि करी वरि, तों हरिकरुणाविलासिनीकुंज[4]
पाहे पुर हर्म्यशतें[5] स्त्रीनरभूषणमणिप्रभापुंज. ६८
प्रथम म्हणे, 'हें काय द्युतिमंडल? काय उतरला भानु ?
सानूरु[6] वरि हि दिसतो, जाणों चालत असेल मणिसानु[7].' ६९
मग नगरी हें कळतां ठाकोनि करी विचार उज्वळधी,
'श्रीद्वारका नव्हे हे, आलिंगुनि कां इला नसे जळधी ? ७०
नाहीं सिंधु, नसेनी, प्रभुपुरवप्रप्रदेश[9] वाचाळीं[10]
सुटला बहुधा, संतत कैसा सोसेल केशवा चाळा ? ७१
परि माझ्या वसतीच्या मार्गाच्या दिसति कीं उदंड खुणा,
त्या सत्य, तरी कैंची अन्य पुरी विभुपुरीसमानगुणा ? ७२
भ्रमली दृष्टि म्हणावी, तरि हे हरिपादनीरजभ्रमरी[11],
भ्रमरीति ही निराळी, नायकिली भूतपीडिता अमरी. ७३
झाली काय गती ? ती येथें चि ब्राह्मणी सती होती,

---

१. देवांचें सरोवर. २. घरट्यास. ३. घराच्या मिषानें. ४. कृष्णकृपारूप विलासनीचें संकेतस्थान. ५. हर्म्यादि धनिनां वासः प्रासादो देवभूभुजामित्यमरः **पं.प्र.** ६. अरुणासह. ७. मेरु-**पं.प्र.** ८. कशास पाहिजे-**पं.प्र.** ९. द्वारकेचा कोट. १०. गर्जना करणाऱ्या समुद्राला. ११. हरिचरणरूप कमलांतील भ्रमरी.

नाहीं[1] कीं या भावें झालें विक्षीण तत्तपोज्योती.' ७४

श्रीपतिसख मुनि ऐसें तर्की जों, तों चि धांवले पौर,
गौरविती निजपतिला, गाती यश अमृतदुग्धशशिगौर. ७५

पौरजनीं वास करी निर्जरसौंदर्य हरिपदादेशें[2]
कीं स्वर्गाचें हरिलें यश भाग्य समग्र त्या तदा देशें. ७६

सद्रसभवनें[3] स्तवनें होती गीतें हि जीं मतें गीतें[4],
भरतमुनिप्रतिपाद्यें[5] वाद्यें नृत्यें हि चित्तहरकृत्यें. ७७

बैसविला गजयानीं स्वस्वामी भक्तपौरलोकानीं,
हरिहरिदासयशातें ऐके सप्रेमचित्त तो कानीं. ७८

कुसुमाक्षतलाज्यांची वृष्टि करिति पौरकन्यका पत्नी
रत्नीं ही वर्षति, जीं रक्षावीं अन्यदुर्लभें यत्नीं. ७९

तो उत्सव, हा ग्रंथ हि, सुखकर भगवत्प्रसाद बहु वाढे;
काढे च हे तयां जे सांपडले भवगदाचिया दाढे. ८०

आला कांत असें ती ऐकोनि स्त्री सती पुढें आली[6],
स्वपति सखा श्रीपतिचा, श्रीची साध्वी हि कां नव्हे आली? ८१

अमरीसम रीतिगुणीं ऐशा तीच्या सहस्र वरदासी[7]
भक्ति हि सख्यास दिधली, हें काय असे अदेय वरदासी? ८२

नेत्रद्वारां हृदयीं नेउनि भेटे पतीस एकांतीं,
स्वांतीं म्हणे, 'सतीनें सेवेतर वर वरूं नये कांतीं.' ८३

दारिद्र्यग्रीष्मार्कें जी होती वाळली जसी उर्सरी[8],
दुसरी श्री झाली ती, वर्षलि वरि हरिदयासुधांबुसरी[9]. ८४

---

१. तया सत्यापि तपःसामर्थ्यादेवं कर्तुं शक्यमित्यर्थः—पं. प्र. त्या सतीनें तपश्चर्येच्या सामर्थ्यानें असें करणें शक्य आहे, हा भाव. २. कृष्णाच्या आज्ञेनें. ३. उत्तम रसांचीं गृहें. ४. वाणीतें—पं. प्र. ५. नाट्याचार्यभरतमुनिप्रतिपादित अर्शी. ६. सखि. ७. श्रेष्ठ दासी. ८. वाळलेली भाजी. ९. हरीची दया ते च सरी सुधाजळ वर्षली—पं. प्र.

विप्रें विलोकिली ती अमरींमध्यें जसी शची देवी,
जे वीजिता सुचामरसुभ्यजनीं, स्त्रीसहस्र जिस सेवीं. ८५

मूर्तिमती सकळकळा गानकळा यांत काय ती आर्या,[2]
कीं मात्रावर्णगणच्छंदोजातींत काय ती आर्या.[3] ८६

कीं तारांच्या वृंदीं मूर्तिमती रोहिणी च ती, अथवा
ती हरिकीर्ति, तदनुचरजनकीर्तींचा[4] चि मूर्त काय थवा? ८७

कीं कविजनोक्तिनिकरीं कविनृपवाल्मीकिविप्रवरवाणी
त्या भक्तराजराजें ऐसी ती देखिली सती राणी. ८८

काय पुन्हां[5] तो वरिला हरि लालसमानसें वर श्रीनें?
स्त्रीनें हस्तीं धरिला परि, लाजविलें तिला वरश्रीनें.[6] ८९

दिव्य प्रासादांत प्रभुसखविप्रप्रवेश ज्या लक्ष्मीं
कौतुक पहात होते सग्रह[7] मणिदंभ[8] भास्वादिंद्वग्मी. ९०

दीप श्रीपतिमित्रप्रासादींचे पतंगसख[9] सारे,
अस्नेहें[10] न तापकर हि, तम न क्षणभारि हि ज्यांपुढें थारे. ९१

तेजस्वी[11] हि स्नेहें स्त्रीकरगत मलिनवदन मळवीती,
तापविती ही, हें हरिजनगृहमणिदीप तत्व कळवीती. ९२

मणिललनाकरपद्मीं[12] मणिदीप तसे विराजती गेहीं
जनबुद्धिवृत्तिमध्यें शुचि चित्प्रतिबिंबकें जसीं देहीं. ९३

हरिभक्तमंदिरीं त्या केवळ मणिदीप मात्र अस्नेह,

---

१. सुदामपत्नी. २. मात्रागणानीं व अक्षरगणानीं रचित ज्या छंदोजाती त्यांत. ३. आर्याछंद. ४. हरिभक्तजनांच्या कीर्तीचा. ५. समुद्रमंथनानंतर भगवान् स्वपति लक्ष्मीनें पुन्हां वरिला जसा तसा इनें ही—**पं. प्र.** ६. पतिच्या निरुपम शोभेनें—**पं. प्र.** ७. ग्रहांसह सूर्य, चंद्र, अग्नि. ८. कपटो स्त्री व्याज दंभो इत्यमरः—**पं. प्र.** ९. सूर्यासारखे तेजःपुंज, पतंगाला न भाजणारे. १०. तैलरहित. ११. तेजोयुक्त पुरुष [पक्षीं] प्रकाशक दीप. १२. रत्नमय पुतळ्यांच्या हातांतील.

शांततमक्षयपटु शुचि या चि गुणें स्वजठरीं भरी गेह. ९४
पूर्णसुधांशुज्योत्स्ना लाजति त्या स्फटिकरत्नभित्तींतें,
प्रतिबिंब दाविती जें बिंब गमे सुकविच्या हि चित्तीं तें. ९५
प्रासादीं रत्नाचे सुस्थूळ अखंड आणि बहु लांब
खांब सहस्रावधि रविकरनिकरा म्हणति जे ' शिशो ! थांब.' ९६
दुग्धाब्धिफेनपांडुरशय्यामंडित[1] करींद्रदंतांचे
पर्यंक शत विराजति, जैसे मृदुशुद्धभाव संतांचे. ९७
वरपद्मराग[2]मरकत[3] हीरकहारिनीलमणिमयागारा
गारा[4] मृगमदकेसरकर्पूरांचा सज्यास[5] जळ[6] गारा. ९८
रत्नांचीं च विचित्रें कनकांचीं हीं कितेक हीं खचितें,
दंत प्रवाळ चंदन यांचीं ही अमित आसनें रचितें. ९९
मणिकनकदंडमंडित शतसंख्य सुरम्य चामरव्यजनें
ज्यांच्या विलोकनास हि पात्र न व्हावें कधीं अभव्यजनें[7]. १००
मुक्ताजाळें[8] रचिलें निववी जननेत्रसारस[9] वितान[10],
जेथें तेथें, वाटे तेंवि सुधाकर न सौर सविता न. १०१
निरुपम संपत्ति असी पाहुनि सद्विप्र तो करी तर्का,
अर्का[11] मधुर फळ कसें जें मुरडी नाक अमृतसंपर्का? १०२
होती सुचिर सुतृषिता एक सती चातकी असें कळलें,
फळलें दैव तिचें चि, श्रीमत्करुणामृताभ्र हें वळलें. १०३
जन्मदरिद्र सुदुर्भग मीं, मजवरि हे सुवर्णमणिवृष्टी
कां हो ! न पडे पडल्या दुर्लभ लक्ष्मीशपादुका दृष्टी? १०४
कांते ! साध्वि ! सख्याचें औदार्य पहा, समक्ष न वदे तो,

---

१. दुग्धसागराच्या फेंसाप्रमाणें शुभ्र शय्येनें युक्त. २. शोणरत्ने लोहितकः पद्मरागोथ मौक्तिकमित्यमरः—**पं. प्र.** ३. गारुत्मतं मरकतमश्मगर्भो हरिन्मणिरित्यमरः पांच इति —**पं. प्र.** ४. गारांचें जळ निर्मळ--**पं. प्र.** ५. शब्दार्थ? ' जयास ' असा पाठ तर नसेल? ६. चिखल—**पं. प्र.** ७. दुर्दैवी जनानें. ८. पल. ९. छत. १०. उत्कृष्ट. ११. रुईच्या झाडाला.

हे तोयजाक्षि! जन्हि बहु यापरि हरि याचका विभव देतो. १०५
जरि सागरपरिपूरक धाराधर[1] कर्षकास[2] लाजेल,
रात्रौ क्षेत्रक्षितितळ भरिल जळें, मंद ही न गाजेल. १०६
दृष्टांत संकटास्तव मत्सखयासीं क्षणार्ध साजेल,
परि बहुवत्सर कविवरहृदयीं तें निजदुरुक्त[3] डाजेल. १०७
आपण मेरु समर्पुनि, मानितसे अणुपरीस हि स्वल्प,
कल्पतरु स्वजनाचा, मत्सख मुनिहृदयनागपतितल्प[4]. १०८
सुहृदर्पित अणुमात्र हि तें ब्रह्मांडापरीस करि थोर,
तो रक्षक विश्वाचा, दीनांचा बंधु साधुहृच्चोर. १०९
मेद्दत्तपृथुकतंडुलकण[5] कृपणपणें पडों न दे, वेंची,
जन्मोजन्मीं हि असो मज एक प्रेम त्या सख्याचें चि. ११०
तत्सख्य भवशतीं ही असतां न 'पुरे' म्हणेल, हा दीन;
हीनश्री त्याहुनि बहु, दुग्धास हि हात जोडितो मीन. १११
तन्मैत्रीस चि हा जन भुलला मीं तोय, तो सखा दुग्ध,
आण प्रमाण झालें बाई श्री[6]! जग म्हणो न मज 'मुग्ध.' ११२
भाग्य तुला चि म्हणतसें जन्मसहस्रीं हि हें चि हरिदास्या[7]!
आस्या येइल, होइल पात्र न हा जन चुकोनि जनहास्या. ११३
भक्तासि रत्नकांचनपर्वत ऐश्वर्य सुत कळत्र असें
संसारहेतु मोहक देत नसे प्रभु, दिलें मला चि कसें? ११४
भक्त म्हणवितों, परि मीं भक्त नव्हें, भक्ति जरि सती असती,
तरि संपदा न येती, साध्वीदयितालया[8] न ये असती. ११५
कृष्णा! सख्या! उदारा! सदया! पद या मनांत राहों दे,
पाहों दे मग हा द्विज कर्मफळें, भवनदींत वाहों दे. ११६

---

१. मेघ. २. शेतकऱ्यास. ३. अनुचितमुक्तं मया अहो! कष्टमिति--**पं. प्र.** ४. मुनींचें हृदय हा च शेष त्यावर निजणारा. ५. मूळ पाठ--**त्वद्दत्त.** ६. अलं ते सख्येनेति--**पं. प्र.** ७. भगवद्दास्यसंबोधनं--**पं. प्र.** ८. यः सतीपतिस्तं परित्यजंति कुलटा--**पं. प्र.**

भार्ये! वस्तु नको तें ज्याचें त्याला चि युक्तिनें द्यावें,
ऱ्हावें वस्तु अनश्वर तरि हें गोब्राह्मणांसि दे भावें. ११७

मज भक्तमयूरा जें करुणाघनकृष्णदर्शनीं प्रेम
तें मन्मित्र[1] चि जाणे, न रुचे हें होय तोय मणि हेम.' ११८

ऐसी कथा यथामति अतिसुरसा प्रेमपद्ममित्राची[2]
मित्राची श्रीपतिच्या दासानीं गायिली पवित्राची. ११९

---

## अध्याय ब्यायशीवा.

सूर्योपराग[3]पर्वस्नानास्तव पुंडरीकदलनेत्र
सकुटुंब यादवांतें नेउनि पावन करी कुरुक्षेत्र. १

पर्वस्नान कराया नृप पांडवकौरवादि बहु आले,
न्हाले श्रीरामाच्या[4] ह्रदतीर्थी, धूतपाप ते झाले. २

मग तीर्थपद[5]प्रभुला भेटति सप्रेम लोक ते सर्व;
गर्व प्रमथाचा[6] हरि हरिदर्शननाम दूसरें पर्व. ३

धृतराष्ट्रभीष्मविदुरद्रोणकृपप्रभृति आप्त वसुदेवा,
देवाधिपा जसे सुर, भेटति, म्हणती, ' पदें शिवों दे बा!' ४

जैसी शांति प्रीति हि वसुदेवा भेटली तया भ्रात्या
कुंती ही आलिंगी प्रेमानें तत्सुता दयाभ्रात्या. ५

भेटाया करुणाघनकृष्णाला जाय मोरसा नंद,
होय विलोकुनि जैसा पर्वहिमकरा[7] चकोर सानंद. ६

वसुदेव पुढें धावुनि आलिंगी त्या सख्या सनंदास,
' वंदा सप्रेम ' म्हणे ' रामास तया हि मोदकंदास[8]. ७

श्रीरामकृष्ण वंदिति नंदपदें; एकदा चि दोघांतें

---

१. मूळ पाठ–मत्सख्यास ठावें. २. प्रेमरूप कमलाच्या सूर्याची (कृष्णाची). [illegible]राग=ग्रहण. ४. परशुरामडोहांत. ५. तीर्थ आहे चरणीं ज्याच्या त्या [illegible]. शिवगणविशेषाचा. ७. पूर्णिमेच्या चंद्राला. ८. आनंदकंदास.

आलिंगी तात महाभाग्यें चिरकाळ त्या [1]मुदोघांतें. ८

मग मातेच्या चरणा नमिती [2]शमितीर्थरूप ते, त्यांतें
भेटे जननी, गंगायमुनौघालागिं लाज देत्यांतें. ९

भवजलधिमथनमंदर मंद रडति बैसुनी पित्याजवळी,
कवळी माय यशोदा, लुटिती तें साधुधन सखे गवळी. १०

[3]नीलरजतनग [3]नंदन, नंद न तो, घन चि अश्रुजळ वर्षे,
मोर चि तदधरपल्लव [4]बल्लववन [5]विरहदावहत हर्षें. ११

भेटे [6]व्रजेश्वरीतें भावें श्रीदेवकी जसी अनुजा,
श्रीरोहिणी हि; भेद प्रेमीं न बघां न दाविती [7]तनु जा. १२

या दोघी ही धात्री दिसती, माता सती यशोदा चि,
प्राचीन प्रेमा तों म्हणे, 'पिता नंद, माय हे साची.' १३

वसुदेवस्त्री म्हणती, "आयिक बाई! व्रजेश्वरी! बोल,
हो लक्ष भवप्रत्युपकृति, उपकृतिला तुझ्या नसे मोल. १४

स्मरति तव [8]स्तन्यास [9]न्यास तुझे हे, तुम्हीं च पितरांहीं
केलें सादर पालन लालन; करिजेल काय इतरांहीं? १५

'तव मैत्रीहुनि आम्हां शक्राची हि प्रिया नसे पदवी,
मद [10]वी ती काय बरी?' त्वत्प्रीति असें च सर्वदा वदवी. १६

आधीं म्हणति 'यशोदे!' मग येतें नाम आमचें बाई!
बा! ईश्वरा! कळो तुज, आम्हीं दायी, व्रजेश्वरी आई. १७

कां खेद? आमचा कीं यांचा प्रेमा गमो जुना न मना,
दे आशीर्वाद, पहा बाई! करिती तुला सुना नमना. १८

त्वां आरोग्य पुसावें [11]आंघीं, [11]मग अश्रु रामकृष्णांचें,

---

१. आनंदप्रवाह जो कृष्ण त्यातें. २. तपस्व्याना पूज्य असे. ३. एक नीलपर्वत व एक रजतपर्वत हेच कोणी पुत्र. ४. गवळ्यांचें रान. ५. विरहाग्नीनें दग्ध. ६. गोकुळाच्या मालकिणीला--यशोदेला. ७. तनुभेदीं ही प्रेमभेद नाहीं--**पंत.** ८. दुधास. ९. ठेवे. १०. प्रसवे. ११. मूळ पाठ-**मुखें करें.**

तव [1]धन्यस्तन्यरसानूनोक्तिसुधारसीं सतृष्णांचें. १९
गायींसीं वत्सासीं दैवबळें गांठि बहुदिसां पडली,
[2]स्थानभ्रमविकळहृदयकृपणाची ठेवि काय सांपडली?" २०
एकांतीं दर्शन दे गोपींतें हरि, तसा च तत्प्रेमा;
क्षेमालिंगन झालें, लाजविलें [3]सेंद्रनीलमणिहेमा. २१
तो [4]विद्युन्नवजलधरतरंगिणीसिंधुसंगमापारिस
धरि [5]सच्छ्री संग, बसति जेव्हां वेष्टूनि गोपिका हरिस. २२
पुशिलें नयनास्यकमळ [6]अनामय श्रीकरें स्वआलींचें
[7]आलींचें [8]लतिकांच्या काय वसंतें गृहास आलींचें? २३
"सखिया हो! कां होतां आतां अन्यत्रदत्तदृष्टि? पहा
शोधित होतां ज्यातें विरहीं सर्वत्र तो चि निष्कृप हा. २४
'सत्वर येतों' ऐसें वदलों होतों मनांत ती लाज,
काज सरेना, नव नव रिपु बहु, तीर्थांस पाहिलें आज. २५
झालें पुण्यक्षेत्रीं प्रियदर्शन हें चि सद्य फळ हो! कीं
शोकीं पडल्या चित्ता दे [9]बोधकरासि तो सखा लोकीं. २६
मजला अकृतज्ञ तुम्हीं सखिया हो! काय मानिलें चित्तीं?
वित्तीं कृपण विटेना, दृष्टि न दे [10]तद्विरक्तिदनिमित्तीं. २७
नोहें कृतघ्न निर्दय मीं, विश्वासार्थ आण वाहीन;
नाहीं नष्टपण [11]कैसी हें सखियांस चि पुसोंन पाहीन. २८
गेलों टाकुनि यास्तव निष्ठुर मीं भासलों असेंन मना,

---

१. धन्य अशा दुग्धरसासारखे जे सुभाषितामृतरस त्यांचे ठायीं. २. जागा चुकल्यामुळें व्याकुळचित्त अशा कद्रु मनुष्याची. ३. इंद्रनीलमण्यासारखा वर्ण कृष्णाचा व सुवर्णासारखा गोपींचा. ४. वीज आणि मेघ किंवा नद्या आणि सागर यांच्या संगमापेक्षां. ५. उत्तम शोभा. ६. कुशल. ७. लतांच्या पंक्तींचें. ८. आलेलींचें. ९. बोधरूपी हस्तांत. १०. त्या वित्ताची विरक्ति उत्पन्न करणाऱ्यांच्या ठायीं. ११. कसी आण वहावी?—पंत.

श्रम नाठवूनि ऐका गुरुमानातें[1] करूनियां नमनां. २९

संयोगवियोगातें पावति अनिळें[2] चि धूळि तृण तूळ,

मूळ श्रीश्वरसत्ता, तैसीं भूतें तयासि अनुकूळ. ३०

पशुपाधीन पशु जसे, तैसीं भूतें महेश्वराधीनें,

आधीनें[3] कृश झालां, वैरिला सुविचार वर न हा धीनें[4]. ३१

'प्रियविरहज्वर रिपुस हि लव हि स्वप्नांतरीं हि न शिवे तें

करुणानिधे! करीं' हें मीं मागतसें सदाशिवशिवेतें. ३२

तो ज्वरदाव[5] मृदुलतनुजनहृदया मामकात्मशुकनीडा[6]

पीडा दे, न मला हें म्हणणाराला चि लाजति व्रीडा. ३३

पारि विरहक्लेशांत हि लाभ सती हो! तुम्हांस हा मोटा,

खोटा नेणे, झाला मत्प्रेमातिशय काय हा तोटा? ३४

नुसती भक्ति च माझी अमृतप्राप्तीस[7] हेतु, मग साच्या

या चारुस्नेहें ये कोण द्वारा न मन्निवासाच्या? ३५

या प्रेमें मज शुद्ध ब्रह्माला पावला चि गोपी हो!

ओपी होमीं तनु, पारि भलत्या हे गति नसे चि सोपी हो!. ३६

आधीं मध्यें अंतीं भूतांच्या आंत आणि बाहेर,

वाहे रश्मिजळ[8] तसें, जग जें तें जोडिलें त माहेर." ३७

विनविति गोपी जेव्हां विधिगुरु[9] तो आत्मतत्व उपदेशी,

'दे शीतांशुनखपदस्मृति[10] जारि भवसागरांत कर देशी. ३८

अजि वैद्यराज![11] प्यालों स्वविरहपित्तज्वरघ्न हा काढा,

बाढा यावारि निजपदनलिनस्मृतिशुद्धशर्करा काढा. ३९

---

१. मोठ्या मानाला नमस्कार करून (मान सोडून). २. वाऱ्यानें. ३. मनोव्यथेनें. ४. अन्वयार्थ? ५. ज्वराग्नि. ६. माझ्या जीवरूप शुकाचें घर. ७. मोक्षप्राप्तीस. ८. मृगजळ. ९. ब्रह्मपिता—कृष्ण. १०. चंद्रतुल्य नखें ज्याचीं त्याच्या पदांची स्मृति. ११. मूळ पाठ—**भवगदवैद्य प्रभुजी! प्यालों विरहज्वरघ्न हा काढा.** (वरील पाठांतर हि मूळ पोथींत क्रमानें च लिहिलें आहे).

निजचरणस्मृतिहस्तीं दासीजन हा दयानिधे! निरवीं,
फिरवीं शिरीं कर, स्मर खावो मांसें न आमुचीं हिरवीं. ४०

---

# अध्याय त्र्यायशीवा.

गोपींवारि करुनि दया तो भगवान् वृष्णिराज सावरजा
धर्मसुतास[1] हि तारी, हे त्यास तसा रुचे जसा वर ज्या. १
कौरवयादवभार्या[2] एका जागां मिळोनियां बसती,
हरियश गातां पळविति कोकिलशुकसारिकांसि[3] लांब सती. २
श्रीमद्रुक्मिण्यादिप्रभुपत्नींतें अजातरिपुभार्या
प्रश्न करि प्रेमें जे मित्रननांदा प्रिया सखी आर्या. ३
'हे वैदर्भि! स्वमुखें स्वविवाहोत्सवकथा मला सांगें,
कैसें वरिलें तुजला श्रीकृष्णें दीनवत्सळें आंगें? ४
भामे! या मेघानें कैसें सौदामिनीस तुज वरिलें?
हे जांबवति! त्वत्करसरसिज कैसें रमाधवें धरिलें? ५
कालिंदि! मित्रविंदे! सत्ये! भद्रे! वदा सदाधीरा[4]
या राकानाथासीं योग कशा पावलां तुम्हीं तारा? ६
वद लक्ष्मणे! स्वयंवरवृत्त मज, स्वजनकल्पवृक्षातें
वरिलें कैसें लतिके! सति! केतकवर्णि! या सद्दक्षातें? ७
सर्वांहीं[5] सांगावे स्वकरग्रहणोत्सव स्वयें सर्वां;
पर्वा आलां, तृषिता द्या अमृत, त्यजुत चंद्रिका गर्वा.' ८

१

प्रथम म्हणे वैदर्भी, "बाई! होत्यें लहान मीं कन्या,
धन्या कृष्णकथा मज तेव्हां चि रुचे, न आवडे अन्या. ९
भगवद्भक्त ब्राह्मण जे येती मत्पित्याचिया गेहा,
ते हारि[6] हरियशोमृत पाजिति, तें मात्र चालवी देहा. १०

---

[illegible] धर्मराजाला. २. मूळ पाठ–**यदुकुरुभार्या कुशळ-ां बसती.** ३. मंजुभाषिणी-त्या–**पंत.** ४. सत्पुरु-[illegible] कृष्णाशीं. ५. अनुरूपातें. ६. मनोहर.

सेवाया अमृतमधुरनिर्मळपुष्कळमुकुंदयश धन्य
स्तन्य त्यागुनि धांवें, काय मनाला रुचेल मग अन्य? ११
हरिगुणगायक सज्जन ते धनलोभी नव्हेत, परि हार
मुद्रा कंकण द्यावें, न करिति मातापिता हि परिहार. १२
ज्या दिवसीं हरिचरितश्रवण नसे त्यांत मज दहा दुखणीं,
दुखणी[1] काय? नवखणी माडी नलगे; धरा नखेंदु[2] खणी. १३
पितृसदनीं मीं वाढें जैसी, तैसी च मन्मनीं प्रीति,
रीति प्रेक्षुनि ऐसी 'दैव बळी' म्हणति ते चि जन भीति. १४
'श्रीकृष्णाला द्यावी, श्रीरामा जानकी तसी दुहिता,'
ऐसी गुरुबुद्धीनीं केली बाई! विचारणा सुहिता. १५
कृष्णीं माझें अर्पण चित्ता आलें चि साधुभावांच्या[3],
कृष्णगुणीं श्रुत्यर्पण[4] ये जेंवि मनास सत्वभावांच्या[5]. १६
रुक्मी माझा दादा जो आम्हां सांजणांमधें मोटा,
खोटा नव्हे चि, परि हरिचरितरसीं तो भिजे न, मणिगोटा[6]. १७
त्या स्वगुरुविचारातें निंदुनियां मोहरोगवैद्यातें,
मजला देवूं केलें दादानें हठ धरूनि चैद्यातें. १८
केला लग्नाचा ही निश्चय, चैद्यासि धाडिलें मूळ[7],
गूळ क्ष्वेडे[8] चि वाटे, मज तातविचार होय पांगूळ. १९
न चले कांहीं तेथें जननीचें, बंधुचें, स्वतातांचें,
होय लवांत दहादां फळ इष्ट[9] अनिष्ट आत्मघाताचें. २०
आधिसमुद्रीं बुडतां दे कर एक प्रियासखी बुद्धी,

---

१. दुमजली. २. पदनखें धरा खणींत बैसें, चिंतालक्षण-**पंत**. ३. उत्तम स्वभावांचे जे भाऊ त्यांच्या किंवा चांगला भाव (अभिप्राय) ज्यांचा अशा लोकांच्या. ४. कान देणें. ५. सत्वशील जनांच्या. ६. रत्न जऱ्ही झालें तऱ्ही तो पाषाण चि, अमृतांत ही भिजायाचा नव्हे; भावास रत्न म्हणती-**पंत**. ७. बोलावणें. ८. बांचण्याचा वीट-**पंत**. विष. ९. मरण बरें ही वाटे, वाईट ही-**पंत**.

मजवारि तीं बहुसदया हरिकीर्तिसुधाब्धिलब्धसंशुद्धि[1]. २१

एक ब्राह्मण केवळ साधु दयामूर्ति तत्पदीं नमनें

केलीं पाय धरुनि म्यां, एकांतीं विनविला सुदीनमनें. २२

कां तो द्रवता, माझा असता जरि भाव पाहिला खोटा ?

जेणें अभयवर दिला, त्या गुरुहस्तांत म्यां हि लाखोटा. २३

स्वकरें 'वसंततिलका' वृत्तें पत्रांत सात योजूनि,

लिहिलीं होतीं तीं ही लिहितां लिहितां क्षणांत योजूनि. २४

काय लिहावें म्यां सखि !? ज्याचे संपूर्ण वेद निश्वास,

विश्वास ज्ञानप्रद, परि माझा हरिपदीं च विश्वास. २५

गेला धांवत घेउनि मत्पत्र द्वारकेस सद्विप्र,

या प्रणतवत्सळाला आणाया आण घालुनि क्षिप्र. २६

तों आला शाल्वमगधपतिसख तो चैद्य, मांडलें लग्न,

जालें पुर तद्बळजळनिर्धौत, आर्धौत मन्मन हि, मग्न. २७

तांतडि बहु दादाची, कैंचा अवकाश ? लागली हळद,

खळदर्पघ्न दिसेना, जो नतचातकदयासुधाजळद. २८

गरळविलेपन वाटे, लाविति आंगास जी हरिद्रा तें,

सखि ! सुकृपणकृत शुष्कोपचरण[2] निववील कसें दरिद्रातें ? २९

त्या कुंडिनीं समुत्सव वाढे, माझ्या मनीं असुखशैल[3],

होयें सखींत मदुक्तें अश्रुप्रति हेतु बापुडें तैल[4]. ३०

शतदा ध्वजां चि झाल्यें प्रासादशिरीं पुरेक्षणच्छद्में[5],

द्वारवतीपथ पाहति नयनें, हरिदिङ्मुखा[7] जसीं पद्में. ३१

---

१. भगवद्यशरूप अमृतसागरामध्यें स्नान केल्यानें शुद्ध झालेली. २. कोरडा बाह्य उपचार. ३. दुःखपर्वत. ४. माझ्या भाषणानें माझ्या मैत्रिणी रडूं लागल्या; पण त्यांच्या अश्रुपातास तेल हें बाह्य कारण झालें; खरें कारण [illegible]ची दुःस्थिति हें च होय. ५. ध्वजासारखीं प्रासादशिखरीं फडकूं लागले; [illegible] चढून गेले, हा भाव. ६. नगर पाहण्याच्या मिषानें. ७. कृष्ण येण्याच्या मार्गाकडे [ पश्चीं ] पूर्वदिशेकडे.

घटिकार्धपादपळलवकालस्थैर्यार्थ विनविला मित्रें[1],
चित्र प्रियसखि! झालें; रथ नावरि निमिष ही; कसा मित्र? ३२
परि मज गमलें गेला धांवत मत्ताप हरिस कळवाया
अन्वर्थनामधेय[2] ब्रह्मण्यप्रभुमनास वळवाया. ३३
आली रात्रि, सुगात्रि! द्रौपदि! अवकाश ती च लग्नासि,
झाली यष्टी[3] कष्टी जें मन त्या आधिभारभग्नासि. ३४
चिंताज्वरांत रात्रौ माझा नाहीं च लागला डोळा,
जायासाठीं कंठीं शतवार प्राण जाहले गोळा. ३५
लावियला म्यां दुःखीं बाई! त्या ईश्वरास ही बोल,
यत्पदपद्मरजाचें चिंतामणिकोटि ही नव्हे मोल. ३६
निजदासवासरांला बहु पाजुनि ही दयादुधास रिते
नव्हति गुणस्तन जीचे, गणिलें अतिकठिन त्या सुधासरिते. ३७
वत्स क्षुद्विकळ रडे झोंबे जारि माय कंचुकी सोडी,
गोडी आपुलि पानीं नुमजे, दानीं तिची[4] म्हणे थोडी. ३८
अलस[5] द्विज, विधि खल, हारि नेतीं उदासीन, नियतिमन खोटें,
शिव अदय गमे, त्यांचीं फुगलीं असतील हांसतां पोटें. ३९
तों प्रियकंठीं आपण पडोनि, हे ही सुखांत पाडावी,
या भावें चि स्फुरली, करि माझी भुजलता कृपा डावी. ४०
नेत्रभुजोरुस्फुरणें चिंतेची सोडिली मनें बाज,
मार्जे[6] प्राणानीं ही, गेल्या धैर्यें हि यावया लाज. ४१
तों चि समूळाधिज्वरहरमात्रा आणुनीं, उषःकाळीं
आला द्विज धन्वंतरि, सदय पिता ही तसा नसे बाळीं. ४२
आधीं विप्रमुखश्री कळवी येतां चि माधवागमन,

---

१. सूर्य. २. 'मित्र' हें यथार्थ नांव धारण करणारा. ३. आधाराची काठी. ४. दूध पिण्याविषयीं आपली ग्रहणशक्ति तें मूल जाणत नाहीं, असें असून हि आई दूध पाजण्यास कसूर करते असें म्हणतें. ५. मूळ पाठ-**ब्राह्मण अलस प्रणतीं, देव.** ६. प्रस्थानीं कटि बांधोनि अशक्त सिद्ध होतात-**पंत.** कंबर. (?)

मग मुनि सांगे मज, तों 'ऊठ' म्हणे 'गुरुपदास लाग' मन. ४३
द्यावें काय तयास? प्रत्युपकारार्ह तों नसे वस्तु,
स्वस्तुत्यादर[1] न गुरुसि मन सांगे, तें चि मीं म्हणें 'अस्तु'. ४४
अश्रुजळप्रक्षाळितगुरुचरणीं वाहिलें शिरःकमळ
वरि ढाळिलें निजालकचामर[2]; मग कां उरेल शोकमळ? ४५
प्रणतक्लेश हरावे, दुसरी गुरुच्या नसे मनांत रुची,
पादोपासककामापूर्त्यर्थ[3]स्थिति सुरांचिया तरुची. ४६
विप्रें कथिलें मज कीं, 'वत्से! लिहिलेस उत्तम श्लोक,
ज्यांच्या अर्थश्रवणें आला धांवोनि, उत्तमश्लोक[4].' ४७
कोणाला हि न पुसतां, स्वरथीं द्विज बैसवूनि सूतातें
'हूं! कुंडिनमार्गं' म्हणे, प्रभुवाक्य[5] कथी 'दया प्रभूता' तें. ४८
एका रात्रींत चि ये, मध्यें ते देश काय हो! थोडे?
जोडे त्याले पविचे, कीं बाई! वायुमित्र ते घोडे. ४९
भावोजींला कळतां ते ही सहसैन्य धांवले, आले,
झाले एक मरुद्नळ, लोकांचें काय त्यांपुढें चाले? ५०
आले प्रभु, हें कळतां सामोरा शीघ्र धांवला बाप,
हा पर्जन्यप्रियसखशिखि[6]सुख सेवी, उरे चि ना ताप. ५१
तातें पूजा केली, गेली चिंता विलोकितां नखरें,
प्रणतांचें तापत्रयहर, हरिपदनीररुहवितान[7] खरें. ५२
कृष्णागमनानंदें हृदयांतुनि ज्यां बळें चि घालविलें,

---

१. अन्वयार्थः—गुरूसि स्वस्तुत्यादर न [असें] मन सांगे, मी तें चि 'अस्तु' [असें] म्हणे. (वसुदेवाला स्तुतीची आवड नाहीं असें समजून माझें मन त्याची स्तुति करण्यास प्रवृत्त झालें नाहीं हा भाव.) २. आपले केश हीच चवरी ती. ३. चरणसेवा करणाऱ्यांच्या मनोरथाची पूर्ती करण्यासाठीं. ४. उत्तम कीर्ति ज्याची असा कृष्ण. ५. तें प्रभुवाक्य 'दया प्रभूता (पुष्कळ)' असें कथी (सुचवी). ६. मोर. ७. हरीचें पदकमलरूप आच्छादन.

चैद्यादिमनें द्याया स्थळ त्या चिंतादिकांसि पाळविलें. ५३
मित्रोदयभीततमा आश्रय देणें जसा बिळा लागे,
प्रभुभीतास्मत्तापा चैद्याद्याश्रय तसा मिळाला गे!. ५४
अंबेच्या नमनाला न्यावी जीचा विवाह नवरी ती,
धरि हरिशंका दादा, देवीयात्रा कुळीं न नव रीती. ५५
मग बाई! दादाचे मागधशाल्वादिकां हि मेल्यांचे
सैनिक मज रक्षाया आले, धाकें विरोनि गेल्यांचे. ५६
हस्तीं शस्त्रें, दंशित, रथतुरगगजाधिरूढ ते कोले
ओले वरि वीररसें, वीरश्री केंवि त्यांसवें बोले? ५७
स्वसखीधात्रीजननीविप्रस्त्रीमंडळी न ती, पेटी,
तींत मणी मीं नेलें शुभविधिनें श्रीशिवेचिये भेटी. ५८
नमिलीं श्रीपदपद्में जीं मधुपां देति आसरा जीवां,
गंगेच्या हि नसे ती मृदुता, न श्री, न वास, राजीवां. ५९
पूजुनि पाय विनविली, 'कन्यांतें प्रसवताति ज्या माता
त्या लटिक्या, तूं चि खरी, तुज कृष्ण चि योग्य होय जामाता. ६०
हीं तूझीं कीं हरिचीं पदपद्में सेव्य म्हणुनि, देहा तीं
स्वीकारूत, दयेनें तूं चि मला शौरिच्या चि दे हातीं.' ६१
ऐसें प्राथित होत्यें चित्तांत चि मीं अशांत विप्रसती
'फलितं सर्वं' म्हणती, पूजा सांगों समीप ज्या असती. ६२
सर्वसतीपूजा म्यां केली, घेऊनि तत्प्रसादाशी,
दासी हरिची, परि पळ झाल्यें भटमीनमंडळा दाशी. ६३
देवीप्रासादांतुनि निघतां द्याया करासि आलीला
आलीला धरुनि करीं दाखविली त्या गतींत आलीलां. ६४

---

१. बोलाविलें. २. सूर्योदयानें भ्यालेल्या अंधाराला. ३. कवचधारी. ४. 'फलेन फलितं सर्वं' इति पूजामंत्रश्रवणं—**पंत.** ५. प्रसादसहिताशीर्वाद—**पंत.** ६. [रक्षक] योद्धे हे च मत्स्य त्यांच्या समुदायास. ७. दाशी—धीवरी—**पंत.** ८. आलेलीला. ९. सखीला. १०. ईषल्लीला—**पंत.** किंचित् लीला.

अवलोकनांत माझ्या नसती जरि साजणी! कृपा भरते,
खड्ग प्रथम मग क्षितिपृष्ठीं पडले गळोनि पामर ते. ६५
त्या मेल्यांस कशाला पाहों मीं? प्रियतमास अवलोकीं
कीं, आला कीं नाहीं; होय तडित्स्फुरण[1] काय तंव लोकीं? ६६
येतां ऐसें नाहीं, हें कां जातां चि जाहलें साचें?
याचें कारण बाई! मीं पात्र शिवाकृपाकटाक्षाचें. ६७
पत्रीं लिहिलें होतें 'देवीयात्रेंत[2] मज पदें दावा,
दावा बहुतासीं हा भाव कळों दुर्जनांसि नेदावा.' ६८
नयनांवरि येति सये! नलिनांवरि भृंगबालसे[3] वाळ[4],
त्यांसि म्हणे, 'साधु कसे? पूजिन[5] जरि काय गाल सेवाल.' ६९
प्रभुसि पहाया पूर्वीपासुनि मन्नेत्रपद्म बहु लोल,
तो लग्नसमय ते उपवास[6] हि, लावील कोण सखि! बोल? ७०
तों आला हरि, सुंदरि! जोडा नाहीं च त्या मद्[7] भागा
आपुलिया ध्याया, ते कोले वारिति कसे महाभागा? ७१
हरि रवि, मीं नलिनी, कीं कैरविणी, वीर वायसीरानी[8],
आनंदाची वेळा सांगों तुज साध्वि! काय सारा ती? ७२
माझा मूर्त मनोरथ तो रथ आला प्रियास घेऊन,
दर्शन नयनें घेती, जैसें शिशिरीं[9] दरिद्र घे ऊन. ७३
तों आलि म्हणे मज, 'सखि! सुमनोमाळा[10] वरा वहायास,
हा या समयीं विधि, मग नित्य असें चि प्रिया, पहा यास.' ७४
माळा उंचलितां, प्रिय आपण हि रथावरूनियां लवला,
लव लागेना तों घे अंकीं, करुणासमुद्र कालवला. ७५

---

१. विद्युत्स्फुरण. २. देवळांत येताना, बाहेर जाताना—पंत. ३. बैर. ४. केश. ५. [ नयनांवर न येतां ] गाल सेवाल तर [ केश हो! ] पूजिन ( तुमची पूजा करीन. माझ्या डोळ्यावर येऊन दृष्टि बंद करूं नका, हें तात्पर्य ). ६. उत्सवास—पंत. ७. मदन्या—पंत. ८. घुबड. ९. थंडीच्या दिवसांत. १०. पुष्पमाळा किंवा उत्तम मनोरूप माळा.

हरिनीळनिभवरांकीं[1] बसल्यें, न श्री तसी घनीं चपळे[2],
गेला घेउनि हरि निजभाग सुखें, त्यास म्हणति नीच 'पळे.' ७६
मज नेल्यावरि रक्षक वीरानीं उघडिले बळें डोळे,
लोळे जरि धूळिमधें केतुच्छायेंत तरि तनू पोळे. ७७
हंसें मुक्ता नेली, मग केला कलकलाट काकानीं,
हाकानीं नभ भरलें, जाय सुरांच्या हि नाद हा कानीं. ७८
कन्या कीर्ति हि हरिली देखत असतां बळें चि गोपानें,
'सोपानें[3] वीरशिरें केलीं कीं!' म्हणति भूप कोपानें. ७९
शाल्वजरासंधादिक चैद्याचे जे सहाय ते रागें
मागें धांवत आले, तळमळती अंतरीं दिल्या डागें. ८०
पुष्कळ खळ बळ घेउनि हरिवरि आले नृपाळ ते कुतरे,
उतरे एक हि न कसीं कनकासीं कोटि भांडतां धुतरे[4]. ८१
प्रथम कटक मज भासे कल्पांतक्षुब्धसिंधुचा लोट,
मन्मति चिंतेंत बुडे पळभरि सखि! वापिकेंत जसि मोट. ८२
मज आलिंगुनि हांसुनि विभु म्हणती, 'कातराक्षि! नेत्रास
उघडुनि निजयदुभटभुजकुतुक पहा, धरिसि कां मनें त्रास? ८३
खळबळजळधिप्राशन करितिल यदुवाडव[5] क्षणामाजि,
आजिप्रियँ[6] दीर तुझा बळभद्र अगस्त्य होतसे आजि.' ८४
पाहें मीं तों बाई! अरिहारिणांमाजि वृष्णिशार्दूळ,
तूळ[7] ज्वलनासीं जरि भांडे, तेजासि होय अनुकूळ. ८५
भावोजींचा विक्रम काय वदों? खळबळांत हे रुद्र,
मुद्रत्नाकर सुजनीं, यांसीं कां भांडती नृप क्षुद्र? ८६
यांच्या काय न दुर्लभ मेळविलें भाग्य सज्जनीं चरणीं?

---

१. इंद्रनीलमण्यासारखा पति जो कृष्ण त्याच्या मांडीवर. २. विजेला. ३. पायऱ्या. ४. एक कोटि धुतरे ( धोतरे ) कनकासीं भांडले तरी ते सोन्याच्या कसास कधीं हि उतरावयाचे नाहींत. कनक=( १ ) सुवर्ण ( २ ) धोतरा. ५. यादवरूप वडवाग्नि. ६. रणप्रिय. ७. कापूस.

मरणीं च कोण लाभ? द्वेषें कां होति सज्ज नीच रणीं? ८७
ज्याचें ज्याचें मस्तकपंकज मद्देवराशुग[1] च्छेदी,
भेदी तो रविमंडळ[2], रणभून्यूना[3] चि वाजिमखवेदी[4]. ८८
तुटलीं असतां हि शिरें, हांसति, नाचति, रणांगणीं वीर,
प्रभु सांगे मज कीं, 'जनिसाफल्यें[5] मुदितचित्त हे धीर.' ८९
वीर बसोनि विमानीं गेले, बहु यच्छरीरपात रणीं,
तरणी[6] झाले वृद्ध हि, त्यांच्या अंकीं प्रिया नवीतरणी. ९०
स्वर्गासि अप्सरांहीं नेले भटमणि, विचित्र तें काय?
रक्तनदी भेटीला नेती रत्नाकराचिया कायँ. ९१
अमरीनीं भटवरमणि घेउनियां, हार निजगळां केले,
रक्तनदीनीं मध्यम मणि[8]खनिला दाखवावया नेले. ९२
रणहट्टीं[9] बहु गेले वीरमणी, त्यांत राहिला गाळ,
काळ ग्राहक आला नव्हता, नेती फिरोनि तत्पाळें[10]. ९३
मग आला गे! बाई! दादा मज सोडवावया कोपें,
तो पेंव वृश्चिकांचें लोकां, परि या खगध्वजा सोपें. ९४
अक्षौहिणीबळ ज्वळदग्निप्रभवीर सांडिले मागें,
रागें गोळी[11] देत चि ये, घाली गांठि शौरिसीं आंगें. ९५
समनोरथरथशस्त्र प्रभुनें केला पळांत तो भग्न,
नग्न स्वखड्ग हि वधा, तों मन्मन होय शोकविनिमग्न. ९६
अभयप्रदपदपद्मीं म्यां तेव्हां घातली मिठी घट्ट,
धट्ट[12] क्षणभरि झाल्यें केली स्वाभाविक त्रपा गट्ट. ९७
केला न वध, तदधिका श्यालाची दुर्दशा सये! केली;
केली हरि[13] जरि करि, तरि करिमदशोभा दिगंतरा गेली. ९८

---

१. माझ्या दिराचा (बळरामाचा) बाण. २. सूर्यमंडळ. [युद्धांत जे मरतात ते सूर्यमंडळ भेदून जातात, हा भाव]. ३. रणभूमीहून हलकीं. ४. अश्वमेधाची वेदिका. ५. जन्म–**पंत**. ६. तरुण. ७. शरीर. ८. रत्नाकर–**पंत**. ९. संग्रामरूप बाजारांत. १०. त्याचे (सैन्याचे) रक्षक (सेनापति). ११. शिवी. १२. धीट. १३. सिंह.

त्यातें सोडुनि देवा लाउनि शब्द, स्वयें मला बोधी
तो धीर दीर माझा, वागमृतें मलिनबुद्धिला शोधी. ९९
द्रौपदि! असी कथा हे लग्नाची; फार मीं वदों काय?
पाय प्रभुचे संतत पूजावे तरि च सफळ हा काय." १००

२

भामा सांगे, "माझा सत्राजितनाम तात रविमित्र,
मित्र प्रसन्न झाला, निजकंठींचा दिला मणी चित्र. १०१
सुमणि स्यमंतकाह्वय रविचा मूर्तानुराग तद्वर्ण[1]
स्वर्ण प्रसवे पुष्कळ, शशिमणि चंद्रोदयीं जसें अर्ण[2]. १०२
चित्तकचिंतामणि त्या मणिला मागे, दिला न मज्जनकें;
जन केंवि भ्रांत नव्हे? भ्रमला रविमित्र मत्पिता कनकें. १०३
मणिला कंठीं बांधुनि माझा सख्खा प्रसेन जो चुलता
तो गेला मृगयेला, मणिकांतिस सिंह जाहला भुलता. १०४
मणिलोभें सिंहानें बाई! त्यापा[3]दिला वनीं काका,
त्या काय होय मोतीं सिक्[4]थ क्षण भासलें मनीं काकों? १०५
त्या सिंहाला मारुनि गेला घेऊनि ऋक्ष[6]राज मणी,
रमणीया रत्नातें बाळक्रीडेस योजिती रमणी. १०६
आता आला नाहीं तेव्हां माझा पिता करी शोक,
तो कश्मळां[7]त बोले जें तें वदती घरोघरीं लोक. १०७
म्हणती 'कृष्णें मृगयागत मणिकंठ प्रसेन मारविला,'
सारविला शिशुनीं[8] कर कज्जळजळडाग हा कसा रविला? १०८
'घोका नीट' न म्हणतां स्वगुरुनि[9]गदसाधुशिष्यतोकानीं
लोकानीं दृढ केला प्रभुच्या अपवाद जाय तो कानीं. १०९
पौरजनांतें घेउनि आपण गेला करावया शोध,

१. रविसप्रभ—पंत. २. जळ—पंत. ३. मारिला. ४. शीत. ५. कावळ्यास. ६. जांबवान. ७. दुःखांत. ८. स्वकर मात्र मळविला; न सूर्य—पंत. ९. आपल्या आचार्यांचें वचन ग्रहण करण्याविषयीं कुशल अशा शिष्यबालकानीं.

क्रोध प्रभुवर न करी, न घडे इतरास कोपसंरोध. ११०
मोटें अरण्य बाई! अश्वाचा प्रथम काढिला माग,
लाग प्रसेनतनुचा लावी, हरिचा हि मग महाभाग. १११
धरिली ऋक्षपदांची पद्धति[1] ती दाखवूनि दे विवरा,
बाहेर लोक ठेउनि, शिरणें लागे बिळांत देवि[2]! वरा. ११२
जिंकुनि ऋक्षपतीतें मणि त्यापासूनि आणिला गेहा,
लोकीं स्तवनैवनें अपवादमलिन काय न्हाणिला गे! हा. ११३
जेव्हां सभेंत हरिच्या रत्न करीं जाहला पहाता तें,
'हा!' तातें म्हणुनि, पुढें ओढविलें घ्यावयासि हातातें. ११४
जो बहु अदर्शनें दे, देइल कां अल्प दर्शनीं ताप?
बाप स्वमनांत म्हणे 'कोणा पुण्यें जळेल हें पाप?' ११५
देवूं केलें होतें अन्यवराला, परंतु देवास
कन्यारत्नार्पण करि तात; पदीं मज मुकुंद दे वास." ११६

३

श्रीजांबवती सांगे, "विवरीं जातां चि देव मत्तातें
नाहीं ओळखिला, सखि! जैसें न कळे निजेष्ट मत्तातें. ११७
सत्तावीस दिवस सखि! दोघांसीं युद्ध तें न पळ राहे,
साहे तात चि विभुभुजदंडपदाघात, रक्त जन्हि वाहे. ११८
असतील असोत बळी, मत्तातासारिखा नसे योध,
शोध ज्ञाते याचा चित्तांत बरा करूतें न क्रोध. ११९
त्यां वर्णावा काय? श्रोत्यांच्या शीघ्र जी भवा खाणी,
श्रीमद्वाल्मीकीची माझ्या बापास जीभ वाखाणी. १२०
अतिवृद्ध बहुयुगांचा, परि बळवेगें तसा न वात रणा,
तरणारांत समर्थ, प्रियसखि! भासे जसा नवा तरणा. १२१
श्रीसीतापति निजपति ऐसें जाणे पिता कवी, चरणीं

१. मार्ग. २. हे द्रौपदि!–पंत. ३. स्तुतिरूप जळानें. ४. स्वहित. ५. कोप न करोत–पंत.

ठेवी शिर, कीं झाली गात्रांची विकळता नवी च रणीं. १२२
मग कैंचा श्रम बाई! प्रभुपदवंदन सुधाब्धिमज्जन कीं,
पूर्वींपासुनि मोटा रघुयदुवीरप्रसाद मज्जनकीं. १२३
निजगुरुदेवप्रभुपदपूजासमयीं उभारुनीं बाहे[1]
बाहे[2], मणिसह वाहे मज, 'पददासी असो' म्हणे 'बा! हे.' १२४
द्रौपदि! बाई! प्रभुची दासी मीं हें चि भाग्य [3]देवि! भवीं[4]
ठेवि भवीं च भवानी चित्त, स्वप्नीं हि पद न दे विभवीं." १२५

४

कालिंदी सांगे, "मीं चिंतित होत्यें सदैव सुरवर्या,
केली प्रभुपददास्यप्राप्तीसाठीं महातपश्चर्या. १२६
रचिलें होतें यमुनाजठरीं बाई! दिवाकरें गेह,
स्नेह प्रभूत मजवरि ताताचा, तेथ हें वसे देह. १२७
जों मीं आलें होत्यें यमुनातीरासि पत्रपुष्पार्थ
मृगयाकेलिश्रांत प्रभुला जळ न्यावयासि ये पार्थ. १२८
तोय भराया विसरे, वृत्त पुसे सर्व मज, 'तुझा नवरा?'
नवराजीवदलाक्षा सांगे तें साधुवर्तमान वरा. १२९
सूचवि पूर्वीं च शुभ स्फुरणें भुज नेत्र सव्य 'साची' तें,
'स्वोक्ति करू' मनिं म्हणतां, पाहे सहसा चि सव्यसाचीतें[6]. १३०
म्यां वेंचिल्या फुलांची बाई! तत्काळ गुंफिली माळा,
ताळा पडला दैवें, आला घेऊनि पार्थ यदुपाळा. १३१
माळेला आपुलिया कंठीं, अंकीं मला हि, दे जागा;
यागा योगा न वळे, वश करिस्ये भक्ति या महाभागा. १३२
गृहमार्जनी च होइन, विभुपदरज भाग्य झाडनी च वरी,
मीच 'बरी' म्हणतिल, परि न नृपशिरीं अधिक ईहुनीं चवरी." १३३

---

१. बाहु. २. बोलावी. ३. संबोधनं—पंत. ४. संसारांत. ५. झांकरी. ६. अर्जुनास. ७. केरसुणी. ८. अन्वयार्थ!

५

स्वविवाह मित्रविंदा सांगे, “बाई! स्वयंवरांत मला
अमलाकारगुण प्रभु कैरविणीला सुधांशुसा गमला. १३४
रूपद्रव्याढ्य हि जे आले होते मदर्थ ते भूप
कूप, प्रभु रत्नाकर, किंवा, ते तेल, देव हा तूप. १३५
रुक्मी, माझे भ्राते, एका शाळेंत हे पढों शिकले,
टिकले[1] सहजा चि गुणीं कुचले हिरवे जसे तसे पिकले. १३६
कुळज गुणाढ्य हि होते परि नृप ते मज नकोत, बळें[2] काय?
पायें[3] प्रिय तपनाचे, हिमकरकर पद्मिनीस विष कायें[3]? १३७
जेव्हां कृष्णग्रीवा मन्माळा, या युगांसि[4] गांठि पडे,
त्या चि क्षणांत बाई! खळभूपभ्रूलतांसि गांठि पडे. १३८
मजला चि सये! न हरी भूपमुखश्रीस ही असत्काळ,
ते नृप चापलता चि न, सेना ही सज्ज करिति तत्काळ. १३९
श्वगणांतूनि जसा हरि निजभागा हारि, तसा चि अतिधीर
अबळखळांतूनि प्रभु मजला घेऊनि जाय यदुवीर. १४०
आले उत्साहें, परि समरीं यदुराज सिंह ते कलभ,
बलभद्रानुज खगपति सति! अतिगतिहीन भूप ते शलभ. १४१
ग्रीष्मीं दावाग्नीतें जिंकुनि जय जोडितील काय तणें?
मुकुटाच्या पदवीतें कैसीं हो! पावतील पायतणें? १४२
खळबळ आलें होतें आधीं मोटे धरूनि आवांके,
प्रभुवरशरततिपद्भर[6] माथां पडतां करूनि ‘आँ’ वांके. १४३
भटमुकुटरत्नकैटभरिपुपटुशरपटलपट[8] रणीं फांके,

१. कुचले हिरवे असोत किंवा पिकलेले असोत, त्यांच्या सहजगुणांत बदल होत नाहीं, तो तसा च टिकतो. २. येथें आग्रह कशास?–**पंत.** ३. तपनपाद बरे; पण अमृतकरकर विष च, काय म्हणोनि स्पर्शक्षणीं म्लानता–**पंत.** ४. संयोगास. ५. योग–**पंत.** ६. कृष्णाच्या शरपंक्तीच्या पायांचा भार. ७. तोंड पसरूनि–**पंत.** ८. वीरशिरोमणि कृष्णाच्या कुशल बाणसमुदायाचें वस्त्र.

कां केवळ कटक चि? सखि! घटजठरीं दीपसा रवी झांके. १४४
खळबळ खळबळ करि सखि! सकळ विकळ धरिति न पळ बळ मळधी,
म्हणति सुर, 'पळति जळचर, विभुशरशुंचि कढवि रिपुकटकजळधी.'
करुनि कृपा मजवरि वरि हरि हरि खळभूपबंधुविघ्नातें,
चरण क्षाळुनि सेविन बहुजन्में त्या चि भक्तनिघ्नातें." १४६

६

सत्या सांगे, "माझ्या तातें केला असा नवा पण, ज्या
तरवे कोणाच्या ही न पित्या न पितामहा न वा पणज्या. १४७
ज्यां वीरगंधदर्शन उत्तेजक पावका जसें तैल,
शैलप्रतिम क्रोधी बळशाळी असति सात खळ बैल. १४८
तो कन्यावर, जो हे जिंकुनि घालील वेसणा नाकीं;
ऐकति भूपति कुतुकें, देव हि ताताचिया पणा नाकीं. १४९
सांगों बहु काय तुम्हां? कोण्हीं अत्युक्ति तों म्हणाना कीं,
बहु भूप भग्न होतां, भ्याले सुर दुर्घटा पणा नाकीं. १५०
आला वीरमुकुटमणि हा लावण्यामृताब्धि थोरपणें,
याला विलोकितां सखि! भ्याला मत्तात साधु घोरपणें. १५१
सत्य चि सांगावें तुज, कथित्यें अपराध जोडुनीं हात,
तात क्रूर गमे मज, पण केला व्हावया सुताघात. १५२
पूजा करूनि तातें पण कथितां प्रभु म्हणे, 'वधू पाहों.
आह्मों उत्सुक बहु, मग वृषमददलनास ही उभे राहों.' १५३
लाजें मीं, परि बसवी मज तातांकीं वराभिमुख दायी,
बायी! स्वेदसलिलकणमौक्तिककंचुकित होय सुखदायी. १५४
मग खळ वृषभ दमाया बंधु तुझा वृष्णिराय कास कसी,
वश वृषशक्ति न होइल बाई! त्या लोकनायकास कसी? १५५
ज्याच्या अतुळ श्रीच्या दिग्गजशुंडा खऱ्याखुऱ्या बटकी,

---

१. वह्नि—पंत. २. भक्ताधीनातें—पंत. ३. कोसलदेशाधिपति नग्नजितनामक राजाची कन्या. ४. घर्मोदककणिकारूप मोत्यानीं व्याप्त असा. ५. देव—पंत.

कटकी[1] वैरांगदी[2] तो बाहु उभारूनि त्या वृषां हटकी. १५६
पाहुनि विभुसि खवळले सात हि वृष, धांवले विदाराया,
तों सप्तमूर्ति त्यांस हि धरि हारि, न दिसे गुणीं भिदा[3] राया!. १५७
त्या सर्वांच्या घाली लीळेनें दुष्टदमन गुण[4] नाकीं,
देवांच्या ही कानीं, वदनीं भवतापशमनगुण नाकीं. १५८
बांधुनि फिरवी वृषभां जैसें खेळांत बाळ अजतोकां,
मज दासीस उपेक्षिल भक्तपराधीन करुण अज तो कां? १५९
वरुनि मला विमलामृतकथ रथरत्नीं बसोनि घे अंकीं,
रंकीं वृषविजितनृपीं रथपथ धारिला मदर्थ निःशंकीं. १६०
होता पार्थ स्वत्पति सत्पतिसह, त्यासि तेधवां नैणदे[5]!
क्षण देव आवरी, मग आज्ञा स्वमुखें करावया रण दे. १६१
युद्धस्वयंवरीं वारि त्यांसि पराभूतिनाम नवरी ती,
न वरीति क्षितिपति, पारि धरि सकळीं तुल्यकाम[7] नवरीती. १६२
जन्मींजन्मीं बाई! हा ईश्वर चरणदास्य देउ मज,
विभवांतर मधुमोहक आत्महिताचा पडों न दे उमज." १६३

७

भैंद्रा म्हणे, "अहो सखि! सुभगा तारि हि न रमा तुळे यास,
प्रेमें मात्र वरावें; मज दे मत्तात मातुळेयास. १६४
बाळपणीं च प्रियसखि! माने कोण्हीं हि न नवरा जीवा.
बहुदिवसांची तृषिता मधुपी सोडील न नव राजीवा. १६५
ईंद्रनीलमणीची मूर्ति प्रभुमूर्तिसी च मज जनकें

---

१. कडीं ज्यास आहेत असा. २. उत्तम बाहुभूषणें ज्यास आहेत असा. ३. सप्त मूर्ति धरूनि वृष धरिले—**पंत**. ४. माझा पितयास मूर्तिसप्तकीं भेद न दिसे—**पंत**. ५. वेसण. ६. प्राकृत संबोधन—**पंत**. ७. समान इच्छेचा. ८. इयं तु नवैव परिपाटीति परिहासोक्तिरिति—**पंत**. ९. मद्यासारखें मोह उत्पन्न करणारें. १०. केकयदेशराजा धृष्टकेतु व वसुदेवभगिनी श्रुतकीर्ति ह्यांची कन्या. ११. इंद्रनीलमण्याची.

करउनि दिधली होती सेवाया, भूषऊनि मणिकनकें. १६६
सति ! अति नति रति पतिमति[1] भजनीं, नैवेद्य मूर्तिचा खावा,
राखावा अर्पाया, प्रथम न आपण पदार्थ चाखावा. १६७
चामर ढाळित पार्श्वीं विनयें प्रेमें सदा उभी राहें,
पाहें श्रीपद, नेणें बसल्यें मीं काय कीं उभी आहें. १६८
माहेरीं बाळपणीं मज झाली रत्नमूर्ति पारि पोटी[2],
सिकल्यें तीवरि बायी ! साध्वींची कांतभक्तिपारिपाटी. १६९
कर्मे करूनि जन्में व्हावीं होणार तीं न कंपावें,
जें स्वकृत सुकृतदुष्कृत तें तों भोगाविणें न संपावें. १७०
वाइट फळ कां म्हणउनि विधिसीं कोण्हीं करूं नये झगडा,
प्रभुचरणस्पर्श घडो मीं जें होईन त्या तृणा दगडा." १७१

८

आत्मस्वयंवराची सांगे श्रीलक्ष्मणा कथा मोटी;
हो टीकाकारांची श्रोत्यांची या रसीं सुखी कोटी.
"कृष्णाबाई ! माझा तात बृहत्सेन[3] साधुजनदास,
त्यास श्रीनारद ये भेटाया जेंवि शंभु धनदास. १७२
त्याच्या पूजासमयीं साहित्यांत स्वयें चि मीं बाळा
माळा अर्पुनि कंठीं, नमन करीं, सर्वयोगिजनपाळा. १७३
लीळाकमळ स्वकरीं घेउनि होत्यें पुढें उभी कन्या,
अन्या गोष्टी न रुचति, मोटी मुनिवर्यवाक्सुधोदन्या[4]. १७४
मज पाहूनि मुनि म्हणे, 'राया ! दुग्धाब्धिबंधु[5] तूं काय ?
माय त्रिजगाची तसि कन्या हे शुद्ध, यश हि उडुराय[6]. १७५
रूपें गुणें असी च क्षीरधिजा लोकपाळकां न वरी,
चवरी नृपासि च बरी, जगदीशाला चि ती रमा नवरी. १७६

१. अयमेव मत्पतिरिति मतिः—**पंत**. हा च माझा पति अशी मति. २. बाळ जीवरि लिहों सिकतात—**पंत**. ३. मद्रदेशाधिप. ४. नारदाच्या वाक्सुधेची तृष्णा (उदन्या=तृष्णा). ५. क्षीरसागराचा भाऊ. ६. चंद्र.

अवतरला यदुवंशीं तो चि जगन्नाथ, त्यास हे साजे;
राजे खद्योत, नृपा! त्यांची श्री कृष्णभानुला लाजे.' १७७
ऐसें सांगुनि गेला मुनि मग मज तो चि लागला छंद;
कंदर्पज्वर[1] हि पिता समजे, जाणेल काय तें मंद? १७८
तुझिया स्वयंवरीं पण करि जैसें मत्स्यभेदन द्रुपद,
मज्जनक हि तें चि रची व्हाया कन्येसि वर सुरद्रुपद[2]. १७९
तो स्तंभलग्नदृष्टिस वारि मीन दिसे, तसा न हा यास;
स्तंभाच्या मूळीं जळ, तें साधन भेदनीं पहायास. १८०
ऐकुनि धांवत आले सर्व हि भूप स्वयंवरा सुसरा[3]
तृषित पथिक, कीं पद्मा मधुकर, दृष्टांत हा असो दुसरा. १८१
तातें सर्व नृपांचा केला सत्कार फार आगमनीं,
बाहेर सम प्रेमा, परि धरिला देव भूरिभाग[4] मनीं. १८२
जैसा तो पण दुस्तर, दुर्धर तैसें चि मांडिलें चाप,
क्ष्मापे[5] प्रबळ हि, परि गुण चढवाया फार पावले ताप. १८३
सज्ज करुनि उंचलितां चापभरें कंप सखि! शिरे अंगीं,
रंगीं पडले नरवर; हर! हर! मरणीं न दुःख बहु, भंगीं[6]. १८४
कोणही भूपति म्हणती, 'नृपकन्या दूर, दुर्दशा जवळी,
कवळील वीरवृंदीं दुर्वहचापाग्नि तो खरा गवळी.' १८५
भीम सुयोधन कर्ण ख्यात महावीर चापधर दक्ष
लक्षक्षत्रियसंमत परि त्यांस हि तें न सांपडे लक्ष. १८६
रंगीं श्रीकृष्णसख[7] त्वत्प्रिय कृष्ण हि उठे महाभागे!
भागे, परि शर सोडी तो त्या मीनास वातसा लागे. १८७
श्रीकृष्णें 'साधु! सखे! साधु!'[8] असें म्हणुनि पोटिसीं धरिला,
अरि लाजले समस्तीं, स्तुतिकन्येनें तुझा चि पति वरिला. १८८
मीनातें भेदाया रंगीं कृष्णे! सजे चि ना कोणी,

१. मदनसंताप. २. कल्पतरुस्थान. ३. शोभनसरोवरास—पंत. ४. महाभाग.
५. भूपति. ६. पराभवीं. ७. अर्जुन. ८. शाबास! मित्रा! शाबास!

क्षोणीपति दुर्बळ, पण भारी; वाहेल वत्स कसि गोणी? १८९

मग जगदीश्वर कार्मुक घेउनि पाहे जळीं झषाभासा,
मासा बाणें भेदी, तोषवि वीरांत अर्जुना दासा. १९०

क्षितिवारि समकाळ पडे मत्स्य, प्रेमळजनाश्रु, सुमवर्ष[1],
हर्षे ब्रह्मांडघटीं कोंदे, तों देव गाति उत्कर्ष. १९१

होती जयजयकार स्तुतिवाद्यध्वान गायनें नृत्यें.
कृत्यें वर्णिति वंदी स्तविलें पार्थें मुकुंदपद भृत्यें. १९२

येतां रंगीं हांसें लाजे [2]हंसी स्वराजहंसातें,
अं[3]सातें वारि माळा, बाळा हे वीरजनवतंसातें. १९३

माळा यादवपाळा बाळा हे जेधवां सये! अर्पी,
[4]सर्पी दहनीं पडलें, खवळे खळभूपमंडली [5]सर्पी. १९४

स्वरथीं अंकीं घे जन्हि तन्हि माझी पावली च तनु कंपा.
होय चतुर्भुज मजवरि करि हारि अरिकारिहरी सदनुकंपा. १९५

जाय मृगांतुनि मृगपति घेउनि निजभाग; काय त्या अटक?
[6]भटकद्रूतनयांचें सद्गुरुगरुडापुढें किती [6]कटक? १९६

जे निर[7]पत्रप खळ नृप धरिति पथ प्रथम [8]दुष्टदमनाचा,
शमनाचा मग धरिती, भुजविक्रम अतुळ गरुडगमनाचा. १९७

प्रभुशर सदय प्रभुहुनि, कीं, मारुनि भूमिवल्लभ द्रवती;
कन्यार्थिवीरहस्तीं दिधल्या [9]सुरकन्यका सुभद्रवती. १९८

ऐशा झालों दासी, होवूं हि, दुजें मना नको यांच्या;
कल्पशतींहीं पोटीं आम्रत्वाचें चि भान कोयांच्या." १९९

जन्हि [10]अष्टपट्टमहिषीपाणिग्रहवृत्त आयके कृष्णा,
कृष्णाच्या चरितामृतपानें वाढे, शमेचिना, तृष्णा. २००

---

१. पुष्पवृष्टि. २. मीं—पंत. ३. खांबाका. ४. तूप. ५. सापीण—पंत. ६. सर्पांचें सैन्य. ७. निर्लज्ज. ८. कृष्णाचा. ९. कल्याणवती अप्सरा. १०. आठ पट्ट राण्यांच्या विवाहाची कथा.

९

षोडशसहस्र महिषी, त्यांमध्यें एक सुंदरी बोले,
तो लेश रस वदावा, अमृतरस हि ज्यासवें न पळ तोले. २०१
" कृष्णे! आम्हीं कन्या सत्कुलजख्यातवृत्तभूपांच्या,
[1]भौमव्यसनीं पडलों जैशा कीं कीर्ति तीर्थरूपांच्या. २०२
भौमव्याध स्वकपटपाशीं गोवूनि या मृगी कोंडी,
बुडवी शोकीं, कंठीं बांधुनि चिंताभिधा महा धोंडी. २०३
देवसपत्नें भौमें हे कन्यामंडळी बळानीता
सीता दशकंठहृता जैसी तैसी च जाहली भीता. २०४
अंतःपुर कारागृह अश्रुश्वासानिळें भिजे वाळे,
सेवाळे मणिभूतळ, धुपति [2]व्यजनोदरांत जे वाळे. २०५
श्रीकृष्णपदस्मरण स्वांतीं आम्हीं करूं म्हणों काय?
'पाय प्रणतीं संप्रति निष्ठुर झाले, नमोस्तु सकृपाय.' २०६
रिपु वधुनि सोडवाया सीता तद्वल्लभा उशिर लागे,
अंतःपुरीं हतारि क्षणांत तव देवि! भाउ शिरला गे! २०७
मारुनि मुरनरकातें भगदत्ता अभय राज्य दे वरद,
आम्हां ताप हरुनि सुख देती अमृतां[3]शुबंधु देवरदे[4]. २०८
अस्मन्मन या अमृतीं होउनि विनिमग्न आपदे विसरे,
अवलोकनसमयीं च स्वप्न तसा सर्व ताप देवि! सरे. २०९
द्वारवतींत प्रभुवर आम्हां नव पद्मिनींसि हा मित्र,
एका लग्नीं च वरी नानारूपें धरूनि हें चित्र. २१०
तुमच्या आशीर्वादें जन्मींजन्मीं घडो असी सेवा,
हे वाङ्मनःशरीरें करितों विज्ञापना सदा देवा!" २११

---

१. भौमासुरानिर्मित संकटीं. २. पंख्याच्या आंतल्या बाजूला जे वाळे असत ते [सर्व काळ] भिजून ओले रहात असत. ३. अस्मदवलोकने स्मितं चक्र इति भावः—पंत. ४. कृष्णाचे दांत.

# अध्याय चौऱ्यायशीवा.

तेथें अत्रि वसिष्ठ द्वित गौतम देवलासित व्यास,
ध्यास प्रभुचा ज्यांला ते पाहों येति मूर्त भव्यास. १
नारद विश्वामित्र त्रित एकत याज्ञवल्क्य भृगुराम
मार्कंडेय अगस्त्य प्रेक्षिति येऊनि सांवळें धाम. २
कश्यप सनकादि मुनि च्यवन शतानंद अंगिरा जीवें,[1]
गालव पुलस्त्य मधुप[2] प्रेक्षिति जगदीशपादराजीव. ३
वाल्मीकि शुक पराशर कण्व भरद्वाज धांवले मोर,
थोर प्रेम दयाघनकृष्णीं, विसरति विधूसि न चकोर. ४
त्या सन्मुनिवृंदातें वंदी गोविंद सुप्रसन्न मनें,
ब्रह्मण्यदेव लोकां कळवी कल्याण होय सन्नमनें. ५
स्वकरें पूजा करुनि स्तुति हि करी देवदेव, ती घाटी
पाटी सर्व कवींची, कर्णांची अमृतपूरिता वाटी. ६
'हे तीर्थतीर्थरूप श्रीचरण विलोकिले अहो! दिष्टें.[4]
शिष्टस्तुत्य चि झालों, कीं, झाला सुप्रसन्न जगदिष्ट. ७
झालें जन्म सफळ हें, संसारीं लाभ हा जना सत्य,
रुग्णा भेटों आले करुणाकर वैद्यराज नासत्य.[5] ८
दर्शन देवां दुर्लभ तें आम्हां सुलभ, भाग्य हें मोटें.
हरिलें आजि क्षीरधियश सारें मावुलीचिया पोटें. ९
प्रतिमा चि देव म्हणती तीर्थत्वें मुख्य ज्या जना तोय,
जो यत्न तो विषयपर ऐसे जे त्यांसि काय हें होय? १०
घडलें दर्शन पादस्पर्शन पूजन हि, धन्य जीवित कीं
नेणों किति जन्माहीं सुकृतें संपादिलीं कसीं इतकीं? ११
योगीश्वरदर्शन हें भलत्याला तों कधीं न संपादे,
घडतां हि अकृतसुकृतां[6] घूकांला मित्र तेंवि कंपा दे. १२

---

१. तेज-पंत. २. बृहस्पति. ३. हे-पंत. ४. दैव. ५. अश्विनीकुमार. ६. ज्यानीं पुण्य जोडलें नाहीं त्यांस.

म्हणती तीर्थें उदकें देव हि मृद्धातु लांकडें धोंडे,
सत्य ब्रह्म चि सारें, वेदस्मृ[1]तिकृन्मतीं सुधी कोंडे. १३
ते देती बहुकाळें नियमें भजतां जनास पावनता,
गुरु हो! तत्काळ चि ती युष्मत्पद[2]देवपादपावनता. १४
अघ्र्यादि हरिति दुरितें भजकांचीं, परि न नाशिती भेद,
हे दक्षोदारगुरू युष्मत्पददेव तुरविती खेद. १५
देहकळत्रसुतजळीं जो आत्मस्वीयतीर्थबुद्धि धरी,
न तसी तत्त्वज्ञजनीं तो गोखर[3] जंतु[4] भार भूमिवरी.' १६
सुमुनि स्तवनें, पवनें जैसे गगनांत तोयद भ्रमती[5],
मग पळमात्रें जाणति जनसंग्रह[6] हा असें अदभ्रमती. १७
ब्राह्मण म्हणति, 'स्वामी! करितां जनसंग्रहास्तव स्तवन,
निजभोगमूर्ति[7]गौरवयुक्त श्रीमंत[8] पूजिती भवन. १८
बहु वर्णि स्वापत्या अत्यादृत तात भूमि पाहूनि,
आनंद न होय तसा मुकुरांत स्वानना हि पाहूनि. १९
तीर्थांच्या माहेरें पदपद्में मोहिलें रमागेहें,
वरदास दाससेना हे नाथा! वेतनांत[9] मागे हें. २०
देणें हें चि पदाचें, विरह नसो आमच्या मना यासीं,
येणें चि बा मुकुंदा! भववारिधिला तरों अनायासीं.' २१
ऐसें विनउनि वाडववर[10]वृंद निजाश्रमासि जायाची
आज्ञा स्वाज्ञान[11]तमोमिहिरप्रभुच्या पदांबुजा याची. २२
तों वसुदेव तयांतें विनवूनि म्हणे, 'भवांत मज तारा
ताराधिप[12]चूड तुम्हीं, उचित नतोद्धरण युष्मदवतारा.' २३

---

१. वेदस्मृति करणाऱ्यांच्या मतीं. २. तुमचे चरण हे च कल्पवृक्ष, त्यांस जो शरणागत त्यास. ३. बैल आणि गाढव. ४. प्राणी. ५. मोह पावतात. ६. लोकांस सन्मार्गाला लावणें. ७. आपली तसबीर ज्यांत ठेविली आहे असें भवन. ८. आपला विभास भूषवितात–पंत. ९. सेवामूल्यांत. १०. ब्राह्मणश्रेष्ठांचा समूह. ११. आपल्या अज्ञानाला नासणारा जो सूर्य त्याच्या. १२. शंकर–चंद्रशेखर.

नारद म्हणे, 'अहो! हें चित्र नव्हे, पुत्र कृष्ण, हा तात,
तीर्थांतरासि गंगा सोडुनि काशिस्थ लोक जातात.		२४
बहु सहवास अनादरकारण, नारायणासि नेणे हा,
येणें हास नयो, वरमणिपरिस हि जानकीस एणेहा[1].		२५
कर्मे कर्मनिरासा पुसतो वसुदेव यासि तें बोधा,
शोधा उपाय, लागो शरणागत मोहसिंधुपररोधा.'		२६
मुनि म्हणती, 'वसुदेवा! तूं ब्राह्मणभक्त साधु वरशील,
यज्ञांहीं यज्ञेश्वर विष्णु यजावा, सुखें चि तरशील.'		२७
आनकदुंदुभि तेव्हां त्यां चि मुनींतें वरी, करी यज्ञ,
ज्यातें पाहुनि हर्षे वाखाणिति शतमखप्रमुख तज्ज्ञ.		२८
सत्कृति विप्रप्रमुखां वर्णांची निरुपमा चि मांहिवर ती,
आज्ञा घेतां देतां मुनिनृपयदुदेवदेव गहिंवरती.		२९
व्यासीं भीष्मीं हि दिसे जी पतिगृहगमनरीति कन्यांची,
अन्यांची काय कथा? ती प्रेमा धीरता हि धन्या चि.		३०
गेले पांडुसुत हि, परि पाहत हरिपादसारसा नंद
'आज उद्यां आज उद्यां' म्हणत वसे सपरिवार सानंद.		३१
शौरि म्हणे नंदातें, 'बंधो! हा स्नेह ईशकृत पाश,
याचा शूरांस बळें, ज्ञानें योग्यांस ही नव्हे नाश.		३२
या अकृतज्ञजनीं[2] बहु मैत्री साधूत्तमीं तुम्हीं केली,
पाषाणशिरीं जैसी वृष्टि तसी सर्वथा वृथा गेली.		३३
फळ नसतां ही मैत्री न विटे, दुष्टात्मजीं जसी माता,
बा! तामसपतिभजनीं साध्वी नाटोपिती मना हाता.		३४
प्रत्युपकारा कारावासीं पूर्वी नसे चि अवकाश
आतां हि प्रियमधुपां बा! नीरस मीं प्रफुल्ल नव काश[3].		३५
भाग्यमदें मीं झालों नेत्रें असतां हि अंध गोपेना[4]!

---

१. मृगेच्छा—पंत. २. कृतोपकारातें न जाणणाऱ्या अशा मजवर. ३. तृण-विशेष. ४. गोपेश्वरा—पंत.

सोपे नाश मदीं या, श्रीवरि कां साधुलोक कोपेना? ३६

तुमच्या उपकारांला संख्या नाहीं च, काय बोलों मीं?
त्यांच्या कोट्यंशांची कांहींसी त्वद्व्रजस्थगोलोमीं[1]. ३७

विपदर्णवांत तरलों, भरलों भाग्याचिया भरीं मंद,
तुज सेतुला विसरलों, परलोकीं ख्यात तूं भला नंद. ३८

बा! गा! चुकलों, आतां ‘उपकार’ असें मुखासि आलें कीं
माझें तातपण मृषा, सत्य तुझें सन्मतें चि या लेंकीं. ३९

पालन लालन बाल न पावे मज जवळि ही न होता तें
सर्व हि तुला चि घडलें, केलें म्यां अधिक काय हो! तातें? ४०

तूं बाप खरा, नंदन तूझे हे रामकृष्ण, मीं चुलता,
भेदें[2] न हा ही, नाहीं तरि विरहें उर पळामधें उलता. ४१

डाव्या उजव्या अंकीं बसतां तो स्पर्श वेगळा काय?
जाय स्तनद्वयीं मुख एकीं शिशुचें न ती दुजी माय.’ ४२

ऐसें बोलोनि रडे वसुदेव, तयासि तातसा नंद
समजावी, तेथ वसे मासत्रय तत्प्रियार्थ सानंद. ४३

गोपीगोपयशोदानंदीं दिव्यांबरीं[3] ललामगणीं[4]
आधीं मध्यें मग ही गौरव सम करि जसें भला मगणीं[5]. ४४

विसरति गोपी बाळें, ज्या समयीं नंद सिद्धता करवी,
मग आठवेल कोणा लोणी दहिं दूध तूप ताक रवी? ४५

जपहोमभुक्त्यलंकृतिविधिमध्यें रामकृष्ण ही चुकले,
भवपाशहरांस[6] हि न प्रेमगुण च्छेदवे, न वा उकले. ४६

देव यशोदाकंठीं घालूनि मिठी किशोरसे रडले,
अमृतस्त्राविसितासितमणिहारें चि[7] काय ते गळां पडले. ४७

---

१. तुझ्या गोकुळांत असणाऱ्या गायींच्या केशांत. २. तातपितृव्य इति भेदोपि नेति–**पंत**. ३. उत्तम वस्त्रानीं. ४. अलंकारसमुदायानीं. ५. मगणाचीं सारीं अक्षरें गुरु असतात हें प्रसिद्ध च आहे. ६. संसारबंधच्छेदकाला. ७. मूळ पाठ–**कंठे**.

नंदें धरिलें सुतयुग मृगमदकर्पूरपूरसें रुचिर,
वर्षा[1]शरदभ्राश्रिततटकनकनगोपमा न ही सुचिर. ४८
नंद कुरुक्षेत्रांतुनि गेला, यदुवीर ही निजावासा;
या सार कथा गातां आवरितो ग्रंथविस्तर चि दासा. ४९

---

# अध्याय पंचायशीवा.

जगदीश्वरप्रसादें झाला वसुदेव एकदा जागा,
यागांत हि बोधकरें मुनि थोपटिती तया महाभागा. १
तो रामाकृष्णांतें प्रार्थूनि म्हणे, 'तुम्हीं जगत्तात,
या तत्वा मायावश मीं नेणें, आज जोडितों हात. २
अवतरलां विश्वंभर भूभरहरणार्थ वृष्णिसंतानीं,
अंता नीच्यां न्याया, कथिलें मज नारदादि संतानीं. ३
कारागारीं प्रथम प्रादुर्भावीं चतुर्भुजाकारा,
हा रात्रीं भानु[2]निभा पाहे कीं तुज प[3]योधिजाहारा. ४
तेव्हां तत्त्व हि कथिलें, परि नेणें, धारणास मीं मुग्ध,
बाळा न दिलें चि, दिलें त्याच्या अंजळिपुटांत जें दुग्ध. ५
कंसनिदेशें जीतें अतिकष्टें लोहकार ही फेडी,
बेडी तुटली; तुजला शिवतां, तें बुद्धि विसरली वेडी. ६
तुज गोकुळासि नेतां बद्ध कपाटें हि उघडलीं वाटे,
वाटेना भय, घ[4]नतम तवपदनखचंद्रकांतिनें फाटे. ७
वृष्टीमध्यें हि दिल्हा एकानें ही न ताप थेंबानें,
तें काय रक्षिलें तुज रात्रौ म्यां[5] चालतां पथें बानें? ८
नेलासि जेधवां या दासानें तूं भवाटवींद[6]मुना,

१. वर्षाकालीन मेघ आणि शरत्कालीन मेघ यानीं ज्याचे तट आश्रित अशा मेरुपर्वताची उपमा. २. सूर्यसदृशा. ३. लक्ष्मीच्या [कंठींचा] हार अशा तुज. ४. दाट अंधकार. ५. म्यां बापानें. ६. अग्नि–**पंत.** दमुनस्=अग्नि.

झाली होती संपन्मदमत्ताऽकुलजधी तसी यमुना. ९
ती ही जैसी दासी, स्वामिपथांतील केरसा पूर,
दूर क्षिप्र करी बा! लाजे या स्वयशासि कापूर. १०
हें चित्र दुजें मोटें या दीना ही तसी च दे पदवी,
पद विश्वगुरो! तूझें दासाला देतसे महापदवी. ११
नंदें स्वमुखें कथिलें मज कीं, सा कोस पूतनाकाय,
लीला अशा चि मार्गे केल्या त्वां; या चि नूतना काय? १२
विधिजनकाच्या ठायीं केली सुतदृष्टि ज्यां सुमंदानें,
नंदानें ही, मनिं हें न धरावें त्वां दयैककंदानें. १३
मायादेवीनें हें वेड मला लाविलें तुम्हीं काढा,
वाढा बोधसुधारस, तुमचा महिमा जगत्रयीं गाढा. १४
मोहांधकूपपतिता अतितापार्ता विवेकदृग्हीना,
जीना असहाया मज उद्धरिलें दीनबंधुनीं दीना. १५
लावा निजभक्तिपथीं, न पुन्हा मोहांत हा पडो अंध,
बंध छेदा स्वकरें, कीं भर्ज्जकरें जसा जरासंध.' १६
देव तया उपदेशी, दे शीतमरीचि अमृत तृषितातें,
जनरीति हि रक्षविली शौरिकरें सर्वदेवऋषितातें. १७
जननीजनकपदांतें नित्य नमस्कारिती प्रभू तनय,
शिकवी गुरुभक्ति जना देवांचा कारि हित प्रभूत नय. १८
एकासमयीं त्यातें तन्माता देवकी म्हणे, 'अज हो!
ईश तुम्हीं कळलें मज, वरदायक युष्मदंघ्रितोयज हो. १९
श्रीसांदीपिनिगुरुसुत यमलोकाहूनि आणिला तूर्ण,
केला गुरुदारमनोरथ सच्छात्रीं तुम्हीं च संपूर्ण. २०
अघटितघटनापटु बटु भावीं ही हें घडेचिना तरुणा,

१. अकुलीनाची बुद्धि. २. मागें [ परतून जाताना ]. ३. तृष्णा भज. ४. भीमाच्या हातून. ५. शीत किरण ज्याचे असा चन्द्र. ६. देवयोरसौ नयः पूज्यपूजनरूपः—पंत.

अरुणानुज[1] लाजविला, अमृत हरी, परि असी नसे करुणा. २१

कंसें वधिले तुमचे अग्रज शिशु उपजत्तक्षणीं सा जे,
ते दावाल मला, तरि तुमच्या काय न भलेपणीं साजे? २२

पाहूं ही न दिलें मुख; कैसें त्या संकटांत पाजावें?
तें स्मरतां मज गमतें हें सर्व त्यजुनियां तपा जावें. २३

हा! हा! देवा! माझीं गर्भश्रमपात्रमात्र तीं बाळें,
डेंयाळें[2] हंसीतोकें[3] तैसीं गिळिलीं सुनिर्दयें काळें. २४

बाई! रोहिणि[4]! मजला वधिता जरि कंस तरि बरें होतें,
तो तें न करि; कसें विधि शोकविषें भरिल चित्त हें पोतें?' २५

सुरमणि नंदन जीचे मृतबाळक आठवूनि ते हि रडे,
अमृतफळ मिळे, नाशे गद, तरिहि शोची गमावले हिरडे. २६

मातेच्या आज्ञेनें गेला साग्रज मुकुंद त्या सुतळा[5],
जेथें बळि भक्तिदयादानरसांचा चि ओतिला पुतळा. २७

श्रीरामकृष्णदर्शनसंमद भुलवी कवीश्वरा बळिला,
नवपुंडरीककुवलययुग[6] जैसें चिरतृषाकुळा अळिला. २८

गुरुपूजा निर्माल्यें बळिनें केली, न लंघिलें विधिला,
प्रेम तयाचें निर्मळ, माने ती[7] साग्रजा दयानिधिला. २९

वंदुनि बळि हलिचक्रिस्तव करि सप्रेम, दे मन श्रीप[8],
भी पद्मा[9], नतवश विभु, तो हि प्रह्लादभक्तकुळदीप. ३०

'देवा! सेवा जे वाक्कायमनीं यास योग्य ते सांगा,
कां गाय स्तन्य न दे? परि वत्स सतृष्ण झोंबतो आंगा.' ३१

कृष्ण म्हणे, 'राजेंद्रा! ऐक, कथा सांगतों जुनी आधीं,
मग आज्ञा संपादुनि रामपदाब्जप्रसाद तूं साधीं. ३२

---

१. गरुड. २. सर्पानें. ३. हंसीचीं पिलें. ४. तदा रोहिण्यपि तत्रैवासीदिति भावः--पंत. त्या वेळीं रोहिणी हि तेथें होती, असा भाव. ५. सुतलनामक पाताळाला. ६. नूतन [ विकसित ] पांढऱ्या आणि काळ्या कमळांची जोडी. ७. पूजा--पंत. ८. माधव, कृष्ण. ९. लक्ष्मी.

पूर्वीं निजकन्येला भोगाया एक धांवला बाप[1],
पाप प्रेक्षुनि हांसति, त्यां हि मरीच्यात्मजांसि दे शाप. ३३
पुत्र हिरण्यकशिपुचे झाले ते देव उग्रशापानें,
भ्रमले साधु हि नयपथविच्युतपूज्योपहासपापानें. ३४
त्यांला चि योगमाया देवक्युदरांत नेउनीं ठेवी,
ते वीरा ! कंसानें वधिले, अद्यापि शोचिती देवी. ३५
ते हे आहेत विभो! तुजपासीं साजण स्मरप्रमुख[2],
द्यावे माझ्या हातीं, पाहों दे देवकीस पुत्रमुख. ३६
यांचा शाप, सतीचा ताप हि, राया ! सरेल; या कार्या
आर्यासह मीं आलों, आम्हां आज्ञा तिची शिरोधार्या.' ३७
जैसे ते स्वशिरासह निजचरणीं क्षिप्र दैत्यभूपाळें,
तैसें च देवदेवी जननीचरणीं समर्पिलीं बाळें. ३८
बाळें जेव्हां पाहे, पान्हा श्रीदेवकीस्तनीं दाटे,
आटे शोकांभोधि, स्वांताला हार्यसें[3] तिच्या वाटे. ३९
भेटे त्या पुत्रांतें, पाजी, चुंबी, रडे, सुखें हांसे,
जाणों ते मायेनें मोहाचे घातले गळां फांसे. ४०
श्रीपतिजननीस्तन्यप्राशन होतां चि जाहलें ज्ञान;
कां न ग्रीष्मजतापा हरि दुरितारातिहरिपदीस्नान[4] ? ४१
झाले दिव्यशरीर श्रीरमणाच्या पदप्रसादानें,
दानें ऐसीं चि दिलीं बहुतां दीनांसि तीर्थपादानें[5]. ४२
वसुदेवदेवकीबळकृष्णांतें नमुनि ते वियद्यानीं[6],

---

१. ब्रह्मेति न वदति तत्र दयां द्योतयन् भगवान् अथवा पापिनामापि न ग्राह्यमिति–**पंत.** ( कृष्णानें ब्रह्मदेवावर प्रेम असल्यानें त्याचे नांवाचा उच्चार केला नाहीं किंवा पापीजनांचें नामग्रहण हि नको म्हणून त्याचें नांव घेतलें नाहीं ). २. स्मर, उद्गीथ, परिष्वंग, पतंग, क्षुद्रभृत् व घृणी. ३. विश्रांति झाली असें. ४. भागीरथीचें स्नान. ५. चरणाचे ठिकाणीं तीर्थ ज्याच्या अशा कृष्णानें. ६. विमानीं.

बेसुनि गेले गात प्रभुचें यश हृद्य[1]गद्यपद्यानीं. ४३
श्रीकृष्णाची माता लाजे चित्तीं म्हणे, ‘ स्वर्नाकद्रु[2],
हा सुत, कां मीं ब्याल्यें कुमनोरथ जेंवि दुर्जेना कद्रु[3]? ४४
लोकत्रयांत केवळ वेडी मीं एक बायको नीच,
विटल्या असतील सती मुक्तीस हि हें चि[4] आयकोनीं च. ४५
ईश्वर पुत्र असोनि प्राकृतपुत्रस्पृहा अहा ! चतुरा !
देवकि ! धन्या बाई ! बालिशमंडळि[5]! तुला हि हैं[6] च तुरा. ४६
प्रभु हो ! सुरतरु मागे पतिला [7]ती मत्सखी उमा, ताकीं
इच्छा अमृत हि पीतां तुमची, वेडी परंतु माता कीं. ४७
हें वेड बरें याच्या लोकांचें वेड जावया पोटा
माझ्या तुम्हीं तसें यश आलें, मज जग हसो, नसे तोटा.' ४८
इत्यादि देवकी मृदु बोले चित्तीं, प्रभूसि कर जोडी,
गोडी कथेंत बहु, परि विस्तरभीरूक्ति[8] मानिली थोडी. ४९

---

# अध्याय शायशींवा.

तीर्थें हिंडत गेला धर्मानुज अर्जुन प्रभासाला[9],
आप्तमुखें निजमातुळकुळवृत्तांतासि ऐकता झाला. १
कृष्णानुजा सुभद्रा लग्नाला योग्य जाहली आहे,
तीतें स्वमतें हळधर धृतराष्ट्रसुतासि द्यावया पाहे. २
तातादिक म्हणति मनीं, ‘ सुमति खळाला, अचक्षुला रत्न,
शूद्रास श्रुति देतो राम, न चाले चि यापुढें यत्न.' ३
ऐकुनि मनीं म्हणे, ‘ मज तीर्थस्नायीस[10] जाहली शुद्धी,

---

१. मनोहर. २. भक्तकल्पतरु--**पंत**. ३. सर्पमाता. ४. मत्पुत्रानयनरूपं भगवद्वरदानं-**पंत**. ५. ‘मंडली' संबुद्धिः--**पंत**. संबोधन. ६. अहं (मीं)-**पंत**. ७. मूळ पाठ-**माझी सखी**. ८. तदुक्तिर्मानिता-**पंत**. त्याची विस्तारभीरूची उक्ति मानिली. ९. द्वारकेजवळील एका तीर्थाला. १०. तीर्थस्नान करणाऱ्यास.

या सुकृतें [1]हे व्हावी प्राप्त, विरक्तासि जेंवि सद्बुद्धि. ४
निजसुखसिद्धि सुभद्रा साधाया होयिन त्रिदंडियती,
प्रिय तीहूनि नसे मज, [2]ती, कीं ही रीति, गति अहो! नियती!' ५
पार्थ त्रिदंडिवेष स्वीकारी हळधरासि वंचाया,
युक्तीनें स्वपरविहित हित करितां कपटदोष [3]कंचा या? ६
द्वारवतींत वसे तो यति वार्षिक च्यारमासपर्यंत,
हर्यंतःकरणास चि ठावा त[4]द्योग जो सद[5]र्यंत. ७
मौन, सदा एकांतस्थिति, साधुसमाधियोग, सुविरक्ती,
सक्ति न लोकसमाजीं, लागे पौरांसि पार्थयतिभक्ति, ८
मोटे मोटे हि मठद्वारांतुनि भेटि घेति पायांची,
[6]असमशरज्वरभरखर करपवि, परि वरि समाधि वायां चि. ९
रामास हि कळलें कीं, 'योगी मोटा असे,' म्हणे, 'पाहों,
आहों ब्रह्मण्य, तया आणूं भिक्षेसि, शिर पदीं वाहों.' १०
तो यति एकादिवसीं बळदेवें आणिला स्वगेहास,
पूजुनि सुश्रद्धेनें जेववितां माधवास ये हास. ११
यतिदर्शना सुभद्रा येउनि बैसे निजाग्रजाजवळ,
न बळ प्रेक्षी, परि यतिहस्तींचा पाहतां गळे कवळ. १२
घाली घृतांत सैंधव, दुग्धीं जंबीरं, पायसीं कथिका,
मथि कामशर जया त्या राम म्हणे 'साधु' मोक्षसत्पथिका. १३
आर्यास निजेंसुरी ती उत्तरदानांत कन्यका यतिला
पाहूनि भुले, स्मर तो, रति ती, दृष्टांत अन्य काय तिला? १४
जीच्या [11]प्रवृत्तिनें वश केला आधीं च सर्ववीरमणी,

---

१. ही सुभद्रा. २. अन्वयार्थ–ती ( सुभद्रा ) कीं [ किंवा ] ही रीति ( त्रिदंडी यति होऊन राहणें ) [ ही च ] गति ( परिणाम ) अहो! नियति ( प्रारब्धीं काय लिहिलें कोण जाणें? ). ३. कोणता. ४. त्या पार्थाची मसलत. ५. प्रचंड शत्रूचा नाशक. ६. असम ( विषम--पंच ) शर=कामशर. ७. सुभद्रेसि पाहतां–पंत. ८. लिंबु. ९. मोक्षमार्गीच्या चांगल्या वाटसरूस. १०. शोंपाकु. १२. हकीकतीनें.

त्यास कटाक्षप्रेक्षणबाणीं मोहील कां न ती रमणी ? १५
कन्यारत्न हराया अवसर पाहे जसा खरा चोर,
घोरप्रताप, परि भी भीमानुज, कीं अनंत[1]बळ थोर. १६
[2]दामोदर दासा दे अनुमोदन ती हरावया नवरी,
दादास देव दावी दार[3]करीति स्वयें सदैव बरी. १७
ताताला मातेला एकांतीं गुह्य वृत्त हें कळवी,
बळवीरभीतिकोपोपशमोपायासि सांगुनी पळवी. १८
अनुकूल [4]ब्रह्म तसें तों झालें तन्मनोरथा पर्व,
तीर्थस्नान कराया पुरवासी लोक चालिले सर्व. १९
वरहयरथगजशिबिकारूढ सकल वृष्णिदारजन चाले,
झाले सिद्ध वऱ्हाडी, तैसे यदुभट; [5]धरा बळें हाले. २०
दिव्यरथांत सुभद्रा राकारजनी तसी [6]बळीं शोभे,
यन्मुखसुधाकरें नरवरपार्थाशयपयोनिधि क्षोभे. २१
तेव्हां धावुनि बैसे पार्थ सुभद्रारथीं, जसा पाटीं
सुचिरक्षुधित ब्राह्मण 'हां! हां!' म्हणतां हि वाढिल्या ताटीं. २२
समयज्ञ चतुर सेवक धनु तूणें तशांत देति आणोनीं,
धांवति रक्षक सैनिक कपटयतिकृतात्यनर्थ जाणोनीं. २३
त्यांतें म्हणे, 'सुभद्रामुक्ताहर वीर अर्जुन मराल,
समरा लक्ष हि या, परि काक तुम्हीं गति विसर्जुन मराल. २४
धर्मानुज मीं अर्जुन सिंह, तुम्हीं शशकिशोर, आटोपा,
या टोपा कवचांच्या भीना वल्गा उगे चि आटोपा.' २५
ऐसें नीट दटाउनि जाय सुभद्रा हरूनि तो पार्थ,
मारिति हाका केवळ, नागविला वनिं जसा [10]वणिक्सार्थ. २६

---

१. शेषावतारी बळरामाचें बळ. २. भक्तयधीनतां द्योतयति—**पंत**. ३. लहान मुलाची रीत. ४. भगवान्—**पंत**. ५. लोकबहुत्वम्—**पंत**. ६. मूळ पाठ—**बैसुनि सेनेंत तेधवा**. ७. माता. ८. स्वगतिरीति--**पंत**. ९. लगाम--**पंत**. १०. व्यापाऱ्यांचा तांडा.

सार्थक पार्थ करी; ती कैरविणी, तो सुधांशु गौरविता,
सविता बिसिनीसि वरी, कीं भेटे तो गुणज्ञ ती कविता. २७

श्रुतिसत्क्रिय[1] धर्मपथा शोभविती दंपती तसे स्वरथा,
अन्योन्यप्रिय संगम, तो प्रेमळ भक्त, ती मुकुंदकथा. २८

झटिति भटकटक, बहु करि 'कन्या नेली' म्हणोनि बोभाट,
वाटे बळास सांगे जो जो त्या दस्युचा चि तो भाट. २९

प्रस्फुरदधरदल प्रभु बळभद्र म्हणे, 'खरें चि सांगा, रे!
कोठें तो कपटपटू गांठितसे जो पटांतें[2] आंगारे? ३०

कोठें रथ? मुसळ पुरे; कवच कशाला? धनुष्य राहों द्या;
वत्सेला निजधर्षणकरखळदंडोत्सवासि पाहों द्या. ३१

छळें[3] या बळदेवासीं! खळें[4] बालिश, कुंति नृपसुते[5]! आते!
हा[6] तेजस्वी पंचम, गुरुवंचक योग्य तुज नव्हे माते!' ३२

पर्वीं अर्णव तैसा भगवान् बळभद्र पुष्कळ क्षोभे,
संध्यारागसुरंजितशरदभ्राहूनि[7] फार तो शोभे. ३३

कोपज्वरभरकंपितकायप्रभुलोचनें पुन्हां शोणें,
होणें पुढें सुदुर्घट, वारावें त्या महेश्वरा कोणें? ३४

जाय हळू च विनयनतकाय चतुर वृष्णिराय देव हरी,
माय सुतार्थ पतीचे कार्य, गुरूचे नमूनि पाय धरी. ३५

नमनीं प्रकटति सहभव[9] सद्गुण शांतिक्षमानुकंपादि;
कंपा दीनसख नुरवि अधरीं[10], प्रणतीं हि भव्य संपादी. ३६

हांसे बळभद्र, म्हणे कृष्णाक्रूरोद्धवां, 'अहो! कळलें,
वळलें मन, मत्पदभय सोडा, आदानें[11] बंधुचें[12] टळलें. ३७

---

१. वेद आणि उत्तम क्रिया करणारा हे दोघे. २. मूळपाठ--**गुणांत**. ३. नवल करितो--**पंत**. ४. न तु साधुश्चतुरश्चेति पार्थमुपहसति--**पंत**. ५. समस्तंव--**पंत**. (?). ६. मीं पाचवा तुझा पुत्र पार्थ मारूनि होईन--**पंत**. ७. संध्याकाळीं आरक्त झालेलें जें शरत्कालीन अभ्र त्याहून. ८. जणु काय. ९. नैसर्गिक. १०. आपुल्या--**पंत**. ११. धरणें, मोठें भय. १२. आप्त पार्थाचें--**पंत**.

जा जा, उठा, मुलीला पाहों, वाहों वरा, घरा आणा,
प्राणाधिक तो येना, तरि घालाव्या मदंघ्रिच्या आणा. ३८
अथवा कशास शासनभय धरुनि मनीं पळेल तो दूर?
शूर ख्यात पळेना; नेऊं द्या पारिबर्ह अक्रूर. ३९
भ्राडा भूषा वसनें दासीदासाश्वहस्तिरथरत्नें,
झाला भगीरथाचा पार्थ सखा आजि या महायत्नें.' ४०
हे रसिककर्णतर्णकशत तर्पायासि कामधेनुकथा
करिती प्रभुवर अनुचरपरसुखकर अनुसरोनि लोकपथा. ४१

---

# अध्याय सत्यायशीवा.

श्रीश्रुतदेव ब्राह्मण होता मिथिलेंत भक्त देवाचा,
सेवा चालवि भावें, मूर्त प्रेमा चि वासुदेवाचा. १
श्वश्रूवशनियतिसुता गृह चालवि, संग्रहीं नसे कवडी,
शमधन कनकनगॅ, न मन विषयीं, सोडूनि माधवा, दवडी. २
त्या राष्ट्राचा पाळक राजा बहुलाश्व तो हि हरिदास,
ज्या सज्जनमित्रास त्रास न दे राज्यदारसहवास. ३
बहुलाश्व श्रीमंत, श्रुतदेव दरिद्र परि सम प्रेमा,
ते मातेस सुत तसे प्रिय विभुस, भुले न भूतिपति हेमा. ४
त्या चातकां कृपाघन, चकोरकां यादवेंदु हरि दोघां.
भेटाया जाय दयासागर त्या प्रेमभक्तिसरिदोघां. ५
प्रभुसह नारद अत्रि व्यास असित वामदेव राम शुक
कण्व च्यवन गुरु असे बहु, देव सुरद्रु, ते मुनींद्र शुक. ६
त्यजिते कृष्णसुरद्रुम मुनिशुक वारिते प्रपंचकिंशुक ते,

१. अर्जुनास विध्युक्त देवूं-पंत. २. नजराणा. ३. रसिक जनांचे कर्णरूप वत्सांचें शत. ४. भक्ताना अत्यंत सुख देणाऱ्या. ५. मूळ पाठ--**श्वश्रूवशासी च नियति, साहित्य करी, न संग्रहीं कवडी**. ६. जो शमधन तो स्वयें मेरु चि--पंत. ७. कृष्ण. ८. प्रपंचरूप पळस.

थुकते जरि न विषयफळ, मुकते च सुखासि, समय हा चुकते. ७
अक्षय अमृतकलश विभु सकरुण मुनिवैद्य कविमना वाटे,
भवरोगियांसि वांटुनि जोडिति पुष्कळ यशोधना वाटे. ८
जनपदजन पद्पंकज परपुरुषाचें पहावया येती,
घेती आकंठ अमृत, सुतृषित उद्गार फारसे देती. ९
अन्नप्रदसदनातें तृरुनि धावोनि येति दुष्काळीं,
तैसे चतुर्विध हि जन मज्जति अमृतह्रदीं जगत्पाळीं. १०
कृष्णागमनश्रवणीं झाल्या स्नानाशनक्रिया शिथिला,
मिथिला सीतोत्पयमात्वरि पाहे या सुखप्रदा तिथिला. ११
मिथिलापुरीस जातां, करि पुष्कळ मुक्तिमूर्ति उत्सव ती,
जसि काय जाय माय स्वसुतेसि पहावयासि भाग्यवती. १२
त्या पुष्पवाटिकेला शोभेची काय दे वसंत धणी?
भक्तपुरी गौरविती, लीलानरकाय देव संत धणी. १३
मिथिलोदरांत होते जे सात्त्विकभाव ते अनादि सेलें
तद्धृद्धिसुखप्रसवें यश कृष्णीं वैद्यसज्जना दिसलें. १४
बहु दिवसीं पति येतां करि बहु मिथिला पतिव्रता साज,
आज द्वारवती तज्ज्येष्ठसपत्नी मनीं धरी लाज. १५
धाडी पुढें स्वजनसुत शृंगारुनि ती पतिव्रता मिथिला,
जावूं पाहे, परि गति लज्जाभूषाभरोत्सवें शिथिला. १६
मिथिलापुरवासिजनें निजनेत्रसरोरुहें उदश्रुजळें
प्रक्षाळिलीं प्रथम, मग भगवच्चरणीं समर्पिलीं उजळें. १७
बहुलाश्व श्रुतदेव प्रेमें धावोनि वंदिती पाय,

१. मार्गांत. २. देशवासी जन. ३. ढेंकर. ४. सीताविवाहानंतर. ५. मुक्तीची मूर्ति च. ६. तृप्ति. ७. बाढ खुंटलेले गर्भ. ८. थाटमाट. ९. लाज, पुष्कळ अलंकार व आनंदातिशय. (मिथिलेच्या गमतीला शिथिलत्व कां आलें याचीं तीन कारणें पतिव्रतेला अत्यंत साजतील अशीं मोठ्या मार्मिकतेनें पंतांनी दिलीं आहेत)—निर्णय०. १०. प्रेमाश्रुजळानें.

काय उपायन दुसरें? आर्पिति चरणीं स्ववाङ्मनःकाय. १८
दोघे हि एकदा चि प्रार्थिति भक्त स्वगेहगमनास,
नमनास एकदा चि प्रथम करिति, भेदभाव न मनास. १९
भक्तास हरिहरांची, भक्तांची भीड तसि पडे देवा,
'सेवा समान आपण दोघांचा ही' म्हणे "खरा ठेवा. २०
वर्णगुरु ब्राह्मण हा श्रुतदेव प्रथम सर्वथा पूज्य,
जनसंग्रहधर्मपथीं घालावें यासि लंघितां पूज्य. २१
निमि[1]कुळकुमुदकळानिधि बहुलाश्व प्रेमळ क्षमापाळ
मीं वृद्ध तात, सुत हे, कवि एक, दुजा हि गोजिरा बाळ. २२
शोडशसहस्र सदनीं लग्नीं केलें तसें[2] करायास
तदधिक भक्तप्रेमा कथितो मज आज लोकरायास. २३
स्त्रींच्या तोषा केलें, भक्तांच्या तें हि जरि करींना मीं
तरि 'दीनबंधु' 'भक्तप्रिय' या अंकित वृथा हरी नामीं. २४
श्रीशिव अनंत विधि निजरूप[3] हि न प्रिय जसा मला भक्त,
व्यक्त स्ववचन तदवन न घडे, तरि सदवनीं कसा शक्त?" २५
तो देव दाय दास हि दायाद तदर्थ दोन करि वांटे,
वांटे तें धन त्यास चि अर्ध न करि सर्व देवघरिं सांटे. २६
समुनिजन प्रभु मूर्तिद्वय धरि, करि कुतुक थोर सांगाया,
रसिककविजना प्याया पुष्कळ दे देव तो रसां गाया. २७
दोघां प्रियभक्तांच्या जाय गृहा तें कळों न दे त्यांस,
प्रभुपदघनां नमूं नत चातकिं हा रस वळोन देल्यांस. २८
बहुलाश्व मुनिजनासह घेउनि जाय स्वमंदिरा हारिला,
करि लास्य, हास्य, हर्षवि न रिपुयशोराशि ही रणीं हारिला. २९
श्रीवरचरणरज पडति, शत न तसा विभव भव[4]सखावासीं,

---

१. निमिकुलकमळाला [विकसित करणारा] चंद्र. २. प्रत्येकीच्या घरीं भिन्न रूपानें मीं एका च वेळीं होतों तसें. ३. माझी स्वतःची मूर्ती हि. ४. कुबेराच्या घरांत.

तो भवभक्त असो परि विरळ चि याच्या तुळेल भावासीं. ३०
रत्नासनें मनोरम सुस्पर्शें त्यांवरि द्विजांसहित
बैसविला बहुलाश्वें नमुनि श्रीचरण सर्वदासहित. ३१
चरण प्रक्षाळुनि तीं तीर्थजळें घे कुटुंबसह माथां,
सकुटुंब होय शिव नृप, शिव हि धरी त्यां चि मस्तकीं पाथां. ३२
पूजन करुनि प्रेमें कर जोडुनि तो म्हणे, 'अहो नाथा!
पाथा या पायांच्या कोणा पुण्यें सुपात्र हा माथा? ३३
या तुमच्या दासाच्या भाग्यास नसे जगत्त्रयीं जोडा,
दोडीं अर्कतरूचा अमृतफळस्वाद दावितो थोडा? ३४
श्रीपदकें पदकें हीं अंकीं माझ्या अहा! महा चित्र!
हे करुणावरुणालय! अरुणानुज काय या मला मित्र? ३५
स्वल्पदसुरतरु पुरविति भक्तांच्या मनिं शिरोनि आवडिला,
सुकविजनीं म्हणउनि भवदंघ्रिसरोरुहपराग सावडिला. ३६
बंधु अनंत, तनुज विधि, भार्या श्री, यांपरीस कोटिगुणें
भक्त प्रिय परम, खरें आतां या किंकरासि काय उणें? ३७
स्फुरलें पादस्पर्शें हें दैवें तों तुझें नव्हे देवा!
हें फळ फळली कळली कल्पलता भूमिदेवपदसेवा. ३८
येथें बहु दिवस रहा चरणनखामृतकरांशु सेवूं दे,
या तृषितचकोरांला, देवा! उद्गार फार येवूं दे. ३९
हे पाय माय काय प्रायस्वायत्त बाळ सोडील?
जोडी लक्ष त्यागुनि आधीं संसारबंध तोडील.' ४०
पाहे आवडि मोटी, राहे मिथिलेंत देव दासवश,
परिसे स्वयें हि सादर द्वारि सेवकवृंदगीत आत्मयश. ४१
श्रुतदेव हि मुनिवृंदासह ने आत्माश्रमास, 'सुखकंदा
वंदा' म्हणे निजजनां 'वंदारुसुरद्रुमा निजानंदा.' ४२

---

१. बहुलाश्वाच्या. २. मस्तकीं. ३. उदकास. ४. कोवळें फळ. ५. रुईचा. ६. गरुड. ७. ध्यानांत आलें. ८. स्वतंत्र. ९. काम. १०. भक्तकल्पतरूला.

तो उत्तरीयवस्त्र प्रेमभरें उडउनी करी नृत्य,
भृत्य प्रभुचा झाला अमित भवांत भ्रमोनि कृतकृत्य. ४३
भेटे करुणाब्द विभु श्रुतदेव मयूर संमदी[1] नाचे,
दीनाचे श्रम सरले, हृद बुडतां आटले नदीनाचे[2]. ४४
व्याघ्रमृगाजिनकंबळतृणकाष्ठ[3]कुशासनें तयां मांडी.
पूजी सिद्धपदार्थीं प्रेम पुरे, सर्व गडबडी सांडी. ४५
श्रुतदेवाच्या दृष्टी अर्पुनि ही अश्रुजळ पुढें होती,
जेव्हां श्रीचरणांवरि साध्वी शुचि शीतळें जळें ओती. ४६
समुनिविभुपद क्षाळुनि करि सादर मानस त्वरा, शिशिरें
तीर्थजळें स्वकुटुंबा न्हाणुनि धरि तो हि सत्वराशि शिरें. ४७
नाचे श्रुतदेव पुन्हां, पूजेचा राहिला विधी अर्धा;
गंगाधर करि तांडव, त्यासीं यासीं च लागली स्पर्धा. ४८
पूजाक्रम स्फुरेना प्रेमभरें जें घडे न तें थोडें,
केवळ अडे तयाहुनि चालींत मनस्वि तें बरें घोडें. ४९
दे मुनि अमृतफळप्रद भगवद्धस्तांत आवळे बोरें,
[4]थोरें तयांत बीजें परि देवा नीरसें न, न कठोरें[5]. ५०
विमळ उशीरें[6]सुवासित हिम मधुर प्राशनासि दे तोय,
तत्प्रेमरससतृष्णा कृष्णाला सत्य अमृत तें होय. ५१
होती जीर्णा कांहीं कस्तूरी, लाविला तिचा टिकला,
शोभे श्रीपतिभाळीं, मधुकर इंदीवरीं[7] जसा टिकला. ५२
घाली [8]कुशपिंजूलग्रथितपवित्रें स्वबंधुच्या बोटीं,
मोटीं रत्नें ज्यांवरि त्या मुद्रा फार लाजल्या पोटीं. ५३
सात्विकभावें कांपे श्रुतदेव पवित्र घालितां बोटीं.

१. आनंदी. २. समुद्राचे. ३. पीठ—पंत. ४. विशेषण; बहुवचनाचें रूप. ५. ह्या ठिकाणची 'सात्विक' ह्या शब्दानें आरंभिलेली पूर्ण आर्या हरताळल्यामुळें अवाच्य झाली आहे. ६. वाळ्यानें सुवासित. ७. कमलांत. ८. दर्भाग्रनिर्मित अशीं पवित्रकें.

तों वरवरद पसरि करसरसिज निजकिंकरीं कृपा मोटी. ५४
बहु कोमळ तुळसीची अर्पी कंठांत मंजरीमाळा,
बाळा तद्भक्ति तदा वारि जाणों त्या जगत्त्रयींपाळा. ५५
चरणीं कमळ समर्पी, तें जाणों आपुलें चि हृत्कमळ,
शमळघ्नप्रभुचें मग गद्गदगल साधु गाय यश अमळ. ५६
भगवद्रूपमुनी ते भगवंतासह समर्चुनी भक्तें
आकंठ तर्पिले जो मूर्त विशद आत्मभाव त्या भक्तें. ५७
तर्क करी तो मुनि कीं, 'मी दीन गृहांधिकूपभेक, मला
मानसरोवरींचें हंसत्व, अलभ्य लाभ हा गमला. ५८
तीर्थांच्या व्यवहारा चालविती साहुकार जे आद्य,
ते मुनिचरण दरिद्रा मज देती मान घेउनी पाद्य. ५९
या मुनिधनिकांचें ही मूर्तमहाभाग्य मद्गृहा आलें,
हे सर्वज्ञ न चुकले मार्गातें; हें असें कसें झालें?' ६०
तो सकुटुंब प्रभुचे पाय धुरी तेधवां म्हणे, 'देवा!
जे श्रवणादिपर जन प्रकटसि त्यांच्या मनीं च तूं ठेवा. ६०
तें मज कांहीं च नसे, घडलें प्रत्यक्ष दर्शन स्वामी!
येतिल काय? दयाळा! नवनिधि त्वत्सद्दरिद्रजनधामीं? ६२
आलें असेल काय प्रेमभरें या मुखा तुझें नाम,
कीं पूर्वीच्या जन्मीं क्षण सादर पाहिलें तुझें धाम? ६३
होय प्रसन्न जेणें मन भजनरहस्य तें पुन्हां बोला.
कुक्षींत क्षेत्राच्या अर्पावें बीज जों असे बोला.' ६४
देव म्हणे, 'श्रुतदेवा! आले घेवूनि हे मुनी भजला,
भजला यांसि सुखी जो तो मोक्षपदासि जावया सजला. ६५
झाले प्रसन्न यास्तव हें निजधन बांधिलें तुझ्या पदरीं,

१. भातानें. २. घरांतल्या अंधेऱ्या विहिरींतील बेडूक. ३. महापद्म, पद्म, शंख, मकर, कच्छप, मुकुंद, कुंद, नील व खर्व असे नव निधी. ४. भांत--पंत. ५. जों कुक्षि ओका आहे तों. ६. आत्मधन.

सांचविलें वृत्ति[1] करुनि पक्वापक्कीं उदुंबरीं, बदरीं. ६६
कष्टें जोडुनि वांटिति, निजधन हे मुनि उदारकर सर्व.
करिती काय कळेना हारिती जो सुरभिकल्पतरुगर्व. ६७
सदय उदार शुचिव्रत यास्तव यांच्या धना नये तोटा,
करिति क्षणांत राजा रंक, चमत्कार हा जगीं मोटा. ६८
तें दानपात्र उत्तम जो जन यांच्या पदांवरी लोळे,
निजपदपूजन घेउनि देती सर्वस्वदान हे भोळे. ६९
हिंडति हे मज घेउनि, निजचरणरजें जगन्मळा धूती,
देवक्षेत्रें तीर्थें मिरविति याहीं च जी दिली भूति[2]. ७०
सर्वप्राणिश्रेष्ठ ब्राह्मण जन्में चि, काय सांगावें?
सद्योजात[3] मराल स्तुत्य, न वृद्धां हि वायसां गावें. ७१
ब्राह्मण उगा चि गुरु जरि तुष्टि तप श्रुत[4] सुगंध तो हेमीं
साधो! ऐसा ही जरि मत्पर[5] तरि तो मनुष्य नोहे मीं. ७२
दयित ब्राह्मण मजला कौस्तुभ हा दृष्टिमणि खरें समज,
जगदिष्ट श्री प्रिय हि स्वचतुर्भुजरूप हें तसें न मज. ७३
मंत्रमय ब्राह्मण हे मज देवमयासि सत्यताहेतू,
श्रुतदेवा! विप्रांचे पाय चि संसारसागरीं सेतू. ७४
विप्रार्चन तें[6] माझें, माझें चि वरें हि नावडे मजला;
आज्ञा[7] न करि, करि स्तुति दास, तसा ब्राह्मणां न जो भजला.' ७५
विप्रभजन सन्मार्ग स्वमुखें सांगोनि ते[8] भजक तारी;
मग मिथिलेहुनि गेला निजनगरीस त्रिलोकहितकारी. ७६

---

१. देहनिर्वाह. २. ऐश्वर्य. ३. नुकता च जन्माला आलेला. ४. शास्त्र, विद्या. ५. मूळ पाठ–**श्रुतदेवा! समज मनीं, हित कथितों.** ६. विप्रार्चन जें तें च माझें अर्चन ७. कोणी दास यजमानाची स्तुति करितो, पण आज्ञा पाळीत नाहीं तो जसा, तसा जो ब्राह्मणातें न भजला तो मला वाटतो. ८. भूप–विप्र–**पंत.**

# अध्याय अठ्यायशीवा.

अद्भुत चरित जगत्त्रयपापापह सर्वभक्तपाळाचें
श्रीशुकमुखसुकविप्रिय गावें भावें चि दुष्टकाळाचें. १
होता एक असुर वृकनामा तो मति धरी तपश्चरणीं,
जातां वनासि, नारद भेटे, ठेवी शिरोरुज तच्चरणीं. २
त्या मुनिवरा पुसे तो, शिष्य जसा गुरुपदांबुजप्रवण,
'सांगा, जी ! विधि हरि हर यांमध्यें आशुतोष तो कवण ?' ३
सांगे नारद, 'भगवान् गिरिश जसा पुसतोसि तूं, तसा आहे;
भज; शीघ्र सिद्धि होइल, देतां मागेंपुढें न तो पाहे. ४
स्वल्पें हि गुणें होतो भजकीं भगवंत शंभु तो तुष्ट,
स्वल्पें दोषें हि बहु स्मरहरहर देव होतसे रुष्ट. ५
होय प्रसन्न; करिती स्तुति, दशमुख बाण ते जसे बंदी,
नंदीहुनि आवडले, केले, प्रभु ज्यांसि इंद्र हा वंदी. ६
करुनि प्रसाद आपण संकट त्यापासुनि प्रभू पावे,
कैलासोत्पाटनपुरक्षणइतिहास हे जना ठावे.' ७
ऐसें सांगुनि गेला मुनिवर, मग दुष्ट तो हि केदारीं
वर घ्यावया बसे खळ, यवन भिकारी जसा टिके दारीं. ८
त्या क्षेत्रीं जातां चि त्यागुनि तो तोयअन्न, होमातें
निजमांसें चि करि, म्हणे, 'देवा ! शीघ्र प्रसन्न हो ! मातें.' ९
होम करी सा दिवस, स्वकरें शस्त्रें स्वमांस तो कापी,
पापी निष्ठुरता त्या करुणानिधिच्या शिरावरि स्थापी. १०
सप्तमदिवसीं जेव्हां उद्यत झाला स्वमस्तकच्छेदीं
दे दीनबंधु दर्शन, ज्याचें वात्सल्य वर्णिलें वेदीं. ११
कुंडांतुनि निघोनि प्रभु धरि त्या शस्त्रपाणिचा पाणी,
'प्राणी मरो' म्हणे त्या साधु निवारी, अशें मनीं नाणी. १२

---

१. दुष्टांचा काळ जो कृष्ण त्याचें. २. गुरूच्या चरणकमळीं नम्र. ३. त्वरित प्रसन्न होणारा. ४. बद्रिकेदारी.

प्रभुपाणिस्पर्शें तो झाला दिव्याकृती जसा मित्र[1],
अमृतप्रवाह वाहे वारि तारि भस्म हि उठे न हें चित्र. १३
त्यातें वारूनि म्हणे करुणार्णव तो, 'पुरे, पुरे कां गा!
सांगाया गुरु नसतां स्वमतें त्वां खंडिलें वृथा आंगा? १४
वेड्या! हें काय कळे? सोपें मद्भजन साधुसहवासें,
दासें जळें चि आम्हां जोडावें, होमिलीं वृथा मासें. १५
बहु पत्रपुष्पफळ; जळ केवळ मज जरि सुशीळ दे, वश मीं[2]
झालों, होतों, होयिन, हें जाणति साधु भूमिदेव शमी. १६
भक्तास उतळ केवळ, आहें जरि[2] कोटि योजनें खोल,
लोलै[3] त्वन्मन कोठें? वर द्यावा कोण तो स्वयें बोल.' १७
ऐसा प्रसन्न झाला वरदर्षभ भक्तभाग्यभर[4] भोळा,
तोळा द्यावा त्याला ब्रह्मांडाहूनि थोर दे गोळा. १८
असुर म्हणे, 'मीं युष्मत्पदपद्मपरागपूत[5], हा पाणी
ज्याच्या ज्याच्या माथां ठेविन तो सर्व ही मरो प्राणी.' १९
अमृतप्रद[6] परमेश्वर 'माग' म्हणे त्यासि मागतो गरळ.
परळ श्रीमंतातें मागे हतविधि! शिजे कसा हरळ[7]? २०
कुमति स्वार्थ हि न करी, होय वरद अप्रसन्न तें मागे,
लागे त्याहुनि बहु घे, सुमति न दाता हि द्यावया भागे. २१
मूर्ख स्वाहित कारि, परि कळकळतो साधु जन्हि उदासीन,
दासीं न भ्रंशावें प्रभुमनिं व्हावें स्वसत्पदासीन[8]. २२
पडली गांठि खळासीं वचनीं ही आपुल्या चि आकळला[9].
कळला स्वच्छेदेच्छु हि तारि तीक्ष्ण कुठार कल्पतरु फळला. २३
"दिधला' म्हणे वरद वर अतिदुर्लभ, जाय कुमतिच्या हाता,
या तामसभुजगाला अमृत दिलें काय आपुल्या घाता? २४

---

१. सूर्य. २. मूळ पाठ--**मीं**. ३. साभिलाष. ४. भक्तांचा भाग्यातिशय. ५. तुमच्या चरणकमळाच्या धुळीनें पवित्र. ६. मोक्ष किंवा सुधा देणारा. ७. खडा. ८. आपल्या सच्चरणीं तत्पर. ९. बांधला गेला.

वृक करि विचार चित्तीं, ' श्रम मीं होमांत भोगिला मोटा,
तोटा मान्य करीना, पाहों वर हा खरा च कीं खोटा. ' २५
स्ववरपरीक्षार्थ कर स्थापूं पाहे शिरीं स्वदात्याच्या,
बहुधा गौरीचा ही अभिलाष मनांत ये तदा त्याच्या. २६
झाला, धर्म ध्वंसुनि, सिद्ध कुधी जो वधास बापाच्या,
मातेचा अभिलाष हि कां ये ना मानसांत पापाच्या? २७
स्वशिरीं कर ठेवाया ये जेव्हां वृक वृकस्वभाव खळ,
भवभयहर हर भगवान् भीम हि भी कीं वरीं तसें चि बळ. २८
धांवे पिसाळला वृक सभय तपस्वी महेश एकाकी,
हा कीसामकरीं* प्रभु*, मागें स्वाभयद[1] पद हळू टाकी. २९
जों जों भय धरि तों तों श्रीमन्मृत्युंजयासि तो दापी,
पापी बहु निर्दय निजमांस चरारां स्वयें चि जो कापी. ३०
भक्ताला वर न दिला, तो पुच्छीं पाय काय नागाच्या?
पाठी लागे यास्तव खळ, देव पळे भयें कृतागाच्या[2]. ३१
सात्विकभावें पावे येतां वर द्यावयासि तनु कंपा,
वरदशिरोरत्नाची मग हि कृतघ्नीं करूनि अनुकंपा. ३२
दासत्रासहर हि हर दासापासुनि धरी परि त्रास,
तो साधु हारिहरांच्या प्रकट अशा या करी चरित्रास. ३३
बहु[3] लाडका भजकशिशु पाठी लागोनि ओवळा शिवतो,
स्पर्शभयें काय पळे ब्रह्मांडगृहांत सोवळा शिव तो? ३४
उडवी ती भयवात्या[4] जिकडे त्या शंभुपुंडरीकास
तिकडे वृकभृंग फिरे. सद्भक्त[5] खरा, बरी धरी कास[5]. ३५
इंद्राद्यमरपतींचे[6] कांपति भुजदंड नष्टबलभांचे[6],

---

१. भक्ताभयद. २. केला आहे अपराध ज्यानें त्याच्या. ३. अस्यां त्वति कौतुकं-**पंत.** ४. भयरूप वाहुटळ. ५. हा वृक खरोखर च सद्भक्त; कारण हा बरी कास धरी. ६. नष्ट आहे बळ आणि कांति ज्यांची त्या इंद्राद्यमरपतींचे.
* ह्या पाठाचा अर्थ बरोबर लागत नाहीं. पदच्छेदांत कांहीं हस्तदोष असेल काय?

हरिभीतयूथनाथाहुनि[1] बहु शतकोटि कष्ट कलभांचे[2]. ३६
भूषाभुजंग[3] भक्ताभीतिद भव्यप्रभाव भुज भार
भावी भयें भवानीभर्ता भगवान् भुले भला फार. ३७
सुटल्या सटा[4] समस्ता सुरसरितासलिल सर्प सोमसुधा
सांडति सरणींत[5], म्हणे सूतशुकव्यास 'सर्व सत्य[6] बुधा!' ३८
स्वप्नांत हि नव्हता हा विदित परंतु प्रभूस दाखविला;
भक्तें पाजुनि पुष्कळ, शेषरस त्रिभुवनास चाखविला. ३९
जेथें जेथें जाय प्रभु, तेथें भक्त वृक उभा मागें;
रागें कसें भरावें अनुचर चुकल्याविना महाभागें? ४०
स्ववचनलंघनमात्र त्रासप्रद ईश्वरा, नसे अन्य;
रक्षक हि आपणाला आपण कळवी स्वतत्व हें धन्य. ४१
जो जन कृतघ्न त्याचें स्पर्शन दर्शन अभद्र हें कळवी,
मळवी ईशयशास हि, अहि[8] अहित न तो न, ईश्वरा पळवी. ४२
क्षुद्रास अतुळवैभवमद बाळोदित हि तत्क्षणीं मोही,
तो हीन क्षय पावे स्वकरें स्वगुणें चि जो गुरुद्रोही. ४३
बहुभव्यभावरत्नाकरचरित[9] स्मरहर प्रभु प्रकटी,
मिरवाया वेंचिल मणि किति कविमति सुंदरी मृगेंद्रकटी? ४४
भागेना प्रबळखळव्याळ, बहु पुराणपुरुष तो थकला;
दुःखितचित्तें वोझें मानी बहुधा सुधांशुच्या शकला. ४५
श्वेतद्वीपीं[10] स्वसखा आपण जैसा तसा चि भव हरतो[11],
या भावें त्राणार्थी गेला यश द्यावयासि भव हर तो. ४६
दंतीनें चि स्वबळें काढावा पंकमग्न जो दंती,
साधूनें चि हरावी बोधें जे साधुच्या मनीं खंती. ४७

---

१. सिंहापासून भ्यालेल्या गजपतीपेक्षां. २. बालगजांचे. ३. अलंकारभूत सर्प च. ४. जटा. ५. मार्गांत. ६. अत्रार्थे संशयोनुचित इति–**पंत.** ७. भीतिरस. ८. अन्वय–तो अहित अहि (सर्प) न [असें] न (तर सर्प च). ९. अत्यंत कल्याणकर भाव (अभिप्राय) हीं च रत्नें त्यांची खाण असें चरित. १०. वैकुंठीं. ११. संसार नाहींसा करितो.

संकट पतिव्रतेचें पतिव्रतेनें चि कीं निवारावें,
नौकेनें नौकेला बुडतां यादोनिधींत[1] तारावें. ४८
रणयज्ञीं भूपाला व्हावें आंगें सहाय भूपानें,
सागरतृषा हरावी कैसी स्वादूदकें हि कूपानें ? ४९
वामें दक्षा द्यावी, वामा हि भुजा तसी उटी[2] दक्षें,
पूजावा हरिनें हर, हरि हि हरें सद्वनक्रियादक्षें. ५०
कळतां वरद्व्यसन प्रभु पटु बटु होय योगमायेनें,
ये धांवत वैद्य जसा नासाया बंधुरोग मायेनें. ५१
झाला बालाकृति हरि, आला घालावया खळीं घाला,
जेंवि बळिच्छळसमयीं धरि मौंजीकृत्तिदर्भदंडाला.[3] ५२
मुनिमंडलीमहित मधुसूदन मत्ता वृका गमे मुंजा
' गुंजाराशि ' म्हणे शिशु शिखितेजांच्या[4] हि दाहका पुंजा. ५३
बटुवेश विभु वृकाला शिष्य जसा श्रोत्रिया तसें वंदी,
जपले गुरुकार्या यापरि न कधीं स्कंद गणपती नंदी. ५४
कुशपाणि बटु प्रभु करकमळें जोडूनि त्या खळास म्हणे,
' दितिकुळकमळद्युमणे ! हे शकुनिसमुद्रचंद्र[5] ! वीरमणे ! ५५
श्रमला कीं तामरसीं[6] प्रालेयें[7] तसा दिसे मुखीं घाम,
सामर्थ्यें मानाना झाला श्रम कोणतें असें काम ? ५६
आम्हांस मात्र वाटे आलां सोडूनि देश बहु दूर,
परि तुमचें क्षिति मंदिर, रत्नाकर अजिरें[8], कीं तुम्हीं शूर. ५७
क्षणभरि बसा. असा श्रम न महाप्रभुला तुला विभो ! साजे.
हा काय काय कष्टोचित पूजिति ज्यास देव नर राजे ? ५८
देह सदा रक्षावा; दक्षा ! वाढी न कामकपिला[9] जे
ते रस हा, न सहाय श्रेष्ठ असा; यास रामकपि[10] लाजे. ५९

१. समुद्रांत. २. जशी डाव्या हातानें उजव्या हातास उटी द्यावी तशी उजव्यानें डाव्यास द्यावी. ३. मेखला, [ मृगाचें ] कातडें. ४. अग्नितेजांच्या. ५. शकुनिनामक पिता. ६. कमळीं. ७. दंव. ८. आंगण. ९. कामधेनु. १०. हनुमानपि—**पंत.**

व्हावें सिद्ध समीहित चित्तीं येतां चि कीं अहो आर्य !
सांगा आंगानें जें करणार तुम्हीं च कोणतें कार्य ? ६०
हा जन कार्यश्रवणा योग्य असें जरि तुम्हांस भासेल,
तरि सांगावें; सुहृदीं कथिला जो मंत्र तो न नासेल. ६१
प्रायः सहाय सज्जन संपादुनि साधिती स्वकार्यास,
अखिल हि असे चि अवगत अगणितगुणसागरास आर्यास.' ६२
त्रैलोक्यगुरुद्रोहें होता आधीं च मूढ तो अमला,
कमलामोहनवचनासवपानभ्रांतचित्त विभ्रमला. ६३
यन्मायादासीनें वेडे केले मुनींद्र ही थोर,
तेथें विश्वगुरुपुढें मदमद्यभ्रांत काय हें पोर ? ६४
श्रीप्रमुखस्त्री, ब्रह्मप्रमुखपुरुष, त्यांसि मूर्ति ते हाला;
रूपें चरितें वचनें मोही कां या न मोहगेहाला ? ६५
सांगे निजवृत्त वृक; प्रभुवर हांसे, म्हणे, 'असें काय ?
नारदवाग्विश्वासें भूतपतीचे उपासिले पाय ? ६६
काय तुम्हांस म्हणावें ? आम्हीं याचा धरूं न विश्वास,
अजि ! दक्षशप्त कीं हा, हें आहे विदित वृत्त विश्वास. ६७
झाला पिशाचवृत्ति प्रेतपिशाचपति दक्षगुरुशापें,
विधि सोडुनि मागावा वर सेवा करुनि काय ऐशापें ? ६८
पितृवनवसति भसितधर हर कीकसभूष नागवा हा तें
जाणति बुध, कलहप्रिय नारद वर्णील नागवाहातें. ६९
वरद जगद्गुरु, यास्तव वर सत्य, असा असेल जरि भाव,
सांव परंतु दिवाळें निघतां कोठें खरेपणा ठाव ? ७०
कैंचा वर ? वेडा हर. माथां कर आपल्या न कां ठेवा ?

---

१. इच्छित. २. लक्ष्मीला मोह उत्पन्न करणाऱ्या कृष्णाच्या भाषणरूप मद्य-प्राशनानें भ्रांतचित्त झालेला. ३. मद्य. ४. अशा शंकरापाशीं. ५. स्मशानीं वास करणारा. ६. भस्म धारण करणारा. ७. अस्थिभूषण. ८. नागभूषणातें. पंत. ९. सावकार.

हे वाचा लटकी हा प्रत्यय येतां वधा महादेवा. ७१
आज तुम्हांस ठकविलें दुसऱ्यास उद्यां ठकील हें खोटें;
साधुप्रतारकाला जिंका, गातील लोक यश मोटें. ७२
स्वशिरीं कर ठेउनि हें सत्य मृषा प्रत्यया बरें आणा,
अजि दानवेंद्र! साधो! वाहेन तुम्हीं म्हणाल तरि आणा.' ७३
बोल मधुर बहु अमृत हि, विरस मग किती सिता मधु क्षुद्रा[1]?
लटिकें घटिकेंत गमे, ठकवी ठक विश्वमोहन क्षुद्रा. ७४
कटु परि पटु हरि बटु वरि अमृताधिक मधुर बोलणें बोले,
पळभरि खळकरिबळहरि[2] वदला, परि आज कविसभा डोले. ७५
आत्मा शिव तन्नाशीं इच्छा धरि होय आत्मशिवनाश,
सदहितपाशकरकपटिकंठीं[3] घाली जपोनि यम पाश. ७६
प्रभुवचनभ्रांत वृक स्थापी निजमस्तकावरी हात,
पविहत गिरिशिखर तसें फुटलें; खळ आपुला करी घात. ७७
तेव्हां वर्षति सुमनें नतसुरमुनि, देवदेवयश गाती,
प्राशिति बहु चरितामृतसिंधु, प्रभुमूर्ति भक्तवशगा ती. ७८
मग तो भगवंत म्हणे भगवंताला, 'अहो महादेवा!
हे वायां स्तविति मला. ऐका हो! क्षणभरि स्तुती ठेवा. ७९
विश्वगुरो! वरदपते! शंभो! हा पाप आपुल्या पापें
मेला दुष्ट. सुत क्षय पावे चि न शापिला जऱ्ही बापें. ८०
पूज्यातिक्रम करितो जो तो हो मर्त्य कीं सुर क्षेमी
नोहे कधीं च आंगें. असमर्थ तयाचिया सुरक्षे मीं. ८१
पूज्य चतुर्दश लोकीं जे त्या सर्वांस पूज्य तूं पहिला,
महिला आश्रय ज्याचा, आश्रय युष्मत्पदें चि त्या अहिला. ८२
विश्वगुरूचा ठायीं अपराध करूनि कोण वांचेल?
भग्नकलश खल शस्त[4] हि जीवन[5] न कदापि त्यांत सांचेल. ८३

---

१. द्राक्षा. २. खल हा च हत्ती त्याच्या शक्तीचा नाश करणारा सिंह. ३. साधुद्वेष्ट्या फासेपारध्याच्या कंठांत. ४. प्रशस्त. ५. पाणी [पक्षीं] वांचणें.

केलें तप बहु दुष्कर. वर उग्र वरोनि पावला अंत.
हें सकृपा! तुज शोकद तारि गातिल तव यशस्करा संत.' ८४
ऐसें हरिहरचरित प्रेमें विस्तरभयें यथाशक्ति
गाउनि हरिहरचरणीं अर्पुनि मीं मागतों सती भक्ती. ८५

---

## अध्याय एकोणनव्वदावा.

पूर्वीं सर्व मुनीश्वर जनसंग्रहशुद्धिकाम एकत्र
होउनि करीत होते बहुकाळ सरस्वतीतटीं सत्र. १
सत्रीं साधुसमाजीं संशय सुरसत्तमत्रयीं होय,
विधि हरि हर गुरुवर, परि भक्तांची कोण जाणतो सोय? २
म्हणति 'ब्रह्मज्ञसभाभाग्य' जया साधुलोक विप्रवर,
प्रेषिति त्या भृगुमुनिला, विधिसदना जाय तो कविप्रवर. ३
ब्रह्मसभेला गेला, ठेला, केला न मान बापाचा,
सत्वपरीक्षेस्तव न स्तवन करी लेश ही न पापाचा. ४
उत्सव ज्यांत न मावा निजनंदनभृगुमुनीश्वरागमनीं,
नमन न केलें यास्तव धरि त्या समयांत देव राग मनीं. ५
आला कोप पित्याला स्वसुत म्हणोनि स्वयें तया शमवी
उदकें अग्नीस जसें, परि पूर्वीं पळ पितामहा भ्रमवी. ६
मग तेथुनि कैलासीं गेला भृगु, या स्वबंधुला शिव तो
भेटों उठे, तदा मुनि दावी भावासि, अशुचि कीं शिवतो. ७
होय वधोद्यत कोपें शूळकर प्रभु, तदा पदें कवळी,
देवी शिवा[2] शिवाची मूर्तिमती जी दया सदा जवळी. ८
तेथुनि वैकुंठातें गेला भृगु तेधवां रमोत्संगीं
निजला होता निश्चळ जैसा ब्रह्मात्मबोधसत्संगीं. ९
ब्रह्मण्यत्व मिरवितो, प्रत्युत्थानोद्गमक्रिया भंगी,
'या, बैसा' ही न म्हणे, पाहेना दुर्मद प्रियासंगी. १०

---

१. ओवळा. २. पार्वती.

दूषी दोषारूपें त्यातें ज्याची जगत्रयीं सत्ता,
मत्तापरि निज[1]बोधा मानुनि हाणी उरावरी लत्ता. ११
लत्ताप्रहार होतां जगदुत्पत्तिस्थितिक्षयक्रीड
शीघ्र उठोनि उतरला पर्यंकावरुनि देव सव्रीड. १२
नमन करुनि त्या मुनिला अत्युत्सव देवदेव दे वसती
ब्रह्मांडें यज्जठरीं, जेंवि समुद्रीं तरंग उल्लसती. १३
'प्रभुजी ! चुकलों. तुमच्या न्व्हतों मीं सावधान आगमनीं,
यावरि कधीं चुकेना, न धरावें हें मदीय आगें[2] मनीं. १४
या आसना सनाथ क्षणभरि देवा ! करा. करौं[3] स्वौं[3] मीं
बापा ! या पायांला लावूं हा, दुखवला अहा ! स्वामी ! १५
बापा ! पापापह हे पाय तुझे मृदुल मत्करापरिस;
परि सज्जना दुरित[4]नगदलनें लाजविति पविधरा[5] हरिस. १६
मदुरीं[6] विराजलें क्षण तुमचें पद, तीर्थभूतिचें[7] पद[8] कीं,
उरला न गर्व कौस्तुभरत्नीं, शोभा असीच या पदकीं. १७
झालें पवित्र हें उर, उरला न मळ; प्रभो ! असा वास
श्रीला दुर्लभ; भक्तीं याचिपरी सदय तूं असावास. १८
भुललों होतों, परि बा ! भाग्यें झालें भलें मला स्मरण,
मद्रूप लोक तरावे, देवूत निजावनेजनें[9] चरण. १९
न्व्हता चि मुनिश्रेष्ठा ! अपराधनदीधव क्षमावासा.
काय प्रसाद वर्णूं ? केलें हें उचित वक्ष मावासा.' २०
ऐसें प्रार्थुनि पूजी, तेव्हां भृगु काय तेथ बोलेल ?
सत्रीं सत्वनिधीचें यश गाउनि डोलवील, डोलेल. २१
सत्रीं येतां नाचे; वाचेला बोलवेल काय ? कवी
तो भृगु मुहूर्तमात्र स्तब्ध बसे, मग समस्त आयकवी. २२

---

१. श्रीविष्णूस. २. अपराध—पंत. ३. आत्मकरासि—पंत. ४. पापरूपी पर्वतांच्या नाशानें. ५. वज्र धारण करणाऱ्या इंद्रास. ६. माझ्या उरावर. ७. तीर्थरूप ऐश्वर्याचें. ८. स्नान. ९. आपल्या धुण्याचें पाणी, पादतीर्थ.

ते मुनि म्हणति, ' प्रभुजी ! प्रणतांच्या कल्पपादपा! देवा!
दे वासना सुनिर्मळ, सत्वसमुद्रा! करूं तुझी सेवा.' २३
जी ती कथा सुखाची सरिता, हरि ताप, तापस श्रोते
कवि मीन आंत बाहिर दिसति विचारें परस्परीं होते. २४
नवल हरिकथासरिता वाहविति स्थिति न मोडितां दूर,
आधीं बुडविति मग तन्नेत्रांत भरे हळूहळू पूर. २५
द्वारवतींत ब्राह्मणपत्नीचें जन्मतां मरे तोक,
तें शव राजद्वारीं ठेउनि करि फार विप्र तो शोक. २६
'[1]ब्रह्मद्वेषकशठमतिलुब्धविषयकामभूपपापानें
रडतों निष्पाप हि मीं विप्र मृतापत्यशोकतापानें. २७
अजितेंद्रिय दुःशील क्षितिपति हिंसाविहार जो पाप,
त्याच्या [2]प्रजा दरिद्रक्लीबांधवधू चि पावती ताप.' २८
करितां विलाप विप्र, प्रभुला निंदी समस्त लोकांत.
तो कां तत्पस्वांतें आत्माधिक्षेप न करि शोकांत? २९
दुसरा हि कुमार मरे, तेव्हां हि विलाप करि, असा चि रडे,
टाकी बाळक, जाणों तो अहिदंष्ट्रांत आंगठा चिरडे. ३०
तिसरा चवथा ऐसे मेले हो! उपजतां चि शिशु आठ,
[3]मुक्तिपुरींत हि शोकें सद्विप्राची हि पुरविली पाठ. ३१
राजद्वारीं सोडी नवमसुतासहित तत्पिता श्वास,
कृष्णासमीप असतां कळलें द्विजवृत्त तें [4]सिताश्वास. ३२
पार्थ म्हणे, ' बा साधो! रोदन करितोसि कां अरण्यांत?
वैद्यांत रोग आर्तें उघडावा, शोक ही शरण्यांत. ३३
या त्वत्पुरीं धनुर्धर केवळ [5]राजन्यबंधु ही नाहीं,

१. ब्रह्मद्वेष करणारे, दुष्टबुद्धि, लोभी, विषयी अशा राजांच्या पापानें. २. दरिद्री, नपुंसक व अंध अशांच्या बायका च अशा (प्रजा). ३. द्वारकेंत. ' मुक्तिपुरी ' शब्दाची योजना साभिप्राय आहे. ४. अर्जुनास. ५. नांवाचा राजा, क्षत्रियाधम.

हे यदुसत्रीं ब्राह्मण रक्षावे काय शस्त्रहीनाहीं ? ३४
धनपुत्रदाराविरहें ज्यांदेखत हि प्रजा बुडे शोकीं,
राजन्यवेष घेउनि नट भरिती पोट थोटे ते लोकीं. ३५
निर्भय निर्दय काळव्याळ तुझ्या बाळकां नवां चावे,
साधु धनुर्धर रक्षक असतां ते बाळ कां न वांचावे? ३६
यावरि मीं सत्य तुम्हां दीनांच्या संततीस रक्षीन,
नाहीं तरि शिखिकुंडीं तनु होमाया न काळ लक्षीन.' ३७
विप्र म्हणे, "अनिरुद्ध प्रद्युम्न मुकुंद राम हे त्राणीं
न क्षम, दक्ष महारथ ईश हि, तरतीं यदीक्षणें प्राणी. ३८
जें ईश्वरीं न केलें, कैसें करिशील कर्म दुष्कर तें?
कामीं साफल्य पणें तसें जसें वंध्यदारशुष्करतें. ३९
मुग्धपणें पंगु म्हणे जरि, 'करितों हेमभूधरारूढ,'
तद्विश्वासें जो जन परिकर बांधील तो खरा मूढ." ४०
पार्थ म्हणे 'भूदेवा! विदित अर्क सत्यसंध विश्वा मीं,
राम नव्हें, कृष्ण नव्हें, प्रद्युम्न हि मीं नव्हें, बरें स्वामी! ४१
मज नाहीं ओळखिलें भीमानुज धर्मसूनु पांडव मीं,
देता झालों भेषज रोगार्तानळमुखांत खांडव मीं. ४२
गांडीवनाम माझें कोदंड, उदंड दंडिले दुष्ट,
ज्यां चंद्रखंडमंडन केला चंडीश देव ही तुष्ट. ४३
लुटिला कुटिला काळें चोरें घोरें वनांतरीं सार्थ,
नव्हता पाळक, बाळकधन जोडा, रक्षिता पुढें पार्थ. ४४
स्वस्थ असावें स्वामी! हा मीं त्वद्दास संगरीं काळ
स्वबळें जिंकुनि बोलुनि काढिन काळाननांतुनीं बाळ.' ४५
ब्राह्मण म्हणे, 'भला बा! जगदीश करू तुझ्या पणा सत्य.

---

१. ठक. २. वांझ स्त्रीचे ठिकाणीं निष्फळ झालेल्या वीर्यानें. ३. वेडेपणानें. ४. कंबर. ५. अनुजास ही म्हणावें—पंत. ६. चंद्रशेखर पार्वतीपति. ७. व्यापाऱ्यांचा तांडा.

त्वां तरि यश जोडावें संरक्षुनि दुर्बळद्विजापत्य.' ४६
विप्र स्वगृहा गेला, अर्जुन हि द्वारकापुरीं राहे,
विप्रस्त्रीप्रसवाच्या समयाची वाट त्याहुनीं[1] पाहे. ४७
भार्याप्रसूतिकाळीं कळवी पार्थासि विप्र ती वार्ता,
तत्काळीं तो अर्जुन पुनरपि दे अभय त्या द्विजा आर्ता. ४८
वंदुनि महेश्वरातें दिव्यास्त्रांतें स्मरोनि तो पार्थ
गांडीवदंड उचली निजभुजदंडाहिराजकोपार्थ.[2] ४९
नानास्त्रमंत्रितेषुप्रकरें[3] मुनिगृहशुकासि पंजर चि
पवनप्रवेश न घडे ज्यांत असें पार्थपाणिकंज[4] रची. ५०
शरपंजरांत झाला विप्रस्त्रीला कुमार जो दशम,
तो तीस दे सुख क्षण, जेंवि अजितबुद्धिस प्रमोद शम. ५१
झाला कुमार सुंदर, होतां पहिले जसे तसा रडला,
पडला स्वप्नीं निधिसा दृष्टिस, मग तो नभांत आरडला. ५२
'शव तरि राहत होतें पहिल्यांचें, हा सदेह ही नेला!'
रडतां म्हणे द्विजस्त्री, 'मज दुर्लभ शव हि भाग्यहीनेला!' ५३
ब्राह्मण म्हणे, 'प्रिये! या वीरें केला बरा चि सांभाळ!
पौत्र[5] तुझा हा धार्मिक! फळलें बहु थोडक्या दिसां भाळ! ५४
शवसंनिधान न बरें, शोकाला हेतु, भूमिला भार,
सार्थक पार्थ करी हा पौत्र विवेकी विधीं[6] नराकार.' ५५
कृष्णापासीं होता पार्थ, तयातें म्हणे, 'भला भ्राता
भीमाधर्मांचा तूं, भीतांचा संकटीं खरा त्राता. ५६
तूं अर्जुन, तृण दत्तच्छात्र[7] म्हणें वृद्ध मीं, नसे तर्क,

---

१. विप्राहूनि–पंत. २. आपला बाहुदंड हा च अहिराज त्याच्या कोपार्थ. ३. अनेक प्रकारचीं अस्त्रें व मंत्रप्रोक्षित बाण यांच्या समूहानें. ४. अर्जुनाचें हस्तकमल. ५. पितृसार्थक पुत्रें केलें–पंत. ६. शास्त्रविधि. ७. दत्तात्रेयाचा शिष्य सहस्रार्जुन.

भ्रांत तमीं बाळ तया भानु गमे वृक्ष म्हणति ज्या 'अर्क.' ५७
सर्वश्रुतिशास्त्रांतें पढलों परि मीं पहा महामुग्ध;
तक्रासि दोष कैंचा? शुभ्रपणें ऱ्यां चि मानिलें दुग्ध. ५८
क्लीबाचें कत्थन कां मानावें सत्य? मूढ मीं च पण,
स्वावें न पाहे कोण्हीं दूषी दुसऱ्यासि हें च नीचपण. ५९
रक्षील कोण दुसरा? झाले न मदात्मजावना शकते
प्रद्युम्नरामकृष्ण हि, जे इंद्राचा हि गर्व नाशक ते. ६०
आम्हां साधूंपासीं बोलावें कां मृषा असें पाप?
धिक्कार तुला! तुझिया गांडीवाला हि! दान दे चाप. ६१
करणार हा महाबळ देवाचें आपुल्या भुजीं मथन,
धन रक्षणार माझें, लाजें मीं हें करावया कथन! ६२
सत्य हरप्रतिभट तूं, केलें मन्नियतिनें तुज क्लीब,
पण चिंता न करावी; बडबडती काय काय न क्षीब? ६३
सुतशोकार्त ब्राह्मण वदला त्याचा धरूं नको कोप,
वृकभय वारिल, परि हरिपासुनि रक्षी असा नसे गोप.' ६४
गेला ब्राह्मण तो, मग पार्थ हि विद्याबळें चि यमलोका,
तेथें शोध करी, परि धर्म म्हणे, 'आणिलें न त्या तोका.' ६५
अष्टौलोकपतींच्या लोकांला जाय तो महायोध,
पाताळादि स्थानीं गांडीवी वायुसा करी शोध. ६६
केला शोध उदंड चि, विप्रसुताचा न लागला माग;
आला मग परतोनि द्वारवतीला चि तो महाभाग. ६७
योगी हो, योगिगुरु, प्रभुची जाणेल कोण हो! माया?
गतगर्व पार्थ झाला सिद्ध ज्वलनांत देह होमाया. ६८
रक्षावया प्रतिज्ञा बांधी परिकर, तया स्वभजकास
रक्षाया त्यापूर्वीं घाली सत्यप्रतिज्ञ अज कास. ६९

१. अन्वयः—तमीं भ्रान्त [जो] बाळ, तया ज्या अर्क म्हणति [तो] वृक्ष भानु गमे. २. आपला दोष. ३. मत्त. ४. आशुग सर्वगत—पंत.

गीतेंत ' न मे भक्तः प्रणश्यति ' प्रभु म्हणेल ज्यापासीं,
होईल उदासीनस्वांत कसा देव त्या सख्या दासीं ? ७०
भक्त जळेल ज्वलनीं, कौतुक पाहेल देव तो काय ?
माय प्रभु वत्स भजक हें हि उणें, वेगळा न तो काय. ७१
कृष्ण म्हणे, ' रे वेडया ! चाल, करूं शोध, हो धनुष्पाणी,
तूं मद्धनासि[1] कैसा मजला न पुसोनि सोडिसी पाणी ? ७२
एकाची काय कथा ? सर्व द्विजबाळ दावितों चाल,
आम्हीं नसों, प्रतिज्ञा न घडे तरि पावकीं उडी घाल. ७३
आतां निंदा करिती, परि यश गातील बा ! तुझें लोक;
हो कश्मळ सोडुनि तूं निर्मळ, देवूं नको मला शोक. ७४
बैस रथावरि, तूं मीं दोघे जावूं, नको तिजा सूत.
मीं मातळी तुझा बा ! तूं वीर रथी समर्थ पुरुहूत[2]. ' ७५
चंद्रार्क तसे ते नरनारायण शोभले रथीं जवनीं,
कीं[3] रामलक्ष्मण प्रभु बसले एकीं च कपितनूपवनीं*. ७६
जाति प्रभु प्रतीचीप्रति[4] विप्राशा करावया पूर्ण,
ते सप्तसिंधुसप्तद्वीप सप्तक्ष्माद्रि लंघिती तूर्ण. ७७
लोकालोकगिरीतें[5] लंघुनि रथ तो पलाकडे गेला.
तेथें तमें तमोहरहरिहारिवरवेग[6] रुद्ध पळ केला. ७८
चक्राला आज्ञापी प्रभु, तें कोटयर्कसम तमा निवटी,
चाले पुढें रथाच्या, जाणों धरिली सुदर्शनें दिवटी. ७९

---

१. त्वद्देह तें च मद्धन त्यास. २. इंद्र. ३. मूळ पाठ–**कीं ज्ञानभक्तियोग श्वसनसुतीं रघुवरांचिया भवनीं**. *मारुतीवर. ४. पश्चिमेस. ५. सप्तमहाद्वीपें आणि सप्तसमुद्र यांस पोटांत घेऊन मेरुपर्वताच्या आसमंतात् बारा कोटि, पन्नास लक्ष योजनांवर असणारा वर्तुलाकार महापर्वत; याच्या आंतल्या भागास ' लोक ' (प्रकाश) व बाहेरच्या भागास ' अलोक ' (अंधकार–अप्रकाश) असल्यामुळें याला ' लोकालोकपर्वत ' असें नांव पडलें–निर्णय०. ६. अंधकारनाशक जो हरि त्याच्या उत्तम घोड्यांचा वेग.

तिमिरघटेसि[1] विदारी तेसें प्रभुचक्र तें महाप्राण[2],
राक्षससेनेसि जसा श्रीरामधनुर्विमुक्तसद्बाण. ८०
हरिरथतुरग सुदर्शनदर्शितमार्गें चि त्या तमीं तरती.
सद्दर्शितभक्तिपथें जेंवि सुमति कृष्णकीर्तिगीतरती. ८१
तें तम तरोनि जातां भागवतज्योति[3] अर्जुना भिववी,
शिव 'वीर' म्हणे ज्याला तद्दृष्टि हरूनि अंतरीं निववी. ८२
तापघ्न शांत पारि त्या तेजा पाहों शके न तो वीर,
विद्युज्ज्योति प्राकृत तें हि पहाया उरों न दे धीर. ८३
उदकीं रत्नभवन जें दिव्य महाकाळपुर तयामाजि,
स्वशिरोमणिदीपाहीं[4] ससखहरिप्रभुपदासि नीराजी. ८४
भगवद्दत्ताभयवर अर्जुन उघडी हळू च नयनातें,
पाहे अनंतसुखकरपद्पद्मा त्या अनंतशयनातें[5]. ८५
हिमधवलभोगी[6] भगवान् दशशतफण शेष देखिला भीम,
तत्तनुसुखासनीं प्रभु, ज्याचें सौंदर्य तेज निःसीम. ८६
सांद्रघनश्याम[7] कनकवर्णांबर सुप्रसन्नमुखपद्म
अनुकंपालक्ष्मीचें[8] रुचिरायतलोचनाब्जयुग[9] सद्म[10]. ८७
सन्मणिकिरीटकुंडलरुचिपुंजसुरंजितालकस्तोम[11]
वोवाळुनि सांडावे श्रीवदनावरुनि कोटि रविसोम. ८८
सांगद मणिकटकांचित मुद्रारम्य[12] प्रलंब[13] भुज आठ
वरदानसाधुपालनखलबलदलनादि कर्म ज्यां पाठ. ८९
श्रीवत्सश्रीकौस्तुभवनमाळाधर मनोहराकार
सार श्रुतिशास्त्रांचें मूर्त ब्रह्म प्रमोद दे फार. ९०

---

१. अंधकारसमूहास. २. महाशक्ति. ३. ईश्वरी तेज. ४. ओवाळी. ५. शेषशयनातें. ६. देह. ७. जलपूर्ण मेघाप्रमाणें काळाकुळकुळीत. ८. दया हो च लक्ष्मी तिचें. ९. सुंदर व विस्तृत जीं लोचनें तीं च कमळें त्यांचें युग्म १०. घर. ११. रत्नखचित मुकुट आणि कुंडलें यांच्या कांतिपुंजानें शोभित आहेत केश ज्याचे असा. १२. अंगठ्यामुळें रम्य दिसणारे. १३. लांबलचक.

पार्षद नंदसुनंदप्रमुख सुदर्शनमुखायुधें सांगें[1]
प्रभुतें उपासिती तें पाहे त्याच्या चि तो कृपापांगें[2]. ९१
पुष्टि अजा[3] कीर्ति श्री अणिमादि विभूति दासिका सेवा
करिती ज्याची वंदी कृष्णासह कृष्ण त्या महादेवा. ९२
त्याला जिष्णु प्रभुच्या तेजें, सत्पुत्र जेंवि ताताच्या,
स्वामिप्रसाद बहु, परि भय शोभे नंदनीं हि वाताच्या. ९३
आज्ञा करि परमेश्वर दोघां कृष्णांसि, 'वत्स हो! आलां,
आम्हीं हारिले द्विजसुत यास्तव लोकांत घाबरे झालां. ९४
त्यां चि तुम्हांसि पहाया केली हे युक्ति मुक्तिच्या पतिनें,
अवतरलां अंश तुम्हीं माझे धर्मावनार्थ मन्मतिनें. ९५
हरुनि क्षितिभार तुम्हीं नरनारायण ऋषी वसा धर्मीं,
शर्मीं लोक पडों द्या, योजा जा आचरोनि सत्कर्मीं. ९६
सत्वर या मजपासीं, न्या हे द्विजबाळ, जा, स्मरा मजला,
आज्ञा केली आहे, मुक्त करा जो सदंघ्रिला भजला.' ९७
ऐसा प्रसाद होतां, वंदुनि परमेश्वरासि ते क्षिप्र
आले, दशबाळार्पण करुनि सुखी करिति तो भला विप्र. ९८
अर्जुन म्हणे, 'जनीं जें पौरुष तें या चि कृष्णनाथाचें,
पल्वल नदी सरोवर मिरविति तें भाग्य मेघपाथाचें[4]. ९९
प्रभुचीं अमितें चरितें जरि तें यश वर्णितां नसे अंत,
गातां दुर्गति चुकवी, सुकविप्रिय हें चि वर्णिती संत. १००

श्रीव्यासें स्वसुता शुका पढविलें, तो बोलिला बोल ते,
पीयूषाहुनि गोड, सज्जनसभा आकर्णितां डोलते;
संतांचें यश थोर, मोर पढला नाहीं, नव्हे ही पटु,
तद्वक्त्रें यश गाववूनि रसिकीं पीयूष केलें कटु. १०१

---

१. अंगासह, सगळीं. २. कृपाकटाक्षान. (अपांग=नेत्रप्रांत). ३. माया. ४. मेघोदकाचें.

# अध्याय नव्वदावा.

श्रीकृष्ण द्वारकेंत स्वजन सुखसुधासागरामाजि घाली,
न्हाली लोकत्रयीं ही सुगुणखनि सखी कीर्ति गंगेसि झाली;
घाली सन्मंडळी ही मधुरतरयशें नित्य आकंठ प्याली,
व्याली गीतें, तसी भू भुलविलि चरितें, रत्नराशी च व्याली. १

स्वाराम निष्काम नारायण क्षोणिच्या राजसेनाद्यभारा हरी,
सारा कथा अत्युदारा विशुद्धा अपारा सुपीयूषधारा परी,
तारापसा विश्व तारावया वी शिवाराध्य जो श्रीस थारा हरी
द्वारावतीमाजि दारासमूहीं विहारा अनेकप्रकारा करी. २

स्वामी प्रियांच्या चि धामीं वसे, नित्य कामी तसा चित्त सामीं हरी,
ज्या याचिती प्रेम जाया सुरागा अजा यादवेंद्रा, भजाया वरी,
देवीमना मोद दे, विश्ववंद्यांघ्रि सेवीं, निजांकीं च घे वीर तो,
यामार्धं ही सोडिना मानवे कीं सकामा समस्ता हि रामा रतो. ३

ज्या त्या दयिताशयनीं नानारूपें धरूनि कारि केली,
षोडशसहस्रपत्नीवृंदीं सत्स्नेहवृष्टि वारि केली. ४

प्रासादीं उद्यानीं नगरोपवनीं वनीं नगीं भुवनीं
क्रीडा करि प्रियांसीं, वर्णिति वैराग्य आत्मभूभुवनीं. ५

कांतस्नेहैंरसभर प्रज्वलित करी बहु स्मरज्वलना;
भुलल्या लीलालोकनललिताधरपल्लवासवें ललना. ६

कोण्ही कुररीस म्हणे, 'न निजसि रात्री, विलाप कां करिसी?
वेडये! निद्राभंगीं पाप; निजों दे महेश्वरा हरिसी. ७

मथिलें कटाक्षबाणें हृदय तुझें कंजलोचनें दिवसा
कुररि! तरी च व्याकुळ; हा ताप नव्हे सुधांशुला हिंवसा. ८

---

१. सर्पांण. २. कल्पतरूस—पंत. ३. त्यांहीं आपणास भजावें म्हणोनि वरिता झाला—पंत. ४. प्रहरार्ध हि. ५. पाण्यांत. ६. मद्यांतांत. ७. प्रेम [पक्षी] तेक. ८. प्रेमावलोकन व सुंदर ओंठ हे च कोणी पल्लव तद्रूप मद्यानें. ९. टिटवीला. १०. निवायाजोगा.

गे चक्रवाकि! आयिक बायि! करुणरोदनें पुरे चिर हें,
रात्री रमण दिसेना व्याकुळचित्ता म्हणोनि तूं विरहें. ९
आम्हीं तैसी दासी तूं प्रभुची काय हो! विशंक बरें
अच्युतपदोपभुक्ता माळा वांछिसि वहावया कबरें[1]. १०
रे सिंधो! कां जागा? निद्रा नाहीं सदा तुला कां गा!?
करिसि क्रोश[2] हि, आली जाणों अस्मद्दशा तुझ्या आंगा. ११
कुचकुंकुमपत्रालिस्रग्भूषाअंगराग संभोगीं
हारि आमुचें तुझें ही श्री कौस्तुभचिह्न हरुनियां भोगी. १२
आम्हीं जशा रडों क्षण विरहें, तैसा चि तूं हि बा! रडसी,
बहुदाराची मैत्री जळरेखा; कां उगा चि आरडसी? १३
तूं क्षयरोगक्षीण क्षणदेशा[3]! आमुच्या मना गमसी,
कृष्णें रहस्य कथिलें, तद्विस्मरणाधिनें बहु श्रमसी. १४
दयितोक्तविस्मृतीनें आम्हीं ही पावतों चि आधींतें,
आतां मौन धरुनि किति आठविसी? विसरलासि आधीं तें. १५
रे! मलयानिल! आम्हीं अप्रिय केलें नसे तुझें लेश,
प्रभुदृगिषुभिन्नहृदयीं[4] दे मार[5] क्षार[6] फार सीं क्लेश. १६
मेघा! तूं औदार्यें, वर्णें, प्रभुमित्र, करिसि तद्ध्यान,
रडसी, अश्रु विसर्जिसि, आम्हांपरि तूज ही नसे ज्ञान. १७
कां केलें सख्य जडा[7]!? आतां कां रडसि या[8] जनार्वाणी?
याच्या संगीं रमतां डोळयांचें तों तुटेचिना पाणी. १८
बोले प्रियंवद प्रभु तैसे चि पिका! तुझे हि हे बोल,
अमृतप्रवाह हे, मृत वांचेल, करील कोण हो! मोल? १९
द्यावें काय तुला बा!? प्राण हि अर्पीन, माग जें इष्ट,
वद एकदा पुन्हा, जें आतां वदलासि, लागलें मिष्ट. २०

---

१. वेणीनें. २. आक्रोश. ३. हे चंद्रा! ४. प्रभूच्या कटाक्षबाणानीं भिन्न झालेल्या हृदयावर. ५. मदन. ६. क्षाराप्रमाणें. ७. जला [ पक्षीं ] मूर्खा! ८. आम्हांप्रमाणें.

बा भूधरा! न बोलसि, डोलसि, केवळ अभीष्ट बुद्धिस तें
चिंतिसि, ऐसें आम्हां तुझिया ध्यानावरूनियां दिसतें. २१
बहुधा आम्हीं स्वकुचीं वाहतसों तेंवि तूं स्वशृंगांहीं
वाहों वांछिसि विभुपद्सारस जें जुष्ट साधुभृंगांहीं. २२
तरि आमुची अवस्था तैसी होइल तुझी हि, कां भुलसी?
आम्हीं च कठिनहृदया, तूं क्षणविरहोत्कटज्वरें उलसी. २३
हे सागरपत्नी हो! ग्रीष्मीं तुमचा पती घनद्वारा
आनंदवीत नाहीं कोंहे वर्षोनियां सुधाधारा? २४
झाला बहु शुष्करसा पुष्करेंशोभाविलासबळहीना
जैशा आम्हीं कांतप्रणयालोकन न पावतां दीना.' २५
दैवेंकरूनि आला हंस प्रभुदारमंडळीपासीं,
मानूनि दूत पतिचा, त्या महिषी बोलती असें त्यासीं:- २६
"हंसा! स्वागत तूझें, ज्ञातींचें प्राप्त हो तुला राज्य,
मणिपीठीं बैस सुखें, मुक्ता भक्षूनि पी पय प्राज्य. २७
वत्सा! शार्ङ्गधराची सांग कथा, सत्य ती सुधाधारा,
जे शुद्धोभयपक्ष द्विजें ते गाताति त्या बुधाधारा. २८
हंसा! कंसारीचा शुद्धात्मा दूत तूं बरें कळलें,
झालें निजदारांचें स्मरण प्रभुला, स्वभाग्य हें फळलें. २९
अजित कुशळ आहे कीं? तत्कल्याणें चि विश्वकल्याण,
ज्याच्या भुजप्रतापें रिपुसिंहीं घातलें चि पल्याण. ३०
आम्हांप्रति एकांतीं पूर्वीं जें बोलिका गदाधर तो
चलसौहृद बहुवल्लभ तें स्ववचन काय नायक स्मरतो? ३१
'स्मरुनि मला आणाया पाठविलें,' म्हणसि जरि अरे! परिस,
रे! क्षुद्राच्या दूता! भेटों जावें किमर्थ त्या हरिस? ३२

१. सेविलेले. २. कमलशोभाविहीन. ३. शुभ्र किंवा निर्दोष आहेत दोन बाजूचे पंख किंवा उभय कुलें ज्यांची असे. ४. पक्षी, ब्राह्मण. ५. खोगीर, ६. अस्थिर प्रीति ज्याची. ७. बहु स्त्रिया ज्याला.

जरि कामार्थ वहातो म्हणसी, तद्भाषणें चि बहु गोडें,
विश्वास नये आम्हां; त्याच्या बोलांत सत्य बहु थोडें. ३३
वारंवार अनादर साहे, धारि पाय इंदिरा देवी,
तें आम्हां पुरवेना; कोण अनादृत सुधेसि ही सेवी? ३४
आम्हीं मानवती कां येऊं? त्याला चि आण जा, जरि तो
इच्छित असेल, येइल; येतां संकोच कांत कां करितो? ३५
रे! रे! मराल! ये ये, पुनरपि तुज सांगणें असे कांहीं,
श्रीला घेउनि येइल तरि त्याचें कार्य या जनीं नाहीं. ३६
आम्हां सतींस वंचुनि, तीसीं रमतो, न तो भला, खोटा.
आम्हीं च कुळवतीनीं ऐसा अपराध साहिला मोटा. ३७
म्हणसी, 'तदेकनिष्ठा श्री, शक्य नसे तिचा क्षण त्याग,'
हंसा! प्रियंवद चि तूं, परि आला या त्वदुक्तिचा राग. ३८
श्रीकृष्णचरणपद्मीं निष्ठा श्रीची च? आमुची नाहीं?
आम्हां सर्वांमध्यें अनुरक्ता ती? न या तशा कांहीं? ३९
रे! मुग्धा दुग्धाभा! हंसा! संसार सार यद्दास्यें
श्रीची च परम निष्ठा त्या कृष्णीं, वदसि हें कसें आस्यें? ४०
वर्णावें काय किति? प्रेम प्रभुपद[1]पयोरुडलिनींचें
शूरकुल[2]कमलसूरश्रीपतिपादैकभव्यनलिनींचें." ४१
कीर्ति श्रीपतिची च सज्जन सदा सप्रेम आकर्णिती,
सर्वस्तुत्य कवींद्र शौरिचरितें अत्यादरें वर्णिती;
'गावें नित्य मुकुंदसद्यश यथाबुद्धि त्यजूनि त्रपा,'
ऐसें सांगति, पाजिती हितसुधा विद्वत्सभा सुप्रपा[3]. ४२
ते आज्ञा स्वशिरीं धरूनि, भगवद्भक्तप्रिया सत्कथा
श्री[4]रामात्मज साधुशिष्य वदला सोडूनि सर्व व्यथा;

---

१. प्रभुपदरूप कमलांतील भ्रमरींचें. २. शूरकुलरूप कमलांचा सूर्य जो श्रीपति त्याचे चरण हें च मुख्य कल्याण ज्यांचें अशा कमलिनी (गोपिका) त्यांचें. ३. पाणपोयी. ४. रामाजीपंत पराडकरांचा पुत्र मयूरकवि.

हें मानेल निजप्रसादमुखरच्छात्रोक्त साधुव्रजा
  जैसें शिक्षित कीरभाषण रुचे, कीं जें वदे स्वप्रजा. ४३
प्रेमा कैसा किती हा पटु अपटु असे कीं नसे दंभ गर्व,
  श्रीमद्विश्वात्मसाक्षी तदनुग जन ही जाणती भाव सर्व;
जाणे हृष्टा मयूरा घनसमय, चकोरा हि राकाख्यपर्व,
  होता साधूपमन्यु प्रणत तरि च दे त्यासि दुग्धाब्धि शर्व. ४४
पद्माकांतपदीं च ' कृष्णविजय 'ग्रंथांबुजन्मांजळी
  भावें वंदुनि अर्पिला; हरिजनामध्यें किती जे अळी,
ते याचा रस सेवितील चि, शिरीं वाहेल सन्मंडळी,
  हा स्वस्वामिपदप्रसाद, खळ तों भीतील जैसा कळी. ४५
श्रीकृष्णा! दीनबंधो! स्वजनसुरतरो! पावना! देवदेवा!
  जन्मींजन्मीं स्वलीलाग्रथनकथन हे दे मयूरासि सेवा;
साधुश्रोते गुणज्ञ क्षितिवरि मुदितस्वांत नांदोत अन्य
  त्वद्भक्तिश्रेष्ठभाग्यें खळ हि बुधसभामान्य होवूत धन्य. ४६

इति श्रीमत्कृष्णविजये श्रीरामनंदनमयूरकृतौ नवतितमोऽध्यायः

श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ शुभमस्तु ॥

कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा बुद्ध्याऽऽत्मना वाऽनुसृतस्वभावात् ।
करोमि यद्यत्सकलं परस्मै नारायणायेति समर्पयामि ॥ १ ॥

श्रीराम जयराम जयजयराम ॥ श्रीरामःशरणम् ॥

---

• आज्ञेच्या प्रसादामुळें बोलका झालेला जो शिष्य मयूर त्याचे बोल. २. पर्व. ३. ग्रंथरूप कमलांची ओंजळ.

# कृष्णविजय
# शुद्धिपत्र.

| पृष्ठ-पांक्ति. | शुद्ध. |
|---|---|
| ३।२६ | शेष. |
| ९।२० | ५. सूर्य. |
| १२।२३ | ३. लोकामध्यें. |
| १६। ४ | दुंदुभिच्या |
| १९।२३ | प्रचंडतेनें |
| २९।२६ | चैतन्यरूप |
| ४१। ८ | ध्यावा |
| ४१।१२ | चालवि संसार |
| ४६।१२ | त्वंद्विरदसंज्वर० |
| ५८।२५ | नुसती. २६ |
| ५८।२२ | भवभय |
| ६९।१५ | नयनतुझे ( ? ) |
| ६९।२१ | गोडी |
| ७२।२४ | ग्रहण |
| ७३। ८ | तथशार्थप्रकल्पितासंभारीं |
| ७१।१३ | सपशुवृंद |
| ९१।११ | अलिकुलपरिवृत |
| १०४।२४ | ( पोपकाचा ) |
| १०९। ६ | हिंडे ( ? ) |
| १०९।२३ | सौंदर्य |
| ११६।२१ | अनाचरणा; |
| १२५।२३ | शंकरादिकानीं. |

| पृष्ठ-पांक्ति. | शुद्ध. |
|---|---|
| १२६।२४ | निरपराध. |
| १२६।२५ | ज्यास |
| १२८।१८ | म्हणती, |
| १२९। ३ | सुलाभसंदोहाचे ( ? ) |
| १३०।१२ | गुरुपितृपतिसुत होतें |
| १३३।१७ | तव सदना ( ? ) |
| १४१।२४ | ताठा ). |
| १४४। २ | नृपपदींहुनीं |
| १४४। ९ | धरिला. |
| १४४।२१ | सिंहासारखा |
| १४४।२३ | तुलना न |
| १४५। ३ | धांवले |
| १४९।१२ | पंदे मुंदुदधि |
| १५३।२६ | १८. सूर्यापासून |
| १५९।१५ | सप्रेमाकोपांचे |
| १६५। २ | ०दलाग्रांबु० |
| १६५।१९ | गौर्यांस्तित्क्तुंब्यामपि |
| १६६। ५ | बहुसुकृतीं |
| १६६।२५ | हें वस्त्रांचें |
| १७०। ६ | संमीहित |
| १७५।२७ | ११. युक्ति, मर्म. |
| १९६। २ | घेऊनि |

| पृष्ठ-पंक्ति. | शुद्ध. |
| --- | --- |
| १९७।२१ | [६]प्रस्थानीं |
| २०१।२३ | हास्यानें ( ? ) |
| २२२।२७ | शोकानें |
| २२३।२४ | जन्हीं |
| २२५। २ | कुमंत्रीं |
| २२५।१५ | ज्या, तथापि |
| २२७। ९ | वातवर्षें ( ? ) |
| २२९। ८ | वदतोसि |
| २३३।२२ | ०क्लस० |
| २३९।१७ | धरिलें, परि बैल |
| २४६।२६ | शृंगाररस |
| २४८।२१ | २. भोळा. |
| २५०।२२ | ७. पत्नी पोटीं |
| २५३।२३ | ला=ल्या. |
| २५५।२० | सदनामाजि |
| २५९।२२ | हृदयहर[११]गुणें |
| २७०।१० | असें |
| २७४।१० | ३७ |
| २७५।२० | पौंड्रक |
| २७८।२१ | कोटिसंवत्सरीं |
| २८२। ३ | ०रिपु० |
| २८९।११ | तैं |
| २८९।१८ | कुर्वंरण्य |
| २९०।१० | कुशस्थळीहुनि |
| २९३। २ | सु[१]हृन्मंतु |

| पृष्ठ-पंक्ति. | शुद्ध. |
| --- | --- |
| २९३।२८ | चरणकमलधूलि |
| ३००।१८ | मन्नामें |
| ३०१।२४ | सप्ताधिकशतांशव |
| ३०१।२४ | चतुरशीत्यग्रसहस्राणि |
| ३०३।२८ | कुशल |
| ३०७। ५ | घात |
| ३०८।२० | मं[०]दार |
| ३०९।२५ | तेधवां |
| ३१८।२४ | विषयैकदृष्टि |
| ३२२। ४ | बुधजनहृदयें |
| ३२९।२८ | यास क्रौंचारि |
| ३३७।१८ | प्रभुशिरीं |
| ३४२।१८ | [१०]तीं |
| ३४७। ९ | द्वारवतीस |
| ३५६।२४ | मेरौधर्मः ( ? ) |
| ३६०।२३ | क्षारसागरीं ( ? ) |
| ३७४।२२ | ( सुदेवाला |
| ३७८।२६ | ३. रणभूमीहून |
| ३८५। ९ | कोटी. १७२ (पुढील सर्व पद्यांक एकानें अधिक). |
| ३९०।२६ | ठेविली |
| ३९७। ८ | [६]हा |
| ३९८।१४ | ब्रह्मण्य |
| ४०६।१० | मानससरोवरींचें |
| ४०८।१६ | ०पुररक्षण० |